# श्रीज्ञानेश्वरी-गूढार्थदीपिका




गीताप्रेस, गोरखपुर

॥ श्रीज्ञानेश्वर माउली समर्थ॥

# अध्याय सातवा

अवतरणिका—योगमार्गाने परमेश्वराचा साक्षात् अनुभव घेतला, तरी प्रारब्धाने व्युत्थान झाल्यावर जडसृष्टि भासूं लागते आणि त्या दशेंत बुद्धि परमेश्वराकार न राहतां, विषयाकार होते.

वास्तविक, परमेश्वर व्यापक असल्यामुळें तो जसा आत आहे तसा बाहेरहि आहे. त्यावांचून दुसरी वस्तुच नाही. योगानें जगरहित केवळ अद्वैतपरमेश्वराचा, आत अनुभव घेतल्यानंतर, बाहेरहि तसाच अनुभव येण्याकरितां, व्युत्थानकालीं येणाऱ्या विषयांचा अनुभव नाहीसा व्हावयास पाहिजे व तो येण्याकरितां बाहेरच्या विषयरूप जगताचा देखावा, खोटा किंवा भ्रमरूप आहे, असें कळणें आवश्यक आहे.

भगवंताचे ठिकाणीं खऱ्या किंवा खोट्या जगताचें अस्तित्वच सिद्ध होत नाही व सर्वत्र एक परमात्माच अनुभवाला येतो. असें असूनहि जीव जगत् पाहतो व खरें समजतो. जगताचा प्रत्यय नाहिसा होऊन केवळ अद्वैतब्रह्मस्वरूपाचा प्रत्यय जीवाला यावा, म्हणून प्रपंचासहित ज्ञानरूप परमेश्वराचें निरूपण करीत, ज्ञानाने जगत् मिथ्या ठरवावें आणि ज्ञानानंतर सगुणभगवंताच्या प्रेमभक्तीने, जगताचा मिथ्या भासहि नाहीसा करावा, असें या अध्यायांत श्रीभगवान अर्जुनाला सांगत आहेत.

*श्रीभगवानुवाच*

**मय्यासक्तमनाः पार्थ योगं युञ्जन्मदाश्रयः। असंशयं समग्रं मां यथा ज्ञास्यसि तच्छृणु॥ १॥**
**ज्ञानं तेऽहं सविज्ञानमिदं वक्ष्याम्यशेषतः। यज्ज्ञात्वा नेह भूयोऽन्यज्ज्ञातव्यमवशिष्यते॥ २॥**

**अर्थ**—श्रीभगवान म्हणतात, अर्जुना! माझ्या सगुण स्वरूपाचे ठिकाणीं चित्त, प्रेमाने आसक्त करून माझाच आश्रय करून, ऐक्यरूपी योग साधला असतां, माझ्या संपूर्ण ऐश्वर्यसंपन्न स्वरूपाला ज्या रीतीने तूं निःसंशय जाणूं शकशील तें सांगतो, ऐक. ॥ १ ॥ मी आतां विज्ञानासहित संपूर्ण ज्ञान तुला सांगतों, जे ज्ञान जाणलें असतां, पुनः जाणावयाचें कांही राहत नाही. ॥ २ ॥

**आइकां मग तो श्रीअनंतु। पार्थातें असे म्हणतु। पैं गा तूं योगयुक्तु। जालासि आतां॥ १॥**

**अर्थ**—श्रोते हो! पुढे ऐका. मग तो भगवान श्रीकृष्ण अर्जुनाला म्हणतो की अर्जुना! तूं आता खरोखर योगयुक्त झाला आहेस. ॥ १ ॥

**गूढार्थदीपिका**—एकच परमात्मा सगुण व निर्गुण आहे. निर्गुणस्वरूप जेवढें शुद्ध आहे, तेवढेंच भगवंताचें सगुणस्वरूपहि शुद्ध आहे, हें मागें सहाव्या अध्यायांत श्रीज्ञानेश्वर माऊलींनी सांगितलेंच आहे; म्हणून भगवंताच्या सगुणस्वरूपाचे ठिकाणीं, ज्या अर्जुनाचें, प्रेम असल्यामुळे, चित्त स्थिर झालें होतें, तो अर्जुन योगयुक्त होता यांत शंकाच नाही.

**मज समग्रातें जाणसी ऐसें। आपुलिया तळहातींचें रत्न जैसें। तुज ज्ञान सांगेन तैसें। विज्ञानेंसी॥ २॥**

**अर्थ**—ज्याप्रमाणे तळहातांत असलेलें रत्न आपण संपूर्ण पाहूं शकतो, त्याप्रमाणे तूं मला ज्या ज्ञानाने संपूर्ण जाणशील, तें ज्ञान मी आता तुला विज्ञानासह सांगणार आहे. ॥ २ ॥

**गूढार्थदीपिका—मज समग्रातें जाणसी ऐसें**—अत्यंत अद्वैत परमेश्वराचे ठिकाणीं, त्याहून दुसरें कांहीच नसल्यामुळें "तें हें आघवेचि मी द्रष्टा। ऐसिया बोधाचा माजिवटा। अनुभवाचा सुभटा। धेंडा तो नाचे"(ज्ञा. अ. १८-११८७) जे कांही सगुण निर्गुण अनुभवाला येतें, तें सर्व पूर्ण ब्रह्मच आहे, असें जाणणें, तें समग्र परमेश्वराला जाणणेंच होय, असें परमेश्वराला संपूर्ण जाणणें, हें ज्ञानविज्ञानाच्या विचारानेच होऊं शकतें.

**एथ विज्ञानें काय करावें। ऐसें घेसी जरी मनोभावें। तरी पैं आधीं जाणावें। तेंचि लागे॥ ३॥**

**अर्थ**—येथें विज्ञानाचा काय उपयोग आहे असें तुला वाटेल. पण तेंच अगोदर जाणलें गेलें पाहिजे.॥ ३॥

**गूढार्थदीपिका**—विज्ञान म्हणजे प्रपंचज्ञान. हें प्रपंचाचें ज्ञान, प्रपंचांत नानाप्रकारचे पदार्थ, नानागुणधर्मांने नटलेले आहेत, अशा रीतीने आपल्याला होतें. एका अद्वैत सच्चिदानंद परमात्मवस्तूचे ठिकाणीं, जडविनाशी अशा नाना प्रकारच्या विशेष पदार्थाचें ज्ञान होणें हेंच प्रपंचज्ञान होय. अर्थात् असा प्रपंच, अद्वैतस्वरूपाचे ठिकाणीं अस्तित्वांत असणेंच शक्य नसल्यामुळें तो भ्रमरूप आहे, असें ज्ञानाने कळून आल्यावर, सर्वच विज्ञानरूप प्रपंच केवळ ज्ञानरूप आहे, असें अनुभवाला येतें. म्हणून आधीं विज्ञानरूप प्रपंचाचा विचार करावा लागतो; हें 'तरी पैं जाणावे। तेचि लागे'' या चरणांनी माऊलींनी दाखविलें आहे. ''**तरंगफेनभ्रमबुदबुदादि सर्वं स्वरूपेण जलं यथा तथा। चिदेव देहाद्यहमन्तमेतत् सर्वं चिदेवैकरसं विशुद्धम्**''॥ ३९१॥ (विवेक चूडामणि) असा आचार्यांनीहि आपला या श्लोकांत अनुभव सांगितला आहे. श्री ज्ञानेश्वरमाऊलींनीहि पुढें याच अध्यायांत हा भाव ''हे समस्तहि श्रीवासुदेवो। ऐंसा प्रतीतीरसाचा ओतला भावो।'' या ओवींत सांगितला आहे.

**मग ज्ञानाचिये वेळे। झांकती जाणिवेचे डोळे। जैसी तीरीं नाव न ढळे। टेकलीसांती॥ ४॥**
**तैसी जाणीव जेथ न रिघे। विचार मागुता पाउलीं निघे। तर्कु आयणी नेघे। आंगीं जयाचां॥ ५॥**
**अर्जुना तया नांव ज्ञान। येर प्रपंचु हें विज्ञान। तेथ सत्यबुद्धि तें अज्ञान। हेंही जाण॥ ६॥**
**आतां अज्ञान अवघें हरपे। विज्ञान निःशेष करपे। आणि ज्ञान तें स्वरूपें। होऊनि जाइजे॥ ७॥**

**अर्थ**—ज्याप्रमाणे नदीच्या कांठाला लागलेली नाव अढळ राहते, त्याप्रमाणे ज्ञान प्राप्त झालें असतां जाणीवच उरत नाही.॥ ४॥ जें जाणीवेने जाणतां येत नाही, जेथें विचार मागल्या पायींच परततो, तर्क ज्याच्या स्वरूपापर्यंत पोहोचत नांही॥ ५॥ त्याला ज्ञान म्हणतात व बाकीचा नामरूपात्मक प्रपंच म्हणजे नाना प्रकारच्या विशेष वस्तूंचें विशेष ज्ञान, हें विज्ञान होय आणि या प्रपंचाचे ठिकाणीं जी सत्यबुद्धि तिला अज्ञान म्हणतात.॥ ६॥ अज्ञान निःशेष नाहीसें होऊन, विज्ञानहि निःशेष वाळून गेले पाहिजे आणि आपण केवळ ज्ञानरूप होऊन राहिले पाहिजे.॥ ७॥

**गूढार्थदीपिका—अज्ञान अवघें हारपें**—''न चेयं परमार्थविषया सृष्टिस्थितिः'' (ब्र. सू०. २-१-३३) प्रपंच नांवाची एक वस्तु परमेश्वरापासून निर्माण झाली आहे व ती सत्य आहे असे जें वाटतें तें अवघें अज्ञान होय. तें संपूर्ण नाहिसे झालें पाहिजे असें श्रीज्ञानेश्वर माऊलीचें म्हणणें असून ''आत्मन आकाशः संभूतः। आकाशाद्वायुः'' आत्म्यापासून आकाश झालें, आकाशापासून वायु झाला अशी सृष्टीची उत्पत्ति सांगणारी श्रुति खरोखरच परमेश्वरापासून सृष्टि झाली, असें सांगत नाही. ''ब्रह्मात्मभावप्रतिपादनपरत्वाच्चेत्येतदपि नैव विस्मर्तव्यम्'' कारणापासून होणारें कार्य आपल्या कारणाशीं अभिन्न असतें किंवा कारणरूपच असतें; म्हणून सच्चिदानंद ब्रह्मापासून झालेलें जगद्रूप कार्यहि पूर्ण ब्रह्मस्वरूप आहे, असें प्रतिपादन करण्याच्या उद्देशाने परब्रह्मापासून सृष्टि झाली, असा सृष्टीचा व परब्रह्माचा कार्यकारणभाव श्रुतीने प्रतिपादन केला आहे, हेहि कोणी विसरूं नये असें आचार्यहि म्हणतात.

**विज्ञान निःशेष करणे**—अज्ञान निःशेष नाहीसें झालें म्हणजे विज्ञान—म्हणजे नामरूपांचा अनेक भिन्न भिन्न पदार्थाचे रूपाने दिसणारा संपूर्ण नामरूपात्मक विशेषभाव-निःशेष नाहीसा होतो, हा विशेषभाव, वास्तविक परब्रह्माचे दृष्टीने नाही, जीवच त्याची कल्पना करतो; कारण हा विशेषभाव, ''विशेषरूपं चिद्रूपं जडरूपं वा भवेत्'' (सूत सं. य. वै. खं. अ. १९ श्लो. २१-२२), वास्तविक असेल तर तो जडरूप किंवा चेतनरूप यापैकीं कोणत्या तरी रूपाने मानावा लागेल.

चिद्रूप मानल्यास तो साक्षीस्वरूपच ठरणार व साक्षीस्वरूप सामान्य (स्वरूप) असल्यामुळें विशेषभावरहित आहे, म्हणून विशेषभाव सिद्ध होणार नाही आणि विशेषभाव जडरूप मानल्यास, चिद्रूपसाक्षीस्वरूपाहून त्याचें स्वतंत्र अस्तित्व सिद्ध होऊं शकत नाही; म्हणून अद्वैत सम अशा ब्रह्मवस्तूचा विचार केला असतां विशेषभाव हा काल्पनिक ठरतो.

सारांश, नामरूपात्मक सगुणप्रपंच विशेषभावरहित सामान्यसच्चिदानंदादस्वरूपच आहे असें कळून आल्यावर प्रपंच म्हणून वस्तुच राहात नाही.

**ज्ञान तें स्वरूपें होऊनि जाइजे**—"नाप्रतीतिस्तयोर्बाधा किंतु मिथ्यात्वनिश्चयः"॥ १३॥ (पंचदशी तृ. दी.) दोरीवर दिसणाऱ्या सर्पाची ज्याप्रमाणे नामरूपासह निवृत्ति होते, त्याप्रमाणे अज्ञान भ्रमजन्य प्रपंचाची निवृत्ति नामरूपासह होत नाही. ती नामरूपें मिथ्या आहेत, म्हणजे परब्रह्माहून निराळी नाहीत, ब्रह्माहून त्यांचा निराळेपणा खोटा आहे, असा निश्चय होतो व नामरूपे परब्रह्मावर भासतात असें सांगून "निवृत्त एवं यस्मात्ते तत्सत्यत्वमतिर्गता। ईदृङ्निवृत्ति रेवात्र बोधजा नत्वभासनम्॥ ४६॥ (पंचदशी अद्वैतानंद प्र.) परब्रह्माच्या अद्वैतसत्तेवर व्यक्त होणारीं नामरूपें परब्रह्माहून निराळी सत्यरूप जगद्वस्तु आहे, असा जो त्याच्या सत्यत्वाचा व स्वतंत्रत्वाचा भास होतो तो नाहिसा होणे, असेंच ज्ञानाने होणाऱ्या अज्ञानाच्या निवृत्तीचें स्वरूप आहे; असें विद्यारण्यांनी सांगितले आहे.

अर्थात् ज्ञानाने प्रपंचाविषयीचें सत्यत्वबुद्धिरूप अज्ञान नाहिसें होऊन-म्हणजे प्रपंचाचा नाश होऊन-सर्व नामरूपात्मक प्रपंच सच्चिदानंदरूप पूर्ण ब्रह्मच आहे, असा अनुभव येतो. हेंच "ज्ञान तें स्वरूप। होऊनि जाइजे" या चरणाने माऊलींनी सांगितलें आहे.

"**न विश्वं नाम पुरुषादन्यत्किंचिदस्ति**" (मुं. उ. २-१-१० भाष्य) "**किंबहुना ब्रह्मैवेदं विश्वं समस्तमिदं जगद्वरिष्ठं वरतमम्**" (मुं. उ. २-२-१२ भाष्य) असेंच श्रुतीत व त्यावरील भाष्यांतहि सांगितलें आहे.

**जेणें सांगतयाचें बोलणें खुंटे। ऐकतयाचें व्यसन तुटे। हें जाणणें सानें मोठें। उरों नेदी॥ ८॥**

**अर्थ**—ज्या ज्ञानाचा अनुभव आल्यावर सांगणाऱ्याला त्याच्या पलीकडे सांगण्याजोगें राहत नसल्यामुळे त्याचें सांगणेच बंद पडते, ऐकणाऱ्याचें ऐकण्याचें व्यसनहि नाहीसें होतें व जे ज्ञान लहान मोठे हा भिन्न भाव उरूं देत नाही. ॥ ८ ॥

**गूढार्थदीपिका**—सर्व द्रष्टा दृश्य यांचे ठिकाणीं ज्ञान्याची एक अद्वैत सच्चिदानंद ब्रह्मदृष्टिच होते. त्याला ब्रह्माशिवाय कांही दिसतच नाही असा भाव. ब्रह्मणोऽन्यत् सदा नास्ति वस्तुतोऽवस्तुतोऽपिच। तथा सति शिवादन्यत्कथं पश्यति तत्त्ववित्॥ ५५॥ (सू. सं. य. वै. खं. अ. ४) जर अद्वैत परब्रह्माहून दुसरी निराळी अशी, सत्य किंवा मिथ्या वस्तुच नाही, तर ज्ञानीपुरुष परब्रह्माहून अन्य काही आहे असे कसा पाहूं शकेल? असें सूतसंहितेतहि म्हटले आहे.

**ऐसें वर्म जें गूढ। तें किजेल वाक्यारूढ। जेणें थोडेनि पुरे कोड। बहुत मनींचें॥ ९॥**

**अर्थ**—असें जे गुप्त ज्ञानरहस्य आहे ते आतां शब्दाने तुला सांगतों. ते थोडेहि प्राप्त झाले असतां मनातील सर्व इच्छा पूर्ण होऊन मन निरिच्छ होते. ॥ ९ ॥

**मनुष्याणां सहस्रेषु कश्चिद्यतति सिद्धये । यततामपि सिद्धानां कश्चिन्मां वेत्ति तत्त्वतः॥ ३॥**

अर्थ—हजारो मनुष्यांत एखादाच परमेश्वरप्राप्तीचा प्रयत्न करतो व अशा प्रयत्न करणाऱ्यांमध्ये एखादाच पुरुष मला यथार्थपणे जाणतो. ॥ ३ ॥

**पैं गा मनुष्यांचिया सहस्रशां-। माजि विपाइलेयाची येथ धिंवसा। तैसेयां धिंवसेकरां बहुवसां। माजि विरळा जाणे॥ १० ॥**
**जैसा भरलेया त्रिभुवना। आंतु एकएकु चांगु अर्जुना। निवडूनि कीजे सेना। लक्षवरी॥ ११॥**
**कीं तयाही पाठीं। जे वेळीं लोह मांसातें घांटी। ते वेळीं विजयश्रियेचां पाटीं। एकुचि बैसे॥ १२॥**
**तैसे आस्थेच्या महापुरीं। रिघताति कोटिवरी। परी प्राप्तीच्या पैल्तीरीं। विपाइला निगे॥ १३॥**
**म्हणऊनि सामान्य गा नोहे। हें सांगता वडिल गोठी गा आहे। परी तें बोलों येईल पाहें। आतां प्रस्तुत ऐकें॥ १४॥**

**अर्थ**—खरोखर अर्जुना! हजारों मनुष्यामध्ये क्वचित् एखाद्याचेच ठिकाणीं आत्मप्राप्तीकरीतां धैर्य दिसून येते आणि अशा पुष्कळ धैर्यवानांपैकीं एखादाच मला जाणतो. ॥ १० ॥ ज्याप्रमाणे मनुष्याने भरलेल्या त्रैलोक्यांतून एक एक धडधाकट धैर्यवान निवडून, लक्षावधि सेना उभारली जाते. ॥ ११ ॥ पुनः त्यांतहि युद्धांत शस्त्राचे शरीरावर

लागणारे घावापाठी घाव धैर्याने सहन करून एखादाच शूर, विजयश्री संपादन करतो. ॥ १२ ॥ त्याप्रमाणे परमेश्वरप्राप्तीच्या आस्थेच्या महापुरांत कोट्यावधि लोक शिरतात म्हणजे अनेक लोक परमेश्वर प्राप्तीची इच्छा करतात, पण प्राप्तीच्या पलीकडील तीरावर एखादाच जातो—म्हणजे एखादाच परमेश्वरप्राप्ति करून घेतो. ॥ १३ ॥ म्हणून परमेश्वरप्राप्तीचा परमार्थमार्ग सामान्य—म्हणजे कोणीहि सहज करून घेऊ शकतो असा-नाही. परमेश्वरप्राप्ति होणे कठीण आहे, ते पुढे सांगतां येईल. सध्या हें ऐक. ॥ १४ ॥

**गूढार्थदीपिका—सामान्य गा नोहे। हें सांगतां वडिल गोठि गा आहे**—जीवाच्या ठिकाणीं मूळांतच आत्मविस्मृतिरूप अविद्यादोष असून, त्यामुळें त्याच्या ठिकाणीं 'देह म्हणजे मी' असा आत्मसुखाचा विसर पडून, विषयसुखाची दृढ वासना उत्पन्न झाली आहे आणि या विषयवासनेमुळे होणाऱ्या पापकर्माने त्याची बुद्धि मंद होऊन विचारहीन झालेली आहे.

परमेश्वर प्राप्तीकरितां शास्त्रैकनिष्ठेनेच निष्कामकर्म करून, भगवदाज्ञापालनरूप भगवंताची भक्ति केली असतां, जीव निष्पाप होऊन, वैराग्यसंपन्न होतो व मग त्याची बुद्धि आत्मविचार करण्याजोगी शुद्ध होते व त्यायोगें त्याला परमेश्वर प्राप्ति होते. अशी भगवंताची प्राप्ति करून घेण्याकरितां एखादाच प्रयत्न करतो व कृतार्थ होतो; म्हणून परमार्थमार्ग थोर आहे व कठीण आहे.

**भूमिरापोऽनलो वायुः खं मनो बुद्धिरेव च। अहंकार इतीयं मे भिन्ना प्रकृतिरष्टधा॥ ४॥**
**अपरेयमितस्त्वन्यां प्रकृतिं विद्धि मे पराम्। जीवभूतां महाबाहो ययेदं धार्यते जगत्॥ ५॥**

**अर्थ**—पृथ्वी, आप, तेज, वायु, आकाश, मन, बुद्धि आणि अहंकार अशी आठ प्रकारची, भिन्न भिन्न झालेली प्रकृति हीच अपरा किंवा कार्यप्रकृति होय. ॥ ४ ॥ हे महाबाहो अर्जुना! जिने जगत् धारण केलें ती जीवभूत प्रकृति म्हणजे पराप्रकृति होय, असें जाण. ॥ ५ ॥

**तरी अवधारीं गा धनंजया। हे महदादिक माझी माया। जैसी प्रतिबिंबे छाया। निजांगाची॥ १५॥**

**अर्थ**—अर्जुना! आता लक्ष दे. हे बुद्ध्यादि आठ पदार्थ माझी माया आहे. आपल्या आंगची सावली जशी भासमात्र असते त्याप्रमाणे ती आहे. ॥ १५ ॥

**गूढार्थदीपिका—हे महदादिक माझी माया**—"कापुसापासोनि होय दोरा। परी तो कापूसचि खरा। तैसे मनबुद्धिचित्तअहंकारा। होणे स्वरूपापासूनि" या मुकुंदराज महाराजांच्या वचनाप्रमाणें दोरा हें नांव व त्या नांवाने दाखविलेलें रूप किंवा आकार हे दोन्ही जसे कापूस या वस्तूचे ठिकाणीच असतात, त्याप्रमाणें पृथ्वी, आप, तेज, वायु इत्यादि नांवे व नांवानी दाखविलेली रूपें हीं दोन्ही अधिष्ठानभूत परब्रह्मवस्तूचे ठिकाणींच प्रगट होतात, म्हणून भूम्यादि सर्व नामरूपाने एक परब्रह्मवस्तूच व्यक्त झाली आहे. पण या नामरूपामुळें जीवाला भ्रम होऊन तो, त्या भिन्न वस्तु समजतो; म्हणून भूम्यादिकांना श्रीज्ञानेश्वर महाराजांनी "माया" म्हटलें आहे.

**प्रतिबिंबे छाया। निजांगाची**—मनुष्याची पडलेली छाया जशी भासमात्र असते तसे भूम्यादिकाचे परब्रह्माहून भिन्न वस्तुत्व सर्व भासमात्र किंवा खोटे आहे असा अर्थ.

**आणि इयेतें प्रकृति म्हणिजे। जे अष्टधा भिन्न जाणिजे। लोकत्रय निपजे। इयेस्तव॥ १६॥**

**अर्थ**—हिला प्रकृति म्हणतात. ती आठ प्रकारची, परस्परांहून भिन्न आहे. हिच्यापासून संपूर्ण त्रैलोक्य उत्पन्न होतें. ॥ १६ ॥

**गूढार्थदीपिका—इयेतें प्रकृति म्हणिजे**—प्रकृति म्हणजे कारण. ह्या भ्रमजन्य महदादिक वस्तूपासूनच सर्व कार्यरूप ब्रह्मांड निर्माण होते; म्हणून या आठ वस्तूंना अपराप्रकृति असे येथें म्हटलें आहे. अपर म्हणजे त्या कार्यरूप किंवा उत्पन्न होणाऱ्या असून, प्रकृति म्हणजे त्या पुढील सर्व स्थूल भूतसृष्टीचें कारण आहे.

सांख्यशास्त्रांतहि मन सोडून राहिलेल्या महत्, अहंकार व पंचतन्मात्रा "प्रकृतिविकृतयः सप्त" या सात पदार्थांना प्रकृतिविकृति म्हटलें आहे. विकृति म्हणजे मूळ प्रकृतीचें कार्य व प्रकृति म्हणजे स्थूलभूत सृष्टीचें कारण

असा अर्थ. येथे भगवंतांनी व श्रीज्ञानेश्वर माऊलींनी, वेदान्ताशीं विरोध न येऊं देतां, सांख्यप्रक्रियाच मांडली आहे आणि महदादिक आठ पदार्थ माया म्हणजे भ्रमजन्य आहेत असें म्हणून, स्थूल सूक्ष्म सर्व ब्रह्मांड भ्रमाचा पसारा आहे, असें सूचित केलें आहे.

**हे अष्टधा भिन्न कैसी। ऐसा ध्वनि धरिसी जरी मानसीं। तरी तेचि गा आतां परियेसीं। विवंचना॥ १७॥**
**आप तेज गगन। मही मारुत मन। बुद्धि अहंकार हे भिन्न। आठै भाग॥ १८॥**
**आणि या आठांची जे साम्यावस्था। ते माझी परम प्रकृति पार्था। तिये नाम व्यवस्था। जीवु ऐसी॥ १९॥**

**अर्थ**—ही आठ प्रकाराने भिन्न असलेली प्रकृति कोणती आहे, अशी तुला जाणण्याची इच्छा होईल, तर तेंच आतां स्पष्ट करून सांगतो, ऐक. ॥ १७॥ पृथ्वी, आप, तेज, वायू, आकाश, मन, बुद्धि व अहंकार हे तिचे आठ भिन्न भिन्न भाग आहेत. ॥ १८॥ आणि या आठ पदार्थांची जी साम्यावस्था म्हणजे अव्यक्तदशा, ती माझी परम प्रकृति म्हटली जाते. तिला जीव हें नांव आहे. ॥ १९॥

**गूढार्थदीपिका—आठांची जी साम्यावस्था**—ज्या अवस्थेंत कोणत्याहि कार्यभूत पदार्थाची विशेषभावाने प्रतीति येत नाही, तिला त्या पदार्थाची साम्यावस्था म्हणतात. हिलाच पदार्थाची कारणावस्था किंवा अव्यक्त अवस्था अशीहि नांवें आहेत. जीवाने मानलेले महादादिक पदार्थ प्रथम साम्यावस्थेंत किंवा अव्यक्त असतात. मूळांत वस्तु एक रूपाची असून, भ्रमाने ती भलत्याच प्रकारची दिसण्यापूर्वी, ज्या साम्यावस्थेंत म्हणजे विशेषरहित अवस्थेंत असते, ती अवस्था म्हणजे मूळ वस्तूचें अज्ञानच असणार. म्हणून येथें सच्चिदानंदस्वरूपाचे ठिकाणी भ्रमाने महदादिक पदार्थाचा भास होण्यापूर्वी ते महदादिक पदार्थ ज्या साम्यावस्थेंत होते ती साम्यावस्था म्हणजे सच्चिदानंदस्वरूपाचें अज्ञानच होय.

**तिचे नाम व्यवस्था जीव ऐसी**—सर्व ब्रह्मांडाचें साम्यावस्थारूप जें मूळ कारण आहे, तें कारण म्हणजे जीव होय, असें माऊलीनी येथे म्हटलें आहे याचा अर्थ असा आहे की ''अज्ञानप्रतिबिंबचैतन्यं जीव:'' ब्रह्मस्वरूपाचें जें अज्ञान, त्यांत प्रतिबिंबित झालेलें चैतन्य तो जीव होय, असें वेदान्तशास्त्रांत म्हटलें आहे, म्हणजे चैतन्य व अज्ञान यांचा संबंध ही जीवदशा होय. जीवांतील चैतन्यांश जड विनाशी नसल्यामुळें तो जड विनाशी अशा महादादिकाची प्रकृतिरूप साम्यावस्था होऊं शकत नाही. कारण समानधर्मियांचाच कार्यकारणभाव सिद्ध होत असतो. विषमधर्मियांचा कार्यकारणभाव सिद्ध होत नाही. म्हणून ज्या अज्ञानांत प्रतिबिंबित झाल्यामुळें चैतन्याला जीवसंज्ञा प्राप्त झाली तें अज्ञानच महदादिक पदार्थाची साम्यावस्था होय, असें मानावें लागतें. आणि हेंच ''तिये नाम व्यवस्था जीव ऐसी'', या चरणाने माऊलींनी सुचविलें आहे.

वेदान्तातहि परब्रह्मस्वरूपाचें अज्ञान, हें सर्व जडविनाशी जगत्प्रतीतीला कारण आहे असेंच मानलें आहे. वेदान्तात जीव एक आहे व जीव अनेक आहेत असे दोन वाद आहेत. अज्ञान एक आहे व त्यांत प्रतिबिंबित किंवा तदुपहित चैतन्यरूप जीव एक आहे असा एकजीववाद्यांचा सिद्धान्त असून, अज्ञानें अनेक असून त्यांत प्रतिबिंबित चैतन्यरूप जीव अनेक आहेत असा अनेकजीववाद्यांचा सिद्धान्त आहे. अनेकजीववादांत ईश्वर सृष्टिकर्ता असून, एकजीववादांत ''अस्मिन्पक्षे जीव एव स्वाज्ञानवशात् जगदुपादानं निमित्तं च'' जीव हा आपल्या अज्ञानाने जगाचें उपादान व निमित्त असें दोन्ही प्रकारचें कारण होतो-म्हणजे तोच सच्चिदानंदस्वरूपाला विसरून स्वप्नाप्रमाणे आपली जगद्रूपाने कल्पना करतो. ''ध्यायतीव लेलायतीव'' (बृ. उ. ४-३-७) असें श्रुतीने सांगितलें आहे.

या दोन वादांतील भेद पुढे नवव्या अध्यायांत विशेष रीतीने सांगण्यात येईल.

''जीव'' या एकवचनी प्रयोगावरून श्रीज्ञानेश्वर माऊलींनी येथे एकजीववादच स्वीकारला आहे हें स्पष्ट होतें.

**जे जडातें जीववी। चेतनेतें चेतवी। मनाकरवीं मानवी। शोक मोहो॥ २०॥**
**पैं बुद्धीच्या अंगीं जाणणें। तें जियेचिये जवळिकेचे करणें। जिया अहंकाराचेनि विंदाणें। जगचि धरिजे॥ २१॥**

**अर्थ**—जी जड पदार्थ अस्तित्वांत आणते, निष्क्रिय चैतन्याकडून क्रिया करविते व मनाला शोक, मोह

मानायला लावते. ॥ २० ॥ बुद्धीचा जाणणें हा धर्म तिच्या सान्निध्यानेच उत्पन्न होतो व अहंकाररूपी खेळाने जग धरून ठेविलें जातें. ॥ २१ ॥

**गूढार्थदीपिका—बुद्धीच्या अंगीं जाणणें। ते जिये जवळिकेचे करणें**—प्रकृतीचा संबंध वागविला जातो तोपर्यंत बुद्धींत जाणीव स्फुरते. वास्तविक पाहतां परब्रह्म जाणीवरहित निर्विकल्प आहे असा भाव.

जया अहंकाराचे बिंदाणें। जगचि धरिजे—प्रकृतीचें कार्य जो मिथ्या अहंकार, त्यामुळेच जीवाला जगाचा प्रत्यय येतो. अहंकार नि:शेष नाहीसा झाला की जगाचा मुळींच प्रत्यय येत नाही.

**एतद्योनीनि भूतानि सर्वाणीत्युपधारय। अहं कृत्स्नस्य जगतः प्रभवः प्रलयस्तथा॥ ६॥**

**अर्थ**—अर्जुना! सर्व भूतें यांच्यापासून उत्पन्न झालीं असें जाण. मीच संपूर्ण जगाच्या उत्पत्तिस्थितिलयांचें स्थान आहे. ॥ ६ ॥

**ते सूक्ष्म प्रकृति कोडें। जैं स्थूळाचिया आंगा घडे। तैं भूतसृष्टीची पडे। टांकसाळ॥ २२॥**
**चतुर्विधु ठसा। उमटों लागे आपैसा। मोला तरी सरिसा। परी थरचि आनान॥ २३॥**
**होती चौऱ्यांशीं लक्ष थरा। येरा मिती नेणिजे भांडारा। भरे आदिशून्याचा गाभारा। नाणेयांसी॥ २४॥**

**अर्थ**—ती सूक्ष्मप्रकृति-महादादिक अपरा-जेव्हा स्थूल सृष्टीला जन्म देते, तेव्हा सर्व भूतसृष्टि, टांकसाळेतील नाण्याप्रमाणे उत्पन्न होते. ॥ २२ ॥ जारज, अंडज, स्वेदज व उद्भिज अशी चार प्रकारची सृष्टि आपोआप उत्पन्न होते. सर्वांचे मोल सारखेंच असते—म्हणजे सर्व भूतसृष्टि पांच-भौतिकच असते-त्यांत नामरूपांचा प्रकार निरनिराळा असतो, इतकेच. ॥ २३ ॥ असे हे भूतांचे प्रकार किंवा योनि चौऱ्यांशी लक्ष आहेत. त्यांतील भूतांची गणतीच करतां येत नाही. ज्या परमेश्वराचे ठिकाणीं जगाचें मूळींच अस्तित्व नाही, त्या परमेश्वराचें आदिशून्याचागाभारा म्हणजे जगरहित अस्तित्वस्वरूपदालन, भूतसृष्टिरूप नाण्याने भरून जातें. ॥ २४ ॥

**गूढार्थदीपिका—आदिशून्याचा गाभारा**—"सर्व शून्याचा निष्कर्षु। जिया बाईला केला पुरुषु" (अमृ. प्र. १-२७). ज्या ठिकांणीं कोणत्याहि ज्ञानाची जाणीव नसते, असें निर्विकल्प चिन्मात्र ब्रह्मस्वरूप हा आदिशून्याचा गाभारा होय.

**ऐसें एकतुके पांचभौतिक। पडती बहुवस टांक। मग तिये समृद्धीचे लेख। प्रकृतीचि धरी॥ २५॥**
**जे आंखूनि नाणें विस्तारी। पाठीं तयांची आटणी करी। माजी कर्माकर्मांचिया व्यवहारीं। प्रवर्तु दावी॥ २६॥**
**हें रूपक परी असो। सांगों उघड जैसें परियेसों। तरी नामरूपाचा अतिसो। प्रकृतीच कीजे॥ २७॥**
**आणि प्रकृति तंव माझ्या ठायीं। बिंबे येथ आन नाहीं। म्हणोनि आदि मध्य अवसान पाहीं। जगासि मी॥ २८॥**

**अर्थ**—याप्रमाणे एकसारखीं अनेक पांचभौतिक भूतरूपी नाणीं पडतात आणि त्या वाढीची मोजदाद प्रकृतीच करते. ॥ २५ ॥ ही प्रकृति भूतसृष्टीच्या नाण्यांची बरोबर त्यांच्या आकाराला धरून उत्पत्ति करते व नंतर त्याचा पुन: लय करते. उत्पत्तिलयांच्या मध्यें पापपुण्यांच्या व्यवहाराची प्रवृत्ति हीच करते. ॥ २६ ॥ पण हें रूपक असूं द्या. स्पष्ट समजेल, असें आतां सांगतों. ज्याला आपण जगत् म्हणतो, तो केवळ नामरूपाचा विस्तार—म्हणजे निरनिराळ्या नामरूपांचें निरनिराळे पदार्थ-आहे. तो असा विस्तार प्रकृतीनेच केला आहे. ॥ २७ ॥ आणि ही अज्ञानरूप प्रकृति माझ्या ठिकाणींच कल्पिली जाते. हें काही खोटें नाही; म्हणून जगाचें आदि, मध्य, अंत मीच आहे, असें जाण॥ २८ ॥

**मत्तः परतरं नान्यत्किञ्चिदस्ति धनञ्जय। मयि सर्वमिदं प्रोतं सूत्रे मणिगणा इव॥ ७॥**

**अर्थ**—अर्जुना! मी अत्यंत अद्वैतस्वरूप असल्यामुळे माझ्याहून दुसरी निराळी वस्तूच नाही. म्हणून सूत्रांत मणी असावे, त्याप्रमाणे हें सर्व माझ्यांत भरलेले आहे.

**हें रोहिणीचें जळ। तयाचें पाहातां येईजे मूळ। तैं रश्मि नव्हती केवळ। होय तें भानु॥ २९॥**
**तयाचिपरी किरीटी। इया प्रकृती जालिये सृष्टी। जैं उपसंहरूनि कीजेल ठी। तैं मीचि आहें॥ ३०॥**

**ऐसें होय दिसे न दिसे। हें मजचि माजिवडें असे। मियां विश्व धरिजे जैसें। सूत्रें मणि॥ ३१ ॥**
**सुवर्णाचे मणी केले। ते सोनियाचे सुतीं वोविले। तैसें म्यां जग धरिलें। सबाह्याभ्यंतरीं॥ ३२ ॥**

**अर्थ**—अर्जुना! हें मृगजळ यांचें मूळ पाहूं गेले असतां केवळ किरण हें मूळ नसून, साक्षात् सूर्य हाच एक मूळ असतो. ॥ २९ ॥ त्याचप्रमाणे अर्जुना! ही जी प्रकृति सृष्टि झाली, त्या सृष्टीचा उपसंहार करून पाहिलें तर मीच आहे असा अनुभव येतो. ॥ ३० ॥ सृष्टीचें उत्पन्न होणें, दिसणें, न दिसणें हे सर्व भास माझ्या ठिकाणीं आहेत व ज्याप्रमाणे सुतांत ओवलेल्या मण्यांना सूत्र धरून ठेवतें, त्याप्रमाणे मी जगाला धारण करतो. ॥ ३१ ॥ ज्याप्रमाणे सोन्याचे मणी करून, सोन्याचे सुतांत ओवावें, त्याप्रमाणे आंतून बाहेरून मी जगाला धरून ठेविलें आहे—म्हणजे नामरूपरहित व नामरूपसहित मीच आहे. ॥ ३२ ॥

**गूढार्थदीपिका**—ज्याप्रमाणे सूर्याच्या प्रकाशाच्या होणाऱ्या सूक्ष्म कंपनावर मृगजळाचा भ्रम होतो. तें जळ नसून सूर्यप्रकाशाचें कंपन होय. त्यापमाणे अज्ञानप्रकृतीपासून झालेल्या सृष्टीचा लय करून किंवा कल्पना सोडून पाहूं लागल्यास, सृष्टि नाही, एक मीच आहे, असा अनुभव येतो. म्हणून हें भूतसृष्टिरूप जगत् सच्चिदानंद परमेश्वरापासून झालें नसून, अज्ञान-भ्रमरूप जी पराप्रकृति तिच्यापासून तें झालें आहे. परमात्मा केवळ त्या जगद्रूपभ्रमाचा आधार आहे-म्हणजे जगद्रूपभ्रमाची कल्पना परमेश्वरावर केली गेली आहे. असे येथे दाखविलें आहे. वास्तविक नामरूपात्मक प्रपंच म्हणून कांही एक निराळी वस्तु नसून, ज्याला जीव नामरूपात्मक प्रपंच म्हणतो, तो परब्रह्माचाच नामरूपात्मक देखावा आहे, असें कळून येते, हें माऊलींनी या ओव्यांतून स्पष्ट केलें आहे.

**रसोऽहमप्सु कौन्तेय प्रभास्मि शशिसूर्ययोः। प्रणवः सर्ववेदेषु शब्दः खे पौरुषं नृषु॥ ८ ॥**
**पुण्यो गन्धः पृथिव्यां च तेजश्चास्मि विभावसौ। जीवनं सर्वभूतेषु तपश्चास्मि तपस्विषु॥ ९ ॥**
**बीजं मां सर्वभूतानां विद्धि पार्थ सनातनम्। बुद्धिर्बुद्धिमतामस्मि तेजस्तेजस्विनामहम्॥ १० ॥**
**बलं बलवतां चाहं कामरागविवर्जितम्। धर्माविरुद्धो भूतेषु कामोऽस्मि भरतर्षभ॥ ११ ॥**

**अर्थ**—अर्जुना! पाण्याचे ठिकाणीं असलेला रस, चंद्रसूर्याचे ठिकाणीं असलेली प्रभा आणि मनुष्यांत असणारें पौरुष हे सर्व मी आहे. ॥ ८ ॥ पृथ्वीमध्यें असलेला शुद्ध गंध, अग्नीच्या ठिकाणचें तेज, सर्व भूतें ज्यावर जगतात तें जीवन आणि तपस्वियांच्या ठिकाणचें तप मी आहे. ॥ ९ ॥ अर्जुना! सर्व भूतांचे अनादि शाश्वत बीज मीच आहे, असें जाण बुद्धिमंताचे ठिकाणीं असलेली बुद्धि मीच आहे. तेजस्वी पुरुषाचे ठिकाणीं असलेलें तेज मीच आहे. ॥ १० ॥ हे भरतश्रेष्ठ! बलवानाचे ठिकाणीं असणारे बल व धर्माचे अविरोधी जी विषयकामना आहे, ती वासना किंवा काम मी आहे. ॥ ११ ॥

**म्हणोनि उदकीं रसु। कां पवनीं जो स्पर्शु। शशिसूर्यी जो प्रकाशु। तो मीचि जाण॥ ३३ ॥**
**तैसाचि नैसर्गिकु शुद्धु। मी पृथ्वीच्या ठायीं गंधु। गगनीं मी शब्दु। वेदीं प्रणवु॥ ३४ ॥**
**नराच्या ठायीं नरत्व। जें अहंभाविये सत्त्व। तें पौरुष मी हें तत्त्व। बोलिजत असें॥ ३५ ॥**
**अग्नि ऐसें आहाच। तेजीं नामाचें आहे कवच। तें परतें केलिया साच। निजतेज तें मी॥ ३६ ॥**
**आणि नानाविध योनीं। जन्मोनि भूतें त्रिभुवनीं। वर्तत आहाति जीवनीं। आपुलाल्या॥ ३७ ॥**
**एकें पवनेंचि पिती। एकें तृणास्तव जिती। एकें अन्नाधारें राहती। जळें एकें॥ ३८ ॥**
**ऐसें भूताप्रति आनान। जें प्रकृतिवशें दिसे जीवन। तें आघवांठायीं अभिन्न। मीचि एक॥ ३९ ॥**

**अर्थ**—म्हणून पाण्याच्या ठिकाणी जो रस आहे, वायूच्या ठिकाणी जो स्पर्श आहे, चंद्रसूर्याचे ठिकाणीं जो प्रकाश आहे, तो मी आहे. ॥ ३३ ॥ त्याचप्रमाणे पृथ्वीचे ठिकाणीं जो स्वाभाविक शुद्ध वास आहे, आकाशांत जो शब्द आहे व वेदांत जो प्रणव आहे, तो मी आहे. ॥ ३४ ॥ मनुष्याचे ठिकाणी मनुष्यत्व म्हणजे जें मीपणाने स्फुरणारें सत्व आहे, तें मीच आहे, असा सिद्धांत देव सांगत आहेत. ॥ ३५ ॥ तेजाचे ठिकाणीं अग्नि या नामाचे वरवर कवच दिसतें, तें नाहिसे झाल्यावर जें तेज राहतें, तें माझें निजतेज आहे. ॥ ३६ ॥ नानाप्रकारच्या योनींत जन्मलेले सर्व

ब्रह्मांडांतील प्राणी आपल्या निरनिराळ्या पदार्थावर जगतात. ॥ ३७ ॥ कोणी वायूवरच जगतात, कोणी तृणावर जगतात, कित्येक अन्नावर जगतात व कोणी पाण्यावर पोसले जातात. ॥ ३८ ॥ याप्रमाणे जीवाजीवाचे भिन्न भिन्न जीवन आहे तें प्रकृतीमुळें भिन्न भिन्न दिसतें, एऱ्हवीं सर्व भूतांचे ठिकाणीं एक मीच अभिन्न जीवन आहे. ॥ ३९ ॥

**गूढार्थदीपिका**—सृष्टींतील पदार्थांत जें वस्तुत्व आहे तें सर्व वस्तुत्व एक भगवानच आहेत. भगवंतावांचून निराळें वस्तुत्व नाही. एका भगवंताचीच निरनिराळ्या वस्तुत्वाने कल्पना केली गेली आहे. पदार्थांत जे पदार्थाचें अस्तित्व आहे, तें पदार्थाचें स्वतंत्र अस्तित्व नसून परमात्म्याचें अस्तित्व आहे. पदार्थांत जो चैतन्यांश आहे, तो परमेश्वराचा अंश होय आणि पदार्थ भोगून ज्या सुखभोगावर प्राणी जगतो, तें सुख परमात्माच होय असा अर्थ.

**पैं आदिचेनि अवसरें। विरूढे गगनाचेनि अंकुरे। जें अंतीं गिळी अक्षरें। प्रणवपीठींचीं॥ ४० ॥**
**जंव हा विश्वाकार असे। तंव जें विश्वाचिसारखें दिसे। मग महाप्रळयदशे। कैसेंही नव्हे॥ ४१ ॥**

**अर्थ**—सृष्टीच्या उत्पत्तीच्या वेळेस जें आकाशरूपी अंकुराने वाढतें व प्रलयाचे वेळीं शेवटीं जें प्रणवाची अ, उ, म, हीं अक्षरें गिळून सर्व सृष्टीचा लय करतें. ॥ ४० ॥ जोपर्यंत हा विश्वाचा आकार आहे, तोपर्यंत जें विश्वाच्या आकाराचें दिसतें व महाप्रलयामध्यें जें कोणत्याहि प्रकाराने राहत नाही. ॥ ४१ ॥

**गूढार्थदीपिका**—परब्रह्माचें अद्वैतत्व केव्हाहि नाहीसे होत नाही "आंगचिया आटणिया। कांतु उवाया आणिला जिया। स्वसंकोचे प्रिया। रूढविली जेणें॥ ३२ ॥" (अमृ. प्र० १) परब्रह्म सृष्टीकालीं आपल्या शक्तीशीं एकरूप होऊन केवळ एका शक्तीरूपाने अद्वैतरूप राहतें आणि महाप्रलयांत सर्व शक्त्याविर्भावाचे आपल्याशीं ऐक्य करून घेऊन, केवळ आपल्या स्वरूपाने अद्वैतरूप राहतें.

**ऐसें अनादि जें सहज। तें मी गा विश्वबीज। हें हातातळीं तुज। देइजत असे॥ ४२ ॥**
**मग उघड करूनि पांडवा। जैं हें आणिसील सांख्याचिया गांवा। तैं ययाचा उपेगु बरवा। देखशील॥ ४३ ॥**

**अर्थ**—असें अनादि व स्वाभाविक जें विश्वाचें बीज तें मी आहे. हा सिद्धांत तुझ्या हातांत देत आहे म्हणजे स्पष्ट सांगत आहे. ॥ ४२ ॥ मग हा सिद्धान्त जेव्हा सांख्यशास्त्राच्या साहाय्याने म्हणजे आत्मानात्म व्यतिरेकाने उघड म्हणजे स्पष्ट करून घेशील, तेव्हा या सिद्धान्ताचा उपयोग तुला कळूं लागेल. ॥ ४३ ॥

**गूढार्थदीपिका**—भूतसृष्टि ही सत्य आहे असे जोपर्यंत वाटतें तोपर्यंत त्या सर्व सृष्टीला कारण असलेल्या परमेश्वराचा अनुभव घेण्याकरितां, व्यतिरेक करून म्हणजे परमेश्वराला सृष्टीहून निराळे समजून व अलग करून, घेतलें पाहिजे.

**परी हे अप्रासंगिक आलप। आतां असतु बोलों संक्षेप। जाण तपियांचां ठायीं तप। तें स्वरूप माझें॥ ४४ ॥**
**बळियांमाजीं बळ। तें मी जाणें अढळ। बुद्धिमंतीं केवळ। बुद्धि ते मी॥ ४५ ॥**
**भूतांचां ठायीं कामु। तो मी म्हणे आत्मारामु। जेणें अर्थास्तव धर्मु। थोरु होय॥ ४६ ॥**

**अर्थ**—पण आतां हें प्रस्तुत विषयाला सोडून असलेलें भाषण पुरे. तें मी बोलत नाही. आतां पुढें संक्षेपाने सांगतो. तपस्वियांचे ठिकाणीं जें तप असतें तें माझें रूप होय. ॥ ४४॥ बलवंतामध्यें जें बल असतें तें निश्चित मी आहे. बुद्धिमंताचे ठिकाणीं जी बुद्धि आहे ती मी आहे. ॥ ४५ ॥ ज्या विषयसुखाच्या वासनेने केवळ धर्मपुरुषार्थ साधण्याकरितांच धन संपादन केलें जातें, ती जीवाच्या ठिकाणीं असणारी वासना, माझें स्वरूप होय, असें आत्मस्वरूपांत रममाण होणारे भगवान श्रीकृष्ण म्हणाले. ॥ ४६ ॥

**एऱ्हवीं विकाराचेनि पैसें। करी कीर इंद्रियांच्याचि ऐसें। परी धर्मासि वेखासें। जावों नेदी॥ ४७ ॥**
**जे अप्रवृत्तीचा अव्हांटा। सांडूनि विधीचिया निघे वाटा। तेवींचि नियमाचा दिवटा। सवें चाले॥ ४८ ॥**
**कामु ऐशिया वोजा प्रवर्ते। म्हणोनि धर्मासि होय पुरतें। मोक्षतीर्थींचें मुक्तें। संसारु भोगी॥ ४९ ॥**
**जो श्रुतिगौरवाच्या मांडवीं। काम सृष्टीचा वेलु वाढवी। जंव कर्मफळेंसीं पाल्वी। अपवर्गीं टेके॥ ५० ॥**

**अर्थ**—एऱ्हवीं वाढलेल्या विकारानुसारच इंद्रियांना आवडेल तसेंच वागतो पण तें वागणें धर्माच्या विरुद्ध कधीं

होऊ देत नाही. ॥ ४७ ॥ शास्त्राने निषेध केलेल्या अपप्रवृत्तीचा आडमार्ग सोडून, शास्त्राने सांगितलेल्या मार्गानेच जो जातो व त्याचप्रमाणे शास्त्रोक्त नियमाची मशाल बरोबर घेऊन जो चालतो. ॥ ४८ ॥ विषयवासनेची पूर्ति, अशी शास्त्रीय मार्गानेच होत असल्यामुळें धर्माचें पूर्ण आचरण होतें. असें शास्त्राने सांगितल्याप्रमाणे विषयांचें सेवन करणारे पुरुष संसारसुख भोगणारे मोक्षतीर्थांतील मोतींच होत. किंवा मोक्षतीर्थांत मुक्त होऊन संसार भोगतात, असा अर्थ. ॥ ४९ ॥ जो वेदाज्ञेचा अत्यंत आदर बाळगून, त्या आदररूपी मांडवावरच, आपल्या नानाप्रकारच्या विषयवासनेचा वेल, त्याचीं पानें, फुलें मोक्षाला टेकेपर्यंत वाढवितो. ॥ ५० ॥

**गूढार्थदीपिका**—"धर्मस्य ह्यापवर्गस्य" (भाग० स्कं० १-२) प्रवृत्तिधर्महि स्वैर विषयसुख भोगाकरितां निर्माण झाला नसून, स्वैर विषयसेवनास आळा बसून जीवाला मोक्ष प्राप्त व्हावा, याच उद्देशाने निर्माण झाला आहे. आपली स्वतंत्र विषयसुखभोगाची इच्छा न ठेवता, केवळ भगवंताची आज्ञा समजून शास्त्रानुसार विषयसेवन करणाऱ्याचें विषयसेवनही, अपवर्ग म्हणजे मोक्षप्राप्ति, करून देणारें होतें, असें भगवंताचें व माऊलीचें म्हणणे आहे.

**ऐसा नियतु कां कंदर्पु। जो भूतां यां बीजरूपु। तो मी म्हणे बापु। योगियांचा॥ ५१ ॥**
**हें एकैक किती सांगावें। आतां वस्तुजातचि आघवें। मजपासूनि जाणावें। विकरलें असे॥ ५२ ॥**

**अर्थ**—अशी शास्त्रनियमित विषयवासना व जी या सर्व भूतसृष्टीच्या उत्पत्तीला बीजभूत आहे, ती वासना मी आहे, असें सर्व योगियांचा बाप म्हणतो. ॥ ५१ ॥ अर्जुना! हे एक एक निराळे किती सांगूं! जेवढी कांही वस्तु आहे, ती संपूर्ण वस्तु मजपासूनच उत्पन्न झाली आहे, असें समज. ॥ ५२ ॥

**ये चैव सात्त्विका भावा राजसास्तामसाश्च ये। मत्त एवेति तान्विद्धि न त्वहं तेषु ते मयि॥ १२॥**

**अर्थ**—जे कांही सात्विक, राजस, तामस भाव आहेत, ते सर्व माझ्यापासूनच प्रगट झाले आहेत, असें जाण; पण ते माझ्या ठिकाणीं भासत असले, तरी त्यांच्यांत मी नाही. ॥ १२ ॥

**जे सात्त्विक हन भाव। कां रजतमादि सर्व। ते ममरूपसंभव। वोळखे तूं॥ ५३॥**
**हे जाले तरी माझां ठायीं। परी ययांमाजीं मी नाहीं। जैसी स्वप्नींचां डोहीं। जागृति न बुडे॥ ५४॥**
**नातरी रसाचीचि सुघट। बीजकणिका तरी घनवट। परी तियेस्तव होय काष्ठ। अंकुरद्वारें॥ ५५॥**
**मग तया काष्ठाचां ठायीं। सांग पां बीजपण असे काई। तैसा मी विकारीं नाहीं। जरी विकारला दिसें॥ ५६॥**
**पैं गगनीं उपजे आभाळ। परी तेथ गगन नाहीं केवळ। अथवा आभाळीं होय सलिल। तेथ अभ्र नाहीं॥ ५७॥**
**मग तया उदकाचेनि आवेशें। प्रगटलें तेज जें लखलखीत दिसे। तिये विजूमाजीं असे। सलिल कायी॥ ५८॥**
**सांगें अग्नीस्तव धूम होये। तिये धूमीं काय अग्नि आहे। तैसा विकारु हा मी नोहें। जरी विकारला असें॥ ५९॥**

**अर्थ**—अर्जुना! जे कांही सात्विक, राजस, तामस भाव आहेत, ते सर्व माझ्या स्वरूपापासून झाले, असे जाण. ॥ ५३ ॥ ज्याप्रमाणे स्वप्न जागृतीच्या संस्काराने होतें, तरी स्वप्नांत जागृती राहत नाही, त्याप्रमांणे हे सात्विकादि सर्व भाव माझ्या ठिकाणीं भासत असले, तरी त्यांत मात्र मी नाही. ॥ ५४॥ ज्याप्रमाणे छोटेसें व घन असलेलें बीं केवळ रसाचेंच बनलेंले असतें आणि त्यापासूनच अंकूर उत्पन्न होऊन, पुढें त्याचें काष्ठ होतें. ॥ ५५ ॥ मग उत्पन्न झालेल्या काष्ठाचे ठिकाणीं बीज असतें काय? अर्जुना! सांग बरें. त्याप्रमाणे त्रिगुणात्मक कार्यरूपाने मीच कार्यरूप झालों, असें दिसत असलें, तरी त्या कार्यांत मी मात्र नाही. ॥ ५६ ॥ वास्तविक आकाशांतच अभ्रें येतात, पण त्या अभ्रांत आकाश नसतें, किंवा अभ्रापांसून पाऊस पडतो, पण त्या पावसांत अभ्रें नसतात. ॥ ५७॥ पाण्याने भरलेल्या मेघांच्या संघर्षणाने लखलखीत अशी वीज चमकते, पण त्या वीजेमध्ये पाणी असतें काय? ॥ ५८ ॥ अर्जुना! सांग, अग्नीपासून धूर होतो, पण त्या धुरांत अग्नि असतो काय? त्याप्रमाणेच हें सर्व त्रिगुणात्मक सृष्टिकार्य माझ्या ठिकाणीं भासत असलें, तरी तें कार्य मात्र मी नव्हे. ॥ ५९ ॥

**गूढार्थदीपिका**—परब्रह्मापासून झालेली सृष्टी, जोपर्यंत जीव परब्रह्माहून निराळी वस्तु समजतो, तोपर्यंत त्या सृष्टीत, त्याला परब्रह्माचा अनुभव येणें शक्य नाही असा भाव.

**त्रिभिर्गुणमयैर्भावैरेभिः सर्वमिदं जगत् । मोहितं नाभिजानाति मामेभ्यः परमव्ययम्॥ १३ ॥**

**अर्थ**—त्रिगुणात्मक ह्या सर्व भावांनी सर्व प्राणी मोहित झाले आहेत, म्हणून या त्रिगुणात्मक भावाचे पलीकडे किंवा त्रिगुणात्मकभावातीत असलेला मी अविनाशी आहे, असें मला जाणत नाहीत. ॥ १३ ॥

**परी उदकीं झाली बाबुळी। ते उदकातें जैसी झांकोळी। कां वायांचि आभाळीं। आकाश लोपे॥ ६० ॥**
**हां गा स्वप्न हें लटिकें म्हणों ये। परि निद्रावशें बाणलें होये। तंव आठवु काय देत आहे। आपणपेयां॥ ६१ ॥**
**हें असो डोळ्यांचें। डोळांचि पडळ रचे। तेणें देखणेंपण डोळ्यांचें। न गिळिजे कायि॥ ६२ ॥**
**तैसी हे माझीच बिंबली। त्रिगुणात्मक साउली। कीं मजचि आड वोडवली। जवनिका जैसी॥ ६३ ॥**
**म्हणऊनि भूतें मातें नेणती। माझींच परी मी नव्हती। जैसी जळींचीं जळीं न विरती। मुक्ताफळें॥ ६४ ॥**
**पैं पृथ्वीयेचा घटु कीजे। सवेंचि पृथ्वीसि मिळे जरी मेळविजे। एऱ्हवीं तोचि अग्निसंगें सिजे। तरी वेगळा होय॥ ६५ ॥**
**तैसें भूतजात सर्व। हे माझेचि कीर अवयव। परी मायायोगें जीव-। दशे आले॥ ६६ ॥**
**म्हणोनि माझेचि मी नव्हती। माझेचि मज नोळखती। अहंममताभ्रांती। विषयांध झाले॥ ६७ ॥**

अर्थ—पाण्यापासूनच शेवाळ होतें व पाण्यालाच आच्छादितें किंवा व्यर्थ च मेघाचे योगाने आकाश दिसत नाही, असें वाटतें. ॥ ६० ॥ दिसलेलें स्वप्न खोटें असतें हें खरें, पण निद्रेमुळें जेव्हा स्वप्न पाहतो, तेव्हा तें स्वप्न आपल्याला आपलें स्मरण होऊं देतें काय?॥ ६१ ॥ हे असो, डोळ्यावर येणारा पडदा डोळ्यापासूनच उत्पन्न होतो, पण त्याच्यायोगाने डोळ्याचें पाहणें नाहिसें होत नाही काय?॥ ६२ ॥ याप्रमाणे माझ्या शुद्ध शक्तीच्या ठिकाणीं कल्पिलेली ही त्रिगुणात्मक छाया पडद्याप्रमाणे माझ्या आड आली म्हणजे माझा अनुभव जीवाला येऊं देत नाही. ॥ ६३ ॥ म्हणून ज्याप्रमाणे पाण्यापासून झालेलीं मोत्यें पाण्यांत पुनः विरत नाहीत, त्याप्रमाणे माझ्यापासूनच झालेलीं भूतें मला जाणत नाहीत व माझ्याशीं ऐक्य पावत नाहीत. ॥ ६४ ॥ मातीपासून केलेला घट लगेच मातींत मिळविला तर मिळू शकतो, पण एकदा विस्तवांत भाजला गेला की, मग मातीहून वेगळा पडतो, म्हणजे मातींत मिळत नाही. ॥ ६५ ॥ त्याप्रमाणे सर्व प्राणी, वास्तविक माझेच अंश आहेत. पण मायाभ्रांतीने किंवा अज्ञानामुळें जीवदशेला आलेत म्हणजे आपल्याला माझ्याहून निराळे समजतात. ॥ ६६ ॥ म्हणून प्राणी माझेच असून मत्स्वरूप होत नाहीत. माझेच असून मला ओळखत नाहीत. देह म्हणजे मी व स्त्रीपुत्रादि विषय हें माझें, अशा अहंताममता भ्रांतीने (माझ्याहून निराळे पडून) विषयासक्त झाले. ॥ ६७ ॥

**गूढार्थदीपिका**—कोणतीहि वस्तु व तिची शक्ति यांचें ऐक्यच असतें. वस्तु म्हणजे शक्ति व शक्ति म्हणजे वस्तुच होय. शक्तीची अव्यक्तदशा म्हणजे वस्तु व वस्तूची व्यक्तदशा म्हणजे शक्ति होय, असेहि म्हणण्यास हरकत नाही. परमेश्वर व परमेश्वराची मायाशक्ति, यांचेंहि असेंच ऐक्य आहे. ''जैसी कां समोरसकट गति। कां सीतयासकट कान्ति। तैसी शिवेसी शक्ति। आघवीचि जे. ॥ ४१ ॥ कां कस्तुरीसकट परिमळू। कां उष्मेसकट अनळू। तैसी शक्तीसी केवळू। शिवूचि जो. ॥ ४२ ॥'' (अमृ. प्र. १) हे श्रीज्ञानेश्वर माऊलींनी या ओव्यांत सांगितले आहे.

अर्थात् परमेश्वर सच्चिदानंदरूप असल्यामुळें त्याची शक्तिहि सच्चिदानंदस्वरूप आहे. यात शंका नाही, किंबहुना परमेश्वराने सच्चिदानंदरूपाने प्रगट होणे म्हणजे तो शक्तीचा आविष्कारच होय. म्हणून मूळांत परमेश्वराची शक्ति सच्चिदानंदरूप आहे. त्रिगुणात्मक नाही. ही परमेश्वराची शक्ति सच्चिदानंदधर्मयुक्त नामरूपाने अभिव्यक्त होते. ज्याप्रमाणे तरंग जसा पाण्यावर स्फुरतो म्हणून त्याचें पाण्याशी ऐक्य असतें. त्याप्रमाणे परमेश्वरशक्ति परमेश्वरावर स्फुरत असल्यामुळे तिचेंहि परमेश्वराशीं ऐक्य असतें असें श्रीज्ञानेश्वर माऊलींनी 'दोघां एकसत्तेचें बैसणें। दोघा एका प्रकाशाचें लेणें' या ओवीने सांगितलें आहे.

पण जीव हा परमेश्वराचे व मायाशक्तीचें ऐक्य जाणत नाही व तो नामरूपाकडेच लक्ष देतो. त्यामुळे परमेश्वराचा त्याला विसर पडून नामरूपात्मकशक्ति, परमेश्वराहून भिन्न वस्तुरूपाने व भिन्न लक्षणाने त्याच्या अनुभवाला येते—म्हणजे त्याला ती परमेश्वराची शक्ति, त्याच्या अज्ञानामुळें, त्रिगुणात्मक मायारूप भासते.

परमेश्वराच्या मायाशक्तीचें व परमेश्वराचें ऐक्य विसरणें, यालाच अज्ञान किंवा मायाभ्रान्ति म्हणतात. "तैसी अज्ञानांगीकारे। निघाली वृत्ति विखुरे। ते सत्वरजद्वारें। तमही होय" (ज्ञाने. १४-१४४) जीवाने अज्ञानाचा अंगीकार केला—म्हणजे परमेश्वर व परमेश्वराची शक्ति यांचें ऐक्य विसरला—की वृत्तिरूपाने भासणारी परमेश्वराची सच्चिदानंदरूपशक्ति सत्व, रज, तम या तीन गुणांनी युक्त अशी त्याला भासते, असें या ओवीने श्रीज्ञानेश्वर माऊलींनी सांगितलें आहे.

अर्थात्, हा मायेचा त्रिगुणात्मक अनुभव, मूळमायेच्या अनुभवाच्या विपरीत असल्यामुळें, तो परमेश्वरस्वरूपाच्या खऱ्या अनुभवाचे आड येतो. म्हणून भगवान म्हणतात, ही जी त्रिगुणात्मक नामरूपात्मक जडविनाशी कार्यसृष्टि आहे, ती माझ्या ठिकाणींच जरी भासते किंवा मीच त्या रूपाने जरी भासतो, तरी पण तो तसा सृष्टींचा अनुभव भ्रांत असल्यामुळें, त्या भ्रांतसृष्टींत मी नाहीं.

**दैवी ह्येषा गुणमयी मम माया दुरत्यया । मामेव ये प्रपद्यन्ते मायामेतां तरन्ति ते॥ १४॥**

**अर्थ**—मज देवाची ही त्रिगुणात्मक माया, जीवाला आपल्या सामर्थ्याने तरून जाण्याला अत्यंत दुस्तर आहे. सर्व भावाने मलाच भजणारे व शरण येणारेच ती माया तरून जातात.॥ १४॥

**आतां महदादि हे माझी माया। उतरोनियां धनंजया। मी होइजे हें आया। कैसेनि ये॥ ६८॥**

**अर्थ**—आतां महदादि प्रकृतीच्या पार होऊन, मज परमेश्वराशीं कसें ऐक्य प्राप्त करून घेतां येईल ?॥ ६८॥

**गूढार्थदीपिका**—आतां महदादि हे माझी माया-महदादिक पदार्थ हे वस्तुत: भगवंताची माया म्हणजें शक्ति नव्हे हे वरील निरूपणावरून स्पष्ट होते. येथें "माझी माया" या शब्दाने परमेश्वराच्या मूळ सच्चिदानंदस्वरूपशक्तीचे ठिकाणींच भ्रांतिरूप मायाशक्तीची कल्पना होते एवढेंच सुचविलें आहे. किंवा "महदादि हे माझी माया" या चरणाचा, माझें ठिकाणी भासणारी महदादि भिन्न पदार्थाची भ्रांति असा अर्थ करावा.

**जिये ब्रह्माचळाचां आधाडां। पहिलिया संकल्पजळाचा उभडा। सवेंचि महाभूतांचा बुडबुडा। साना आला॥ ६९॥**

**अर्थ**—ज्या ब्रह्मरूपी पर्वताच्या प्रथम तुटलेल्या कड्यांत "अहं बहुस्यां प्रजायेय"-मी पुष्कळ स्वरूपाचा होवो, असा संकल्परूप जळाचा झरा उसळला त्याबरोबरच सूक्ष्म महाभूतांचा बुडबुडा उठला.॥ ६९॥

**गूढार्थदीपिका**—ब्रह्माचळाचां आधाडां-येथे परब्रह्माला अचळ म्हणजे पर्वताची उपमा देऊन परब्रह्म नित्य, कूटस्थ, अविकारी असे दाखविलें आहे. "जैसी कां समीरेसकट गति।", "कां कस्तुरीसकट परिमळु।" (अमृ. प्र. १). या ओव्यांनी परब्रह्मांत सर्व शक्तिच भरली असून शक्तींत केवळ सर्व परब्रह्म भरलें आहे, असे प्रतिपादून, माऊलींनी परब्रह्म व त्याच्या शक्तीचे अत्यंत ऐक्य आहे, असे सांगितले आहे, अर्थात् परब्रह्माप्रमाणे त्याची शक्तिहि कूटस्थ अविकारी आहे हें सिद्धच आहे. अशा परब्रह्माचा तुटलेला कडा राहणेंच शक्य नाही; कारण परब्रह्म निरवयव असल्यामुळे "**न कश्चिदव्यवैः स्फुटति**" (मां. उ. ३-२) ते अवयवांनी फुटत नाही किंवा त्याचा तुकडा पडत नाही.

पण या विषयीचें अज्ञान असलेला जीव परब्रह्माच्या नामरूपात्मक सृष्टीला परब्रह्माहून भ्रमाने निराळी वस्तु समजतो व अस्फुट अद्वैत अशा परब्रह्माचे ठिकाणीं द्वैताची भ्रांत कल्पना करतो. जीवाच्या भ्रांत समजुतीने परब्रह्माहून निराळी झालेली शक्ति, हाच परब्रह्माचा तुटलेला कडा होय.

**पहिल्या संकल्पजळाचा उभडा**—आपण आपल्याच ठिकाणीं प्रेमरूप क्रीडा करण्याकरितां, मी सच्चिदानंदरूपाने बहूरूप व्हावें असे परब्रह्माचे जे स्वाभाविक स्फुरण होते, तेच जीवाला भ्रांतीने जगद्विषयक वाटतें व मी जगद्रूपांने बहुरूप व्हावे असा परमात्मा संकल्प करतो, असा त्या संकल्पाचा तो अर्थ करतो. हाच तो संकल्पजळाचा 'उभडा' होय, ही द्वैत भ्रांतीच मायानदीचा उगम होय, असा अर्थ.

**जे सृष्टिविस्ताराचेनि वोघें। चढत काळकलनेचेनि वेगें। प्रवृत्तिनिवृत्तीची तुंगें। तटें सांडी॥ ७०॥**

**अर्थ**—मग तेथे सृष्टिविस्तराच्या ओघाने व कालाच्या गतीने प्रवृत्ति म्हणजे विषयसुख किंवा प्रपंचसुख व निवृत्ति म्हणजे मोक्षसुख यांची उंचतटें सांडून मायानदी वाहूं लागली.॥ ७०॥

**गूढार्थदीपिका**—याप्रमाणे अद्वैत परब्रह्माचे ठिकाणीं द्वैताचा भ्रम झाला की पुढें द्वैत वाढतच जातें.

**जे गुणघनाचेनि वृष्टिभरें। भरली मोहाचेनि महापूरें। घेऊनि जात नगरें। यमनियमांचीं॥ ७१ ॥**

**अर्थ**—त्रिगुणरूपी मेघाच्या सारख्या वर्षावामुळें त्या मायानदीला भ्रांतींचा महापूर आला व ती यमनियमांची नगरें वाहून घेऊन जाऊं लागलीं॥ ७१ ॥

**गूढार्थदीपिका**—तैसी अज्ञ नांगीकारे। निघाली वृत्ति विखुरे। ते सत्वरजद्वारें तमही होय. ॥ १४३ ॥ (ज्ञा. अ. १४) आत्म्याची अद्वैतस्थिति विसरून द्वैताची भ्रांति झाली की, आत्मस्वरूपाचे ठिकाणीं स्फुरणारी वृत्तिरूपशक्ति त्रिगुणात्मक भासूं लागते व जीव सर्वस्वी गुणाच्या स्वाधीन होऊन वागूं लागतो.

मनुष्य जितका जितका गुणांच्या स्वाधीन होतो, तितका तितका तो अविवेकी होत जातो आणि त्याच्याकडून शास्त्रमर्यादा सोडून स्वैर वर्तन घडते.

**जे द्वेषाचां आवर्तीं दाटत। मत्सराचे वळसे पडत। माजी प्रमदादि तळपत। महामीन॥ ७२ ॥**

**अर्थ**—त्या मायानदीच्या प्रवाहांत जागोजाग द्वेषाचे भवरे व मत्सराचीं वळणें पडतात व त्यांत बुद्धिपुर:सर शास्त्राच्या विरुद्ध वागणें हे मोठमोठे मासे भासूं लागतात. ॥ ७२ ॥

**गूढार्थदीपिका**—आत्मवस्तु अद्वैत व परमप्रिय असल्यामुळें तिचे ठिकाणीं आपल्याविषयींच द्वेषादि विकार उठूं शकत नाहीं. आपल्याहून भिन्न वस्तु आहे असे भ्रांतीने जेव्हां मानलें जातें तेव्हांच हे द्वेषादि षड्विकार उठू शकतात.

**जेथ प्रपंचाचीं वळणें। कर्माकर्माचीं वोभाणें। वरी तरताती वोसाणें। सुखदु:खांची॥ ७३ ॥**
**रतीचिया बेटा। आदळती कामाचिया लाटा। जेथ जीवफेन संघाटा। सैंघ दिसे॥ ७४॥**
**अहंकाराच्या चळिया। वरि मदत्रयाचिया उकळिया। जेथ विषयोर्मीच्या आकळिया। उल्लाळ घेती॥ ७५ ॥**
**उदयास्ताचे लोंढे। पाडीत जन्ममृत्यूचे चोंढे। जेथ पांचभौतिक बुडबुडे। होती जाती॥ ७६ ॥**
**संमोह विभ्रम मासे। गिळित धैर्याचीं आमिषें। तेथ देव्हडे भोंवत वळसे। अज्ञानाचे॥ ७७॥**
**भ्रांतीचेनि खडुळें। रेवलें आस्थेचे अवगाळें। रजोगुणाचेनि खळाळें। स्वर्गु गाजे॥ ७८ ॥**

**अर्थ**—त्या मायानदीच्या प्रवाहांत प्रपंचाची वळणें पडली, पापपुण्याचे लोंढे येऊं लागले व त्यावर सुखदु:खाचा केरकचरा तरंगू लागला. ॥ ७३ ॥ विषयसुखाच्या बेटावर कामाच्या लाटा आदळूं लागल्या व त्याठिकाणीं संपूर्ण जीवरूपी फेंस सांचलेला दिसूं लागला. ॥ ७४॥ अहंकाराचे हेलकावे उठून, वर त्यांत धन, विद्या, सामर्थ्य यांच्या मदाच्या उकळ्या उठून जेंथे विषयवासनेच्या उंच उंच लाटा उठत आहेत. ॥ ७५ ॥ सूर्योदय व सूर्यास्त यांचे एका मागून येणारे लोट हे जन्ममरणं यांचे मोठे धोंडे पाडत राहतात आणि तेथें कितीतरी पांचभौतिक देहरूपी बुडबुडे उत्पन्न होतात व नाहीसे होतात. ॥ ७६ ॥ अविवेक व भ्रम हे मासे, धैर्याचें अमिष खाऊन टाकतात व त्या नदींत अज्ञानाचे वांकडे वळसे फिरत असतात. ॥ ७७ ॥ देहादि विषय सत्य आहेत, या अविद्याभ्रांतिरूप गढूळ पाण्यामुळे विषयसुखाच्या आस्थेचे गाळ खालीं बसले आहेत व रजोगुणाचा खळखळाट स्वर्गापर्यंत गाजतो. ॥ ७८ ॥

**गूढार्थदीपिका—भ्रांतीचेनि खडुळें। रेवलें आस्थेचें अवगाळें**-अविद्याभ्रांतीने उत्पन्न झालेली विषयसुखाची आस्था हा मोठा खोल गाळ आहे. अशा खोल गाळांत गाडलेला मनुष्य जसा निघणे कठीण, त्याप्रमाणे विषयसुखाच्या आस्थेतून सुटणे कठीण आहे, असा भाव.

**रजोगुणाचेनि खळाळे। स्वर्ग गाजे**—विषयसुखाचे प्रयत्नावाचून एक क्षणभर देखील स्वस्थ बसावेसे न वाटणें, याला रजोगुणाचा खळाळ म्हणतात. हा खळखळाट स्वर्गापर्यंत गेला आहे-म्हणजे काम्यकर्माचें अंतिम फळ स्वर्ग आहे, या रजोगुणाच्या खळाळांतून म्हणजे काम्यकर्माच्या प्रवृत्तींतून निघणें म्हणजे वैराग्य होणें, हेंहि फार कठीण आहे.

ह्या द्वैत भ्रांतिरूप मायानदीचा प्रवाह कसा विस्तार पावला याचें माऊलींनी वरील ओव्यांतून वर्णन केलें आहे.

**तमाचे धारसे वाड। सत्त्वाचें स्थिरपण जाड। किंबहुना हे दुवाड। मायानदी॥ ७९॥**

**अर्थ**—यांत तमाचे मोठे जोराचे प्रवाह आहेत व सत्वगुणाचा भक्कम स्थिरपणा आहे. अशी ही मायानदी दुस्तर आहे. ॥ ७९ ॥

**गूढार्थदीपिका—तमाचे धारसे वाड**—या मायानदींत तमोगुणाचे अविवेक, आळस, निद्रा असे मोठमोठे प्रवाह आहेत. त्यांना चुकविणें किंवा जिंकणें कठीणच असते.

**सत्वाचे स्थिरपण जाड**—''सत्वं यद्ब्रह्मदर्शनम्'' सत्वगुण हा ब्रह्मप्राप्तीला कारणीभूत आहे, असें भागवतांत सांगितलें आहे, पण नाथांनी ''रजतम नाशी सत्व वाढे'' रजोगुण तमोगुण यांचा नाश झाल्याने सत्वगुण वाढतो असें म्हणून ''वाढलें सत्व बाधक फुडे''. वाढलेलें सत्व तसेंच राहूं दिल्यास बाधक होतें, असें म्हटलें आहे. भगवंतांनीहि सत्वगुण ज्ञानाचा व सुखप्राप्तीचा अहंकार उत्पन्न करतो, म्हणजे तो केवळ ज्ञानरूप किंवा सुखरूप होऊं देत नाही, असें त्याचें बंधकत्व सांगितलें आहे. म्हणून सत्वगुणाच्या बंधनांतून सुटणें फार कठीण असतें. ''तेविं अज्ञान अभिमान आहे। तो सर्वथा तत्काळ जाये। ज्ञानाभिमान कठिण पाहे। गोंविताहे मुक्तत्वें'' (ए. भा.)

सत्वगुण आहे तोपर्यंत निर्विकल्प समाधिहि साधत नाही; म्हणूनच ''तत्परं पुरुषख्यातेर्गुणवैतृष्ण्यम्'' (योगसूत्र स. पा. १६) निर्विकल्पसमाधिकरितां गुणवैतृष्ण्यरूप म्हणजे सात्विकगुणहि नको असे परवैराग्य आवश्यक आहे. असे योगांत मानले जातें आणि हे गुणवैतृष्ण्यरूप परवैराग्य इतर उपायापेक्षां परमेश्वरभक्तीने सुगम साधले जाते असे ''ईश्वरप्रणिधानाद्वा''॥ २३ ॥ योगसूत्रांत सांगितलें आहे. ''शांतिक्षमा दया। त्याहि नको पंढरीराया॥'' (तु. गा.)

**पैं पुनरावृत्तीचेनि उभडें। झळंबती सत्यलोकींचे हुडे। घायें गडबडती धोंडें। ब्रह्मगोळकाचे॥ ८०॥**

**अर्थ**—यांतील पुनरावृत्तीचे उभळे सत्यलोकरूपी बुरुजांनाहि लागतात व त्या उभळीच्यां आघाताने ब्रह्मांडरूपी धोंडे गडबडतात. ॥ ८० ॥

**गूढार्थदीपिका—पै पुनरावृत्तीचेनि उभडे। झळंबती सत्यलोकींचे हुडे**—''अनावृत्तिः शब्दादनावृत्तिः शब्दात्'' (ब्र. सू. ४-४-२२) या वेदान्तसूत्रांत, ब्रह्मलोकांत गेलेले पुरुष संसारांत येत नाहीत, ते पुढें ब्रह्मदेवाबरोबर मुक्त होतात, असा सिद्धान्त केला आहे आणि श्रीज्ञानेश्वर माऊलींनी या ओवींत पुनरावृत्तीची झळ सत्यलोकांतील जीवांनाहि लागते, असें सांगितलें आहे. या दोन विधानांचा समन्वय असा आहे की, संसारांतून मुक्त व्हावें या इच्छेने अर्चिरादि मार्गाचा अवलंब करून ब्रह्मलोकांत गेलेले पुरुष, पुनः संसारांत येत नाहीत, असा वरील सूत्राचा अर्थ असून, विषयसुखाची इच्छा राहून ब्रह्मलोकासारख्या श्रेष्ठ लोकांत गेलेल्या पुरुषांनाहि पुनरावृत्ति चुकत नाही, असा माऊलीच्या म्हणण्याचा अर्थ आहे.

**तया पाणियाचेनि वहिलेपणें। अझुनी न धरती वोभाणें। ऐसा मायापूर हा कवणें। तरिजेल गा॥ ८१॥**

**अर्थ**—त्या पाण्याचा वर्षाव सारखा होत असल्यामुळें, त्या मायेचा पूर अजूनपर्यंत ओसरला नाही. अर्जुना! असा हा मायानदीचा पूर कोण तरून जाईल, सांग बरें. ॥ ८१ ॥

**गूढार्थदीपिका—तया पाणियाचेनि वहिलेपणें**—मागील ७१ व्या ओवींत ''गुणघनाचेनि वृष्टिभरें'' त्रिगुणरूपी मेघांतून सारखी वृष्टि होते, असें सांगितलें आहे, तोच वृष्टिरूपी पाण्याचा सारखा होत असलेला वर्षाव ''तया पाणियाचेनि वहिलेपणें'' या चरणाने माऊलींनी येथें सांगितला आहे.

**येथ एक नवलावो। जो जो कीजे तरणोपावो। तो तो अपावो। होय तें ऐक॥ ८२॥**

**अर्थ**—आणखी येथें असे एक आश्चर्य आहे की ही मायानदी तरून जाण्याकरितां जो जो उपाय करावा, तो तो अपायच होतो, पहा. ॥ ८२ ॥

**गूढार्थदीपिका—येथ एक नवलावो। जो जो कीजे तरणोपावो**—अकर्मरूप अशा परब्रह्माचे ठिकाणीं कर्माचें व कर्तृत्वाचें अस्तित्व मानणें हीच माया आहे आणि या मायेवर आरूढ होऊन ही मायानदी तरण्याचा जो जो उपाय केला जाईल, तो तो उपाय कर्मकर्तृत्वबुद्धि दृढ करणाराच होत असल्यामुळें तो उपाय न होतां अपायच होणार, हें स्पष्ट आहे.

**एक स्वयंबुध्दीच्या बाहीं। रिगाले तयांची शुध्दीचि नाहीं। एक जाणिवेचे डोहीं। गर्वेचि गिळिले ॥ ८३ ॥**

**अर्थ**—जे कोणी आपल्या केवळ बुद्धीच्या भरंवशावर ही मायानदी तरून जाण्याचां प्रयत्न करीत होते ते कोठें गेलेत याचा अजून पत्ताहि नाही. एक जे कोणी ''आम्हांला समजतें'' या शहाणपणाचे डोहांत गेले, ते गर्वानें गिळले गेले. ॥ ८३ ॥

**गूढार्थदीपिका—एक स्वयंबुद्धीच्या बाहीं—''तद्विज्ञानार्थं सद्गुरुमेवाभिगच्छेत्''** (मुं. उ. १-२-१२) **''शास्त्रज्ञोऽपि स्वातंत्र्येण ब्रह्मज्ञानान्वेषणं न कुर्यात्। इत्येतत् गुरुमेवेत्यवधारणफलम्''** ब्रह्मप्राप्ति करून घेऊन माया तरून जाण्याकरितां श्रीगुरुलाच शरण गेलें पाहिजे अशी श्रुति असून, पुरुष शास्त्रज्ञ झाला तरी त्याने अनुभवी गुरुवांचून **''जयास मोक्ष व्हावा। तेणें सद्गुरु करावा। सद्गुरुविणें मोक्ष पावावा। हे कल्पांतीं, न घडे''** (दास. द. ५-स. १) असेंच समर्थहि म्हणतात.

**एक जाणिवेचां डोहीं। गर्वेचि गिळिले**—मी ब्रह्म जाणलें असें म्हणणारा ज्ञानरूपाने ब्रह्मांपासून निराळा पडतो व त्याचे ठिकाणीं ब्रह्मैक्यता न राहतां नुसता, अहंकारच राहतो. ''एथ जाणीव करी तोचि नेणे। आथिलेपण मिरवी तेचि उणें। आम्ही जाहालों ऐसे जो म्हणे। तो कांहीचि नव्हे'' (ज्ञानेश्वरी) केवळ आपल्या स्वतंत्र बुद्धीने ब्रह्मज्ञान करून घेण्याचा प्रयत्न करुं नये असे आचार्यानीही म्हटले आहे. असो.

**एकीं वेदत्रयाचिया सांगडी। घेतल्या अहंभावाचिया धोंडी। ते मदमीनाचां तोंडी। सगळेचि गेले॥ ८४॥**

**अर्थ**—जे कोणी ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद या तीन वेदांची सांगड बांधून त्यांत अहंकाराचे धोंडे घेऊन बसले, ते मदरूपी माशाच्या तोंडांत सगळेच्या सगळे गेले. ॥ ८४॥

**गूढार्थदीपिका**—संपूर्ण ऋग्वेदादि तीन वेदांच्या अध्ययनरूपी कर्मानेहि परमेश्वरप्राप्ति होत नाही. उलट पुरुष अध्ययनाच्या मदाच्या स्वाधीनच होतो, असा अर्थ.

**एकीं वयसेचें जाड बांधले। मग मन्मथाचिये कासे लागले। ते विषयमगरीं सांडिले। चघळूनियां॥ ८५॥**
**आतां वार्धक्याच्या तरंगा-। माजीं मतिभ्रंशाचा जरंगा। तेणें कवळिजताती पैं गा। चहूंकडे॥ ८६॥**
**आणि शोकाचा कडा उपडत। क्रोधाच्या आवर्तीं दाटत। आपदागिधीं चुंबिजत। उधवला ठायीं॥ ८७॥**
**मग दु:खाचेनि बरबटें बोंबले। पाठीं मरणाचिये रेवे रेवले। ऐसे कामाचे कासे लागले। ते गेले वायां॥ ८८॥**
**एकीं यजनक्रियेची पेटी। बांधोनि घातली पोटीं। ते स्वर्गसुखाचां कपाटीं। शिरकोनि ठेले॥ ८९॥**
**एकीं मोक्षीं लागावयाचिया आशा। केला कर्मबाह्यांचा भरंवसा। परि ते पडिले वळसां। विधिनिषेधांच्या॥ ९०॥**
**जेथ वैराग्याची नाव न रिगे। विवेकाचा तागा न लगे। वरि कांहीं तरों ये योगें। तरी विपाय तो॥ ९१॥**
**ऐसें ये जीवाचिये आंगवणें। इये मायानदीचें तरणें। हें कासयासारिखें बोलणें। म्हणावें पां॥ ९२॥**
**जरी अपथ्यशीळा व्याधी। कळे साधूसी दुर्जनाची बुद्धि। कीं रागी सांडी रिद्धी। आली सांती॥ ९३॥**
**जरी चोरां सभा दाटे। अथवा मीना गळु घोटे। ना तरी भेडा उल्टे। विवसी जरी॥ ९४॥**
**पाडस वागुर करांडी। जरी मुंगी मेरु वोलांडी। तरी मायेची पैलथडी। देखती जीव॥ ९५॥**
**म्हणऊन गा पंडुसुता। जैसी सकामा न जिणवेचि वनिता। तैसी मायामय हे सरिता। न तरवे जीवां॥ ९६॥**
**येथ एकचि लीला तरले। जे सर्वभावें मज भजले। तयां ऐलीच थडिये सरलें। मायाजळ॥ ९७॥**

**अर्थ**—कोणी ही मायानदी तरून जाण्याकरितां, कंबरेला तारुण्याची कास बांधली, पण ते मदनाच्या ताब्यांत गेले व शेवटीं विषयरूपी मगरांनी त्यांना चघळून टाकून दिलें. ॥ ८५ ॥ आतां पुढें म्हातारपणाच्या लाटेंत सांपडून ते बुद्धिभ्रंशाच्या जाळयांत अटकले, म्हणून ते जें जें दिसेल त्याला कवटाळत जातात. ॥ ८६ ॥ आणि शोकाच्या कांठावर आदळत जातात, क्रोधाच्या भोंवऱ्यांत सांपडून कासावीस होतात व थोडें वर आले की नानाप्रकारचीं दु:खरूपी गिधाडें त्यांना टोंचतात. ॥ ८७ ॥ मग दु:खरूपी चिखलाने माखले गेले, नंतर शेवटीं मरणरूपी गाळांत रुतले गेले. याप्रमाणे विषयसुखाचे जे मागे लागले ते असे वायां गेले. ॥ ८८ ॥ कोणी यजनक्रियेची पेटी आपल्या पोटाशी बांधून, ते स्वर्गांतील सुखाच्या कपाटींत शिरले व तेथेच राहिले. ॥ ८९ ॥ कोणी मोक्षाला प्राप्त होणाच्या आशेने

कर्मरूपी हातांचा विश्वास धरला, पण ते मायानदीच्या विधिनिषेधरूप प्रवाहांत सांपडले. ॥ ९० ॥ या मायानदींत वैराग्याची नाव शिरणें कठीण आहे. विवेकाचा टिकाव लागत नाही आणि दुसऱ्या कांही उपायाने तरण्याचा प्रयत्न केला तरी तो विपायच होतो. ॥ ९१ ॥ अशा स्थितींत, जीवाने आपल्या सामर्थ्याने मायानदी तरून जाण्याची भाषा बोलणें, कशासारखें आहे, तें सांगतों. ॥ ९२ ॥ जर व्याधि पथ्य न करणाऱ्याच्या आटोक्यांत येईल, दुर्जनाची दुष्ट बुद्धि साधूच्या लक्षांत येईल किंवा विषयासक्त पुरुष ऋद्धि म्हणजें आपलें वाढलेलें ऐश्वर्य भोगणार नाही. ॥ ९३ ॥ जर चोराला न्याय करणारे सभासद भितील, किंवा गळच माश्याला गिळील, किंवा भित्रा पुरुष द्रव्यावर असलेल्या पिशाच्चाला घालवू शकेल. ॥ ९४ ॥ हरणाचें पोर व्याधाचें जाळें तोडील किंवा मुंगी मेरू ओलांडील, हें होणें शक्य असेल तरच जीव हा केवळ स्वसामर्थ्याने मायानदीच्या पैलतीराला लागेल. ॥ ९५ ॥ म्हणून, अर्जुना! कामी पुरुषाला जसे स्त्री जिंकणें शक्य नाही त्याप्रमाणे ही मायानदी, जीवाला स्वसामर्थ्याने तरून जाणें शक्य नाही. ॥ ९६ ॥ जो सर्वभावाने मज परमेश्वराचें भजन करतो त्याला, या तीरावरच असतांना, मायानदी आटलेली अनुभवाला येते. ॥ ९७ ॥

**गूढार्थदीपिका**—येथें हें रहस्य आहे की "अविद्याकल्पिते नामरूपे.....संसारप्रपंचबीजभूते सर्वज्ञस्येश्वरस्य मायाशक्तिः प्रकृतिरिति च श्रुतिस्मृत्योरभिलप्येते" (ब्र. सू. शां. भा. २-१-१४) परब्रह्माचे ठिकाणीं प्रगट होणाऱ्या नामरूपांना जीव, अज्ञानभ्रांतीने परब्रह्माहून निराळी वस्तु समजतो व तीं नामरूपें त्याच्या कल्पनेनुसार त्याच्या जगद्भासाला कारणीभूत होतात, म्हणून या नामरूपाना श्रुतिस्मृतितून परमेश्वराची मायाशक्ति म्हटले आहे, असे आचार्य ब्रह्मसूत्रभाष्यांत म्हणतात.

या मायेच्या निवृत्तीचे कर्मज्ञानादि जे उपाय सांगितले आहेत ते तिला सत्यत्व देऊनच सांगितले आहेत. मिथ्या किंवा काल्पनिक अशा मायावस्तूला सत्यत्व दिल्यावांचून तिच्या निवृत्तीचा उपाय संभवत नाही. मायाभ्रांतीला सत्यत्व देणें, हीच मुळांत भ्रांति आहे; म्हणून तिच्या निवृत्तीचा प्रयत्न करणारा भ्रांतीतच राहतो, भ्रांतीबाहेर होत नाही. रज्जूवर भासणाऱ्या सर्पाला भिऊन पळणारा मूर्ख भ्रांतच म्हणावा लागतो, पण रज्जुसर्पाला शस्त्र घेऊन मारणारा काय शहाणा ठरेल? याप्रमाणेच मायाभ्रांतीचा अंगीकार करणारा जसा भ्रांत, तसा माया निवृत्तीचा प्रयत्न करणाराहि भ्रांतच समजला जातो. वास्तविक माया नाही, देह नाही व दुःखहि नाही. एक सच्चिदानंद ब्रह्मच आहे व तेंहि अद्वैतस्वरूप असल्यामुळे त्याला स्वतःचा व दुसऱ्या कशाचाहि अहंकार नाही. तें निःशेष अहंकाररहित आहे. अशा त्या निःशेष अहंकाररहित परब्रह्माशीं ऐक्य पावण्याकरितां जीवालाहि निःशेष अहंकाररहित झालें पाहिजे.

परंतु कोणताहि क्रियारूप प्रत्यय अहंकारपूर्वक होत असल्यामुळे क्रियारूप प्रयत्नाने अहंकाररहित होणें शक्य नाही, म्हणून कोणताहि क्रियारूप प्रयत्न अपायकारकच होतो, असें माऊलींनी येथे सांगितलें आहे. आत्मज्ञानप्राप्तीच्या प्रयत्नांतहि अहंकार असतोच आणि मी ब्रह्मस्वरूप आहे अशी अपरोक्ष ज्ञानप्राप्ति झाल्यावरहि, मी व्यापक व अद्वितीय, अशा परब्रह्मांत "मी ब्रह्म" म्हणून उठणारा व्यक्तिरूप ज्ञानाहंकार उरतो; म्हणून ज्ञानमार्गातहि जीव निःशेष अहंकाररहित होऊं शकत नाही. अहंकार धरून अहंकाराची निवृत्ति होण्याऐवजी अहंकारच बळावतो आणि अहंकार ही मायाच असल्यामुळें अहंकार बळावला म्हणजे मायाच दृढ होते. "नवल अहंकाराची गोठी। विशेषें न लगे अज्ञानापाठीं। सज्ञानाचे झोंबे कंठीं। नाना संकटीं नाचवी" (ज्ञा. अ. १३-८२) असें माऊलींनी सांगितलें आहे. जोपर्यंत अहंकारनिवृत्ति होत नाही तोपर्यंत माया निवृत्त होत नाही. पण ज्या मायेने हा सर्व जगत् पसारा निर्माण केला ती नामरूपेंच, नामरूपात्मक रामकृष्णादि सगुण भगवंताच्या प्रेमभक्तीने पूर्ण ब्रह्मस्वरूप आहेत असा अनुभव येत असल्यामुळें नामरूपाचें मायात्वच नाहीसे होते याप्रमाणें भगवद्भक्ताला तरून जाण्याकरितां मायानदीच शिल्लक राहत नाही. "साधन संपत्ति हेचि माझें धन। सकळ चरण विठोबाचें. ॥ १ ॥ शीतल हा पंथ माहेराची वाट। जवळीच नीट सुखरूप ॥ २ ॥ भवनदी आड नव्हतीशी झाली। कोरडीच चाली जावे पायी. ॥ ३ ॥" (तु. गा.) तुकाराम महाराजहि आपला असाच अनुभव सांगतात. माया ही वस्तुच नाहीशी झाल्यानंतर तिचें कार्य जो अहंकार तोहि निःशेष मावळतो.

**जयां सद्‌गुरु तारू फुडें। जे अनुभवाचे कासे गाढे। जयां आत्मनिवेदनतरांडें। आकळलें॥ ९८ ॥**

**अर्थ**—सगुण-निर्गुण स्वरूपाचा ज्याला पूर्ण अनुभव आहे असा सद्‌गुरु ज्यांना खरोखर नावाडी मिळाला, त्यांना अहंताममतासमर्पणरूप पूर्ण आत्मनिवेदनाचा ताफा सांपडला. ॥ ९८ ॥

**गूढार्थदीपिका—सद्‌गुरु तारू फुडे। जे अनुभवाचे कासे गाढे**—''**जो शब्दज्ञानें पारंगतु। ब्रह्मानंदे सदा डुल्लतु। शिष्य प्रबोधनीं समर्थु। यथोचितु निजभावें॥ २८९ ॥** (ए. भा. अ. ३)-ज्याप्रमाणे अलंकाराचें प्रेम कायम राहण्याकरिता, तो सोन्याचा आहे, हें कळणें आवश्यक असतें, त्याप्रमाणेच सगुण परमेश्वराचें प्रेम कायम टिकण्याकरिता, तो माझा परमप्रेमरूप आत्माच आहे, असें समजणें आवश्यक असतें; म्हणून हें ऐक्यज्ञान होण्याकरिता श्रीगुरूची प्रथम आवश्यकता आहे. हें ऐक्यज्ञान, ''**जेणें स्वयें चाखिली नाही चवी। तो दुजियाते गोडी केवि लावी। यालागीं पूर्ण जो अनुभवी। तो तारी सच्छिष्यांसी**'' (ए. भा.) अनुभवी गुरुवांचून शब्दज्ञानी गुरु, शिष्याला अनुभवाला आणून देऊं शकत नाही.

**जया आत्मनिवेदनतरांडे। आकळले**—ज्याची नि:शेष अहंताममता समर्पण झाली—म्हणजे भगवंताहून मी म्हणून कोणी निराळा नसून एक भगवानच आहे व त्याचीच सर्व क्रीडा आहे, अशी दृष्टि ज्यांना प्राप्त झाली, त्यांनाच हा अनुभव असतो.

**जे अहंभावाचें वोझें सांडुनी। विकल्पाचिया झुळका चुकाउनि। अनुरागाचा निरुता होउनी। पाणिढाळु॥ ९९ ॥**

**अर्थ**—ज्यांनी अहंभावाचें म्हणजे अहंकाराचें ओझें टाकून दिलें. विकल्परूप वाऱ्याच्या मंद झुळुका चुकवून जे भगवत्‌च्चरणाचे ठिकाणीं वाहणाऱ्या शुद्ध प्रेमजळांचा उतार होऊन राहिले. ॥ ९९ ॥

**गूढार्थदीपिका—अहंभावाचें ओझें सांडूनि**—अहंभाव हा दोन प्रकारचा आहे. मीं देहरूप आहे हा एक व मी ब्रह्म आहे हा दुसरा. ''अहंभावीदयाभावी बोधस्य परमोऽवधि:'' (वि. चू. ४२५) ब्रह्मबोध पूर्ण झाला असतां, मी देह आहे हा अहंभाव नाहिसा होतो आणि ज्ञानानंतर होणाऱ्या सगुणभक्तीने, मी ब्रह्म आहे, हा अहंकारहि नाहिसा होतो; असा ज्ञान व भक्ति यांच्या योगाने ज्यांनी संपूर्ण अहंभाव नाहीसा केला.

**विकल्पाचिया झुळका। चुकाउनि**—मन हें विकल्पात्मक आहे. ''विकल्पाचिया झुळुका चुकाऊनि'' म्हणजे ज्यांनी मनाची उन्मनदशा केली आहे किंवा ज्याचें मन भगवंतावांचून इतर विषयांविषयीचे संकल्पविकल्प करीत नाही.

**जया ऐक्याचिया उतारा। बोधाचा जोडला तारा। मग निवृत्तीचिया पैल तीरा। झेंपावले जे॥ १०० ॥**

**अर्थ**—ज्यांनी जीवेश्वराच्या ऐक्याच्या उतारावरहि आत्मज्ञानाची सांगड बांधली-म्हणजे भगवच्चरणाचे ठिकाणीं वाहणाऱ्या शुद्ध प्रेमामुळें ज्यांना सहज आत्मबोध व ऐक्य प्राप्त झालें-व मग मायानदीच्या निवृत्तिरूप पैतलीरावर ते सहज गेले. ॥ १०० ॥

**गूढार्थदीपिका—ऐक्याचिया उतारा। बोधाचा जोडला तारा**—ज्याप्रमाणे नदीला उतार असता नदी पार होणें सोपें असतें व त्यांतच सांगड प्राप्त झाली असतां पायाला पाणी न लागतां मनुष्य नदी पार होतो; त्याप्रमाणे ज्यांना सगुण परमेश्वराची भक्ति असते. त्यांना ऐक्याचा उतार असतो-म्हणजे त्यांचे परमेश्वराशीं ऐक्य होतें. कारण भक्तीनेच ऐक्यबोधाची सांगड त्यांना प्राप्त होते व भक्तीच्या योगाने त्यांना मायानदीच्या पाण्याचा स्पर्श होत नाही.

**ते उपरतीचां वांवीं सेलत। सोहंभावाचेनि थावें पेलत। मग निघाले अनकळित। निवृत्तितटीं॥ १०१ ॥**

**अर्थ**—जे उपरतीच्या हातांनी पाणी तोडीत व सोहंभावाच्या बळाने पोहत सहज निवृत्तिरूप कांठावर जातात. ॥ १०१ ॥

**गूढार्थदीपिका—उपरतीचां वावीं सेलत**—''लीनवृत्तेरनुत्पत्तिर्मर्यादोपरतेस्तु स:'' (वि. चू. ४२५) परमेश्वराचे ठिकाणीं लीन झालेली वृत्ति-म्हणजे तदाकार झालेली वृत्ति पुन: देहावर न येणें याला उपरति म्हणतात ही उपरतिच ज्ञानीभक्ताचे हात होत. या हातांनी ते मायानदीचे पाणी तोडतात व सोहंभाव रूप ऐक्यबळाने मायानदीवर तरंगत, मायानदी सहज पार करतात.

**येणें उपायें मज भजले। ते हे माझी माया तरले। परि ऐसे भक्त विपाइले। बहुवस नाहीं॥ १०२॥**

**अर्थ**—अशा उपायांनी जे माझें भजन करतात तेच माझी ही दुस्तर माया तरून जातात. पण अर्जुना! असे ज्ञानीभक्त क्वचित्च असतात, फार नाही. ॥ १०२ ॥

**गूढार्थदीपिका**—या वरील ओव्यांचा भावार्थ असा आहे की मायानदी तरण्याकरिता सद्‌गुरूची प्राप्ति, आत्मानुभव, आत्मनिवेदन इत्यादि जी साधनसामुग्री आवश्यक असते, ती भगवद्भक्ताला भगवत्कृपेने अनायासें प्राप्त होते.

**न मां दुष्कृतिनो मूढाः प्रपद्यन्ते नराधमाः। माययापहृतज्ञाना आसुरं भावमाश्रिताः॥ १५॥**

**चतुर्विधा भजन्ते मां जनाः सुकृतिनोऽर्जुन। आर्तो जिज्ञासुरर्थार्थी ज्ञानी च भरतर्षभ॥ १६॥**

**अर्थ**—माझ्या मायेने यथार्थ ज्ञान नष्ट होऊन, भ्रांत झालेले व हिंसादिक आसुरी भावांचा आश्रय करणारे पापी, अविवेकी, अत्यंत दुष्ट पुरुष मला शरण येत नाहीत. ॥ १५ ॥ आर्त म्हणजे रोगादिकांच्या दुःखांनी ग्रस्त झालेले, जिज्ञासु म्हणजे भगवंताचें स्वरूप जाणण्याची इच्छा करणारे, अर्थार्थी म्हणजे धनाच्या प्राप्तीची इच्छा करणारे व ज्ञानी म्हणजे आत्मस्वरूप जाणणारे, असे चार प्रकारचे पुण्यशील लोक मात्र माझें भजन करतात. ॥ १६ ॥

**जे बहुतां एका अवांतरु। अहंकाराचा भूतसंचारु। जाहला म्हणोनि विसरु। आत्मबोधाचा॥ १०३॥**

**अर्थ**—भक्तांना सोडून बाकी बहुतेक सर्व जीवांना देहाहंकाररूपी पिशाच्चाने पछाडल्यामुळें आत्मबोधाचा विसर पडला. ॥ १०३ ॥

**गूढार्थदीपिका**—देहाहंकाराने आत्मबोधाचा विसर पडतो आणि आत्मबोधाची विस्मृति झाली असतांच देहाहंकार राहतो, असे माऊलींनी या ओवींत सुचविलें आहे.

**ते वेळीं नियमाचें वस्त्र नाठवें। पुढिले अधोगतीची लाज नेणवे। आणि करितात जें न करावें। वेदु म्हणे॥ १०४॥**

**अर्थ**—त्यावेळीं आपण नियमाचें वस्त्र नेसलें पाहिजे ही आठवण राहत नाही, मेल्यानंतर अशा स्वैर वर्तनामुळें अधोगति होईल याची लाज वाटत नाही आणि वेदशास्त्रांनी जे करूं नये म्हणून सांगितलें तेच नेमके करितात. ॥ १०४ ॥

**गूढार्थदीपिका**—देहाहंकारानेच आत्मविस्मृति होऊन स्वैराचार वाढतो. जसाजसा देहाहंकार वाढतो, तसा तसा स्वैराचार वाढतो, असा अर्थ.

**पाहें पां शरीराचिया गांवा। जयालागीं आले पांडवा। तो कार्यार्थु आघवा। सांडुनियां॥ १०५॥**

**इंद्रियग्रामींचां राजबिदीं। अहंममतेचिया जल्पवादीं। विकारांतरांची मांदी। मेळविताती॥ १०६॥**

**दुःखशोकांचां घाईं। मारिलीयाची सेचि नाहीं। हें सांगावया कारण काई। जे ग्रासिले माया॥ १०७॥**

**म्हणोनि ते मातें चुकले। आइकां चतुर्विध मज भजले। जिहीं आत्महित केलें। वाढतें गा॥ १०८॥**

**तो पहिला आर्तु म्हणिजे। दुसरा जिज्ञासु बोलिजे। तिजा अर्थार्थी जाणिजे। ज्ञानिया चौथा॥ १०९॥**

**अर्थ**—अर्जुना! पहा, ज्या परमेश्वरप्राप्तीच्या उद्देशाने आपल्याला पमेश्वराने मनुष्यजन्मांत घातलें, तो कार्यभाव साधण्याचें सोडून. ॥ १०५ ॥ इंद्रियांच्या समुदायरूप राजमार्गावर अनेक विकारांचा समुदाय मिळवून किंवा एकत्र करून, हा मी व हें माझें अशी अहंताममतेची व्यर्थ बडबड करीत. ॥ १०६ ॥ दुःखशोकांच्या घावाने मारले जात असतांहि त्याची त्यांना स्मृति देखील नसते. हें सर्व सांगण्याचें कारण इतकेंच की अशारीतीने सर्व लोक माझ्या मायेने ग्रासिलेले आहेत. ॥ १०७ ॥ म्हणून ते मला शरण येत नाहीत. बाकी ज्यांनी आपलें वाढतें कल्याण करून घेतलें असे चार प्रकारचे लोक मात्र मला भजतात. ॥ १०८ ॥ पहिला म्हणजे आर्तभक्त, दुसर जिज्ञासु म्हटला जातो, तिसरा अर्थार्थी होय व चवथा ज्ञानी होय. ॥ १०९ ॥

**तेषां ज्ञानी नित्ययुक्त एकभक्तिर्विशिष्यते। प्रियो हि ज्ञानिनोऽत्यर्थमहं स च मम प्रियः॥ १७॥**

**अर्थ**—त्यांमध्ये ज्ञानीभक्त मात्र माझें अखंड भजन करतो. तो माझ्या प्रेमाशिवाय दुसरें कांही करीत नाही;

म्हणून तो सर्वांत श्रेष्ठ होय. मी ज्ञान्याला अत्यंत प्रिय असतो व तो मला अत्यंत प्रिय असतो. ॥ १७ ॥

**तेथ आर्तु तो आर्तीचेनि व्याजें। जिज्ञासु तो जाणावयालागीं भजे। तिजेनि तेणें इच्छिजे। अर्थसिद्धि ॥ ११० ॥**

**अर्थ**—आर्तभक्त आपलें दु:ख नाहीसे होण्याकरिता, माझे भजन करतो. जिज्ञासुभक्त मला जाणण्याकरितां मला भजतो आणि तिसरा अर्थार्थी भक्त धनाकरिता माझें भजन करीत असतो. ॥ ११० ॥

**गूढार्थदीपिका**—या तिन्ही भक्तांची भक्ति कामनिक असल्यामुळे गौण असली, तरी ती अनन्य असते म्हणजे कामना—सिद्धि व्हावी म्हणून जरी ते भक्ति करीत असले, तरी ते आपल्या उपास्याला सोडून दुसऱ्या देवतांची भक्ति करीत नाहीत—म्हणजे दुसऱ्या देवतांना शरण जात नाहीत. या एकनिष्ठेतेनेच त्यांची कामवासना नाहीशी होऊन त्यांचें वाढतें आत्महित होतें व शेवटीं ते निष्काम ज्ञानीभक्त होतात. ''न मय्यावेशितधियां काम: कामाय कल्पते। भर्जिता क्वथिता धाना प्रायो बीजाय नेष्यते॥'' (१०-२२-२६ भागवत.)

भाजलेलें किंवा उकडलेलें बीज जसें अंकुरित होत नाही, तशी माझी सकाम भक्ति करणाऱ्याचीहि कामवासना क्रमाने नाहीशी होते, ती वाढत नाही.

**मग चौथियाच्या ठायीं। कांहींचि करणें नाहीं। म्हणोनि भक्तु एकु पाहीं। ज्ञानिया जो॥ १११ ॥**
**जे तया ज्ञानाचेनि प्रकाशें। फिटलें भेदभेदांचें कडवसें। मग मीचि जाहाला समरसें। आणि भक्तुही तेवींचि॥ ११२ ॥**

**अर्थ**—जो ज्ञानी आहे तो कोणत्याही कामनेने माझें भजन करीत नाही म्हणून जो ज्ञानीभक्त असतो तोच एक खराभक्त होय. ॥ १११ ॥ कारण ज्ञानाच्या प्रकाशाने माझ्याहून तो आपल्याला भिन्न समजत नाही. माझ्याशीं तो समरस मिळाला असतो व आणखी भक्तहि राहतो. ॥ ११२ ॥

**गूढार्थदीपिका—मीचि जाहाला समरसें। भक्तुही तेविंचि**—आत्मज्ञानाने जीवात्मैक्य झाल्यावर सगुणभक्ति राहू शकत नाही, असे जे अननुभवी ज्ञान्यांचें म्हणणें असतें, त्याला श्रीज्ञानेश्वरमाऊलींनी, भेद नाहिसा होऊन समरस ऐक्य झाल्यावरहि भक्ति राहते असते, असे चोख उत्तर दिलें आहे.

दृढ आत्मज्ञान झाल्यावर व्युत्थानकालीं जो जगताचा मिथ्या प्रत्यय उरतो, तो नाहिसा होऊन, आंत आत्मस्वरूपाचा निर्गुण प्रत्यय व बाहेर परब्रह्माचा सगुण प्रत्यय येऊन, परब्रह्माचें पूर्ण अद्वैतत्व अनुभवाला येण्याकरिता ज्ञानानंतर सगुण भगवंताच्या प्रेमभक्तीची आवश्यकता असते.

**''विशुद्धज्ञानमुत्पन्नं यस्य तस्य महात्मन:।.................शिवलिंगस्य पूजायां शिवस्थानेषु सुव्रत:। प्रियबुद्धि: प्रजायेत स्वभावादेव सर्वदा॥''**

**य: स विज्ञानिनस्तेषु प्रद्वेषाऽपि जायते। उपेक्षा वा न स ज्ञानी पशुविज्ञानवंचक:॥ ७२॥** (सू. सं.)

खऱ्या अनुभवी ज्ञान्याला निर्गुणस्वरूपाप्रमाणेच सगुण स्वरूपाचेंहि स्वाभाविक प्रेम असतें, असें सूतसंहितेंत म्हटलें आहे.

**परि आणिकांचिये दिठी नावेक। जैसा स्फटिकुचि आभासे उदक। तैसा ज्ञानी नव्हे कौतुक। सांगतां तो॥ ११३ ॥**

**अर्थ**—परंतु ज्याप्रमाणे स्फटिकमणि पाण्यांत अलग असतो पण अज्ञान्याला पाणीरूपच दिसतो तसा ज्ञानी नसतो, त्याची स्थिति आश्चर्यकारक असते. ॥ ११३ ॥

**गूढार्थदीपिका**—पाण्यांत पडलेला स्फटिकमणि पाण्याहून निराळा असतो, पण अज्ञान्याला तो पाणीस्वरूप भासतो. ज्ञानीभक्ताची गोष्ट तशी नाही. म्हणजे पाण्याचें व स्फटिकमण्याचें द्वैत किंवा निराळेपणा सत्य असून अद्वैत किंवा एकरूपता भासमात्र असते आणि ज्ञान्याचें परमेश्वराशीं ऐक्य सत्य असून द्वैत किंवा निराळेपणा भासमात्र असतो असा अर्थ.

ज्ञानीभक्त हा परमेश्वराशीं समरस ऐक्य पावलेला असतो, पण तो बाहेर भक्तीमुळें अज्ञान्याला परमेश्वराहून निराळा भासतो. भक्तीमुळें भासणारा हा द्वैताचा भास परमेश्वराचें व जीवाचें द्वैत किंवा निराळेपणा वाढविणारा नसून अद्वैत किंवा ऐक्यच वाढविणारा आहे. जसें ''द्वैतदशेनें आंगण। अद्वैत ओळगे आपण। भेद तव तंव दूण।

अभेदासी'' (अमृ. प्र. ९-२८) असें श्रीज्ञानेश्वर माऊलींनी अमृतानुभवांत म्हटले आहे.

''भक्त्यर्थं कल्पितं द्वैतं अद्वैतादपि सुंदरम्'' असा एका भक्तानेहि आपला अनुभव सांगितला आहे.

**जैसा वारा कां गगनीं विरे। मग वारेपण वेगळें नुरे। तेविं भक्त हे पैज न सरे। जरी ऐक्या आला॥ ११४॥**

**अर्थ**—ज्याप्रमाणे वारा आकाशांत विरला म्हणजे मग वेगळा दिसत नाही, त्याप्रमाणे ज्ञानीपुरुषाचे माझ्याशी अत्यंत ऐक्य असते, पण तो ज्ञानीपुरुष आपलें भक्तपण सोडत नाही. ॥ ११४॥

**गूढार्थदीपिका—भक्त हे पैज न सरे। जरी ऐक्या आला**—आकाशांत विरलेला वायु ज्याप्रमाणे असतो पण वेगळा अनुभवाला येत नाही, त्याप्रमाणे परमेश्वराशीं ऐक्य पावलेल्या ज्ञान्याची, ऐक्य न मोडतांच, भक्ति होत असते असा अर्थ.

**जरी पवन हाल्वूनि पाहिजे। तरी गगना वेगळा देखिजे। एऱ्हवीं गगन तो सहजें। असे जैसें॥ ११५॥**
**तैसें शरीरीं हन कर्में। तो भक्त ऐसा गमे। परी अंतरें प्रतीतिधर्में। मीचि जाहला॥ ११६॥**
**आणि ज्ञानाचेनि उजिडलेपणें। मी आत्मा ऐसें तो जाणे। म्हणऊनि मीही तैसेंचि म्हणें। उचंबळला सांता॥ ११७॥**
**हां गा जीवापैलीकडिली खुणे। जो पावोनि वावरोंही जाणे। तो देहाचेनि वेगळेपणें। काय वेगळा होय॥ ११८ ॥**

**अर्थ**—जर वायु हालवून पाहिला तर त्याचा आकाशाहून निराळेपणा प्रत्ययाला येतो, नाहीतर जशाच्या तसा आकाशरूपच तो भासतो. ॥ ११५॥ त्याप्रमाणे शरीराकडून होणाऱ्या कर्मामुळें तो भक्त असा भासतो, पण अंत:करणांतील अनुभवाने तो मीच झालेला असतो. ॥ ११६ ॥ आणि त्याचे ठिकाणीं माझ्या स्वरूपाचें ज्ञान प्रकाशित झाल्यामुळें मला तो आपला आत्मा म्हणतो. ॥ ११७॥ अर्जुना! जीवदशेच्या पलीकडे जे शुद्ध आत्मस्वरूप त्याची खूण ओळखून, तोच मी आहे, असें ऐक्य ओळखून, जो शुद्ध आत्मस्वरूप झाला व त्या अनुभवानेच जो व्यवहार करतो, तो नुसत्या देहाचे वेगळेपणाने वेगळा होईल काय?॥ ११८॥

उदारा: सर्व एवैते ज्ञानी त्वात्मैव मे मतम्। आस्थित: स हि युक्तात्मा मामेवानुत्तमां गतिम्॥ १८॥

**अर्थ**—हे सर्व चार प्रकारचे माझे प्रिय भक्तच आहेत. पण ज्ञानी मात्र माझा आत्माच आहे, (म्हणजे मला अत्यंत प्रिय आहे); कारण माझे ठिकाणींच त्याचें चित्त स्थिर झालें असल्यामुळें, अत्युत्तम गति जो मी, त्या मला तो प्राप्त होतो. ॥ १८॥

**म्हणोनि आपुलाल्या हिताचेनि लोभें। मज आवडे तोही भक्त झोंबे। परी मीचि करी वालभें। ऐसा ज्ञानिया एकु॥ ११९ ॥**
**पाहें पां दुभतेयाचिया आशा। जगचि धेनूसि करीताहे फांसा। परि दोरेंवीण कैसा। वत्साचा बळी॥ १२०॥**
**कां जे तनुमनुप्राणें। तें आणिक कांहींचि नेणे। देखे तयातें म्हणे। हे मायचि कीं माझी॥ १२१॥**
**तें येणें मानें अनन्यगती। म्हणूनि धेनुही तैसीचि प्रीती। यालागीं लक्ष्मीपती। बोलिले साच॥ १२२॥**
**हें असो मग म्हणितलें। जे कां तुज सांगितले। तेही भक्त भले। पढियंते आम्हां॥ १२३॥**
**परि जाणोनियां मातें। जो पाहों विसरला मागौतें। जैसें सागरा येऊनि सरिते। मुरडावें ठेलें॥ १२४॥**
**तैसी अंत:करणकुहरीं उपजली। जयाची प्रतीतिगंगा मज मिनली। तो मी हे काय बोली। फार करूं॥ १२५॥**
**एऱ्हवीं ज्ञानिया जो म्हणिजे। तो चैतन्यचि केवळ माझें। हें न म्हणावें परि काय कीजे। न बोलणें बोलें॥ १२६॥**

**अर्थ**—म्हणून अर्जुना! आपल्या कल्याणाकरिता कोणीहि माझी भक्ति करितो, पण माझेंच एक प्रेम ज्याला आहे. असा एक ज्ञानीभक्तच असतो. ॥ ११९॥ पहा, अर्जुना! दूध मिळावें म्हणून दुधाचे आशेने लोक गायीला दाव्याने बांधून ठेवतात किंवा आडी घालतात पण ती दोरावांचून वासरांच्या स्वाधीन कशी होते, पहा. ॥ १२०॥ कारण शरीर, मन, प्राण हे तिन्ही वासराने गायीकडेच लावलेलें असतें. तें वासरू गायीवांचून दुसरें कांही जाणत नाही. गायीला पाहिल्याबरोबर तें वासरू 'माझी माय' म्हणून हंबरतें. ॥ १२१॥ तें वासरू अशारीतीने गायीच्या ठिकाणीं अनन्य असतें, म्हणूनच गायहि त्या वासराचे ठिकाणीं अनन्य प्रेम करते; म्हणूनच लक्ष्मीपति भगवान श्रीकृष्णांनी वर जें सांगितलें तें खरें आहे. ॥ १२२॥ हे असो, भगवान मग म्हणाले, अर्जुना! जे दुसरे इतर भक्त मी सांगितलें,

तेहि चांगले असून मला प्रिय आहेत. ॥ १२३ ॥ ज्याप्रमाणे समुद्राला येऊन मिळाळेले नदीचें पाणी मागें मुरडणे बंद होतें, त्याप्रमाणे मला जाणून जे मागें सोडलेल्या संसाराला विसरले. ॥ १२४ ॥ व ज्याच्या अंत:करणरूपी गुहेंत जन्माला आलेली अनुभवगंगा मला येऊन मिळाली, तो मीच होतो, हें शब्दाने काय विस्तारून सांगू. ॥ १२५ ॥ वास्तविक ज्ञानी पुरुष म्हणजे माझें केवळ चैतन्यस्वरूप होय. असें बोलूं नये खरें, पण काय करूं जें बोलूं नये तें बोललों. ॥ १२६ ॥

**गूढार्थदीपिका—तो चैतन्यचि केवळ माझें**—''एकभक्तिर्विशिष्यते'' असें जें ज्ञानीभक्ताविषयीं भगवंतांनी मागें म्हटलें आहे. त्याचेंच येथे स्पष्टींकरण केलें आहे. या भक्तींत दोन गोष्टी मुख्य असतात. अनन्यता व दीनता. ''अन्याश्रयाणां, त्यागोऽनन्यता'' (ना. भ. सू. १०) एका भगवंतावांचून दुसरें कांहीच नाही हें जाणून, इंद्रादिदेवतांचा आश्रय सोडणें व एका भगवंतालाच शरण जाणें हीच अनन्यता होय. ही अनन्यता ज्ञान्याचें ठिकाणीं आत्मज्ञानामुळें सहजच येते. ''माझेकडून भगवंता! तुझ्या प्राप्तीचें साधन कांहीच यथायोग्य होत नाही, तूंच कृपा करशील, तर माझा उद्धार होईल'' अशी मनोवृत्ति ठेवणें याला दीनता म्हणतात. या सानन्यदीनतापूर्वक केलेल्या प्रेमभक्तीने ज्ञानीभक्त भगवंताशीं जाणीवरहित समरस ऐक्य पावतो हें ''चैतन्यचि केवळ माझें'' या पंक्तीने दाखविलें आहें.

**बहूनां जन्मनामन्ते ज्ञानवान्मां प्रपद्यते । वासुदेवः सर्वमिति स महात्मा सुदुर्लभः ॥ १९ ॥**

**अर्थ**—पुष्कळ जन्मानंतर, माझ्या स्वरूपाचा साक्षात्कार होऊन तो मला प्राप्त होतो. सर्व एक नामरूपासह पूर्ण ब्रह्मच असते, त्यावाचून दुसरे कांही नाही असे जाणणारा महात्मा दुर्लभ आहे. ॥ १९ ॥

**गूढार्थदीपिका**—येथें पहिल्या चरणांत 'मी ब्रह्मरूप आहे' अशा व्यतिरेकज्ञानानें होणाऱ्या आत्मप्राप्तीचा उल्लेख असून, दुसऱ्या चरणांत अन्वयाने होणाऱ्या ''सर्व खल्विदं ब्रह्म'' या व्यापक ब्रह्मप्राप्तीचा उल्लेख आहे. बहुतेक ज्ञानीपुरुष व्यतिरेकाने येणाऱ्या अनुभवांतच तृप्ति मानून राहतात आणि या व्यतिरेक ज्ञानानंतर सगुणस्वरूपाची प्रेमभक्ति करून अन्वयाने सर्व नामरूपासह पूर्ण एक सच्चिदानंद परमात्माच आहे. असा व्यापक अनुभव (सगुणाला तुच्छ समजून) घेण्याच्या भरीस पडत नाहीत. पण नुसत्या व्यतिरेकाने आत्मानुभव घेणाऱ्या ज्ञान्यांपेक्षां, व्यतिरेकानंतर अन्वयाचा नामरूपासह व्यापक अनुभव घेणारा महात्मा श्रेष्ठ होय हेच ''वासुदेवः सर्वमिति स महात्मा सुदुर्लभः'' या चरणाने सांगितलें आहे.

**जे तो विषयांची दाट झाडी। माजीं कामक्रोधांचीं सांकडीं। चुकावूनि आला पाडी। सद्वासनेचिया॥ १२७ ॥**

**अर्थ**—शब्दादि पंचविषयांचें दाट अरण्य व त्यांतील कामक्रोधादि संकटें किंवा भीति यांना चुकवून सद्वासनेच्या ओसाड जमिनीवर तो पुरुष येतो. ॥ १२७ ॥

**गूढार्थदीपिका**—संसारात पडलेल्या जीवाला मुक्त होण्यास अनेक जन्म कसे लागतात याचें माऊलींनी या श्लोकावरील ओव्यांत वर्णन केलें आहे.

प्रथम शास्त्रानुसार वागत असतां, कांही कालाने, विषयवासना व त्यामुळें उत्पन्न होणाऱ्या कामक्रोधादिकांतून सुटून, परमेश्वर प्राप्ति करून घ्यावी अशी सद्वासना उत्पन्न होते.

**मग साधुसंगे सुभटा। उजू सत्कर्माचिया वाटा। अप्रवृत्तीचा अव्हांटा। डावलूनि॥ १२८ ॥**

**अर्थ**—मग अर्जुना! साधूच्या संगतीने शास्त्रविरुद्ध वागण्याची आडवाट सोडून, सरळ सत्कर्माचरणाची वाट धरतो. ॥ १२८ ॥

**गूढार्थदीपिका**—परमेश्वरकृपेने सद्वासना उत्पन्न झाल्यानंतर परमेश्वरकृपेनेच सत्पुरुषाचा संग घडतो. त्यांच्या उपदेशाने विषयसुखाच्या प्राप्तीकरिता कर्म करणें बंद पडून, भगवत्प्राप्तीकरिताच निष्कामचित्ताने कर्माचरण होऊं लागतें, असा अर्थ.

**आणि जन्मशतांचा वाहतवणा। तेवीं आस्थेचिया न लेचि वाहणा। तेथ फलहेतूचा उगाणा। कवणु चाळी॥ १२९ ॥**

**अर्थ**—आणि अशा सन्मार्गाने शेकडों जन्म तो वाट चालत राहतो; पण विषयसुखरूपी आशेच्या वाहणा तो

कधीं घालत नाही. तेथे फळाची इच्छा धरणें, याचा हिशेब कोण पाहतो?॥ १२९ ॥

**गूढार्थदीपिका—आस्थेचिया न लेचि वाहणा**—केलें जाणाऱ्या निष्काम कर्माच्या योगाने पुढे विषयसुखाकडे ढुंकून न पाहतां परमेश्वरप्राप्तीकरितां शेंकडों जन्म लागलें तरी ते घालविण्याचे त्याला धैर्य येतें.

**ऐसा शरीरसंयोगाचिये राती। माजीं धांवतां सडिया आयती। तंव कर्मक्षयाची पाहाती। पाहांट जाली॥ १३०॥**

**अर्थ**—याप्रमाणे शरीराच्या संयोगरूप रात्रीमध्ये सर्व संग सोडून, एकटाच धांवू लागला असतां, कर्मक्षयाची उजेडरूप पहाट होते.॥ १३०॥

**गूढार्थदीपिका—शरीरसंयोगाचिये राती।-माजी धांवतां सडिया आयती**—प्रारब्धकर्माने प्राप्त झालेल्या पांचभौतिक देहामुळें आत्मविस्मृति झालीं असतांहि, त्या देहबुद्धि मन इंद्रिये इत्यादिकांहून मी निराळा आहे, असें जाणून त्याचें प्रेम न धरतां, चित्तांत परमेश्वरप्राप्तीची सारखी तळमळ वागविली असतां, सर्व कर्माचा नाश होतो.

**तैसीच गुरुकृपाउखा उजळली। ज्ञानाची वोतपली पडली। तेथ साम्याची ऋद्धि उघडली। तयाचिये दिठी॥ १३१॥**

**अर्थ**—त्या बरोबर गुरुकृपारूप उष:काल होऊन, तिच्यायोगाने आत्मैक्यज्ञानदृष्टिरूप तिरीप पडते. ज्ञानाची तिरीप पडल्यामुळें त्याच्या दृष्टिसमोर साम्यतेचें भांडार उघडलें जातें.॥ १३१॥

**गूढार्थदीपिका—गुरुकृपा उखा उजळली**—परमेश्वरप्राप्तीच्या तळमळीने परमेश्वरकृपा होऊन सद्‌गुरुची प्राप्ति होते व सद्‌गुरुकृपेने आत्मज्ञान होऊन ज्ञानाच्या दृष्टीला सर्वत्र सम असलेल्या एका ब्रह्माचाच अनुभव येतो.

**ते वेळीं जयाकडे वास पाहे। तेउता मीचि तया एकु आहे। अथवा निवांत जरी राहे। तरी मीचि तया॥ १३२॥**
**हें असो आणिक कांहीं। तया सर्वत्र मीवांचूनि नाहीं। जैसें सबाह्य जळ डोहीं। बुडालिया घटा॥ १३३॥**
**तैसा तो मजभीतरीं। मी तया आंतुबाहेरी। हें सांगिजे बोलवरी। तैसें नव्हे॥ १३४॥**
**म्हणोनि असो हें इयापरी। तो देखे ज्ञानाची वाखारी। तेणें संसरलेनि करी। आपु विश्व॥ १३५॥**
**हें समस्तही श्रीवासुदेवो। ऐसा प्रतीतिरसाचा वोतला भावो। म्हणोनि भक्तांमाजीं रावो। आणि ज्ञानिया तोचि॥ १३६॥**

**अर्थ**—तेव्हा जेथे जेथे तो दृष्टि देतो तेथे तेथे त्याला मीच एक दिसतो किंवा कोणीहिकडे दृष्टि न देतां, निवांत राहिला तरी, मीच त्याला दिसतो.॥ १३२॥ हें असो. अर्जुना! ज्याप्रमाणे पाण्यांत बुडालेल्या घटाला आंतबाहेर पाणीच असतें, त्याप्रमाणे त्याला माझ्यावांचून दुसरें कांहीच दिसत नाही.॥ १३३॥ तसा तो ज्ञानीभक्त माझ्या आंत असतो व त्याच्या आंत बाहेर मी असतो, अर्जुना! ही स्थिति बोलण्याने सांगतां येण्याजोगी नाही.॥ १३४॥ म्हणून हे असो. याप्रमाणे तो सर्वत्र ज्ञानाचें कोठारच पाहतो—म्हणजे त्याला सर्वत्र ज्ञानरूप आत्माच दिसतो—व त्या ज्ञानाने सर्व व्यवहार करीत असतांना, सर्व विश्वच आपण होऊन जातो.॥ १३५॥ हे सर्व नामरूपात्मक श्रीवासुदेवच आहे असा त्यांच्या अंतकरणांत अनुभवाचा ठसा ओतला गेला असतो म्हणूनच तो ज्ञान्यांतहि श्रेष्ठ होय व भक्तांतहि श्रेष्ठ होय.॥ १३६॥

**गूढार्थदीपिका**—नामरूपासह सर्व परब्रह्म आहे, दुसरें कांही नाही अशी ज्ञान्याची परानिष्ठा प्राप्त झाली असतां सगुणाचे ठिकाणीं आपोआप प्रेम जडून ज्ञानी भक्त होतो.

**जयाचिये प्रतीतीचां वाखारां। पवाडु होय चराचरा। तो महात्मा धनुर्धरा। दुर्लभु आथी॥ १३७॥**
**येर बहु जोडती किरीटी। जयांचीं भजनें भोगासाठीं। जे आशातिमिरें दृष्टी। मंद जाले॥ १३८॥**

**अर्थ**—ज्याच्या अनुभवाच्या कोठारांत संपूर्ण विश्वाचा विस्तार झालेला असतो, असा सिद्ध पुरुष अर्जुना! दुर्लभ असतो.॥ १३७॥ हे अर्जुना! विषयसुखाचे आशेने ज्यांची दृष्टि मंद होऊन जे विषयांध झाले आहेत व विषयभोगाच्या प्राप्तीसाठीच माझें भजन करतात, असे या महात्म्याहून इतर पुष्कळ सांपडतात.॥ १३८॥

**कामैस्तैस्तैर्हृतज्ञाना: प्रपद्यन्तेऽन्यदेवता: । तं तं नियममास्थाय प्रकृत्या नियता: स्वया॥ २०॥**

**अर्थ**—पुत्र धन इत्यादि विषयसुखाच्या वासनेने हें विवेकज्ञान नष्ट झाल्यामुळें आपल्या प्रकृतीच्या सर्वस्वीं स्वाधीन होऊन निरनिराळ्या देवतांच्या आराधनेचे नियम पाळून कामनापूर्तीकरितां मला सोडून जे इतर निरनिराळ्या देवतांना शरण जातात.॥ २०॥

**आणि फळाचिया हांवा। हृदयीं कामा जाला रिगावा। कीं तयाचिये घसणी दिवा। ज्ञानाचा गेला॥ १३९ ॥**
**ऐसे उभयतां आंधारीं पडले। म्हणोनि पासींचि मातें चुकले। मग सर्वभावें अनुसरले। देवतांतरां॥ १४० ॥**
**आधींच प्रकृतीचे पाइक। वरी भोगालागीं तंव रंक। मग तेणें लोलुप्यें कौतुक। कैसे भजती॥ १४१ ॥**
**कवणी तिया नियमबुद्धि। कैसिया हन उपचारसमृद्धि। कां अर्पण यथाविधि। विहित करणें॥ १४२ ॥**

**अर्थ**—कर्माचें फळ मिळावें या तीव्र इच्छेने अंत:करणांत वासना शिरली व वासनेच्या संघर्षाने ज्ञानाचा दिवा विझला. ॥ १३९ ॥ या रीतीने आंतबाहेर दोन्हीकडे अज्ञानांध:कारांत ते पडतात, म्हणून मी जवळ असून त्यांना दिसत नाही. मला चुकल्यामुळें इतर देवतांचें ते सर्व भावाने भजन करितात. ॥ १४० ॥ अगोदर प्रकृतीच्या स्वाधीन झालेले असतात व त्यांत पुन: विषयसुखाकरिता दीन झालेले असतात. मग विषयलंपट होऊन देवतांची कशी उल्हासाने सेवा करतात; पहा. ॥ १४१ ॥ देवतांचे आराधनेकरितां जे नियम सांगितले असतील ते पाळण्याविषयीं, जें उपचार सांगितले असतील ते मिळविण्याविषयी आणि जें विहित कर्म सांगितलें असेल तें यथाविधि करण्याविषयीं, कशी काळजी घेतात पहा. ॥ १४२ ॥

**यो यो यां यां तनुं भक्त: श्रद्धयार्चितुमिच्छति । तस्य तस्याचलां श्रद्धां तामेव विदधाम्यहम्॥ २१ ॥**

**अर्थ**—जो जो उपासक श्रद्धेने ज्या ज्या भगवत्तनूचें अर्चन करूं इच्छितो, त्या त्या स्वरूपाचे ठिकाणीं त्याची ती श्रद्धाच मी दृढ करतों॥ २१ ॥

**पै जो जिये देवतांतरी। भजावयाची चाड करी। तयाची ते चाड पुरी। पुरविता मी॥ १४३ ॥**
**देवोदेवीं मीचि पाहीं। हाही निश्चय त्यासि नाहीं। भाव ते ते ठायीं। वेगळाला धरी॥ १४४ ॥**

**अर्थ**—पण जो ज्या देवतेचें भजन करण्याची इच्छा करतो त्याची ती इच्छा मीच पूर्ण करतों. ॥ १४३ ॥ वास्तविक देवोदेवी मीच झालों आहे, पण हा निश्चय त्याला नसतो व प्रत्येक देवतेच्या ठिकाणीं निरनिराळा भाव धरतो. ॥ १४४ ॥

**गूढार्थदीपिका**—नित्यशुद्धबुद्धमुक्त सर्वज्ञ सर्वशक्ति असा एकच परमात्मा आहे आणि एका परमेश्वराचे ठिकाणींच निरनिराळे उपासक, आपल्या निरनिराळ्या उपास्यांचीं भावना करतात. पण पूजनीय ईश्वर एक आहे अशी एकेश्वर भावना न राहतां त्यांच्या अनेकेश्वर भावनेमुळें त्यांच्या अशा आराधनेने परमेश्वर प्राप्ति होत नाही.

**स तया श्रद्धया युक्तस्तस्याराधनमीहते । लभते च तत: कामान्मयैव विहितान्हि तान्॥ २२ ॥**

**मग तिया श्रद्धायुक्त। तेथिंचे आराधन जें उचित। तें सिद्धीवरी समस्त। वर्तों लागे॥ १४५ ॥**
**ऐसें जेणें जें भाविजे। तें फळ तेणें पाविजें। परी तेंही सकळ निपजे। मजचिस्तव॥ १४६ ॥**

**अर्थ**—मग त्या देवतेचें, श्रद्धेने जें आराधन केलें जातें तें सिद्ध होई पर्यंत तसे वागतो. ॥ १४५ ॥ अशा रीतीने ज्या इच्छेने तें आराधन केलें जातें तसें फळ त्यांना मिळतें, पण जें फळ मिळतें तें मात्र माझ्यामुळेंच मिळतें. ॥ १४६ ॥

**गूढार्थदीपिका**—ज्याप्रमाणे राज्यशासनव्यवस्थेंत लोकांचा निग्रह व लोकांवर अनुग्रह करणारे मर्यादित सत्तेच्या अधिकाराचे अधिकारी असतात, त्याप्रमाणेच भगवंतांनी निर्माण कलेल्या सृष्टींतील इंद्रादिक देवता ह्या मर्यादित अधिकारयुक्त असे नेमलेले अधिकारिक जीव आहेत, असे शास्त्रांतून सांगितलें आहे. लोकशासनाचे द्वारा राजशासनसत्ताच लोकांचे शासन करीत असतें, त्याप्रमाणे इंद्रादिक देवतांच्या अधिकारांचे द्वारा जगाची उत्पत्ती स्थिति लय करणारा सर्वज्ञ सर्व शक्ति असा परमेश्वरच जगताचें सर्व शासन करीत असतो. जगताच्या शासनांत, जीवाच्या कर्माचें फळ देणे, हेंहि येत असल्यामुळें सर्व जीवांच्या कर्माचें फळ एका सर्वज्ञ सर्वशक्ति परमात्म्यावांचून दुसरा कोणी देऊं शकत नाही. असा "फलमत उपपत्ते:" या वेदान्तसूत्र अधिकरणांत भगवान व्यासांनी सिद्धान्त केला आहे आणि तोच भगवान श्रीकृष्णांनी व ज्ञानेश्वर माऊलींनी येथे मांडला आहे.

**अन्तवत्तु फलं तेषां तद्भवत्यल्पमेधसाम् । देवान्देवयजो यान्ति मद्भक्ता यान्ति मामपि॥ २३ ॥**

**अर्थ**—या मंदबुद्धीच्या उपासकांना, त्यांच्या उपासनेचें जें फळ मिळतें, तें मात्र नाशिवंत असते. देवाचें यजन

करणारे देवाला पावतात व माझें यजन करणारे मलाच मिळतात. ॥ २३ ॥

**परी ते भक्त मातें नेणती। जे कल्पनेबाहेरी न निघती। म्हणोनि कल्पित फळ पावती। अंतवंत॥ १४७॥**
**किंबहुना ऐसें जें भजन। तें संसाराचेंचि साधन। येर फळभोग तो स्वप्न। नावभरी दिसे॥ १४८॥**
**हें असो परौतें। मग हो का आवडे तें। परि यजी जो देवतांतें। तो देवत्वासीचि ये॥ १४९॥**
**येर तनुमनुप्राणीं। जे अनुसरले माझेयाचि वाहणीं। ते देहाचां निर्वाणीं। मीचि होती॥ १५०॥**

**अर्थ**—असे हे भक्त मला जाणत नाहीत, म्हणून नाशिवंत असें विषयसुखरूप कल्पित फळ त्यांना मिळतें. ॥ १४७ ॥ किंबहुना अशा रीतीचें आराधन संसारालाच कारणीभूत होतें. बाकी कर्माचें फळ जो सुखभोग, तो मात्र स्वप्नाप्रमाणें, क्षणभर भासतो. ॥ १४८ ॥ हें असो. पलीकडे प्रिय दैवत कां असेना, पण जो ज्या देवतेचें यजन करतो, तो त्या देवतेला प्राप्त होतो. ॥ १४९ ॥ बाकीचे जे शरीराने मनाने व प्राणाने अखंड माझ्याकडे लागले ते देह पडल्यावर मीच होतात. ॥ १५० ॥

**गूढार्थदीपिका**—इंद्रादिक देवताच सर्वश्रेष्ठ समजून त्यांच्या प्रीत्यर्थ केलेल्या कर्मानुष्ठानाचें फळ नाशिवंत आहे. तशा कर्मानुष्ठानानें त्या त्या देवतेच्या लोकांची प्राप्ति होऊन, नंतर पुन: मृत्युलोकांत यावें लागतें. निष्कामचित्ताने परमेश्वराकडे लक्ष ठेवून व परमेश्वराची आज्ञा समजून, देवतांचें यजन केलें असतां, त्या कर्मयोगाचे अनुष्ठानाने ज्ञान प्राप्त होतें, हें मागें चवथ्या अध्यायांत सांगितलेच आहे. जे सगुण रामकृष्णादि परमेश्वराचे ठिकाणीं चित्त स्थिर करून तत्प्रीत्यर्थ सर्व कर्मांचें अनुष्ठान करतात, तें सगुण रामकृष्णादि परब्रह्माला मिळतात-म्हणजे सगुण परमात्माहि क्षेत्रज्ञच असल्यामुळें त्यांत मिळणें म्हणजे मुक्त होणेंच होय, म्हणून मुक्त होतात-असा अर्थ.

**अव्यक्तं व्यक्तिमापन्नं मन्यन्ते मामबुद्धय: । परं भावमजानन्तो ममाव्ययमनुत्तमम्॥ २४॥**

**अर्थ**—कधींहि नष्ट न होणारा व इंद्रियाला गोचर न होणारा व्यापक असा माझा जो सर्वोत्तम परब्रह्मभाव तो न जाणणारे मूर्ख लोक, मला एक मर्यादित व विवक्षित व्यक्तिरूप समजतात. ॥ २४॥

**परी तैसें न करिती प्राणिये। वांयां आपुला हितीं वाणिये। पैं पोंहताती पाणिये। तळहातींचेनि॥ १५१॥**
**नाना अमृताच्या सागरीं बुडिजे। मग तोंडा कां वज्रमिठी पाडिजे। आणि मनीं तरी आठविजे। थिल्लरोदकातें॥ १५२॥**
**हें ऐसें कासया करावें। जें अमृतींही रिगोनि मरावें। तें सुखें अमृत होऊनि कां नसावें। अमृतामाजीं॥ १५३॥**
**तैसा फळहेतूचा पांजरा। सांडूनियां धनुर्धरा। कां प्रतीतिपाखीं चिदंबरा। गोसावियां नोहावें॥ १५४॥**
**जेथ उंचावलेनि पवाडें। सुखाचा पैसारु जोडे। आपुलेनि सुरवाडें। उडों ये ऐसा॥ १५५॥**
**तया उमपा माप कां सुवावें। मज अव्यक्ता व्यक्त कां मानावें। सिद्ध असतां कां निमावें। साधनवरी॥ १५६॥**
**परि हा बोल आघवा। जरी विचारिजतसे पांडवा। तरी विशेषें या जीवां। न चोजवे गा॥ १५७॥**

**अर्थ**—पण जेणें करून माझी प्राप्ति होईल, अशा रीतीने माझ्या ठिकाणीं चित्त स्थिर करून, माझ्याकरितां, लोक कर्मानुष्ठान करीत नाहीत व माझी प्राप्ति, हें जें त्यांचें हित त्या हिताला ते उणेपणा आणतात, कारण ते तळहातातींल पाण्यांत पोहण्याचा प्रयत्न करतात (म्हणजे तळहातांतील पाण्यांत पोहण्याचा प्रयत्न करणें व्यर्थ प्रयास होय.) त्याप्रमाणे माझी व्यापकता न जाणतां देवतांना माझ्याहून भिन्न ईश्वर समजून त्यांचें यजन करणें व्यर्थ होय. ॥ १५१ ॥ किंवा अमृताच्या सागरांत बुडल्यावर तोंड कां पक्कें मिटून घ्यावें आणि एखाद्या डबक्यांतील पाण्याचें कां चिंतन करावें?॥ १५२ ॥ अमर करणाऱ्या अमृतांत शिरूनहि, तोंडाला मिठी मारून तोंडात अमृत जाऊं न देतां, मरावें असे कां करावें? त्यापेक्षां अमृत पिऊन सुखाने अमृत होऊन अमृतामध्यें कां राहूं नये?॥ १५३ ॥ त्याप्रमाणे, अर्जुना! विषयसुखाच्या फळाची इच्छा या पिंजऱ्यांचा त्याग करून अनुभवाच्या पंखाने अमर्याद सुखस्वरूप चिदाकाशाचे स्वामी कां होऊं नये?॥ १५४॥ सर्वांचे पलीकडे अमर्याद पसरलेल्या ज्या चिदाकाशांत आपल्याला, आनंदाने संचार करीत असतां, सुखाचा अपार लाभ होतो. ॥ १५५ ॥ त्या मला अपरिमिताला परिमित कां करावें? इंद्रियातीत अशा मला इंद्रियगोचर असा भौतिक कां मानावें? आणि मी सिद्धवस्तु असतांना त्याच्या प्राप्तीकरितां

साधनें करित कां मरावें?॥ १५६ ॥ पण जरी हें माझें सर्व बोलणें विचार करण्याजोगें आहे, तरी तें जीवाला विशेषेंकरून आवडत नाही. ॥ १५७ ॥

**नाहं प्रकाशः सर्वस्य योगमायासमावृतः । मूढोऽयं नाभिजानाति लोको मामजमव्ययम्॥ २५॥**

अर्थ—योगमायेने आवृत झाल्यामुळें मी सर्वांनाच प्रकाशित होत नाही. मूर्ख अज्ञानी पुरुष मी जन्मरहित व अविनाशी आहे. असें मला जाणत नाही. ॥ २५ ॥

**कां जे योगमायापडळें। हे जाले आहाती आंधळे। म्हणोनि प्रकाशाचेनि देहबळें। न देखती मातें॥ १५८ ॥**
**एऱ्हवीं मी नसें ऐसें। कांहीं वस्तुजात असे। पाहें पां कवण जळ रसें-। रहित आहे॥ १५९ ॥**
**पवन कवणातें न शिवेचि। आकाश कें न समायेचि। हें असो एक मीचि। विश्वीं असें॥ १६० ॥**

**अर्थ**—कारण हे जीव, त्यांच्या डोळ्यांत योगमायेचें म्हणजे त्रिगुणात्मक मायेचें पटल असल्यामुळें ते आंधळे झाले आहेत म्हणून 'प्रकाशाचेनि देहबळे'-म्हणजे 'मी म्हणजे मर्यादित' या समजुतीमुळें, ते मला पाहूं शकत नाहीत. ॥ १५८ ॥ नाही तर 'मी नाही' अशी वस्तुच जगांत नाही. अर्जुना! विचार कर. कोणतें पाणी रसावांचून असतें? ॥ १५९ ॥ वारा कोण्या वस्तुला स्पर्श करीत नाही? आकाश कशांत भरून नाही? हे असूं दे. मीच एक जगांत भरलो आहे. ॥ १६० ॥

**वेदाहं समतीतानि वर्तमानानि चार्जुन । भविष्याणि च भूतानि मां तु वेद न कश्चन॥ २६ ॥**

**अर्थ**—अर्जुना! मी पूर्वी होऊन गेलेली, सध्या भासत असलेली व पुढें होणारी सर्व भूतसृष्टि जाणतो, पण त्यापैकीं मला मात्र कोणीहि जाणत नाही. ॥ २६ ॥

**येथें भूतें जियें अतीतलीं। तियें मीचि होऊनि ठेलीं। आणि वर्तत आहाति जेतुलीं। तींही मीचि॥ १६१ ॥**
**कां भविष्यमाणें जियें हीं। तींही मजवेगळीं नाहीं। हा बोलचि एऱ्हवीं कांहीं। होय ना जाय॥ १६२ ॥**
**दोराचिया सापासी। डोंबा बडीया ना गव्हाळा ऐसी। संख्या न करवे कोण्हासी। तेवीं भूतांसि मिथ्यत्वें॥ १६३ ॥**
**ऐसा मी पंडुसुता। अनुस्यूत सदा असतां। यां संसार जो भूतां। तो आनें बोलें॥ १६४॥**

**अर्थ**—या जगांत जेवढे प्राणी पूर्वी होऊन गेले, ते सर्व मीच झालों आणि जेवढे सध्या वर्तमानकाळीं आहेत, तेहि मीच आहे. ॥ १६१ ॥ किंवा पुढें जेवढे उत्पन्न होतील, तेहि माझ्याहून निराळे राहूं शकत नाही. अर्जुना! हे नुसते शब्दच उच्चारिले जातात, वास्तविक कांही उत्पन्न होत नाही व कांही नाशहि पावत नाही. ॥ १६२ ॥ दोरीवर भासणारा सर्प ज्याप्रमाणे कोणाला डोंबा, कोणाला कवड्या, अशी गणना केलीं जाणार नाही असा अनेक प्रकारें, मिथ्या भासतो. त्या प्रमाणेच माझ्या ठिकाणीं मिथ्या भासणाऱ्या भूतसृष्टीची गणना करतां येत नाही. (म्हणजे जीवजगत् व त्यांची संख्या हे सर्व समूळ खोटे आहेत असा अर्थ) ॥ १६३ ॥ याप्रमाणे अर्जुना! या सर्व विश्वांत मीच एक घनदाट भरलों असतांना, जीवाला हा जो माझ्याहून निराळा संसार भासतो, तो निराळ्या विचाराने भासतो. ॥ १६४ ॥

**गूढार्थदीपिका**—परमात्मा एक अद्वैतरूप असून, त्यावांचून अन्य वस्तुच नसल्यामुळें, तो अव्यक्त नाही व व्यक्तहि नाही—म्हणजे आतांपर्यंत दिसत नव्हतां पण आतां दिसतो, असें त्याच्या ठिकाणीं म्हणतां येत नाही, पण मूर्ख अज्ञानी लोक तसें मानतात. परमात्मा अव्यक्त होता, आतां व्यक्त झाला असे अज्ञानीच म्हणतात. खरोखर जें कांही भासतें तें तोच भासतो. इतकेंच की अज्ञानदृष्टीने पाहिलें असतां तोच परमात्मा जीवजगत्स्वरूप दिसतो, ज्ञानदृष्टीने पाहिलें, तर तोच अव्यक्त म्हणजे इंद्रियातीत भासतो व प्रेमरूप भक्तिदृष्टीने पाहिलें असतां व्यक्त म्हणजे नामरूपासह सच्चिदानंदस्वरूप अनुभवाला येतो. कारण भगवंताच्या इंद्रियातीत निर्गुणस्वरूपाचे ठिकाणींच नामरूपात्मक सगुणस्वरूप प्रेमाने भासत असतें.

भगवंताच्या मायेने भ्रांत झालेल्या व भगवंताची कृपा नसलेल्या मूर्खांना मात्र, सगुण स्वरूपाच्या पूर्ण ब्रह्मत्वाची ओळख पटत नाही व ते भगवंताचें सगुण स्वरूप आपल्या देहाप्रमाणे स्थूल पांचभौतिक मर्यादित आहे असें समजतात.

हाच सर्व आशय भगवंतांनी २४-२५ व २६ या श्लोकांतून व श्रीज्ञानेश्वर माऊलींनी त्यावरील ओव्यांतून सांगितला आहे.

**इच्छाद्वेषसमुत्थेन द्वन्द्वमोहेन भारत। सर्वभूतानि सम्मोहं सर्गे यान्ति परन्तप॥ २७॥**

**अर्थ**—हे शत्रूला ताप देणाऱ्या अर्जुना! सर्व प्राणी सृष्टिउत्पत्तीच्या वेळीं राग द्वेष यापासून उत्पन्न झालेल्या शीतउष्ण, सुखदु:ख इत्यादि द्वंद्वाचे मोहाने अविवेक संपन्नच असतात. ॥ २७॥

**तरी तेचि आतां थोडीसी। गोठी सांगिजेल परियेसीं। जेथ अहंकार तनूंसी। वालभ पडिलें॥ १६५॥**

**अर्थ**—ज्या गोष्टीमुळें संसार भासतो ती गोष्ट कोणती हें थोडेसें सांगतो अर्जुना! ऐक. जेथे देह व अहंकार यांचें प्रेम जुळलें. ॥ १६५॥

**गूढार्थदीपिका**—देहाचे प्रेमाने मी देह असा देहाहंकार जीवाचे ठिकाणीं अनादिकालापासून आहे हें ''जेथ'' या शब्दाने दाखविले आहे.

**तेथ इच्छा हे कुमारी जाली। मग ते कामाचिया तारुण्या आली। तेथ द्वेषेंसीं मांडिली। वराडिक॥ १६६॥**

**अर्थ**—तेच इच्छा हे मुलगी उत्पन्न झाली व ती विषयवासनारूपी तारुण्यदशेला आली. तेव्हा द्वेषाशीं तिचा विवाहसंबंध झाला. ॥ १६६॥

**गूढार्थदीपिका**—आपल्या आवडत्या विषयाची भोगवासना उत्पन्न झाली असतां, त्याबरोबर नावडत्या विषयाचा द्वेष उत्पन्न होतो, असा अर्थ.

**तया दोघांस्तव जन्मला। ऐसा द्वंद्वमोह जाला। मग तो आजेयाने वाढविला। अहंकारें॥ १६७॥**

**अर्थ**—या दोघांपासून द्वंद्वमोह जन्माला आला व मग तो अहंकार या आज्याने, त्याचें संगोपन करून मोठा केला. ॥ १६७॥

**गूढार्थदीपिका—द्वंद्वमोह**—म्हणजे सुखदु:खाच्या स्वाधीन झाल्यामुळे विचार नाहिसा होणें.

**आजेयानें वाढविला**—जसा देहाहंकार बळावतो तसा तसा अविचार चढत जातो.

**जो धृतीसि सदा प्रतिकूळु। नियमाही नागवे सळु। आशारसें दोंदिलु। जाला सांता॥ १६८॥**
**असंतुष्टीचिया मदिरा। मत्त होवोनि धनुर्धरा। विषयांचे वोवरां। विकृतीसीं असे॥ १६९॥**
**तेणें भावशुद्धीचिया वाटे। विखुरले विकल्पाचे कांटे। मग चिरिले अव्हांटे। अप्रवृत्तीचे॥ १७०॥**
**तेणें भूतें भांबावलीं। म्हणोनि संसाराचिया आडवामाजीं पडिलीं। मग महादु:खाच्या घेतलीं। दांडे वरी॥ १७१ ॥**

**अर्थ**—आशारूपी रसाने पुष्ट झालेला असा तो दांडगा, नियमाचे आटोक्यात येत नाही व धैयाला नेहमीं प्रतिकूल असतो. ॥ १६८॥ असंतोषरूपी मदिरा पिऊन धुंद झालेला तो, अर्जुना! विषयरूपी खोलीमध्ये विकाररूपी स्त्रीसह राहतो. ॥ १६९॥ त्यामुळें शुद्धभावाच्या किंवा शुद्ध श्रद्धेच्या वाटेमध्यें नाना विकल्पाचे अश्रद्धेचे कांटे पसरले व त्या विकल्पाचे तेथून शास्त्रविरुद्ध वर्तनाचे आडमार्ग फुटले. ॥ १७०॥ ते फुटलेले आडमार्ग पाहून भूतें बुचकळ्यांत पडलीं, म्हणून संसाररूपी दाट अरण्यांत पडलीं व परम दु:खाच्या दंडुकाने बडवली गेलीं. ॥ १७१॥

**येषां त्वन्तगतं पापं जनानां पुण्यकर्मणाम्। ते द्वन्द्वमोहनिर्मुक्ता भजन्ते मां दृढव्रता:॥ २८॥**

**अर्थ**—ज्या पुण्यशील लोकांचें पाप नाहिसें झालेले असतें, तेच या द्वंद्वमोहापासून मुक्त होतात व माझें भजन करायचें, असे दृढ व्रत धारण करून, माझें भजन करतात. ॥ २८॥

**ऐसे विकल्पाचे वांयाणे। कांटे देखोनि सणाणे। जे मतिभ्रमाचें पासवणें। घेतीचिना॥ १७२॥**
**उजू एकनिष्ठेच्या पाउलीं। रगडूनि विकल्पाचिया भालीं। महापातकांची सांडिली। अटवी जिहीं॥ १७३॥**
**मग पुण्याचे धांवा घेतले। आणि माझी जवळीक पातले। किंबहुना ते चुकले। वाटवधेयां॥ १७४॥**

**अर्थ**—अशा प्रकारच्या विकल्पाचे तीक्ष्ण कांटे खोटे आहेत असें पाहून, बुद्धिभ्रमाचें सान्निध्य जे करीत नाहीत. ॥ १७२॥ 'माझे ठिकाणीं एकनिष्ठ होणें' या सरळ पाउलाने, विकल्पाची तीक्ष्ण भाल्यासारखीं टोकें रगडून

टाकिलीं आणि महापातकांचें अरण्य ज्यांनी ओलांडिलें. ॥ १७३ ॥ आणि जे पुण्यमार्गानें धांवत सुटले व माझ्या जवळ आले, अर्जुना! ते मात्र वाटमाऱ्यापासून-भगवत्प्राप्तीच्या मार्गावरील मारेकऱ्यापासून-सुटले. ॥ १७४ ॥

**जरामरणमोक्षाय मामाश्रित्य यतन्ति ये। ते ब्रह्म तद्विदुः कृत्स्नमध्यात्मं कर्म चाखिलम्॥ २९॥**

**अर्थ**—माझ्या सगुण रामकृष्णादि स्वरूपाचा आश्रय करून जे कोणी जन्ममरणापासून मुक्त होण्याचा प्रयत्न करतात, ते संपूर्ण ब्रह्म जाणतात, अध्यात्म जाणतात व संपूर्ण कर्महि जाणतात. ॥ २९ ॥

**एऱ्हवीं तरी पार्था। जन्ममरणाची निमे कथा। ऐसिया प्रयत्नातें आस्था। विये जयांची॥ १७५॥**
**तयां तो प्रयत्नुचि एके वेळे। मग समग्रें परब्रह्में फळे। जया पिकलेया रसु गळे। पूर्णतेचा॥ १७६॥**

**अर्थ**—अर्जुना! नाही तरी, ही जन्ममरणाची कथा पुनः ऐकूं नये, या सदिच्छेने ज्यांचा प्रयत्न सुरूं झाला. ॥ १७५ ॥ मग तो प्रयत्न एकदांचा नामरूपासह सर्वच ब्रह्म आहे अशा अनुभवाने फलद्रूप होतो व ते अनुभवरूप फळ पिकलें असतां, पूर्णतेचा रस गळायला लागतो. ॥ १७६ ॥

**गूढार्थदीपिका**—नामरूपासह सर्व पूर्ण परब्रह्मच आहे, असा अनुभव येणे; अशा पूर्णतेचें माऊलींनी येथे लक्षण केलें आहे.

**ते वेळीं कृतकृत्यता जग भरे। तेथ अध्यात्माचें नवलपण पुरे। कर्माचें काम सरे। विरमे मन॥ १७७॥**
**ऐसा अध्यात्मलाभ तया। होय गा धनंजया। भांडवल जया। उद्यमीं मी॥ १७८॥**

**अर्थ**—(ही पूर्णता प्राप्त झाली असतां) सर्व जग कृतकृत्यतेने भरून जातें—म्हणजे सर्वत्र पूर्ण परब्रह्माचाच अनुभव येतो—व अध्यात्मप्राप्तीचें कौतुकहि संपते. कर्माचा उपयोग राहत नाही व मनहि उन्मन होतें. ॥ १७७ ॥ अर्जुना! जो कोणी माझ्या सगुण स्वरूपाच्या भांडवलावर एवढा उद्योग करतो, त्याला एवढी अध्यात्मप्राप्ति होतो. ॥ १७८ ॥

**गूढार्थदीपिका**—सगुण भगवंताच्या भक्तीने, निर्गुणस्वरूपाचें ज्ञान होऊन, कर्माचें यथार्थ स्वरूप काय, हेंहि कळतें व मन उन्मन होतें.

**तयातें साम्याचिये वाढी। ऐक्याची सांदे कुळवाडी। तेथ भेदाचिया दुबळवाडी। नेणिजे तो॥ १७९॥**

**अर्थ**—त्याच्या साम्यदृष्टिरूप व्याजावर ऐक्याचा सर्व व्यवहार चालतो. मग तेथे द्वैताचें दारिद्र्य तो कधींच जाणत नाही. ॥ १७९ ॥

**गूढार्थदीपिका**—आत्मज्ञानानंतर केलेल्या सगुणभक्तीने व्यवहार कालीं भक्ताची अद्वैतब्रह्मस्थिति नाहीशी होत नाही असा अर्थ.

"**ब्रह्मैव सर्वनामानि रूपाणि विविधानि च। कर्माण्यपि समग्राणि बिभर्तीति श्रुतिर्जगौ॥**" (अपरोक्षानुभूति)

ज्ञानीभक्ताला परमेश्वरावांचून दुसरें कांही दिसतच नाही असा आचार्यांचाहि आशय आहे.

**साधिभूताधिदैवं मां साधियज्ञं च ये विदुः। प्रयाणकालेऽपि च मां ते विदुर्युक्तचेतसः॥ ३०॥**

*॥ इति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे ज्ञानविज्ञानयोगो नाम सप्तमोऽध्यायः॥*

**अर्थ**—आणि अधिभूत, अधिदैव व अधियज्ञासह मीच आहे, असें जे कोणी मला जाणतात, ते माझ्या ठिकाणीं चित्त स्थिर झालेले पुरुष, मरणसमयीं, मलाच जाणतात. ॥ ३० ॥

**जिहीं साधिभूता मातें। प्रतीतीचेनि हातें। धरूनि अधिदैवातें। शिवतलें गा॥ १८०॥**
**जया जाणिवेचेनि वेगें। मी अधियज्ञु दृष्टी रिगें। ते तनूचेनि वियोगें। विऱ्हये नव्हती॥ १८१॥**
**एऱ्हवीं आयुष्याचें सूत्र विघडतां। भूतांची उमटे खडाडता। काय न मरतयाहि चित्ता। युगांतु नोहे॥ १८२॥**
**परी नेणों कैसे पैं गा। जे जडोनि गेले माझिया आंगा। ते प्रयाणींचिया लगबगा। न सांडितीच मातें॥ १८३॥**

**अर्थ**—ज्यांनी आपल्या पूर्ण आत्मानुभवाच्या बळाने, अधिभूत मीच आहे, असे जाणून आधिदैवताला (जीवाला) स्पर्श केला म्हणजे जीवस्वरूपहि मीच आहे असे जाणलें. ॥ १८० ॥ त्याचप्रमाणे त्या जाणीवेच्या बळाने अधियज्ञहि मीच आहे, अशी ज्यांची ज्ञानदृष्टि आहे, ते शरीर सोडतेवेळीं विव्हल होत नाहीत. ॥ १८१ ॥ खरोखर

पाहिलें तर आयुष्याची दोरी तुटली की पंचभूतांत एकमेकांना सोडण्याची खळबळ सुरू होते, तेव्हा न मरणाऱ्यांच्या (म्हणजे मरण पहाणाऱ्यांच्या) चित्ताला देखील प्रलयासारखे भयंकर दु:ख होत नाही काय ? ॥ १८२ ॥ पण अर्जुना! जे माझ्या सगुण स्वरूपाशीं ऐक्य पावले, ते त्या प्रलयकालच्या व्याकुळतेमध्यें देखील मला कसे सोडत नाहीत, हें समजत नाही. ॥ १८३ ॥

**गूढार्थदीपिका**—सगुण स्वरूपाची प्रेमभक्ति करणाऱ्या पुरुषांना अधिभूत, अधिदैव, अधियज्ञ इत्यादि सर्व सगुणब्रह्मस्वरूपच दिसतात आणि त्याहून भिन्न अशा विनाशी भौतिक वस्तूची कल्पनाच त्यांच्या अंत:करणाला शिवत नसल्यामुळें लवमात्र देखील मरणाचें दु:ख त्यांना होत नाही.

**एऱ्हवीं तरी जाण। ऐसे जे निपुण। तेचि अंत:करण-। युक्त योगी॥ १८४॥**
**तंव इये शब्दकुपिकेतळीं। नोडवेचि अवधानाची अंजुळी। जे नावेक अर्जुन तये वेळीं। मागांचि होता॥ १८५॥**
**जेथ तद्ब्रह्मवाक्यफळें। जियें नानार्थरसें रसाळें। बहकते आहाती परिमळें। भावाचेनि॥ १८६॥**
**सहज कृपामंदानिळें। कृष्णद्रुमाचीं वचनफळें। अर्जुनश्रवणाचिये खोळें। अवचित पडिलीं॥ १८७॥**
**तियें प्रमेयाचीच हो कां वळलीं। कीं ब्रह्मरसाच्या सागरीं चुबुकळिलीं। मग तैसींच कां घोळिलीं। परमानंदें॥ १८८॥**
**तेणें बरवेपणें निर्मळें। अर्जुना उन्मेषाचे डोहळे। घेताति गळाळे। विस्मयामृताचे॥ १८९॥**
**तिया सुखसंपत्ति जोडलिया। मग स्वर्गा वाये वांकुलिया। हृदयाचां जीवीं गुतकुलिया। होत आहाती॥ १९०॥**
**ऐसें वरचिलीचि बरवा। सुख जावों लागलें फावा। तंव रसस्वादाचिया हांवा। लाहो केला॥ १९१॥**
**झाकरी अनुमानाचेनि करतळें। घेऊनि तियें वाक्यफळें। प्रतीतिमुखीं एके वेळे। घालूं पाहे॥ १९२॥**
**तंव विचाराचिया रसना न दाटती। परी हेतूचाहि दशनीं न फुटती। ऐसें जाणोनि सुभद्रापती। चुंबीचिना॥ १९३॥**
**मग चमत्कारला म्हणे। इयें जळींचीं मा तारांगणें। कैसा झकविलों असलगपणें। अक्षरांचेनि॥ १९४॥**
**इयें पदें नव्हती फुडिया। गगनाचियाचि घडिया। येथ आमुची मती बुडलिया। थाव न निघे॥ १९५॥**
**वांचूनि जाणावयाची कें गोठी। ऐसें जीवीं कल्पूनि किरीटी। तियें पुनरपि केली दृष्टी। यादवेंद्रा॥ १९६॥**
**मग विनविलें सुभटें। हां हो जी यें एकवाटे। सातही पदें अनुच्छिष्टें। नवलें आहाती॥ १९७॥**
**एऱ्हवीं अवधानाचेनि वहिलेपणें। नाना प्रमेयांचे उगाणे। काय श्रवणाचेनि आंगणे। बोलों लाहाती॥ १९८॥**
**परि तैसें हें नोहेचि देवा। देखिला अक्षरांचा मेळावा। आणि विस्मयाचिया जीवा। विस्मयो जाला॥ १९९॥**
**कानाचेनि गवाक्षद्वारें। बोलाचे रश्मी अभ्यंतरें। पाहेना तंव चमत्कारें। अवधान ठकले॥ २००॥**
**तेवींचि अर्थाचि चाड मज आहे। ते सांगतांही वेळु न साहे। म्हणूनि निरूपण लवलाहें। किजो देवा॥ २०१॥**
**ऐसा मागील पडताळा घेउनी। पुढां अभिप्रावो दृष्टी सूनी। तेवींचि माजीं शिरऊनि। आर्ती आपुली॥ २०२॥**
**कैसी पुसती पाहें पां जाणिव। भिडेंचि तरी लंघों नेदी शिव। एऱ्हवीं श्रीकृष्णहृदयासि खेंव। देवों सरला॥ २०३॥**
**अगा श्रीगुरूतें जैं पुसावें। तें येणें मानें सावध होआवें। हें एकचि जाणे आघवें। सव्यसाची॥ २०४॥**
**आतां तयाचें तें प्रश्न करणें। वरी सर्वज्ञ श्रीहरीचें बोलणें। हें संजयो आवडलेपणें। सांगेल कैसे॥ २०५॥**
**तिये अवधान द्यावें गोठी। बोलिजेल नीट मऱ्हाटी। जैसी कानाचे आधीं दृष्टी। उपेगा जाये॥ २०६॥**
**बुद्धीचिया जिभा। बोलाचा न चाखतां गाभा। अक्षरांचियाचि भांबा। इंद्रियें जिती॥ २०७॥**
**पाह पां मालतीचे कळे। घ्राणासि कीर वाटले परिमळे। परि वरचियां बरवा काइ डोळे। सुखिये नव्हती॥ २०८॥**
**तैसें देशियेचिया हवावा। इंद्रियें करिती राणिवा। मग प्रमेयाचिया गांवा। लेसा जाइजे॥ २०९॥**
**ऐसेनि नागरपणें। बोलु निमे तें बोलणें। ऐका ज्ञानदेव म्हणे। निवृत्तीचा॥ २१०॥**

**इति श्रीज्ञानदेवविरचितायां भावार्थदीपिकायां सप्तमोऽध्याय: ॥ ७॥**

**अर्थ**—वास्तविक असे जे अनुभवनिपुण पुरुष आहेत तेच युक्त—म्हणजे ज्याचें अंत:करण अखंड माझे ठिकाणीं लागले आहे—असे योगी होत असें समज. ॥ १८४ ॥ पण या शब्दरूपी कुपिकेखालीं अर्जुन एकाग्रचित्ताची ओंजळ धरू शकला नाही; कारण भगवंताच्या शब्दाचे तो थोडा मागे होता (म्हणजे भगवंताच्या रसाळ व

नानाभावयुक्त शब्दांनी मुग्ध झाल्यामुळें अर्जुनाचें लक्ष अर्थाकडे जाऊं शकले नाही). ॥ १८५ ॥ ज्या भगवंताचे बोलण्यांत, नाना अर्थरूपरसाने रसाळ झालेली आणि भक्तिप्रेमाच्या सुगंधाने दरवळलेली अशी ''तद्ब्रह्म'' इत्यादि वाक्यरूपफळें होतीं ॥ १८६ ॥ अर्जुनाच्या ठिकाणीं असलेलीं भगवंताची स्वाभाविक कृपा हाच मंदवायु होता; त्या मंद वायूने श्रीकृष्णरूप वृक्षाची वचनरूप फळें अर्जुनाच्या श्रवणरूप झोळींत अकस्मात् पडलीं. ॥ १८७ ॥ तीं वाक्यरूपीं फळें सिद्धान्ताचींच बनलीं होतीं किंवा ब्रह्मरसाच्या समुद्रांत बुडविली होतीं. त्याचप्रमाणे आणखी तीं परमानंदांत घोळिलीं होती. ॥ १८८ ॥ अशी ती शुद्ध व उत्कृष्ट फळें पाहून अर्जुनाचे ठिकाणीं त्या वाक्यांच्या ज्ञानाचे डोहळे उत्पन्न होऊन, तो चमत्काररूपी अमृताचे घोट घेऊं लागला. ॥ १८९ ॥ अशा त्या रसाळ स्वादाच्या सुखाने तो संपन्न झाला असतां, स्वर्गसुखाला वेडावूं लागला आणि त्याच्या हृदयांत गुदगुल्या होऊं लागल्या. ॥ १९० ॥ अशा रीतीने भगवंताचे तोंडांतून निघालेल्या शब्दांचें वरचें सौंदर्य पाहूनच अर्जुनाचे मनांत सुख उचंबळून आलें. तितक्यांत त्या शब्दांतील रसाचा स्वाद घेण्याची त्याला उत्कट इच्छा झाली. ॥ १९१ ॥ म्हणून झटकन अनुमानाचे हाताने भगवन्मुखीचीं तीं वाक्यरूपीं फळें अनुभवाच्या मुखांत एकदम घालण्याची त्याने इच्छा केली. ॥ १९२ ॥ पण तीं वाक्यफळें विचाररूपी जीभेने चघळली जाऊं शकत नव्हती, हेतुरूप (अनुमानांतील एक अवयव) दांतांनी तीं फुटूं शकत नव्हतीं, हें पाहून अर्जुनाने त्या फळांना स्पर्शच केला नाही. ॥ १९३ ॥ मग आश्चर्याने थक्क होऊन अर्जुन मनांत म्हणूं लागला, हे भगवन्मुखीचे शब्द म्हणजे ताऱ्यांचें पाण्यांत पडलेलें प्रतिबिंब होय. अक्षरांचा परस्पर संबंध न घेतां आल्यामुळे, मी कसा फसलों गेलों, पहा. ॥ १९४ ॥ खरोखर हीं पदें नव्हेत. आकाशाच्या एकावर एक रचलेल्या घड्या वाटतात. येथें माझ्या बुद्धीने बुडी मारली तरी अर्थाचा थांग लागणार नाही. ॥ १९५ ॥ अर्थाचा थांग लागल्यावांचून जाणण्याची गोष्टच नको. अशा रीतीने मनांत विचार करून, पुन: एकदां भगवंताकडे दृष्टि केली. ॥ १९६ ॥ मग त्या श्रेष्ठ योद्ध्याने भगवंताला प्रार्थना केली, भगवंता! तुम्हीं जीं ब्रह्मादि सात पदें उच्चारिलीं, तीं सातहि पदें सारखी अनुच्छिष्ट राहिलीं (म्हणजे त्यांतील कोणाचाहि अर्थ ग्रहण करतां आला नाही) अशी आश्चर्यकारक आहेत. ॥ १९७ ॥ अत्यंत अवधानामुळेच होणारे, नानाप्रकारच्या सिद्धान्ताचे उलगडे, नुसत्या श्रवणाच्या बळावर बोलतां येतील काय? ॥ १९८ ॥ पण हे आपण उच्चारिलेले तसे दिसत नाहीत. तुमच्या मुखांतून शब्दांचा समुदाय निघतांना पाहिला व विस्मयालाहि विस्मय वाटला. ॥ १९९ ॥ मी कानाच्या झरोक्यांतून आपल्या शब्दाचे किरण हृदयाचे आंत आलेलें पाहतो तोंच मन आश्चर्यचकित झालें व अर्थानुसंधान सुटलें. ॥ २०० ॥ त्याचप्रमाणे मला अर्थ जाणण्याची इच्छा आहे, हें तुम्हाला सांगण्याचाहि विलंब मला सहन होत नाही. म्हणून, भगवंता! त्या सात पदांचें लवकर निरूपण करा. ॥ २०१ । अशारीतीने मागील विषयसंबंध घेऊन व पुढें अभिप्रायाकडे दृष्टि ठेवून व त्याचप्रमाणें त्यांत आपली उत्कट इच्छा प्रगट करून (अर्जुनाने देवाची प्रार्थना केली) ॥ २०२ ॥ श्रीगुरूला प्रश्न करण्याचें अर्जुनाचें शहाणपण पहा कसें आहे? गुरुशिष्य संबंधाची मर्यादा सांभाळून, श्रीकृष्णाच्या अंत:करणाला आलिंगन द्यावयास तो पुढे सरसावला. ॥ २०३ ॥ खरोखर श्रीगुरूला जर प्रश्न करायचा असला, तर अशा सावधानतेने विचारला पाहिजे, पण ही कला एका अर्जुनालाच ठाऊक आहे. ॥ २०४ ॥ आता अर्जुनाचें प्रश्न करणें व भगवंताचें उत्तर देणें हे दोन्ही, संजय राजा धृतराष्ट्राला आवडीप्रमाणे कसे सांगणार आहे. ॥ २०५ ॥ त्या गोष्टीकडे श्रोत्यांनी कृपा करून लक्ष द्यावें. कानांत शब्द पडण्यापूर्वीच दृष्टीचा उपयोग होईल, अशा सुंदर मराठी भाषेने मी ते सर्व सांगणार आहे. ॥ २०६ ॥ बोलाचा गाभा जो अर्थ तो बुद्धीने चाखण्यापूर्वीच शब्दांच्या शोभेने इंद्रियांचें पोषण होईल. ॥ २०७ ॥ हे पहा, मालतीच्या फुलांच्या कळ्या सुगंधामुळें घ्राणेंद्रियाला सुखावह असतात, पण वरच्या त्यांच्या सौंदर्याने डोळे सुखी होत नाहीत काय? ॥ २०८ ॥ त्याप्रमाणे मराठी भाषेच्या शोभेने इंद्रियेंहि सुखाचें राज्य करतील, मग त्यांतून मांडलेल्या सिद्धान्तांच्या गांवाला उत्तम रीतीने जातां येईल. ॥ २०९ ॥ अशा सुंदर भाषेने जेथे बोलच खुंटतो तें सांगितलें जाणार आहे, म्हणून श्रीनिवृत्तिनाथांचे शिष्य श्रीज्ञानेश्वर महाराज श्रोत्यांना म्हणतात तुम्ही ऐका. ॥ २१० ॥

**श्रीगुरुकृपेने श्रीज्ञानेश्वरी अध्याय सातव्याचा अनुवाद संपला तो श्रीगुरुचरणीं समर्पण असो!**



## समारोप

मागील सहाव्या अध्यायांत योगाने परमेश्वराचा साक्षात् अनुभव आंत कसा घेतां येतो याचें वर्णन करून या अध्यायांत तोच अनुभव बाहेरहि कसा व्यापक करावयाचा हें भगवान श्रीकृष्ण अर्जुनाला सांगत आहेत.

परमेश्वर व्यापक आहे, तो जसा आंत आहे तसा बाहेरहि आहे, त्याचें ठिकाणीं खऱ्या खोट्या जगताचे अस्तित्व सिद्ध होत नाही, पण जीव जगत् पाहतो व तें खरें समजतो. जगताचा जड विनाशी प्रत्यय नाहीसा व्हावा व केवळ अद्वैत सच्चिदानंद ब्रह्मस्वरूपाचा प्रत्यय जीवाला यावा, याकरिता विज्ञानरूप प्रपंचासहित ज्ञानरूप परमेश्वराचें निरूपण भगवंतांनी अर्जुनाला सांगितलें.

मी देह आहे, मी ब्रह्म आहे ही जाणीव न स्फुरणें याला ज्ञान म्हणतात, विज्ञान म्हणजे नामरूपात्मक प्रपंच व नाम रूपात्मक प्रपंच सत्य आहे असें समजणें हें अज्ञान होय.

आत्मविचाराने अज्ञान नि:शेष नाहीसें झालें म्हणजे विज्ञान म्हणजे नामरूपाचा भिन्न भिन्न रूपाने दिसणाऱ्या प्रपंचाचा विशेष भाव नाहीसा होतो व एक सच्चिदानंद परब्रह्मच सृष्टींत भरलें आहे असा अनुभव येतो.

हें ज्ञान-रहस्य अत्यंत गुप्त आहे. हजारों लोकांत एखाद्यासच याची प्राप्ति होते.

जीवाचें परब्रह्माविषयीचें अज्ञान हीच माया किंवा प्रकृति होय, ही परा व अपरा अशी दोन प्रकारची आहे. अपरा म्हणणे कार्यरूप व परा म्हणजे कारणरूप, पृथ्वी, आप, तेज, वायु, आकाश, मन, बुद्धि अहंकार ही अपरा प्रकृति असून जीवाचें परब्रह्माविषयी जें मूळ अज्ञान ही परा प्रकृति होय.

सर्व जड विनाशी जगत् प्रतीतीला हें अज्ञानच मूळ कारण आहे. वास्तविक एक परमेश्वरच सत्य आहे. त्यावाचून दुसरी वस्तुच नाही; पण या त्रिगुणात्मक मायेने अज्ञानी लोक मोहित झाले आहेत. ते भगवंताचें खरें स्वरूप जाणत नाहीत. जे भगवंताला शरण येऊन त्याचें भजन करतात ते मात्र ही माया सहज तरून जातात, किंबहुना त्यांना तरून जाण्याकरिता मायाच शिल्लक उरत नाही. आर्त, जिज्ञासु, अर्थार्थी व ज्ञानी असे चार प्रकारचे भक्त आहेत. त्यांत आर्त, जिज्ञासु व अर्थार्थी यांची भक्ति सकाम असते व ज्ञानीभक्त हाच खरा निष्काम भक्त होय. संसार खरा वाटतो तोपर्यंत निष्काम भक्ति होऊं शकत नाही.

विषयकामनेच्या मागे लागून जीव परमेश्वराला विसरतो व नाना देवतांची उपासना करतो व त्यांना त्या उपासनेचें संसाररूप विनाशी फळ मिळतें. सगुण परमेश्वराची भक्ति करणाऱ्यांना अविनाशी सगुण परमेश्वराचीच प्राप्ति होते. परमेश्वर सगुण झाला तरी त्याचें मूळचें पूर्णत्व नष्ट होत नाही. पण मूर्खांना हे समजत नाही. परमेश्वराची भक्ति करतां करतां ज्याचें पाप क्षीण झालें अशा पुरुषांना परमेश्वराच्या सगुण स्वरूपाचें पूर्ण ब्रह्मत्व अनुभवाला येते व तो सर्व नामरूपात्मक स्थूल सूक्ष्म पसारा किंवा आधिभौतिक, आधिदैविक, आध्यात्मिक पसारा पूर्ण ब्रम्हस्वरूपच आहे असा अनुभव घेतो. सच्चिदानंद परब्रह्मावांचून दुसरें कांही नाही हें जें श्रुतीचें म्हणणें आहे त्याचा ज्ञानीभक्तच खरोखर अनुभव घेतो.

अधिभूत, अधिदैव, अधियज्ञ, इत्यादि सर्व सगुण परमात्माच आहे, असे ज्यांनी जाणलें त्याचें मरणसमयीं देखील भगवंताचे ठिकाणीं चित्त स्थिर राहतें.

॥ श्रीमद्सद्गुरु श्रीज्ञानेश्वरमहाराजार्पणमस्तु ॥



॥ श्रीज्ञानेश्वर माउली समर्थ ॥

# अध्याय आठवा

अवतरणिका—मागे सातव्या अध्यायांत जन्ममरणरूपी संसारांतून सुटण्याकरितां भगवंताच्या श्रीकृष्णस्वरूपाचा जे आश्रय करतात त्यांना ब्रह्म, कर्म, अध्यात्म, अधिभूत, अधिदैव इत्यादि परस्परांहून भिन्न दिसणारे पदार्थ एकमेकांपासून भिन्न नसून, ते सर्व म्हणजे एक श्रीकृष्ण परमात्मा आहे असा अनुभव येतो, असें भगवंतांनी सांगितलें, या निरूपणाचें नीट आकलन अर्जुनाला होऊं शकलें नाही म्हणून त्याचे स्पष्टीकरणार्थ या अध्यायांत अर्जुनाने प्रश्न केला व त्याचें भगवंतांनी सविस्तर निरूपण केलें.

*अर्जुन उवाच*

**किं तद्ब्रह्म किमध्यात्मं किं कर्म पुरुषोत्तम। अधिभूतं च किं प्रोक्तमधिदैवं किमुच्यते ॥ १ ॥**
**अधियज्ञः कथं कोऽत्र देहेऽस्मिन्मधुसूदन । प्रयाणकाले च कथं ज्ञेयोऽसि नियतात्मभिः ॥ २ ॥**

**अर्थ**—अर्जुन म्हणतो, भगवंता! तें ब्रह्म काय आहे? तें अध्यात्म काय आहे? कर्म म्हणजे काय? अधिभूत तें काय? व अधिदेव कशाला म्हणतात. ॥ १ ॥ हे मधुसूदना! अधियज्ञ म्हणजे काय? व या देहामध्यें तो कोण आहे आणि मरणसमयीं जितेंद्रिय पुरुषाकडून तूं कसा जाणला जाऊं शकतोस? ॥ २ ॥

**मग अर्जुनें म्हणितलें। हां हो जी अवधारिलें। जें म्यां पुसिलें। तें निरूपिजो ॥ १ ॥**
**सांगा कवण तें ब्रह्म। कायसया नाम कर्म। अथवा अध्यात्म। काय म्हणिपे ॥ २ ॥**
**अधिभूत तें कैसें। एथ अधिदैव तें कवण असे। हें उघड मी परियेसें। तैसे बोला ॥ ३ ॥**
**देवा अधियज्ञ तो काई। कवण पां इये देहीं। हें अनुमानासि कांहीं। दिठी न भरे ॥ ४ ॥**
**आणि नियता अंतःकरणीं। तूं जाणिजसी देहप्रयाणीं। तें कैसेनि हें शार्ङ्गपाणी। परिसवा मातें ॥ ५ ॥**
**देखा धवळारीं चिंतामणींचां। जरी पहुडला होय दैवाचा। तरी वोसणतांही बोलु तयाचा। परी सोपु न वचे ॥ ६ ॥**
**तैसें अर्जुनाचिया बोलासवें। आलें तेंचि म्हणितलें देवें। परियेसें गा बरवें। जें पुसिलें तुवां ॥ ७ ॥**
**किरीटी कामधेनूचा पाडा। वरी कल्पतरूचा आहे मांदोडा। म्हणोनि मनोरथसिद्धीचिया चाडा। तो नवल नोहे ॥ ८ ॥**
**श्रीकृष्ण कोपोनि ज्यासी मारी। तो पावे परब्रह्मसाक्षात्कारी। मा कृपेनें उपदेशु करी। तो कैशापरी न पवेल ॥ ९ ॥**

**अर्थ**—मग अर्जुन म्हणाला, देवा! तुमचें म्हणणें मीं ऐकलें. आता मीं विचारलें त्याचें निरूपण करा. ॥ १ ॥ ब्रह्म म्हणजे काय? कर्म कशाला नांव आहे? आणि अध्यात्म कशाला म्हणतात? ॥ २ ॥ अधिभूत कोणतें होय व अधिदैवत तें काय आहे? हें सर्व मी समजेन, अशा रीतीने बोला. ॥ ३ ॥ देवा! त्याचप्रमाणे अधियज्ञ म्हणजे काय? व या देहामध्ये कोण अधियज्ञ आहे, हें मला विचार करूनहि कांही लक्षांत येत नाही. ॥ ४ ॥ ज्यानी आपलें अंतःकरण तुझ्या ठिकाणीं स्थिर केलें, त्याच्याकडून तूं मरणसमयीहि जाणला जातोस, तें कशारीतीने, ते सर्व मला सांगा ॥ ५ ॥ पहा, चिंतामणीच्या केलेल्या मंदीरांत जर एखादा भाग्यवान पुरुष निजला, तर झोपेंत केलेली त्याची बडबड देखील निष्फळ होत नाही. ॥ ६ ॥ त्याप्रमाणे अर्जुनाच्या बोलण्याबरोबर जें देवाच्या मनांत आलें, तेंच देव म्हणाले. अर्जुना! तूं विचारलेंस तेंच सांगतों, लक्ष देऊन ऐक. ॥ ७ ॥ अर्जुन हा कामधेनूचें वासरू होय. त्याच्यावर कल्पतरुचा मांडव आहे, म्हणून त्याने मनोरथसिद्धीची इच्छा करावी, हें आश्चर्य नाही. ॥ ८ ॥ भगवान श्रीकृष्ण रागावून ज्याला मारतो तो जर परब्रह्माला प्राप्त होतो, तर ज्याला कृपेने उपदेश करतो तो कसा परब्रह्माला प्राप्त होणार नाही? ॥ ९ ॥

**गूढार्थदीपिका**—या ओवींत सगुण श्रीकृष्णस्वरूपाचें पूर्णब्रह्मत्व माऊलींनी दाखविलें आहे.

**जैं कृष्णचि होइजे आपण। तैं कृष्ण होय आपुलें अंत:करण। मग संकल्पाचें आंगण। वोळगती सिद्धी॥ १०॥**

**अर्थ**—जेव्हा आपण श्रीकृष्णरूप होतो तेव्हा आपलें अंत:करणच श्रीकृष्णरूप होतें व तेव्हा कोणताहि केलेला संकल्प सिद्धींला जातो. ॥ १० ॥

**गूढार्थदीपिका**—जेव्हा श्रीकृष्णस्वरूपाचें नि:सीम प्रेम लागून पुरुष श्रीकृष्णस्वरूप होतो तेव्हा त्याचें अंत:करणच श्रीकृष्णस्वरूप होतें किंवा अंत:करणात श्रीकृष्णस्वरूपाचें ध्यान प्रेमाने दृढ झालें म्हणजे पुरुष श्रीकृष्णस्वरूप झाला असें समजावें. तेव्हा तो सत्यसंकल्प होतो. म्हणजे तो जो जो संकल्प करतो तो पूर्ण होतो व हें जग संकल्पमात्र कसें आहे. याचा त्याला अनुभव येतो.

**परि ऐसें जें प्रेम। तें अर्जुनींचि आथि नि:स्सीम। म्हणऊनि तयाचे काम। सदा सफल॥ ११॥**
**याकारणें श्रीअनंतें। तें मनोगत तयाचें पुसतें। होईल जाणूनि आइतें। वोगरूनि ठेविलें॥ १२॥**
**जें अपत्य थानींहूनि निगे। तयाची भूक ते मायेसीचि लागे। एऱ्हवीं तें शब्दें काय सांगे। मग स्तन्य दे येरी॥ १३॥**
**म्हणोनि कृपाळुवा गुरूचिया ठायीं। हें नवल नोहे कांहीं। परि तें असो आइका काई। जें देव बोल्ते जाहाले॥ १४॥**

**अर्थ**—अंत:करण श्रीकृष्णस्वरूप करून सोडणारे असें जें भगवंताचें नि:सीम प्रेम तें अर्जुनाचेच ठिकाणीं होतें; म्हणूनच त्याची कोणतीहि इच्छा सदा सफळ होत असे. ॥ ११ ॥ त्यामुळेंच श्री भगवंतांनी अर्जुन जें काय विचारणार तें त्याच्या मनांतील ओळखून अगोदरच त्याच्यापुढें वाढून ठेविलें. ॥ १२ ॥ जें मूल स्तनपान करणारे असतें त्याची भूक ती आईलाच लागते. नाहीतर ते मूल शब्दाने सांगतें व मग आई स्तनपान करविते काय? ॥ १३ ॥ म्हणून अत्यंत कृपाळू अशा गुरुचे ठिकाणीं हें कांही आश्चर्य नव्हे. पण हें असो. देव पुढें काय बोलले तें ऐका. ॥ १४ ॥

**गूढार्थदीपिका**—भगवान आपल्या प्रेमळ भक्तावर व श्रीगुरु आपल्या प्रेमळ शिष्यावर इतके लुब्ध होतात की त्यांना ब्रह्मसाक्षात्कार लीलेने होतो. भगवान पूर्ण ब्रह्मस्वरूपच असतो. तसेंच श्रीगुरुहि पूर्ण ब्रह्मरूपच असतात. त्यांचें लुब्ध होणें म्हणजे ब्रह्माचेंच लुब्ध होणें होय व ब्रह्मच प्रेमाला भाळल्यावर साक्षात्काराला काय वेळ लागणार? लोहचुंबक जसा लोखंडाला ओढतो त्याप्रमाणे प्रेम प्रिय वस्तूचें आपल्याशी ऐक्य करून घेतें.

*श्रीभगवानुवाच*

**अक्षरं ब्रह्म परमं स्वभावोऽध्यात्ममुच्यते। भूतभावोद्भवकरो विसर्गः कर्मसञ्ज्ञितः॥ ३॥**

**अर्थ**—भगवान म्हणतात, अर्जुना! अविनाशी तें परब्रह्म होय. त्याच परब्रह्माचें, प्रत्येक देहाचे ठिकाणीं, देहाने मर्यादित केलेलें शुद्ध अस्तित्व, त्याला अध्यात्म म्हणतात. सर्व भूतांचें अस्तित्वांत येणें, ज्या उत्पत्तिरूप व्यापारामुळे भासतें त्या उत्पत्तिरूप व्यापाराला कर्म म्हणतात. ॥ ३ ॥

**मग म्हणितलें सर्वेश्वरें। जें आकारीं इये खोंकरें। कोंदलें असत न खिरे। कवणें काळीं॥ १५॥**
**एऱ्हवीं सपूरपण तयाचें पाहावें। तरि शून्यचि नव्हे स्वभावें। वरि गगनाचेनि पाल्वें। गाळूनि घेतलें॥ १६॥**
**जें ऐसेंही परि विरुळें। इये विज्ञानाचिये खोळे। हालवलेंही न गळे। तें परब्रह्म॥ १७॥**

**अर्थ**—तेव्हा सर्वांचे स्वामी भगवान् श्रीकृष्ण म्हणाले, अर्जुना! जें या छिद्रमय शरीरांत कोंडलें असून केव्हाहि गळून पडत नाही. ॥ १५ ॥ एऱ्हवीं अणु रेणूंतून घनदाट भरून असलेली त्याची व्याप्ति पाहावी तर आपल्या सत्तेमुळें तें शून्य आहे, असें म्हणतां येत नाही (स्थूल म्हणावें तर) जें आकाशांतूनही गाळले जातें-म्हणजे आकाशापेक्षाहि सूक्ष्म आहे. ॥ १६ ॥ असें सूक्ष्म आहे, तरी या नामरूपात्मक प्रपंचाच्या झोळींतून हालवूनहि जें गळत नाही, त्याला परब्रह्म म्हणतात. ॥ १७ ॥

**गूढार्थदीपिका**—या ओव्यांतून माऊलींनी परब्रह्माचें लक्षण केले आहें. हें परब्रह्म म्हणजे निर्गुण स्वरूप होय. नामरूपरहित स्वरूपाला निर्गुण स्वरूप म्हणतात आणि तें निर्गुण स्वरूप म्हणजे केवळ सत्तारूप घेतलें जातें किंवा परब्रह्माचा केवळ अविनाशी सत्तारूपाने अनुभव येणें, यालाच निर्गुण परब्रह्माचा अनुभव म्हणतात. माऊलींनी पुढे

तेराव्या अध्यायांतहि "तरि केवळ जे सत्ता। तो पुरुष गा पंडुसुता" (ज्ञा. अ. १३-९६६) या निर्गुण परब्रह्मस्वरूपाची ओळख सांगितली असून नाथांनीहि "सत्पद तें ब्रह्म" (हरिपाठ अभंग ११) "सत्पद ते निर्गुण" या वचन पंक्तींनी सत्, चित्, आनंद या तीन अंशापैकी केवळ सद्अंशाचा अनुभव हाच निर्गुण परब्रह्माचा अनुभव होय, असें म्हटलें आहे.

**आणि आकाराचेनि जालेपणें। जन्मधर्मातें नेणे। आकारलोपीं निमणें। नाहीं कहीं॥ १८॥**
**ऐशिया आपुलियाची सहजस्थिती। जया ब्रह्माची नित्यता असती। तया नाम सुभद्रापती। अध्यात्म गा॥ १९॥**

**अर्थ**—आणि आकार उत्पन्न झाला, तरी आकाराबरोबर जे उत्पन्न होत नाही आणि आकार नाहीसा झाला, तरी जें कधीं नाश पावत नाही.॥ १८॥ अशी या परब्रह्माचीच जी आपल्या ठिकाणीं म्हणजे जीवाच्या ठिकाणीं अविनाशी सत्ता व्यापून आहे तिलाच अर्जुना! अध्यात्म म्हणतात.॥ १९॥

**गूढार्थदीपिका**—जीवाला आपल्या निर्गुण आत्मस्वरूपाचा जो अनुभव येतो, तो देखील केवळ अविनाशी सत्तारूपानेच येतो, असा अर्थ.

**मग गगनीं जेविं निर्मळें। नेणों कैंचीं एके वेळे। उठती घनपटळें। नाना वर्णे॥ २०॥**
**तैसें अमूर्ती तिये विशुद्धें। महदादि भूतभेदें। ब्रह्मांडाचे बांधे। होंचि लागती॥ २१॥**

**अर्थ**—मग निर्मळ अशा आकाशांत, ज्याप्रमाणे एकाएकी नाना रंगांच्या मेघांचे समुदाय कोठून उठतात हे समजत नाही.॥ २०॥ त्याप्रमाणे शुद्ध निराकार परब्रह्माचे ठिकाणीं बुद्ध्यादिक नाना प्रकारचीं भिन्न भिन्न भूतें उत्पन्न होऊन नाना ब्रह्मांडाचे आकार निर्माण होतात.॥ २१॥

**गूढार्थदीपिका**—निरुपाधिक निराकार परब्रह्माचे ठिकाणीं जगत्-ब्रह्मांडाची प्रतीति कल्पनामात्र आहे, असा अर्थ.

**पैं निर्विकल्पाचिये बरडी। फुटे आदिसंकल्पाची विरूढी। आणि ते सवेंचि मोडोनि ये ढोंढी। ब्रह्म गोळकांच्या॥ २२॥**

**अर्थ**—निर्विकल्प अशा माळ जमिनींत आदिसंकल्पाचा अंकुर उत्पन्न होतो आणि लगेच त्याबरोबर तो अंकुर ब्रह्मांडरूप आकारांनी भरून (लदबदून) येतो.॥ २२॥

**गूढार्थदीपिका—निर्विकल्पाचिया बरडीं**—येथे ज्या निर्गुण निराकार परब्रह्माचे ठिकाणीं जगताचा प्रत्यय येतो, त्या परब्रह्माला माऊलींनी निर्विकल्प म्हटलें असून; त्याला माळजमिनीची उपमा दिली आहे. ज्याप्रमाणे माळजमीनींत अंकुर फुटणें शक्य नाही, पण तेथे जर अंकुराचा प्रत्यय आला तर तो भ्रमरूपच म्हणावा लागेल. त्याप्रमाणे जें परब्रह्म निर्विकल्प आहे—म्हणजे ज्या परब्रह्माच्या ठिकाणीं परब्रह्माहून भिन्न वस्तूच्या विकल्पाचा प्रत्ययच येऊं शकत नाही त्या परब्रह्माचे ठिकाणीं जड, विनाशी ब्रह्मगोलकाचा प्रत्यय भ्रांतच असणार, असा अर्थ.

**आदिसंकल्पाची विरूढी—"सोऽकामयत बहुस्यां प्रजायेय"** मी बहुरूप व्हावें, अशी प्रारंभीं परमात्मा कामना करतो, असें तैत्तिरीय उपनिषदांत सांगितलें आहे. हाच आदिसंकल्प होय. पण नित्यमुक्त भगवंताला, आपल्या अखंडानंद स्वरूपावांचून दुसरा प्रत्ययच नसल्यामुळें, त्याचा तो 'आदिसंकल्प' सच्चिदानंदस्वरूपच असतो—म्हणजे मीच सच्चिदानंदस्वरूपाने बहुरूप व्हावें, असाच त्या संकल्पाचा अर्थ असतो—असा त्या श्रुतीवर आचार्यांनी केलेल्या भाष्याचा अभिप्राय आहे.

जीव अनादि अविद्याभ्रमाने युक्त असल्यामुळे तो भगवंताचा विशुद्ध संकल्प सृष्टिविषयक समजतो व तसा त्याला सृष्टीचा प्रत्यय येतो. वास्तविक पाहतां हा सृष्टिविषयक संकल्प खोटा आहे. "हरिसंकल्प तोही। समूळ मिथ्या"॥ २४॥ (अन्वय व्यतिरेक स. १०-समर्थ)

**तया एकैकाचे भीतरीं पाहिजे। तंव बीजाचाचि भरिला देखिजे। माजि होतियां जातियां नेणिजे। लेख जीवां॥ २३॥**

**अर्थ**—त्या एकेकाचे आंत पाहिल्यास तो बीजानेच भरलेला दिसतो. त्यांत उत्पन्न होणाऱ्या व नाश पावणाऱ्या जीवांची तर संख्याच करतां येत नाही.॥ २३॥

**गूढार्थदीपिका**—जड विनाशी सृष्टीचें उत्पत्तिस्थान कल्पना हेच असून, सर्व सृष्टि कल्पनामय असल्यामुळे, प्रत्येक ब्रह्मगोळकाच्या आंत बीजच भरले आहे असें म्हटले आहे.

**मग तया ब्रह्मगोळकांचे अंशांश। प्रसवती आदिसंकल्प असमसहास। हें असो ऐसी बहुवस। सृष्टि वाढे॥ २४॥**

**अर्थ**—मग त्या ब्रह्मांडाच्या अंशाचेहि अंशापासून असंख्य आदिसंकल्प उठतात व अशी असंख्य सृष्टीची उत्पत्ति होते. ॥ २४॥

**गूढार्थदीपिका**—निर्विकल्प परब्रह्मस्वरूपाच्या ठिकाणीं भासलेल्या ब्रह्मांडरूप सृष्टींतील जीवहि नाना प्रकारचे संकल्प करून बहुरूप होत जातात असा अर्थ.

**परि दुजेनविण एकला। परब्रह्मचि संचला। अनेकत्वाचा आला। पूर जैसा॥ २५॥**

**अर्थ**—पण एवढीहि असंख्य सृष्टि झाली, तरी एका परब्रह्मावांचून दुसरी यत्किंचित् वस्तु अस्तित्वांत येत नाही. एक परब्रह्मच सर्वत्र भरलेंले असतें व अनेकत्वाचा नुसता पूर येतो. ॥ २५॥

**गूढार्थदीपिका**—सर्व सृष्टि काल्पनिक असल्यामुळे मूळच्या परब्रह्माच्या अद्वैत सच्चिदानंद अवस्थेंत कांही एक फरक होत नाही, असा अर्थ. हाच आशय आचार्यांनीहि वेदान्तसूत्रावरील अध्यास भाष्यांत ''तत्रैवं सति यत्र यदध्यासस्तत्कृतेन दोषेण गुणेन वाऽणूमात्रेणापि स न संबध्यते'' या पंक्तीने दाखविला आहे.

**तैसें समविषमत्व नेणों कैंचें। वायांचि चराचर रचे। पाहातां प्रसवतिया योनींचे। लक्ष दिसती॥ २६॥**

**येरी जीवभावाचिये पाल्लविये। कांहीं मर्यादाच करूं नये। पाहिजे कवण हें आधवें विये। तंव मूळ तें शून्य॥ २७॥**

**अर्थ**—त्याप्रमाणे ही समविषम सृष्टि कशी काय भासते, हें समजत देखील नाही, पण व्यर्थ सजीव निर्जीव सृष्टीचा भास होतो व लक्षावधि जीव योनि निर्माण झालेल्या दिसतात. ॥ २६॥ येऱ्हवीं जीवभावरूपी अंकुराची मर्यादा करतां येत नाही आणि हें सर्व कोणापासून उत्पन्न होतें. याचा विचार केला, तर कारणच सांपडत नाही. ॥ २७॥

**गूढार्थदीपिका—तंव मूळ तें शून्य**—येथील २०-२९ पर्यंतच्या ओव्यांमध्ये श्रीज्ञानेश्वर माऊलींनी कर्माचें स्वरूप सांगितलें आहे. कर्म म्हणजे व्यापार. हा व्यापार कर्त्यावांचून होत नाही. आणि कांही तरी कार्य घडून आणण्याकरितां, हा व्यापार होत असतो. म्हणून कार्याची उत्पत्ति होतांना कर्मरूप व्यापाराचा प्रत्यय येत असतो. परब्रह्म अद्वैतरूप आहे. त्यावांचून दुसरी वस्तूच नाही, म्हणून जीवाला ज्या जडविनाशी जगताचा प्रत्यय आहे, त्या जगताचे परब्रह्माव्यतिरिक्त दुसरें मूळ कारण सांपडत नाही.

**म्हणूनि कर्ता मुदल न दिसे। आणि शेखीं कारणही कांहीं नसे। माजीं कार्यचि आपैसें। वाढों लागे॥ २८॥**

**अर्थ**—म्हणून सृष्टीचा मुळांत कोणी कर्ता दिसत नाही व तसेंच त्या सृष्टीचें कारणहि कांही सांपडत नाही. पण हें नुसतें सृष्टिरूप कार्यच वाढलेलें दिसतें. ॥ २८॥

**गूढार्थदीपिका—कर्ता मुदल न दिसे। आणि सेखीं कारणही कांहीं नसे**—परब्रह्म अकर्तृ आहे म्हणून तें जगताच्या उत्पत्तिरूप कर्माचें निमित्तकारण होऊं शकत नाही आणि परब्रह्म अविकारी असल्यामुळें तें स्वत: जगताचें उपादानकारणहि होऊं शकत नाही. याप्रमाणे जीवाला प्रतीत होणाऱ्या जगताचें कोणतेंहि कारण सांपडत नाही.

**माजि कार्यचि आपैसे। वाढोंचि लागे**—असें जगद्रूप कार्य कारणावांचून मध्येच भासणारें आहे म्हणजे भ्रमरूप आहे; असा अर्थ.

**ऐसा करितेनवीण गोचरु। अव्यक्तीं हा आकारु। निपजे जो व्यापारु। तया नाम कर्म॥ २९॥**

**अर्थ**—याप्रमाणे अव्यक्त ब्रह्मस्वरूपाचे ठिकाणीं व्यापार करणाऱ्या कर्त्यावांचून आकार उत्पन्न करणारा जो व्यापार दिसतो, त्याला कर्म म्हणतात. ॥ २९॥

**गूढार्थदीपिका**—अर्थात्, जडविनाशी सृष्टीचें कारणच सांपडत नसल्यामुळे, ती जशी खोटी भ्रमरूप आहे, त्याप्रमाणेच अव्यक्त ब्रह्मस्वरूपाचे ठिकाणीं सृष्टीचा आकार निर्माण करणारा व्यापार, कर्त्यावांचून दिसत असल्यामुळे, तोहि अर्थात् खोटा किंवा भ्रमरूप आहे, असा अर्थ.

ज्याप्रमाणे पाणीच तरंगाकार झालें असतां, मूर्खाला तरंगाच्या उत्पत्तीच्या क्रियेचा भास होतो. त्याप्रमाणे परब्रह्माचे ठिकाणीं होणाऱ्या नामरूपाचा, स्वाभाविक शक्तिस्फुरणाचे ठिकाणीं जीवाला उत्पत्ति व्यापाररूप कर्माचा, भ्रमाने भास होतो. याचें मागे चवथ्या अध्यायांत स्पष्टीकरण केलेंच आहे. (किं कर्म किमकर्मेति........अ. ४-१६)

**अधिभूतं क्षरो भावः पुरुषश्चाधिदैवतम्। अधियज्ञोऽहमेवात्र देहे देहभृतां वर॥ ४॥**

**अर्थ**—विनाशी भावाला अधिभूत म्हणतात. जीवाला अधिदैवत म्हणतात आणि देहधारी जीवांमध्ये श्रेष्ठ अशा अर्जुना! या देहामध्ये राहणारा अधियज्ञ तो मीच आहे. ॥ ४॥

**आतां अधिभूत जें म्हणिपे। तेंहि सांगों संक्षेपें। तरी होय आणि हारपे। अभ्र जैसें॥ ३०॥**
**तैसें असतेपण आहाच। नाहीं होइजे हें साच। जयातें रूपा आणिती पांचपांच। मिळोनियां॥ ३१॥**
**भूतांतें अधिकरूनि असे। आणि भूतसंयोगें तरि दिसे। जें वियोगवेळे भ्रंशे। नामरूपादिक॥ ३२॥**
**तयातें अधिभूत म्हणिजे। मग अधिदैवत पुरुष जाणिजे। जेणें प्रकृतीचें भोगिजे। उपार्जिलें॥ ३३॥**
**जो चेतनेचा चक्षु। जो इंद्रियदेशींचा अध्यक्षु। जो देहास्तमानीं वृक्षु। संकल्पविहंगमाचा॥ ३४॥**
**जो परमात्माचि परि दुसरा। जे अहंकारनिद्रा निदसुरा। म्हणोनि स्वप्नीचिया वोरबारा। संतोषे शिणे॥ ३५॥**

**अर्थ**—आतां अधिभूत जें म्हटलें जातें तें काय, हेंहि संक्षेपाने सांगतों. ज्याप्रमाणे अभ्र येतें व नाहीसें होतें. ॥ ३०॥ त्याप्रमाणे ज्याचें अस्तित्व भासमात्र आहे, 'नसणें' हेंच त्याचे खरें स्वरूप आहे, पांच भूतें परस्परांत मिळून ज्याला रूपाला आणतात. ॥ ३१॥ जें नामरूपात्मक शरीर पंचभूतांना धरून असतें, पंचभूतांचा संयोग झाला असतां दिसतें आणि भूतांचा वियोग झाला असतां नाहीसें होतें. ॥ ३२॥ त्या शरीराला अधिभूत म्हणतात; आणि जो प्रकृतीने केलेलें कर्म मी केलें म्हणतों, म्हणून त्याचें फळ आपण भोगतों, तो जीवपुरुष अधिदैवत होय. ॥ ३३॥ जो जीव जाणीवरहित चैतन्याची जाणणारी दृष्टी होय किंवा जो प्रमाणाने जाणणारा प्रमाता होय; जो इंद्रियांचा प्रवर्तक आहे म्हणजे जो इंद्रियांवर आरूढ होऊनच व्यवहार करतो व जो स्थूल देहाचा संबंध सुटला असतां संकल्परूपी पक्ष्यांचा आश्रय करून राहण्याचा वृक्ष होय. ॥ ३४॥ जो खरोखर परमात्माच आहे, पण आपल्या निराळेपणाच्या अहंकारनिद्रेने झोपला असल्यामुळे जो परमात्म्याहून वेगळा झाला आहे. जो स्वप्नांतील व्यवहाराने संतोष पावतो व कष्टी होतो. ॥ ३५॥

**गूढार्थदीपिका**—ज्याप्रमाणे घटांतील आकाश घटामुळे मर्यादित दिसलें तरी बाहेरच्या आकाशाप्रमाणे ते शुद्धच असतें व बाहेरच्या आकाशीं मिळालेलेंच असतें, त्याप्रमाणे वृत्त्यवच्छिन्न चैतन्यस्वरूप जीवहि वृत्तीमुळे मर्यादित दिसत असला, तरी शुद्ध चैतन्यस्वरूपच असतो व शुद्ध ब्रह्मचैतन्याशी मिळालेलाच असतो. पण तो वृत्तिमर्यादेचा अहंकार धारण करून आपल्या शुद्ध सच्चिदानंदस्वरूपाला व शुद्ध चैतन्यस्वरूपाशीं असलेल्या ऐक्याला विसरल्यामुळे परमेश्वराहून वेगळा झाला आहे. त्याचा जागृतींतील सर्व व्यवहार स्वप्नाप्रमाणे काल्पनिक असून त्याचे सुखदु:खाचे भोगहि काल्पनिक असतात.

**स्वप्नीचिया वोरबारा। संतोषे शिणे**—ज्ञानदृष्टीने पाहतां जागृति देखील स्वप्नच होय, असे माऊलींनी येथे सुचविलें आहे. आचार्यांनीहि ऐतरेयोपनिषदावरील भाष्यांत "त्रयः स्वप्ना जागृत्स्वप्नसुषुप्त्याख्याः" जागृति, स्वप्न, सुषुप्ति हे तिन्हीहि स्वप्नच आहेत, असें म्हटलें आहे.

**जीव येणें नांवें। जयातें आळविजे स्वभावें। तें अधिदैवत जाणावें। पंचायतनींचें॥ ३६॥**
**आतां इयेचि शरीरग्रामी। जो शरीरभावातें उपशमी। तो अधियज्ञु एथ गा मी। पंडुकुमरा॥ ३७॥**

**अर्थ**—ज्याला आपण जीव या नांवाने संबोधतों, तो जीवच पंचभूतांपासून बनलेल्या शरीरांतील अधिदैवत होय. ॥ ३६॥ आता याच शरीरात असून ज्याचे ठिकाणीं हा पांचभौतिक शरीरभाव मुळीच नाही किंवा ज्याच्या योगाने जीवाचा पांचभौतिक शरीरभाव नाहीसा होतो, असा जो अधियज्ञ, तो मीच आहे. ॥ ३७॥

**गूढार्थदीपिका**—येथे श्रीज्ञानेश्वर माऊलींनी या शरीरांतच, जीव व परमात्मा यांचा अनुभव घेतां येतो, असें सांगून दोघांचें स्वरूप दाखविलें आहे.

देहाहंकाराने देहाशीं आपल्या ऐक्याची कल्पना करणारा जीव असून, देहांत राहून देहाशीं ऐक्य न करणारा, तो परमात्मा होय, असें माउलीचें म्हणणें आहे.

आचार्यांनीहि वेदान्तसूत्राच्या पहिल्या अध्यायाच्या द्वितीय पादांतील तिसऱ्या सूत्रावर भाष्य करतांना "सत्यं (ईश्वरः)। शरीरे भवति न तु शरीर एव भवति.......जीवस्तु शरीर एव भवति" असा जीव व ईश्वर यांचा वेगळेपणा दाखविला आहे.

**येर अधिदैवाधिभूत। तेही मीचि कीर समस्त। परि पंधरें किडाळा मिळत। तें काय सांकें नोहे॥ ३८॥**
**तरि तें पंधरेपण न मैळे। आणि किडळाचियाही अंशा न मिळे। परि जंव असे तयाचेनि मेळें। तंव सांकेंचि म्हणिजे॥ ३९॥**
**तैसें अधिभूतादि आघवें। हें अविद्येचेनि पाल्वें। झांकलें तंव मानावें। वेगळें ऐसें॥ ४०॥**

**अर्थ**—बाकीचें जें अधिदैव व अधिभूत तें देखील सर्व मीच—म्हणजे तें सर्व खरोखर सच्चिदानंद ब्रह्मरूपच आहेत, पण शुद्ध सोनें हीणकसात मिळविलें असतां ते हीणकस होत नाही काय?॥ ३८॥ वास्तविक शुद्ध सोनें कांही अशुद्ध होत नाही व हीणकसपणालाहि येत नाही (कारण शुद्ध सोनें हीणकसाहून निराळें करतां येतें), पण जोपर्यंत, तें शुद्ध सोनें हीणकसाबरोबर आहे तोपर्यंत तें हीणकसच म्हटलें जातें. ॥ ३९॥ त्याप्रमाणे अधिभूत, अधिदैव हे जोपर्यंत अविद्यारूप वस्त्राने झांकले आहेत, तोपर्यंत ते माझ्याहून निराळे मानले जातात. ॥ ४०॥

**गूढार्थदीपिका—अविद्येचेनि पालवें। झांकलें तंव**—अधिभूतादिक हे पूर्णब्रह्मस्वरूपच आहेत, असें त्याचें जोंपर्यंत यथार्थ ज्ञान होत नाही व ते जड विनाशी पांचभौतिक पदार्थ आहेत, अशी जोंपर्यंत जीव कल्पना करतो तोंपर्यंतच भेदाचा भास आहे.

**तेचि अविद्येची जवनिक फिटे। आणि भेदभावाची अवधी तुटे। मग म्हणों एक होऊनि जरी आटे। तरि काय दोनी होती॥ ४१॥**

**अर्थ**—अविद्यारूपी विपरीत कल्पनेचा पडदा बाजूला सारला गेला की अधिदैव व अधिभूत यांचा निराळेपणा संपतो—म्हणजे माझ्याशी ते ऐक्य पावतात—मग ते ऐक्य पावले, त्यांचा भेद आटला, असें म्हणावें, तर खरोखरच ते निराळे झाले होते काय?॥ ४१॥

**गूढार्थदीपिका**—परब्रह्म हीच एक अस्फुट निरवयव वस्तु असल्यामुळे जीवजगत् तिच्याहून मुळींच निराळे झाले नाहीत, म्हणून ते निराळे आहेत, असें वाटणें जसें अज्ञानमूलकच आहे, तसेंच ज्ञानाने ज्यांचें परब्रह्माशीं ऐक्य होतें, असें वाटणेंहि अज्ञानमूलकच आहे असा भाव. "**न हि वस्तुतो मुक्तामुक्तत्व विशेषाऽस्ति आत्मनो नित्यैकरूपत्वात्**", "**तस्मान्न आत्मनः स्वतो बद्धमुक्तज्ञानाज्ञानकृतो विशेषोऽस्ति सर्वदा समयैकरसस्वाभाव्यादभ्युपगमात्**" (बृ. ४-४-६) या बृहदारण्यक भाष्यपंक्तींत आचार्यांनी असेंच सांगितलें आहे.

**पैं केशांचा गुंडाळा। वरि ठेविली स्फटिकशिळा। ते वरी पाहिली डोळां। तंव भेदली गमली॥ ४२॥**
**पाठीं केश परौते नेले। आणि भेदलेपण काय नेणों जाहालें। तरि डांक देऊनि सांदिलें। शिळेतें काई॥ ४३॥**
**ना ते अखंडचि आयती। परि संगें भिन्न गमली होती। ते सारीलिया मागौती। जैसी कां तैसी॥ ४४॥**
**तेवीं अहंभावो जाये। तरी ऐक्य तें आधींचि आहे। हेंचि साचें जेथ होये। तो अधियज्ञु मी॥ ४५॥**

**अर्थ**—ज्याप्रमाणे केसाच्या गुंडाळ्यावर स्फटिकाचा दगड ठेवला व आपण पाहूं लागलों, तर तो दगड फुटलासा दिसतो. ॥ ४२॥ नंतर केसांचा गुंडाळा बाजूला केल्याबरोबर स्फटिकाचें फुटणे कोठे गेलें, समजत नाही. खरोखर स्फटिक फुटला होता व नंतर तो जोडला गेला काय?॥ ४३॥ किंवा तो स्फटिक जसाचा तसा अखंडच होता, पण केसाच्या संबंधामुळे फुटला, असें वाटत होतें आणि केसाचा गुंडाळा बाजूला केल्याबरोबर पुनः तो जसाचा तसा अभंग दिसूं लागला. ॥ ४४॥ त्याप्रमाणे आपल्या निराळेपणाचा अहंकार नाहिसा झाला की, जीव मूळचाच ब्रह्माशीं एकरूप आहे, असा सत्य अनुभव जेथे येतो तो, अर्जुना! अधियज्ञ मीच होय. ॥ ४५॥

**गूढार्थदीपिका—"तस्मात्सर्वशरीरेष्वहमहमित्येव भासते स्पष्टः।**
**यः प्रत्ययो विशुद्धस्तस्य ब्रह्मैव भवति मुख्योऽर्थः॥ ८८॥"** (स्वात्मनिरूपण)

शरीरामध्ये जें 'अहं' म्हणजे 'मी स्फुरण' तें खरोखर ब्रह्मस्फुरणच होय, असें आचार्यांनी म्हटलें आहे. हाच 'अहं' देहावर बसला की तो जीव होतो. श्रीज्ञानेश्वर माऊलींनीहि 'अर्जुनपण न घेतां। मी ऐसें जें पंडुसुता। उठतसे तें तत्त्वतां। तयाचें रूप'॥ १३१५॥ (ज्ञा. अ. १८) देहाहंकार हा जीव असून नुसता अहं किंवा मी स्फुरण परमात्मा आहे, असे या ओवींत सांगितलें आहे.

याप्रमाणे अहं हें वृत्तिस्फुरण परब्रह्माचेंच असल्यामुळे त्यांत सत्, चित्, आनंद हे तिन्ही अंश एकत्र भरलेले असतात आणि आहेपणा, जाणणेपणा व आनंद या धर्मांचे द्वारा त्याचा आपण अनुभवहि घेतोच. अर्थात् हें सच्चिदानंदाचें वृत्तिस्फुरण मर्यादित असल्यामुळे सच्चिदानंदधर्माने युक्त म्हणून सगुण व वृत्तीने मर्यादित म्हणून साकार असतें. म्हणून केवळ अहंवृत्तीने स्फुरण परमात्मा व देहाहंकाराने स्फुरणारा जीव, हे दोघेहि सगुण साकारच आहेत. फरक इतकाच की परमात्मा आपल्या स्वरूपाला विसरत नाही व देहाची अहंता वागवीत नाही, म्हणून परमेश्वराचा सगुण साकार पांचभौतिक होत नाही व देहावर अहंभाव धरणारा जीव आपली मूळ परब्रह्मस्थिति विसरून, पांचभौतिक देहावर अज्ञानाने अहंभाव ठेवतो, म्हणून त्याचा सगुण साकार पांचभौतिक असतो.

जीवाच्या हृदयांत केवळ अहंरूपाने स्फुरणाऱ्या या सगुण साकार परमेश्वराला येथे माऊलींनी अधियज्ञ म्हटलें आहे.

या सगुण साकार अधियज्ञ परमेश्वराला जाणल्यानेच जीव कल्पित अज्ञानादि उपाधीपासून मुक्त होऊन, आपली अभंग असलेली ब्रह्मस्थिति अनुभवितो, असा अर्थ.

**पैं गा आम्ही तुज। सकळ यज्ञ कर्मज। सांगितलें कां जें काज। मनीं धरूनि॥ ४६॥**

**अर्थ**—अर्जुना! ज्याच्या प्राप्तीचा हेतु मनांत धरून आम्ही तुला कर्माने सिद्ध होणारे जेवढे यज्ञ आहेत, ते सर्व सांगितले.॥ ४६॥

**गूढार्थदीपिका**—सांडोनि देहींची अहंता। सकळ भोग ईश्वरु भोक्ता। ऐशी दृढ भावना भावितां। पाविजे परमार्था अपरोक्षसिद्धी.॥ ८५९॥ (ए. भा. अ. ३)

कायिक, वाचिक, मानसिक जेवढे कर्मसाध्य यज्ञ आहेत ते सर्व सगुण भगवंताच्या प्राप्तीकरिता, त्याची आज्ञा म्हणून, निष्काम चित्ताने केले असतां हृदयस्थ अशा सगुण परमेश्वराची प्राप्ति होते.

निर्गुण परमेश्वरप्राप्तीकरिता संन्यासयोग आहे. परमेश्वराची सगुण निर्गुण दोन्ही रूपें पूर्ण निरुपाधिक-म्हणजे त्रिगुणात्मक मायारहित-असल्यामुळे सगुण परमेश्वराची प्राप्ति व निर्गुण परमेश्वराची प्राप्ति सारखीच आहे. त्यांत श्रेष्ठ-कनिष्ठ भाव नाहीत. किंबहुना परमेश्वराचें सगुण स्वरूप, बर्फ पाण्याला सोडून नसतो, त्याप्रमाणे निर्गुणस्वरूपाला मुळींच सोडून नसतें. म्हणून निर्गुणस्वरूपांत सगुणाची प्राप्ति नाही, पण सगुणस्वरूपांत मात्र निर्गुणाची प्राप्ति होतेच, असें श्रीज्ञानेश्वर माउलींनी "म्हणोनि नाम वज्रकवच। तोचि निर्गुणाचा अभ्यास" या अभंगचरणांत सांगितलें आहे.

**तो हा सकळ जीवांचा विसांवा। नैष्कर्म्यसुखाचा ठेवा। परि उघड करूनि पांडवा। दाविजत असे॥ ४७॥**
**पहिलें वैराग्यइंधन परिपूर्तीं। इंद्रियानळीं प्रदीप्तीं। विषयद्रव्याचिया आहुती। देऊनियां॥ ४८॥**
**मग वज्रासन तेचि उर्वी। शोधूनि आधारमुद्रा बरवी। वेदिका रचे मांडवीं। शरीराच्या॥ ४९॥**
**तेथ संयमाग्नीचीं कुंडें। इंद्रियद्रव्याचेनि पवाडें। यजिजती उदंडें। युक्तिघोषें॥ ५०॥**
**मग मनप्राणसंयमु। हाचि हवनसंपदेचा संभ्रमु। येणें संतोषविजे निर्धूमु। ज्ञानानळु॥ ५१॥**
**ऐसेनि हें सकळ ज्ञानीं समर्पे। मग ज्ञान तें ज्ञेयीं हारपे। पाठीं ज्ञेयचि स्वरूपें। निखिल उरे॥ ५२॥**
**तया नांव गा अधियज्ञु। ऐसें बोलला जंव सर्वज्ञु। तंव अर्जुन अतिप्राज्ञु। तया पातलें तें॥ ५३॥**
**हें जाणोनि म्हणितलें देवें। पार्था परिसतु आहासि बरवें। या कृष्णाचिया बोला सवे। येरु सुखाचा जाहला॥ ५४॥**
**देखा बाळकाचिया धणी धाइजे। कां शिष्याचेनि जाहलेपणें होईजे। हें सद्गुरुचि एकलेनि जाणिजे। कां प्रसवतिया॥ ५५॥**

**अर्थ**—तो हा अधियज्ञ सर्व जीवांचा विसांवा होय-म्हणजे ज्याची प्राप्ति झाली असतां जीवांना संसारदु:खांचा

विसर पडतो—व हाच नैष्कर्म्यसुखाचा-म्हणजे कर्मरहित अथा ब्रह्मसुखाचा-ठेवा होय. पण अर्जुना! मी तुला स्पष्ट करून दाखवित आहे. ॥ ४७ ॥ प्रथम वैराग्यरूपी लाकडांचा पूर्ण पुरवठा करून इंद्रियरूपी अग्नि प्रज्वलित करावा व मग त्यांत विषयरूपी द्रव्याच्या आहुती द्याव्या. (प्रथम तीव्र विषयवैराग्य संपादन करावें असा अर्थ). ॥ ४८ ॥ मग वज्रासन हीच पृथ्वी, ती शुद्ध करून घेऊन, तेथ शरीररूपी मंडपांत मूळबंधरूपी उत्तम स्थंडिल किंवा ओटा रचावा. ॥ ४९ ॥ तेथे इंद्रियरूप पुष्कळ द्रव्याच्या साहाय्याने संयमाग्नीची (संयम म्हणजे धारणा, ध्यान, समाधि हे तिन्ही एका ठिकाणीं करणें) कुंडे युक्तिरूप-म्हणजे नियमित आहारविहाररूप-मंत्राच्या घोषाने दीर्घकाल पूजावीं. ॥ ५० ॥ मग मन व प्राण यांचा निग्रह हा त्या हवनसंपत्तीचा समारंभ होय. त्याने धूररहित स्वच्छ ज्ञानाग्नि संतुष्ट करावा. ॥ ५१ ॥ अशा रीतीने द्रव्य, कर्म वगैरे सर्व ज्ञानाचे ठिकाणीं समर्पण केले जातात व मग ज्ञानहि ज्ञेयपरब्रह्मांत नाहीसें होऊन, केवळ ज्ञेयस्वरूप उर्वरित राहतें. ॥ ५२ ॥ त्या ज्ञेयाला अधियज्ञ म्हणतात, असें भगवान श्रीकृष्ण बोलत आहेत, तोंच अर्जुन अति बुद्धिमान असल्यामुळे, त्याला ती स्थिती प्राप्त झाली. ॥ ५३ ॥ हें देवाला समजलें, म्हणूनच भगवान म्हणाले, अर्जुना! नीट लक्ष देऊन ऐकतोस ना! हे श्रीकृष्णाचें बोल ऐकून अर्जुन सहाजिकच अति समाधान पावला. ॥ ५४ ॥ पहा, आपल्या मुलाला सुखसंपन्न पाहून आपल्याला कसें सुख वाटतें, हे त्याच्या आईलाच माहीत किंवा शिष्य कृतार्थ झाला असतां श्रीगुरुला कसा आनंद होतो, हें एका सद्गुरुलाच माहीत. ॥ ५५ ॥

**गूढार्थदीपिका**—आपल्या सुखाने सुखी होणें व दुसऱ्याच्या सुखाने सुखी होणें अशा दोन प्रकारांनी व्यवहारांत सुखभोग घेता येतो. आपल्या सुखानें सुखी होणे, हा सुखभोग 'रजोरागात्मकं विद्धि' या भगवद्वचनाप्रमाणे रजोगुणात्मक आहे आणि दुसऱ्याच्या सुखाने सुखी होणें, हा सुखभोग अर्थातच सत्त्वगुणात्मक आहे. ज्याप्रमाणे गढूळ पाण्यापेक्षा स्वच्छ पाण्यांत प्रतिबिंब अधिक स्पष्ट दिसतें, त्याप्रमाणे रजोगुणापेक्षा सत्त्वगुणांत आत्म्याचें सुख अधिक प्रतिबिंबित होत असल्यामुळे, आपल्या सुखाने सुखी होणें, या रजोगुणात्मक सुखभोगापेक्षा दुसऱ्याच्या सुखाने सुखी होणें, हा सुखभोग अर्थातच अधिक सुखकारक असतो. पण व्यवहारांत सर्व पुरुष "**आत्मनस्तु कामाय सर्वं प्रियं भवति**" या श्रुतिप्रमाणे आपलें सुख पाहत असतात. म्हणून त्यांना दुसऱ्याच्या सुखाने सुखी होण्यांत काय अधिक लाभ आहे, याचा अनुभव येत नाही. आपल्याला सुख व्हावें अशी कांही एक इच्छा न करतां केवळ आपल्यासारखेंच शिष्याला सुख प्राप्त व्हावें, असा शिष्याच्या कृतार्थतेने कृतार्थ होऊं पाहणाऱ्या श्रीगुरुलाच किंवा मुलाच्या सुखाने सुखी होऊं इच्छिणाऱ्या आईलाच, हा सुखाचा अनुभव घेतां येतो.

**म्हणोनि सात्त्विक भावांची मांदी। कृष्णाआंगीं अर्जुनाआधीं। न समातसे परी बुद्धी। सांवरूनि देवें॥ ५६॥**
**मग पिकलिया सुखाचा परिमळु। कां निवालिया अमृताचा कल्लोळु। तैसा कोंवळा आणि रसाळु। बोलु बोलिला॥ ५७॥**
**म्हणे परिसणेयांच्या राया। आइकें बापा धनंजया। ऐसी जळों सरलिया माया। तेथ जाळितें तेंही जळे॥ ५८॥**

**अर्थ**—म्हणूनच अर्जुनाचे अगोदर भगवान श्रीकृष्णाचे ठिकाणीं अष्टसात्विकभाव दाटून आले व मावेनासे झाले. पण भगवंताने अष्टसात्विकभावांत बुद्धि विरूं न देतां सावरून धरली. ॥ ५६ ॥ मग जणूं काय पिकलेल्या सुखाचा सुगंधच किंवा थंड केलेल्या अमृताची लहरीच, अशा मृदु आणि रसाळ शब्दाने, भगवान अर्जुनाला बोलूं लागले. ॥ ५७ ॥ भगवान म्हणतात, श्रवण करणाऱ्यांमध्ये श्रेष्ठ अशा बापा अर्जुना! असा ज्ञानाने मायेचा नाश झाला की मायेचा नाश करणारें ज्ञानहि नाश पावते. ॥ ५८ ॥

**गूढार्थदीपिका**—"मी ब्रह्म आहे या जाणीवरूप ज्ञानाने, अविद्येचा नाश झाला असतां, तें ज्ञानहि आपोआप नाहिसें होते." असा या ओवीचा अर्थ केला जाण्याचा संभव आहे; पण येथे नि:शेष अविद्येचा नाश झाल्यावर, अविद्येचा नाश करणारें ज्ञानहि नाहिसें होतें, एवढेंच सांगितले आहे. आत्मज्ञानानेंच नि:शेष अविद्येचा नाश होऊन, अविद्यालेशहि उरत नाही किंवा ज्ञानाची जाणीवहि उरत नाही, असें येथें सांगितले नाही.

**अन्तकाले च मामेव स्मरन्मुक्त्वा कलेवरम्। यः प्रयाति स मद्भावं याति नास्त्यत्र संशयः॥ ५॥**

**अर्थ**—मरणसमयीं माझें स्मरण करून जो देह सोडतो व जातो तो माझ्या स्वरूपांशीं ऐक्य पावतो यांत मुळींच संशय नाही. ॥ ५ ॥

**जें आतांचि सांगितलें होतें। अगा अधियज्ञ म्हणितला जयातें। जे आधींचि तया मातें। जाणोनि अंतीं॥ ५९ ॥**

**अर्थ**—अर्जुना! ज्याला अधियज्ञ म्हणतात तो मीच आहे, हें तुला आतांच सांगितलें होतें, त्या मला प्रथमपासून जाणून ते मरणसमयींहि माझ्या ठिकाणीं चित्त ठेवतात.॥ ५९ ॥

**गूढार्थदीपिका**—आत्मज्ञानाने अविद्या मिथ्या ठरल्यानंतर प्रारब्ध आहे तोंपर्यंत अविद्येचे लेश म्हणजे पूर्वीच्या बद्धस्थितीचें स्मरण व मिथ्या जगताचा भास हे कायम राहतात व प्रारब्ध संपल्यानंतरच ते विदेहमुक्तीने नाहिसे होतात, असे ज्ञानमार्गांत सर्वत्र मानलेलें आहे, हें सूतसंहितेत ज्ञान्याच्या जीवन्मुक्तीचें वर्णन करतांना विद्यारण्यांनी जें स्पष्टीकरण केलें आहे, त्यावरून कळून येतें.

''तिस्रोहि मायावस्थाः। दृश्यस्य वास्तवत्वाभिमानात्मिका प्रथमा। प्रथमा सा युक्तिशास्त्रजनितविवेकज्ञानान्निवर्तते। तन्निवृत्तावपि प्रागेव साभिनिवेशव्यवहारहेतु द्वितीया। सा तत्त्वसाक्षात्कारान्निवर्तते। तन्निवृत्तावपि देहाभास जगदादौभास हेतुरूपा तृतीया। सा प्रारब्धकर्मावसाने निवर्तते'' (सू. सं. मु. खं. अ २-५४)

विद्यारण्य म्हणतात, मायेच्या तीन अवस्था आहेत. दृश्य प्रपंच सत्य आहे, असा अभिमान ज्यांत असतो. ती पहिली बद्ध अवस्था होय. ही शास्त्र युक्ति यांनी उत्पन्न झालेल्या विवेकज्ञानाने (परोक्षज्ञानाने) नाहिशी होते. ती नाहिशी झाली तरी, पूर्वीप्रमाणेच जीमध्ये अभिमानपूर्वक व्यवहार होतो, ती दुसरी अवस्था होय. ही अवस्था आत्म्याचा दृढ अपरोक्ष साक्षात्कार झाला असतां नाहिशी होते; आणि अपरोक्ष साक्षात्काराने ही दुसरी अवस्था नाहिशी झाल्यावरहि देहाभास व जगदाभास कायम राहतो ही तिसरी अवस्था होय. ही प्रारब्धकर्म संपल्यानंतर नाहिशी होते.

पण हें आत्मैक्य जाणीवरूप ज्ञान व त्यामुळे भासणारा अविद्येचा लेश, मेल्यानेहि नाहिसा होत नाही. तो अविद्यालेश मी ''तैसें ग्रासूनि दुसरें। स्वरूपीं स्वरूपाकारें। आपुलेपणें उरें। बाधू जो कीं॥ ३१ ॥ तें ऋणशेष वाचा इया। न फेडवेचि मरोनियां। तें पाया पडूनि मियां। सोडवलें॥ ३२ ॥'' (अमृ. प्र. ३) श्रीगुरुपरमेश्वराच्या पायां पडून म्हणजे श्रीगुरुचरणीं भक्तिप्रेमाने लीन होऊन जीवंतपणींच नाहिसा केला, असा स्वानुभव श्रीज्ञानेश्वर माऊलींनी सांगून, ज्ञानानंतर केलेल्या सगुण भक्तीने ज्ञानाची जाणीव व अविद्यालेश नाहिसे होतात, असें अमृतानुभवांत प्रतिपादिलें आहे व तेच येथेहि सांगतात.

अधियज्ञ जो श्रीकृष्ण सगुण परमात्मा, त्याचे ठिकाणीं कर्मरूप यज्ञ समर्पण करतां करतां, सगुण ध्यानाने व प्रेमाने जीवाचा, पृथक्‌पणाचा अहंकार जाऊन, सगुणांशीं ऐक्य झालें की, हेंच ऐक्यज्ञानहि सगुणाचे प्रेमाने पुढे राहत नाही. यालाच ज्ञानोत्तरभक्ति म्हणतात.

**ते देह झोळ ऐसें मानुनी। ठेले आपणपें आपणचि होउनी। जैसा मठ गगना भरुनी। गगनींचि असे॥ ६० ॥**

**ये प्रतीतीचिया माजघरीं। तयां निश्चयाची वोवरी। ज आली म्हणोनि बाहेरी। नव्हेचि से॥ ६१ ॥**

**अर्थ**—ज्याप्रमाणे घर आंत बाहेर आकाशाने भरलें असल्यामुळें तें आकाशांतच असतें, त्याप्रमाणे ते पुरुष देहादिक केवळ काल्पनिक आहेत, असें समजून व देहबुद्धि विसरून आपल्या सच्चिदानंद आत्मस्वरूपाशीं ऐक्य पावून राहतात.॥ ६० ॥ या आत्मानुभवाचे माजघरांतच त्या दृढनिश्चयाची खोली असल्यामुळें, त्याना बाहेरच्या देहादिकांचे स्मरणच होत नाही.॥ ६१ ॥

**गूढार्थदीपिका**—''**विस्मरत्वेव सा ध्यानाद्विस्मृतिर्न तु वेदनात्॥ ९६ ॥**'' (पंचदशी ध्यानदीप) ब्रह्मज्ञानाने द्वैताची विस्मृती होत नसते; ती ध्यानाने होते, असे विद्यारण्य म्हणतात.

अधियज्ञ जो श्रीकृष्ण परमात्मा, त्याच्या भक्तीने देहादि मिथ्या ठरून व त्याच्याशीं ऐक्य होऊन, त्या ऐक्यानुभवाने, व अधियज्ञ परमात्मा भगवान श्रीकृष्णच आहे, या निश्चयाने, जें भगवान श्रीकृष्णाचें ध्यान होतें, त्या ध्यानाने भक्ताला द्वैताभासाचा संपूर्ण विसर पडतो, असा अर्थ.

**ऐसें सबाह्य ऐक्य संचलें। मीचि होऊनि असतां रचिलें। बाहेरी भूतांचीं पांचही खवळे। नेणतांचि पडिलीं॥ ६२॥**
**आता उभयां उभेपण नाहीं जयाचें। मा पडिलिया गहन कवण तयाचें। म्हणोनि प्रतीतीचिये पोटींचें। पाणी न हाले॥ ६३॥**
**ते ऐक्याची आहे वोतिली। कीं नित्यतेचिया हृदयीं घातली। जैसी समरससमुद्रीं धुतली। रुळेचिना॥ ६४॥**
**पैं अथावीं घट बुडाला। तो आंतबाहेरी उदकें भरला। पाठीं दैवगत्या जरी फुटला। तरी उदक काय फुटे॥ ६५॥**
**नातरी सर्पे कवच सांडिलें। कां उबारेनें वस्त्र फेडिलें। तरी सांग पां कांहीं मोडलें। अवेवामाजीं॥ ६६॥**
**तैसा आकारु हा आहाच भ्रंशे। वांचूनि वस्तु ते सांचलीचि असे। तेचि बुद्धि जालिया विसुकुसे। कैसेनि आतां॥ ६७॥**

**अर्थ**—अशा रीतीने आंतबाहेर आत्मस्वरूपाशीं ऐक्य होऊन ते मीच होऊन राहिले असतां, बाहेर देहरूपाने रचलेल्या पंचभूतांच्या खपल्या, त्यांना न समजतांच पडतात. ॥ ६२ ॥ आता ज्यांना, देह उभा असतां, त्यांचें उभेंपण समजत नव्हतें, मग तो पडला असता त्यांना त्यांचें काय दुःख वाटणार आहे? म्हणून त्यांच्या अद्वैत अनुभवांत यत्किंचित् देखील केव्हाहि बिघाड होत नाही. ॥ ६३ ॥ त्यांची ती प्रतीति जणूं काय ऐक्याच्या रसाची ओतली असते किंवा नित्यतेच्या हृदयांत ती घातली असते किंवा जशी कांही समरसरूपी समुद्रांत धुतली असते म्हणून ती कधी मळत नाही. ॥ ६४ ॥ अथांग पाण्यांत घट बुडला असतां तो आंतबाहेर पाण्यानेच भरला असतो, नंतर जरी तो दैववशात् फुटला म्हणून पाणी फुटतें काय? ॥ ६५ ॥ किंवा सर्पाने जरी आपली कात टाकली, किंवा उकडतें म्हणून अंगावरील वस्त्र काढून टाकलें, तरी त्यांच्या अवयवांमध्ये कांही बिघाड होतो काय? ॥ ६६ ॥ त्यप्रमाणे वरवर नुसता दिसणारा जो आकार तोच नाहिसा होतो. बाकी आत्मवस्तु तशीच राहते. बुद्धि आत्मवस्त्वाकार झाल्यावर तिची आत्माकारता कशी भंग पावेल? ॥ ६७ ॥

**गूढार्थदीपिका**—सगुण परमेश्वराचे ठिकाणीं ज्याचें चित्त आसक्त झाले, त्याचें चित्त अखंड भगवदाकारच असतें. कारण भगवंतावांचून सर्वांचाच त्याला विसर पडतो. भगवद्भक्त दुःख करतांना दिसतो, तो आपलें भक्तिप्रेम लोकांना दिसूं नये, म्हणून करतो.

विषयाचें दुःख झालें असतां, ज्या विषयाचें दुःख असतें त्या विषयाच्या आकाराचें मन होऊन राहतें; पण दुःखाचे वेळीं भगवद्भक्ताचें तसें होत नाही. ज्याप्रमाणे आईपासून जबरदस्तीने ओढलें जाणारें मूल जेव्हा रडतें, तेव्हा तें आईकरितांच रडतें व त्याच्या चित्तांत आईचेंच ध्यान असतें, त्याप्रमाणे प्रारब्धाने प्राप्त झालेल्या दुःखाचे वेळीं, दुःखाने भगवंतापासून चित्त निघून विषयाकडे धावूं नये म्हणूनच भक्त रडतो व ईश्वराचा धांवा करून भगवदाकार चित्त करीत राहतो.

ज्याप्रमाणे पक्व झालेल्या नारळांतील डोल, बाहेरच्या कवटीपासून अलग होतो. पुनः कवटीशीं युक्त होत नाही व कवटीवर मारलेला. घाव त्याला लागत नाही, त्याप्रमाणे भक्ताची भगवदाकार झालेली बुद्धि पुनः अहंकाराशीं कधी युक्त होत नाही. हा अनुभव नसणाऱ्या जनांना, भक्तहि सुखदुःख भोगतो, असें वाटतें. वास्तविक ''कर्ता भोक्ता भवत्यहंकारः'' तो सर्व भोग अहंकाराला होतो व भक्ताला तें माहीतहि नसतें.

**म्हणोनि यापरी मातें। अंतःकाळीं जाणतसाते। जे मोकलिती देहातें। ते मीचि होती॥ ६८॥**

**अर्थ**—म्हणून याप्रमाणे मरणसमयीं मला जाणून, जे माझें स्मरण ठेवतात व देह सोडतात, ते मद्रूप होतात. ॥ ६८ ॥

**यं यं वापि स्मरन्भावं त्यजत्यन्ते कलेवरम्। तं तमेवैति कौन्तेय सदा तद्भावभावितः॥ ६॥**
**तस्मात्सर्वेषु कालेषु मामनुस्मर युध्य च। मय्यर्पितमनोबुद्धिर्मामेवैष्यस्यसंशयम्॥ ७॥**

**अर्थ**—अर्जुना! जो मनुष्य ज्या वस्तूचें अखंड चिंतन करतो व ज्या वस्तूच्या अखंड चिंतनाने ध्यान घडल्यामुळे मरणसमयींहि ज्या वस्तूचें चिंतन करीतच देह सोडतो, तो त्या वस्तूला प्राप्त होतो. ॥ ६ ॥ म्हणून, सदा सर्वदा माझे स्मरण असूं दे व युद्ध कर. अशारीतीने तुझी मनबुद्धि माझे ठिकाणी अर्पण झाली म्हणजे तू मला खात्रीने प्राप्त होशील. ॥ ७ ॥

**एऱ्हवीं तरी साधारण। उरीं आदळलिया मरण। जो आठवु धरी अंतःकरण। तेंचि होईजे॥ ६९॥**
**जैसा कवणु एकु काकुळती। पळतां पवनगती। दुपाउलीं अवचितीं। कुहामाजीं पडियेला॥ ७०॥**
**आतां तया पडणयाआरौतें। पडण चुकवावया परौतें। नाहीं म्हणोनि तेथें। पडावेंचि पडे॥ ७१॥**
**तेविं मृत्यूचेनि अवसरें एकें। जें येऊनि जीवासमोर ठाके। तें होणें मग न चुके। भलतयापरी॥ ७२॥**
**आणि जागता जंव असिजे। तंव जेणें ध्यानें भावना भाविजे। डोळां लागतखेंवो देखिजे। तेंचि स्वप्नी॥ ७३॥**
**तेविं जितेनि अवसरें। जें आवडोनि जीवीं उरे। तेंचि मरणाचिये मेरे। फार हों लागे॥ ७४॥**
**आणि मरणीं जया जें आठवे। तो तेचि गतीतें पावे। म्हणोनि सदां स्मरावें। मातेंचि तुवां॥ ७५॥**

**अर्थ**—एऱ्हवीं साधारणपणें पाहतां, असें दिसतें की, मरणकाल प्राप्त झाला असतां, मनुष्याच्या मनांत ज्या वस्तूचें स्मरण असतें, त्या वस्तूला तो प्राप्त होतो. ॥ ६९ ॥ ज्याप्रमाणे एखादा पुरुष अत्यंत भयभीत होऊन प्राण वांचविण्याकरितां वायूच्या वेगाने पळूं लागला असतां, दोन पावलांवरच अकस्मात् विहिरींत पडला. ॥ ७० ॥ आतां त्याला विहिरींत पडण्यापूर्वी, पुढील विहिरींत पडणें चुकविण्याकरितां, अवसरच नसल्यामुळे, पडणे भागच होतें ॥ ७१ ॥ त्याप्रमाणे मरणाचे वेळी जें कांही आपल्या मनांत येतें तें होणे, कांही केलें तरी चुकत नाही. ॥ ७२ ॥ आणि मनुष्य जोपर्यंत जागा आहे, तोपर्यंत ज्या वस्तूचें ध्यान करीत असतो तीच वस्तु डोळा लागल्याबरोबर स्वप्नात तो पाहतो. ॥ ७३ ॥ त्याप्रमाणे जोपर्यंत आपण जीवंत आहो, तोंपर्यंत ज्या आवडत्या वस्तूचें मनांत ध्यान असतें, त्याच वस्तूचें मरणाचे वेळीं जास्त ध्यान लागतें. ॥ ७४ ॥ आणि मरणाचे वेळी ज्याला जें आठवते, त्याच वस्तूला तो प्राप्त होतो, म्हणून अर्जुना! सदा सर्वदा तूं माझेंच स्मरण कर. ॥ ७५ ॥

**गूढार्थदीपिका**—तुकाराम महाराजहि म्हणतात. "ज्याचें जया ध्यान। तेचि होय त्याचें मन॥ म्हणोनि अवघे दूर सारा। पांडुरंग दृढ धरा॥"

**डोळां जें देखावें। कां कानीं हन ऐकावें। मनीं जें भावावें। बोलावें वाचे॥ ७६॥**
**तें आंत बाहेरी आघवें। मीचि करूनि घालावें। मग सर्वीं काळीं स्वभावें। मीचि आहें॥ ७७॥**
**अगा ऐसें जाहालिया। मग न मरिजे देह गेलिया। मा संग्रामु केलिया। भय काय तुज॥ ७८॥**
**तूं मन बुद्धि सांचेंसीं। जरी माझिया स्वरूपीं अर्पिसी। तरी मातेंचि गा पावसी। हे माझी भाक॥ ७९॥**
**हेंच कायिसयावरी होये। ऐसा जरी संदेहो वर्तत आहे। तरी अभ्यासूनि आदीं पाहें। मग नव्हे तरी कोपें॥ ८०॥**

**अर्थ**—डोळ्याने जें पाहायचें किंवा कानाने जें ऐकायचें अथवा मनाने ज्याचें चिंतन करायचें किंवा वाणीने जें बोलायचें. ॥ ७६ ॥ तें सर्व आंत बाहेर (देहाचे आंत व देहाचे बाहेर) मलाच करून ठेव. असें झालें असतां, अर्जुना! सदा सर्वदा मींच स्वाभाविकपणे अनुभविला जाईन ॥ ७७ ॥ अर्जुना असें झालें असतां तुला कशाचें भय राहणार ? ॥ ७८ ॥ तूं जर मन व बुद्धि खरोखरच माझे सगुण स्वरूपाचे ठिकाणीं लावशील, तर मलाच प्राप्त होशील, असें तुला मी वचन देतों. ॥ ७९ ॥ अशी प्राप्ति कशी होईल, अशी जर तुला शंका येत असेल, तर आधीं तसा अभ्यास करून पाहा. जर तसें होणार नाही, तर मग रागाव. ॥ ८० ॥

**अभ्यासयोगयुक्तेन चेतसा नान्यगामिना। परमं पुरुषं दिव्यं याति पार्थानुचिन्तयन्॥ ८॥**

**अर्थ**—अभ्यासयोगाने युक्त झालेल्या व दुसरे कोठेहि (विषयाकडे) न जाणाऱ्या चित्ताने दिव्य परम पुरुषाचें चिंतन करीत राहिलें असतां, असा पुरुष परमपुरुषाला प्राप्त होतो. ॥ ८ ॥

**येणेंचि अभ्यासेंसीं योगु। चित्तासि करी पां चांगु। अगा उपायबळें पंगु। पहाड ठाकी॥ ८१॥**
**तेविं सदभ्यासे निरंतर। चित्तासि परमपुरुषाची मोहर। लावीं मग शरीर। असो अथवा जावो॥ ८२॥**
**जें नाना गतीते पाववितें। तें चित्त वरील आत्मयातें। मग कवण आठवी देहातें। गेलें कीं आहे॥ ८३॥**
**पैं सरितेचेनि ओघें। सिंधुजळा मीनलें घोघें। तें काय वर्तत आहे मागें। म्हणोनि पाहों येती॥ ८४॥**
**ना तें समुद्रचि होऊन ठेलें। तेविं चित्ताचें चैतन्य जाहालें। जेथ यातायात निमालें। घनानंद जे॥ ८५॥**

**अर्थ**—याच अभ्यासाचा आपल्या चित्ताशी चांगला योग होऊ दे. अर्जुना! अभ्यासाने पांगळा मनुष्य देखील डोंगर चढून जाऊं शकतो. ॥ ८१ ॥ त्याप्रमाणे नीट शास्त्रानुसार अभ्यास करून आपल्या चित्ताला अखंड परमपुरुषाचें ध्यान लाव. मग शरीर राहो की जावो, याचा विचार करूं नकोस. ॥ ८२ ॥ ज्या मनानेच नाना गतीरूप योनी प्राप्त होतात त्या मनानेच आत्मस्वरूपाला वरलें. म्हणजे ते मन आत्माकार झालें असतां, शरीर आहे की पडलें अशी देहाची चिंता करणारा कोण उरतो ? ॥ ८३ ॥ नदीच्या रूपाने समुद्राच्या जळांत घों घों करीत प्रवाह मिळालेले असतात, ते मागे काय चाललें आहे म्हणून पाहायला येतात! ॥ ८४ ॥ कीं समुद्रच होऊन राहतात? त्याप्रमाणे चित्त परमपुरुषाकडे लावण्याच्या अभ्यासाने, चित्ताचें चैतन्य होतें. जें चैतन्य घनानंदस्वरूप असून जेथे प्राप्त झालें असतां जन्ममरणाची यातायात मुळींच राहत नाही. ॥ ८५ ॥

**कविं पुराणमनुशासितारमणोरणीयांसमनुस्मरेद्यः। सर्वस्य धातारमचिन्त्यरूपमादित्यवर्णं तमसः परस्तात्॥ ९ ॥**

**अर्थ**—जो सर्वज्ञ आहे, सूक्ष्माहून सूक्ष्म आहे, जो सर्व प्राण्याच्या कर्माप्रमाणे फळ देणारा आहे, ज्याचें स्वरूप कल्पनातीत आहे, ज्याचा सूर्याप्रमाणे नित्यचैतन्यप्रकाश हाच वर्ण आहे व जो प्रकृतिरूप अंधाराच्या पलीकडे आहे, अशा परमेश्वराचें जो चिंतन करतो. ॥ ९ ॥

**जयाचें आकारावीण असणें। जया जन्म ना निमणें। जें आघवेंचि आघवेपणें। देखत असे॥ ८६ ॥**
**जें गगनाहूनि जुनें। जें परमाणूहूनि सानें। जयाचेनि सन्निधानें। विश्व चळे॥ ८७ ॥**
**जे सर्वांतें यया वियें। विश्व सर्व जेणें जिये। हेतु जया बिहे। अचिंत्य जें॥ ८८ ॥**
**देखें वोळंबा इंगळु न चरे। तेजीं तिमिर जेथ न शिरे। जें दिहाचें आंधारें। चर्मचक्षूसीं॥ ८९ ॥**
**सुसडा सूर्यकिरणांचीराशी। जो नित्य उदो ज्ञानियांसी। अस्तमानाचें जयासी। आडनांव नाहीं॥ ९० ॥**

**अर्थ**—जो आकारावांचून राहतो, ज्याला जन्ममृत्यु नाहीत, जो सर्वव्यापक असल्यामुळे सर्व जाणतो. ॥ ८६ ॥ जो आकाशाहून पुरातन आहे, जो परमाणुहूनहि सूक्ष्म आहे व ज्याच्या सान्निध्यामुळे जगाचे व्यापार होतात. ॥ ८७ ॥ ज्यापासून सर्व जग उत्पन्न होतें, ज्याच्या योगाने विश्व भासतें, किंवा ज्याच्या योगाने जगाचें अस्तित्व भासतें, जें मनाच्या कल्पनेंत येत नसून अनुमानादि तर्क ज्याला जाणू शकत नाहीत. ॥ ८८ ॥ ज्याप्रमाणे वाळवी विस्तवाला लागत नाही किंवा प्रकाशात अंधार राहू शकत नाही, त्याप्रमाणे जें चर्मचक्षूला दिवसा देखील अंधाररूप आहे—म्हणजे दिसत नाही. ॥ ८९ ॥ जें परब्रह्म, ज्ञानी पुरुषाला, स्वच्छ प्रकाशरूप सूर्यकिरणाच्या राशीरूपाने कधीं न मावळणारें व नित्य उदय पावलेलें, असें अनुभवाला येतें. ॥ ९० ॥

**गूढार्थदीपिका**—ज्ञानी पुरुषांना आपल्या आत्मरूप ज्ञानसूर्याचा अपरोक्ष साक्षात्कार हजारों चिद्वृत्तिरूप किरणांनी होतो, असें माऊलींनी अठराव्या अध्यायांत "चिद्वृत्तीच्या सहस्रकरीं" या ओवीने सांगितलें आहे.

**प्रयाणकाले मनसाचलेन भक्त्या युक्तो योगबलेन चैव । भ्रुवोर्मध्ये प्राणमावेश्य सम्यक् स तं परं पुरुषमुपैति दिव्यम्॥ १० ॥**

**अर्थ**—मरणसमयीं स्थिरचित्ताने भक्तियुक्त होऊन व योगबलाने दोन भुवयांमध्ये प्राण स्थिर करून, जो त्या परमेश्वराचें चिंतन करतो, तो त्या दिव्य परमेश्वराला प्राप्त होतो. ॥ १० ॥

**तया अव्यंगवाणेया ब्रह्मातें। प्रयाणकाले प्राप्ते। जो स्थिरावलेनि चित्तें। जाणोनि स्मरे॥ ९१ ॥**
**बाहेरी पद्मासन रचुनी। उत्तराभिमुख बैसोनि। जीवीं सुख सूनि। कर्मयोगाचें॥ ९२ ॥**
**आंतु मीनलेनि मनोधर्में। स्वरूपप्राप्तीचेनि प्रेमें। आपेंआप संभ्रमें। मिळावया॥ ९३ ॥**
**आकळलेनि योगें। मध्यमा मध्यमार्गें। अग्निस्थानौनि निगे। ब्रह्मरंध्रा॥ ९४ ॥**
**तेथ अचेत चित्ताचा सांगातु। आहाचवाणा दिसे मांडतु। तेथ प्राणु गगनाआंतु। संचरे कां॥ ९५ ॥**
**परी मनाचेनि स्थैर्यें धरिला। भक्तीचिया भावना भरला। योगबळें आवरला। सज्ज होउनी॥ ९६ ॥**
**तो जडा जडातें विरवितु। भ्रूलतामाजीं संरचतु। जैसा घंटानाद लयस्तु। घंटेसीच होय॥ ९७ ॥**
**कां झांकलिये घटींचा दिवा। नेणिजे काय जाहला केव्हां। या रीती जो पांडवा। देह ठेवी॥ ९८ ॥**

**तो केवळ परब्रह्म। जया परमपुरुष ऐसें नाम। तें माझें निजधाम। होऊनि ठाके॥ ९९॥**

**अर्थ**—मरणकाळ प्राप्त झाला असतां, परिपूर्ण अशा त्या परब्रह्माच्या ठिकाणीं स्थिर चित्ताने, जो जाणून ध्यान करतो. ॥ ९१ ॥ बाहेर पद्मासन घालून उत्तरेकडे तोंड करून आणि अंत:करणात कर्मयोगाचा-म्हणजे क्रियायोगाने परमेश्वरप्राप्ति होते हा-आनंद मानून. ॥ ९२ ॥ व सर्व व्यापार एकवटलेल्या मनोधर्माने व स्वरूपप्राप्ति व्हावी या प्रेमाने आपोआप मिळण्याच्या लगबगीने. ॥ ९३ ॥ प्राप्त करून घेतलेल्या योगाभ्यासाच्या साहाय्याने सुषुम्ना नाडीद्वारें ब्रह्मरंध्राला जाण्याकरिता आधारचक्रापासून निघतो. ॥ ९४ ॥ जेथें मग प्राणवायु आकाशांत प्रवेश करतो. तेथे जडचेतनाचा संबंध वरवरच म्हणजे कल्पनामात्र आहे, असें कळून येतें. ॥ ९५ ॥ पण तो प्राण मनाचे धैर्याने धरला असल्यामुळे, भक्तीच्या भावनेने भरला असल्यामुळे व योगबलाने आवरला जाऊन पुढे जाण्याला सज्ज असल्यामुळे. ॥ ९६ ॥ तो प्राण, जड व चेतन यांची जाणीव नाहिशी करतो व भ्रुकुटीच्या ठिकाणीं प्रवेश करून, ज्याप्रमाणे घंटेचा नाद घंटेचे ठिकाणींच लय पावतो. ॥ ९७ ॥ किंवा मडक्यात ठेंवून झांकलेला दिवा केव्हा नाहिसा झाला समजत नाही, त्याप्रमाणे न समजतां त्याचा प्राण लय पावतो व त्याचा देह सुटतो. ॥ ९८ ॥ ज्याला परमपुरुष म्हणतात व जे माझें स्वरूप होय, तें तो केवळ परब्रह्म होऊन राहतो. ॥ ९९ ॥

**यदक्षरं वेदविदो वदन्ति विशन्ति यद्यतयो वीतरागा:। यदिच्छन्तो ब्रह्मचर्यं चरन्ति तत्ते पदं सङ्ग्रहेण प्रवक्ष्ये॥ ११ ॥**

**अर्थ**—ज्याला वेदवेत्ते पुरुष अक्षर म्हणतात, वैराग्यशील यति ज्याला प्राप्त होतात व ज्याची इच्छा करीत ब्रह्मचारी पुरुष ब्रह्मचर्य पाळतात, तें पद तुला संक्षेपाने पुन: सांगतों. ॥ ११ ॥

**सकळां जाणणेयां जे लाणी। तिये जाणिवेची जे खाणी। तयां ज्ञानियांचिये आयणी। जयातें अक्षर म्हणिपे॥ १०० ॥**
**चंडवातेंही न मोडे। तें गगनचि कीं फुडें। वांचूनि जरी होईल मेहुडें। तरी उरेल कैंचें॥ १०१ ॥**

**अर्थ**—सर्व ज्ञानाचा शेवट असणाऱ्या आत्मज्ञानाची जे ब्रह्मज्ञानी खाणी आहेत, त्या ब्रह्मज्ञान्यांची बुद्धि ज्याला अक्षर म्हणते. ॥ १०० ॥ जें भयंकर झंझावातानेहि नाहिसें होत नाही, जें खरोखर आकाशच होय; जर तें आकाश नसतें व अभ्र असतें तर त्या झंझावातापुढे कसें टिकलें असतें? ॥ १०१ ॥

**तेविं जाणणेया जें आकळिलें। तें जाणवलेपणेंचि उमाणलें। मग नेणवेचि तयातें म्हणितलें। अक्षर सहजें॥ १०२ ॥**

**अर्थ**—त्याप्रमाणे ज्ञानाने जें जाणलें गेलें, तें ज्ञानाच्या आटोक्यांत आलें-म्हणजें ज्ञानकालापुरतेंच त्यांचें अस्तित्व सिद्ध झालें; म्हणून जें ज्ञानाने जाणलें जात नाही, त्याला अक्षर म्हटलें जातें. ॥ १०२ ॥

**गूढार्थदीपिका**—वेदान्तात पदार्थाच्या ज्ञातसत्ता व अज्ञातसत्ता अशा दोन सत्ता मानल्या आहेत.

पदार्थ जाणला जातो तेव्हाच त्याचें अस्तित्व असतें व जेव्हा तो जाणला जात नाही तेव्हा त्याचें अस्तित्व नसतें, असें ज्या पदार्थाविषयीं मानलें जातें, तो पदार्थ ज्ञातसत्ताक म्हटला जातो आणि पदार्थ जाणला जातो, तेव्हा त्याचें अस्तित्व असतेंच, पण तो जेव्हा जाणला जात नाही तेव्हाहि त्याचे अस्तित्व असतेच असें ज्या पदार्थाविषयीं मानलें जातें, तो पदार्थ 'अज्ञातसत्ताक' म्हटला जातो.

ज्ञातसत्तेचा पदार्थ 'काल्पनिक' असतो व अज्ञातसत्तेचा पदार्थ 'अकल्पित' असतो.

वेदान्तांने सर्व कार्यरूप सृष्टीची ज्ञातसत्ता मानली असून त्या अधिष्ठानरूप ब्रह्मचैतन्याची अज्ञातसत्ता मानली आहे. जाणलें जाणारें संपूर्ण जगत् ज्ञातसत्ताक असून, अज्ञात असलेलें परब्रह्म अक्षर म्हणजे सदा सर्वदा राहणारें अविनाशी असें अज्ञातसत्ताक आहे, हेंच श्रीज्ञानेश्वर माऊलींनी या ओवींत दाखविलें आहे.

**म्हणोनि वेदविद नर। म्हणती जयातें अक्षर। जें प्रकृतीसी पर। परमात्मरूप॥ १०३ ॥**
**आणि विषयांचे विष उलंडूनि। जे सर्वेंद्रियां प्रायश्चित्त देऊनि। आहाति देहाचिया बैसोनि। झाडातळीं॥ १०४ ॥**
**ते यापरी विरक्त। जयाची निरंतर वाट पाहात। निष्कामासि अभिप्रेत। सर्वदा जें॥ १०५ ॥**
**जयाचिया आवडी। न गणिती ब्रह्मचर्याचीं सांकडीं। निष्ठुर होऊनि बापुडीं। इंद्रियें करिती॥ १०६ ॥**
**ऐसें जें पद। दुर्लभ आणि अगाध। जयाचिये थडियेचि वेद। चुबुकळिले ठेले॥ १०७॥**

**तें ते पुरुष होती। जे यापरी लया जाती। तरी पार्था हेचि स्थिती। एक वेळ सांगों॥ १०८॥**
**तेथ अर्जुनें म्हणितलें स्वामी। हेंचि म्हणावया होतों पां मी। तंव सहजें कृपां केली तुम्हीं। तरी बोलिजो कां जी॥ १०९॥**
**परि बोलावें तें अति सोहोपें। तेथें म्हणितलें त्रिभुवनदीपें। तुज काय नेणों संक्षेपें। सांगेन ऐक॥ ११०॥**

**अर्थ**—म्हणून वेदवेत्ते पुरुष ज्याला अक्षर म्हणतात, जें प्रकृतीच्या पलीकडे असून परमात्मस्वरूप आहे. ॥ १०३ ॥ आणि विषयाचें विष (विषय हे विषासारखे मारक म्हणजे आत्मघात करणारे आहेत, म्हणून विषयाला विष म्हटलें आहे) फेंकून देऊन व सर्व इंद्रियांना प्रायश्चित्त देऊन—म्हणजे सर्व इंद्रियांचे विषयभोग तोडून, केवळ देहरूपी झाडाखाली बसून राहतात—म्हणजे प्रारब्धभोगापुरता देहाचा संबंध वागवितात ॥ १०४ ॥ असे जे विरक्त झाले ते ज्या वस्तूच्या प्राप्तीची सारखी इच्छा करीत राहतात आणि निष्काम पुरुषांना जें नेहमीं प्रिय असतें. ॥ १०५ ॥ ज्याच्या प्राप्तीच्या आवडीने ब्रह्मचारी पुरुष ब्रह्मचर्याश्रमांतील खडतर व्रताचे कष्ट जुमानीत नाहीत आणि इंद्रियांविषयीं कठोर होऊन त्यांना (इंद्रियांना) दीन करून आपल्या स्वाधीन ठेवतात. ॥ १०६ ॥ अर्जुना! ज्याच्या कांठावरच वेद बुडून गेलेत, असें जें दुर्लभ व अत्यंत थोर पद आहे. ॥ १०७ ॥ वर सांगितल्याप्रमाणे ज्यांनी आपल्या प्राणाचा परब्रह्मांत लय केला, ते या पदाशीं ऐक्य पावतात. तरी पण अर्जुना! हीच स्थिति तुला पुन: एक वेळ सांगतों. ॥ १०८ ॥ तेव्हा अर्जुन म्हणतो, देवा! ही स्थिति पुन: एक वेळ सांगा, असें मीच म्हणणार होतो, पण आपणच, देवा! कृपा केली तर ते पुन: एक वेळ सांगाच. ॥ १०९ ॥ पण, देवा! अति सोपें करून सांगा. तेव्हा त्रैलोक्याचे प्रकाशक भगवान, म्हणतात, अर्जुना! तुझा अधिकार मी ओळखत नाही काय? मी संक्षेपानेच सांगतों, ऐक. ॥ ११० ॥

**सर्वद्वाराणि संयम्य मनो हृदि निरुध्य च। मूर्ध्न्याधायात्मनः प्राणमास्थितो योगधारणाम्॥ १२॥**

**अर्थ**—सर्व इंद्रियांचा निग्रह करून, मनाचा हृदयकमलाच्या ठिकाणीं निरोध करून, मग आपला प्राण सुषुम्ना नाडीच्या द्वारा मूर्ध्नस्थानीं स्थापन करून, योगधारणा करण्यास प्रवृत्त झालेला योगी. ॥ १२ ॥

**तरी मना या बाहेरिलीकडे। यावयाची साविया सवें मोडे। हें हृदयाचिया डोहीं बुडे। तैसें कीजे॥ १११॥**
**परि हें तरीच घडे। जरी संयमाचीं अखंडे। सर्वद्वारीं कवाडें। कळासती॥ ११२॥**
**तरी सहजें मन कोंडलें। हृदयींचि असेल उगलें। जैसें करचरणीं मोडलें। परिवरु न संडी॥ ११३॥**
**तैसें चित्त राहिल्या पांडवा। प्राणांचा प्रणवुचि करावा। मग अनुवृत्तिपंथें आणावा। मूर्ध्निवरी॥ ११४॥**

**अर्थ**—तरी मनाची बाहेर विषयांकडे धांवण्याची संवय सर्वथा नाहिशी होईल व तें हृदयाच्या डोहांतच बुडून जाईल, असें केलें पाहिजे. ॥ १११ ॥ पण जर सर्व इंद्रियांच्या द्वाराला निग्रहाची अखंड मजबूत कवाडें लावलीं राहतील, तरच हें घडणें शक्य आहे. ॥ ११२ ॥ तर, ज्याप्रमाणे हातपाय मोडलेला मनुष्य आपल्या कुटुंबाच्या माणसाला सोडून जात नाही त्याप्रमाणे आंत कोंडलें गेलेलें मन, सहजच हृदयाचे ठिकाणीं अगदी स्वस्थ राहतें. ॥ ११३ ॥ अर्जुना! असें चित्त स्थिर झालें असतां, प्राणाचा प्रणव करावा-म्हणजे प्राणांतील 'हंस:' असा जो अज्ञातजप होतो, त्याच्याशीं ॐकार या ज्ञातजपाचा समन्वय करावा व पुढे त्या समन्वित जपाला, आधारचक्राच्या क्रमाने, ब्रह्मरंध्रापर्यंत आणावें. ॥ ११४ ॥

**तेथ आकाशीं मिळे न मिळे। तैसा धरावा धारणाबळें। जंव मात्रात्रय मावळे। अर्धबिंबीं॥ ११५॥**
**तंववरी तो समीरु। निराळीं कीजे स्थिरु। मग लग्नीं जेवीं ॐकारु। बिंबींचि विलसे॥ ११६॥**

**अर्थ**—मग अ, उ, म् या प्रणवाच्या मात्रा अर्धबिंबांत मिळेतोंपर्यंत धारणेच्या बळाने आकाशांत मिळतो न मिळतो असा प्रणव धरून ठेवावा. ॥११५ ॥ तो प्राण आकाशांत स्थिर करावा व मग ऐक्य झाल्यावर, तो ब्रह्मस्वरूपाचे ठिकाणींच भासतो. ॥ ११६ ॥

**ओमित्येकाक्षरं ब्रह्म व्याहरन्मामनुस्मरन्। यः प्रयाति त्यजन्देहं स याति परमां गतिम्॥ १३॥**

**अर्थ**—ॐ ह्या एकाक्षरी ब्रह्माचा उच्चार करून, त्याचा वाच्य जो मी, त्या माझें नंतर स्मरण करून, जो देह सोडतो, तो परम गतीला प्राप्त होतो. ॥१३ ॥

**तैसें ॐ हें स्मरों सरे। आणि तेथेंचि प्राणु पुरे। मग प्रणवांतीं उरे। पूर्णघन जें॥ ११७॥**
**म्हणोनि प्रणवैकनाम। हें एकाक्षर ब्रह्म। जो माझें स्वरूप परम। स्मरतसाता॥ ११८॥**

**अर्थ**—तसें झालें म्हणजे प्रणव अनुच्चार्य होतो व तेथेच प्राणहि लीन होतो. मग प्रणववाच्य, प्रणवातीत. असें जें पूर्ण ब्रह्म तें, तो योगी होऊन राहतो. ॥ ११७ ॥ म्हणून प्रणव म्हणजे ॐ हें एक नाव एकाक्षर ब्रह्मच आहे. जो कोणी माझ्या परम स्वरूपाचें स्मरण करीत. ॥ ११८ ॥

**गूढार्थदीपिका**—येथे ॐ हें एकाक्षरी ब्रह्मच आहे, असें सांगितलें आहे, असें कित्येक समजतात, पण तो समज चुकीचा आहे, कारण ब्रह्म एकच असून ते उत्पत्तिनाशरहित आहे आणि ॐकाराची उत्पत्ति सांगितली आहे, म्हणून ॐ हे प्रत्यक्ष ब्रह्म होऊं शकत नाही. येथे ॐ ह्या एकाक्षराच्या ठिकाणीं ''इति'' या शब्दाने परब्रह्माची भावना करण्यास सांगितली आहे आणि ''ब्रह्मदृष्टिरुत्कर्षात्'' (ब्र. सू. ४-१-५) या वेदान्तसूत्रावर भाष्य करितांना ''ब्रह्मेत्यादेश:'' ''ब्रह्मेत्युपासीत्'' इत्यादि श्रुतींतील ''इति'' शब्दाचा अर्थ ''ब्रह्माची भावना करावी'', असा केला आहे. तोच अर्थ येथेहि घेतला पाहिजे. ॐकार हा कार्यरूप व कारणरूप अशा दोन्ही प्रकारच्या ब्रह्माचें आलंबन होतें व त्याची ब्रह्मभावनेने उपासना केली जाते, असें कठोपनिषदांत (२-१६) भगवान आचार्यांनी सांगितले आहे.

**यापरी त्यजी देहातें। तो त्रिशुद्धी पावे मातें। जया पावणया परौतें। आणिक पावणें नाहीं॥ ११९॥**

**अर्थ**—वर सांगितल्याप्रमाणे देह सोडतो, तो मला पावतो, हें त्रिवार सत्य आहे. या प्राप्तीपेक्षा दुसरी श्रेष्ठ प्राप्ति नाही. ॥ ११९ ॥

**अनन्यचेता: सततं यो मां स्मरति नित्यश:। तस्याहं सुलभ: पार्थ नित्ययुक्तस्य योगिन:॥ १४॥**

**अर्थ**—एक माझेच ठिकाणीं सतत चित्त ठेवून, माझें अखंड स्मरण जो करतो, त्या माझ्याशीं नित्य ऐक्य पावलेल्या योग्याला, अर्जुना! मी अत्यंत सुलभ प्राप्त होतो. ॥ १४ ॥

**येथ अर्जुना जरी विपायें। तुझ्या जीवीं हन ऐसें जाये। ना हें स्मरण मग होये। कायसयावरी अंतीं॥ १२०॥**
**इंद्रियां अनुघडु पडलिया। जीविताचें सुख बुडालिया। आंतुबाहेरी उघडलिया। मृत्युचिन्हें॥ १२१॥**
**ते वेळीं बैसावेंचि कवणें। मग कवण निरोधी करणें। तेथ काह्याचेनि अंत:करणें। प्रणव स्मरावा॥ १२२॥**
**तरि अगा ऐशिया ध्वनी। झणें थारा देशी हो मनीं। पैं नित्य सेविला मी निदानीं। सेवकु होय॥ १२३॥**

**अर्थ**—हें ऐकून, अर्जुना! जर कदाचित् तुझ्या मनांत असें येईल की अंतकाळी हें तुझें स्मरण कसें होणें शक्य आहे?॥ १२० ॥ इंद्रियांचे व्यापार बंद पडले व जीवंतपणाचें सुख नाहिसें झालें आणि आंतबाहेर मरणाचीं लक्षणें दिसूं लागलीं. ॥ १२१ ॥ तेव्हा कोणी बसायचें? कोण इंद्रियांचा निरोध करील? व कोणत्या अंत:करणाने प्रणवाचें चिंतन करायचें?॥ १२२ ॥ अर्जुना! कदाचित् अशा संशयाला तूं अंत:करणांत अवसर देशील, पण हें एक लक्षांत ठेव की, माझें नित्य सेवन करणारा जो आहे, त्याचा मी मरणसमयी सेवक होतो. ॥ १२३ ॥

**गूढार्थदीपिका**—सगुण भगवंताची भक्ति न करतां, नुसता योगाचा अभ्यास करणाऱ्या योग्यांना योग साधणें व मरणाचे वेळीं योगाभ्यास करून प्रणवोच्चारपूर्वक देहत्याग करणें, अत्यंत कठीण आहे. पण सगुणाची भक्ति करणाऱ्या योग्यांना मात्र तें सर्व भगवत्कृपेने सहज साधतें. कारण प्रेमळ भक्त ज्या नि:सीम प्रेमानें आपल्या भगवंताची स्मरणादिद्वारा निष्काम सेवा करतो, त्या प्रेमाच्या मोबदल्याचीं तो भक्त कधीं चुकून देखील इच्छा करीत नाही. म्हणूनच भगवानहि आपलें भगवंतपण विसरून त्याच्या सेवेची संधि पाहत असतात. मरणसमयीं भगवान भक्ताचीं इंद्रियें, अंत:करण, इत्यादिकांना, इतर जीवांप्रमाणे वैकल्य प्राप्त होऊं देत नाही व देह सोडण्याच्या क्षणापर्यंत भक्ताला आपली स्मृति ठेवतो. भगवान आपल्या प्रेमळ भक्तांच्या अंतकाळीं त्यांचा सेवक कसा होतो, हेंच पुढे माउली सांगत आहे.

**जे विषयांसि तिळांजळी देऊनि। प्रवृत्तीवरी निगड वाऊनि। मातें हृदयीं सूनि। भोगिताती॥ १२४॥**
**परि भोगितया नाराणुका। भेटणें नाहीं क्षुधादिकां। तेथ चक्षुरादि रंका। कवण पाडु॥ १२५॥**

**ऐसे निरंतर एकवटले। जे अंत:करणीं मजशीं लिगटले। मीचि होऊनि आटले। उपासिती॥ १२६ ॥**
**तयां देहावसान जैं पावे। तैं तिहीं मातें स्मरावें। मग म्यां जरी पावावें। तरि उपास्ति ते कायसी॥ १२७॥**
**पैं रंकु एक आडलेपणें। काकुळती अंतीं धांवा गा धांवा म्हणे। तरि तयाचिये ग्लानी धांवणें। काय न घडे मज॥ १२८ ॥**
**आणि भक्तांही तेचि दशा। तरी भक्तीचा सोसु कायसा। म्हणऊनि हा ध्वनि ऐसा। न वाखाणावा॥ १२९॥**
**तिहीं जे वेळीं मी स्मरावा। ते वेळीं स्मरला कीं पावावा। तो आभारुही जीवा। साहवेचि ना॥ १३०॥**
**तें ऋणवैपण देखोनि आंगीं। मी आपुलियाचि उत्तीर्णत्वालागीं। भक्तांचियां तनुत्यागीं। परिचर्या करीं॥ १३१॥**
**देहवैकल्याचा वारा। झणें लागेल या सुकुमारा। म्हणोनि आत्मबोधाचां पांजिरां। सूयें तयातें॥ १३२॥**
**वरि आपुलिया स्मरणाची उवाइली। हींव ऐसी करीं साउली। ऐसेनि नित्यबुद्धी संचली। मी आणीं तयातें॥ १३३॥**

**अर्थ**—ज्यांनी विषयसुखावर पाणी सोडले, विषयसुखाच्या होणाऱ्या प्रयत्नात बेडी घातली व हृदयामध्ये मला एकट्यालाच सांठवून जे माझें सुख भोगतात. ॥ १२४॥ पण माझें सुख भोगतांना, ज्यांना कधी तृप्तीच होत नाही व त्या सुखांतून ते निघत नाहीत, म्हणून त्यांना क्षुधातृषेची आठवण होत नाही, तेथे भिकारड्या चक्षुरादि इंद्रियांवर येण्याचीं गोष्ट दूर राहिली. ॥ १२५ ॥ जे अखंड मत्परायण झाले, अंत:करणांत माझ्या ठिकाणीं जडले व ज्यांनी आपला निराळेपणा नि:शेष नाहीसा केला, अशा रीतींने पूर्ण मद्रूप होऊन जे माझी भक्ति करतात. ॥ १२६ ॥ त्यांना मरणकाळ प्राप्त झाला असतां, त्यांनी माझें स्मरण करावें, आणि तेव्हा जर मी धांवून यावें तर मग त्यांच्या भक्तीची किंमत काय?॥ १२७॥ एखादा भिकारी संकटांत सापडला व त्याने जर 'भगवंता धांव' म्हणून अत्यंत कळवळून धांवा केला, तर त्याची दीन वाणी ऐकून, मी धांवून जात नाही काय?॥ १२८ ॥ आणि प्रेमळ भक्तहि जेव्हा माझा धांवा करतील तेव्हाच मी जर धांवून जाऊं लागलों, तर मग माझ्या भक्तीच्या हव्यासाला काय किंमत? म्हणून अशा शंकेला तूं आपल्या चित्तांत थारा देऊं नकोस. ॥ १२९ ॥ भक्तांनी माझा जेंव्हा धांवा करावा, तेव्हा मीं धांवून जावें, हें धावा करण्याचें ओझें देखील मला सहन होत नाही. ॥ १३० ॥ भक्ताच्या निष्काम प्रेमभक्तीचें माझ्यावर जें ऋण होते, तें थोडे तरी फेडावें, म्हणून प्रेमळ भक्ताच्या मरणाचे वेळीं मी स्वत: आपण होऊनच त्याची सेवा करतो. ॥ १३१ ॥ देह सोडतेवेळीं जीवाला जी विकलता उत्पन्न होत असते तिचा माझ्या सुकुमार प्रेमळ भक्ताला कदाचित् स्पर्श होईल, म्हणून मी त्याला अगोदरच, आत्मज्ञानाच्या पिंजऱ्यांत घालून ठेवतों. ॥ १३२ ॥ आणखी वर आपल्या सगुण स्वरूपाच्या स्मरणाची थंडगार सावली करतों. अशारीतीने मी त्याला नित्य संचली बुद्धि प्राप्त करून देतों. ॥ १३३ ॥

**गूढार्थदीपिका**—देहामुळे प्राप्त झालेल्या मरणाचे भीतीने मरणसमयीं जीव अत्यंत व्याकुळ होतो. हें मरणाचें भय मी देहरूप नसून अविनाशी सच्चिदानंदस्वरूप आहे, असें दृढ आत्मज्ञान झालें असतां नाहिसें होतें. भगवान आपल्या प्रेमळ भक्ताला, या आत्मज्ञानाची बुद्धि मरणापूर्वीच देऊन व मरणकालींहि ती कायम ठेवून मरणाची भीति नाहिशी करतो आणि आणखी आपल्या सगुण स्वरूपाच्या अखंड स्मरणाने, आपल्या सगुण स्वरूपाचें ध्यान दृढ करून देहादिकांचा विसर पाडतों.

**म्हणोनि देहांतींचें सांकडें। माझिया कहींचि न पडे। मी आपुलियातें आपुलीकडे। सुखेंचि आणी॥ १३४॥**
**वरचील देहाची गंवसणी फेडुनी। आहाच अहंकाराचे रज झाडुनी। शुद्ध वासना निवडुनी। आपणपां मेळवी॥ १३५ ॥**
**आणि भक्तां तरी देहीं। विशेष एकवंकीचा ठाव नाहीं। म्हणऊनि अव्हेरु करितां कांहीं। वियोगु ऐसा न वाटे॥ १३६ ॥**
**नातरी देहांतींचि मियां यावें। मग आपणयातें न्यावें। हेंही नाहीं स्वभावें। जे आधींचि मज मीनले॥ १३७॥**
**येरी शरीराचिया सलिलीं। असतेपण हेचि साउली। वांचूनि चंद्रिका ते ठेली। चंद्रींच आहे॥ १३८॥**
**ऐसे जे नित्ययुक्त। तयांसि सुलभ मी सतत। म्हणऊनि देहांतीं निश्चित। मीचि होती॥ १३९॥**

**अर्थ**—म्हणून मरणाच्या वेळेचें संकट माझ्या भक्ताला कधींच पडत नाही. मी आपल्या भक्ताला आपल्याकडे सुखाने सहज आणतों. ॥ १३४॥ वरची देहाची खोळ बाजूला सारून, व्यर्थच दिसणारी अहंकाराची धूळ झाडून

टाकून, त्याची वासना शुद्ध करून, आपल्यांत त्याला मिळवितों. ॥ १३५ ॥ आणि माझा भक्त तरी आपल्या देहाशीं 'मी देह आहे' असें तादात्म्य किंवा ऐक्य वागवीत नाही; म्हणून देह सोडतांना त्याला देहाच्या वियोगाचें दु:ख होत नाही. ॥ १३६ ॥ किंवा भक्ताच्या मरणाचे वेळींच मीं यावें व मग मी भक्ताला आपल्यांत मिळवावें, असेंहि कांही नाही, कारण तो मरणाचे अगोदरच, ज्ञानभक्तीच्या योगाने, माझ्याशीं सहजच मिळालेला असतो. ॥ १३७ ॥ बाकी पाण्यांत चंद्राचा प्रकाश पडलेला दिसत असला, तरी तो पाण्यांत नसून, जसा चंद्राचे ठिकाणींच असतो, त्याप्रमाणे जीवचैतन्य, शरीररूपी पाण्यांत जरी दिसत असलें, तरी त्याचें देहाचे ठिकाणीं असणें, ही नुसती सावलीच असते. (वास्तविक जीवचेतन परमेश्वर चेतनाचे ठिकाणींच असतो. जीवचेतन व परमेश्वर चेतन यांचा कधीं वियोग नाही) ॥ १३८ ॥ असें ज्ञानभक्तीने माझ्याशीं अखंड एकरूप झालेले जे आहेत त्यांना मी सदासर्वदा सुलभ प्राप्त आहे. म्हणून मरणाचे वेळीं निश्चितपणें ते मलाच प्राप्त होतात. ॥ १३९ ॥

**मामुपेत्य पुनर्जन्म दु:खालयमशाश्वतम्। नाप्नुवन्ति महात्मानः संसिद्धिं परमां गताः ॥ १५ ॥**

**अर्थ**—मला प्राप्त झालेले व परमगतीला गेलेले महात्मे, सर्व अध्यात्मिकादि त्रिविध दुखांचें माहेरघर असलेल्या, व विनाशी अशा क्षणभंगुर पुनर्जन्माला प्राप्त होत नाहीत. ॥ १५ ॥

**मग क्लेशतरूची वाडी। जे तापत्रयाग्नीची सगडी। जे मृत्युकाकासि कुरोंडी। सांडिली आहे ॥ १४० ॥**
**जें दैन्याचें दुभतें। जें महाभयातें वाढवितें। जें सकळ दु:खाचें पुरतें। भांडवल ॥ १४१ ॥**
**जें दुर्मतीचें मूळ। जें कुकर्माचें फळ। जें व्यामोहाचें केवळ। स्वरूपचि ॥ १४२ ॥**
**जें संसाराचें बैसणें। जें विकाराचें उद्यानें। जें सकळ रोगांचें भाणें। वाढिलें आहे ॥ १४३ ॥**
**जें काळाचा खिच उशिटा। जें आशेचा आंगवठा। जन्ममरणाचा वोलिंवटा। स्वभावें जें ॥ १४४ ॥**
**जें भुलीचें भरिव। जें विकल्पाचें वोतिंव। किंबहुना पेंव। विंचुवांचें ॥ १४५ ॥**
**जें व्याघ्राचें क्षेत्र। जें पण्यांगनेचें मैत्र। जें विषयविज्ञानयंत्र। सुपूजित ॥ १४६ ॥**
**जें लावेचा कळवळा। निवालिया विषोदकाचा गळाळा। जें विश्वासु आंगवळा। संवचोराचा ॥ १४७ ॥**
**जें कोढियाचें खेव। जें काळसर्पाचें मार्दव। गोरीयेचे स्वभाव। गायन जें ॥ १४८ ॥**
**जें वैरियाचा पाहुणेरु। जें दुर्जनाचा आदरु। हें असो जें सागरु। अनर्थांचा ॥ १४९ ॥**
**जें स्वप्नीं देखिलें स्वप्न। जें मृगजळें सासिन्नलें वन। जें धूम्ररजांचें गगन। ओतलें आहे ॥ १५० ॥**

**अर्थ**—मग कष्टरूपी वृक्षांची बाग, जे तिन्ही प्रकारच्या दु:खाची शेगडी. जें मृत्युरूपी कावळ्याला उतरून टाकलेला बळी आहे. ॥ १४० ॥ जें अखंड दैन्याला उत्पन्न करतें, जें महाभयाला म्हणजे मृत्यूच्या भयाला वाढविणारें आहे, जें उत्पन्न होणाऱ्या सर्व दु:खाचें पूर्ण भांडवल आहे. ॥ १४१ ॥ जें दुर्बुद्धीचे उगमस्थान होय. जें पापकर्माचें फळ होय, जें अविवेकाचें केवळ स्वरूपच होय. ॥ १४२ ॥ जें संसाराचें वसतिस्थान होय, जें कामक्रोधादि विकारांचें विहारस्थान होय व जें रोगांचें वाढलेलें ताट होय. ॥ १४३ ॥ जें काळाची उष्टी खिचडी आहे, जे आशेचें घर होय आणि स्वभावत:च जें जन्ममरणाची वाहती वाट आहे. ॥ १४४ ॥ ज्यांत भ्रमच भरला आहे, जें विपरीत समजुतीचें ओतलेलें आहे, किंबहुना जे विंचवांचें पेवच आहे. ॥ १४५ ॥ जें व्याघ्राचें वसतिस्थान आहे, जें वेश्यांचा मित्र आहे. (वेश्येप्रमाणे मोह उत्पन्न करणारें आहे) जें विषयांचा अनुभव देणारें चांगलें पूजलेलें यंत्र होय. ॥ १४६ ॥ जें जखिणीची मारक ममता होय, जें निवलेल्या विषमिश्रित पाण्याचा घोट होय, वरून सावासारख्या दिसणाऱ्या ठकाप्रमाणे विश्वास उत्पन्न करून बनलेला सांगातीं आहे. ॥ १४७ ॥ (मेद, मांस, रक्त यांनी भरलें असल्यामुळे) जे कुष्टी माणसाचें आलिंगन होय, जे काळरूपी सर्पाचा नरमपणा होय, जे चित्तास मोहून घेणारे पारध्याचें स्वाभाविक गायन होय. ॥ १४८ ॥ जें शत्रूला पाहुणचार होय, जें दुर्जनांचा सत्कार होय अर्जुना! हे वर्णन असो, जें सर्व अनर्थांचा समुद्र होय. ॥ १४९ ॥ जें स्वप्नामध्ये स्वप्न पाहणें होय, जें मृगजळाने टवटवीत दिसणारें अरण्य होय, जे धुराच्या कणांचें ओतीव आकाश आहे. ॥ १५० ॥

**गूढार्थदीपिका**—जीवाचें मूळ आत्मस्वरूप अखंड सुखरूप आहे, तेथे दु:खाचा लेश नाही. किंवा सर्व दु:खांची निवृत्ति आहे, अशा जीवाला सर्व दु:खांची प्राप्ति देहासक्तीमुळेच आहे. या देहासक्तीमुळे आत्मस्वरूपाचा विसर पडतो. मृत्यूची भीति वाटते, विषयसुखाकरितां दीन होतो. स्वैर वर्तनाची दुर्बुद्धि या देहासक्तीनेच वाढून बुद्धि अत्यंत अविवेकी होते. अशारीतीने पांचभौतिक शरीराची प्राप्ति, ही मुळांत सुखस्वरूप असलेल्या आत्म्याला स्वप्नाप्रमाणे "सुख पाहतां जवापाडें। दु:ख पर्वता एवढें" सर्वस्वी निरर्थक, कल्पित व दु:खांत लोटणारी आहे. अशा शरीराची प्राप्ति कधी न होण्याकरिता, सगुण परमेश्वराच्या भजनाने सगुण परमेश्वरस्वरूपच झालें पाहिजे, असा या वरील सर्व ओव्यांचा आशय आहे.

**ऐसें जें हें शरीर। तें ते न पवतीचि पुढती नर। जे होऊनि ठेले अपार। स्वरूप माझें॥ १५१॥**

**अर्थ**—असें जें वर वर्णिलेलें शरीर आहे, तें माझ्या अमर्याद स्वरूपाशीं जे ऐक्य पावलें, त्यांना पुन: प्राप्त होत नाही.॥ १५१॥

**आब्रह्मभुवनाल्लोका: पुनरावर्तिनोऽर्जुन। मामुपेत्य तु कौन्तेय पुनर्जन्म न विद्यते॥ १६॥**

**अर्थ**—ब्रह्मलोकापर्यंत किंवा सत्यलोकापर्यंत जितके लोक आहेत, त्या सर्व लोकांतून पुन: पुन: जन्म घ्यावा लागतो; परंतु कुंतिपुत्रा अर्जुना! मला प्राप्त झाल्यानंतर पुनर्जन्म प्राप्त होत नाही.॥ १६॥

**एऱ्हवीं ब्रह्मपणाचिये भडसे। चुकतीचि पुनरावृत्तीचे वळसे। परि निवटलियाचें जैसें। पोट न दुखे॥ १५२॥**

**अर्थ**—एऱ्हवीं, अर्जुना! ब्रह्मलोकासारख्या थोर लोकांची प्राप्ति झाली, तरी पुनर्जन्माचे फेरे चुकत नाहीत; पण मेलेल्या माणसाचें पोट दुखणें जसें बंद पडतें.॥ १५२॥

**गूढार्थदीपिका**—येथे ब्रह्मलोकापर्यंत पुनरावृत्ति आहे, असें जें सांगितलें आहे, तें सकाम उपासकाविषयी सांगितलें आहे, असे समजावयाचें, कारण निष्काम चित्ताने अक्षि पुरुषासारख्या कार्यब्रह्माची उपासना करून अर्चिरादि मार्गाने ब्रह्मलोकाला गेलेले उपासक, पुन: जन्माला येत नाहीत, असा ब्रह्मसूत्रांत सिद्धान्त केला आहे. (ब्र. सू. ४-४-२२). ते प्रलयकाल प्राप्त झाला असतां, ब्रह्मज्ञानाने संपन्न होऊन, ब्रह्मदेवाबरोबर मुक्त होतात, असा वेदान्तसिद्धान्त आहे (४-३-१०). हें मागें सांगितलेंच आहे.

**नातरी चेइलियानंतरें। न बुडिजे स्वप्नींचेनि महापूरें। तेवीं मातें पावले ते संसारें। लिंपतीचि ना॥ १५३॥**
**एऱ्हवीं जगदाकाराचें सिरें। जें चिरस्थायीयांचे धुरे। ब्रह्मभुवन गा चवरें। लोकाचळाचें॥ १५४॥**
**जिये गांवींचा पहारु दिवोवेरी। एका अमरेंद्राचें आयुष्य न धरी। विळोनि पातीं उठी एकीसरीं। चवदाजणांचीं॥ १५५॥**

**अर्थ**—किंवा जागे झाल्यावर स्वप्नातील महापुरांत मनुष्य बुडत नाही, त्याप्रमाणे जे मला प्राप्त झाले, ते मग संसाराने लिप्त होत नाहीत.॥ १५३॥ एऱ्हवीं सर्व ब्रह्मांडाचा शिरोभाग व बहुत काळपर्यंत नाश न पावणारे जे लोक आहेत, त्या लोकामध्यें अग्रस्थान असलेला व त्रैलोक्यरूप पर्वताचें शिखर, असा जो ब्रह्मलोक.॥ १५४॥ ज्या ब्रह्मलोकांतील दिवसाच्या प्रहरभर देखील एका एका देवाधिपति इंद्राचें आयुष्य नसतें; तर एका दिवसांत एकामागून एक चौदा इंद्र होऊन जातात.॥ १५५॥

**सहस्रयुगपर्यन्तमहर्यद्ब्रह्मणो विदु:। रात्रिं युगसहस्रान्तां तेऽहोरात्रविदो जना:॥ १७॥**

**अर्थ**—रात्र व दिवस जाणणारे पुरुष, ब्रह्मदेवाचा दिवस एक हजार युगच असून, एक हजार युगच त्याची रात्रहि आहे, असें जाणतात.॥ १७॥

**जैं चौकडिया सहस्र जाये। तैं ठायेठावो विळुचि होये। आणि तैसेंचि सहस्रें वरियें पाहें। रात्री जेथ॥ १५६॥**
**येवढें अहोरात्र जेथिंचें। तेणें न लोटती जे भाग्याचे। देखती ते स्वर्गींचे। चिरंजीव॥ १५७॥**
**येरां सुरगणांची नवाई। विशेष सांगावी येथ काई। मुदला इंद्राचीचि दशा पाहीं। जे दिहाचे चौदा॥ १५८॥**
**परि ब्रह्मयाचियाहि आठां प्रहरांतें। आपुलियां डोळां देखते। जे आहाति गा तयांतें। अहोरात्रविद म्हणिपे॥ १५९॥**

**अर्थ**—कृत, त्रेत, द्वापार, कली या चार युगाची एक चौकडी होते. अशा हजार चौकड्या झाल्या असतां,

वास्तविक ब्रह्मदेवाचा दिवस होतो. तशाचप्रमाणे हजार चौकड्यांची ब्रह्मदेवाची रात्र होते. ॥ १५६ ॥ एवढे मोठे दिवस व रात्र जेथे आहेत, त्या दिवसरात्रींत न मरतां, जें भाग्याचे पुरुष ब्रह्मदेवाचा दिवसरात्र पाहतात, ते स्वर्गातील चिरंजीव होत. ॥ १५७ ॥ बाकीच्या देवांचें विशेष नवल काय सांगायचें! त्यांत मुख्य जो इंद्र त्याचीच दशा अशी आहे की ब्रह्मदेवाचे दिवसांत ते चौदा होतात. ॥ १५८ ॥ पण ब्रह्मदेवाच्या आठहि प्रहराला—म्हणजे पूर्ण दिवसरात्रीला-आपल्या डोळ्यांनी जे पाहणारे आहेत, त्यांना अहोरात्र जाणणारें असे म्हणतात. ॥ १५९ ॥

**अव्यक्ताद्व्यक्तय: सर्वा: प्रभवन्त्यहरागमे। रात्र्यागमे प्रलीयन्ते तत्रैवाव्यक्तसञ्ज्ञके ॥ १८ ॥**

**अर्थ**—ब्रह्मदेवाचा दिवस उगवला असतां, ब्रह्मदेवाच्या सुषुप्ति अवस्थेंत लीन असलेली सर्व व्यक्त सृष्टि प्रगट होते व ब्रह्मदेवाची रात्र झाली म्हणजे पुन: त्याच अव्यक्तरूप सुषुप्तावस्थेंत सर्व सृष्टि लीन होते. ॥ १८ ॥

**तिये ब्रह्मभुवनीं दिवसें पाहे। ते वेळीं गणना केंहीं न समाये। ऐसें अव्यक्ताचें होये। व्यक्त विश्व ॥ १६० ॥**
**पुढती दिहाची चौपाहारी फिटे। आणि हा आकारसमुद्र आटे। पाठीं तैसाचि मग पाहांटे। भरों लागे ॥ १६१ ॥**
**शारदीयेचिये प्रवेशीं। अभ्रें जिरती आकाशीं। मग ग्रीष्मांतीं जैशीं। निगती पुढती ॥ १६२ ॥**
**तैशी ब्रह्मदिनाचिये आदी। हे भूतसृष्टीची मांदी। मिळे जंव सहस्त्रावधी। निमित्त पुरे ॥ १६३ ॥**
**पाठीं रात्रीचा अवसरु होये। आणि विश्व अव्यक्तीं ल्या जाये। तोही युगसहस्त्र मोटका पाहे। आणि तैसेंचि रचे ॥ १६४ ॥**
**हें सांगावया काय उपपत्ती। जे जगाचा प्रळयो आणि संभूती। इये ब्रह्मभुवनींचिया होती। अहोरात्रामार्जी ॥ १६५ ॥**
**कैसें थोरिवेचें मान पाहें पां। तो सृष्टिबीजाचा साटोपा। परि पुनरावृत्तीचिया मापा। शीग जाहला ॥ १६६ ॥**

**अर्थ**—त्या ब्रह्मलोकांत जेव्हा दिवस उगवतो, तेव्हा ब्रह्मदेवाच्या सुषुप्तींत अव्यक्त असलेलें विश्व, संख्या करवत नाही असें, असंख्य व्यक्त होतें. ॥ १६० ॥ पुढे पुन: दिवसाचे चार प्रहर लोटले की हा सृष्टींचा व्यक्त आकारसमुद्र नाहिसा होतो. नंतर पुन: पहाट झाली की पुन: तसाच पूर्वीप्रमाणे तो आकारसमुद्र भरूं लागतो. ॥ १६१ ॥ शरद्‌ऋतूचा प्रवेश झाल्याबरोबर, ज्याप्रमाणें अभ्रें आकाशांत जिरतात व मग ग्रीष्मऋतु संपला की पुन: अभ्रें उत्पन्न होतात. ॥ १६२ ॥ त्याप्रमाणे ब्रह्मदेवांचे दिवसाचे आरंभ हा भूतसृष्टीचा पसारा, हजार चौकड्यांचा काल हें निमित्त पूर्ण होईपर्यंत दिसूं लागतो. ॥ १६३ ॥ नंतर ब्रह्मदेवाच्या रात्रीचा समय आला, की सर्व सृष्टि अव्यक्तांत लीन होते, तोहि रात्रीचा काल हजार चौकड्यांचा आहे आणि दिवस उजाडला, की तसेंच विश्व रचिलें जातें. ॥ १६४ ॥ ही उपपत्ति सांगण्याचें कारण असें की, ब्रह्मदेवाच्या अहोरात्रीमध्ये जगाची उत्पत्ति व लय होतात हें समजावें. ॥ १६५ ॥ अर्जुना! या ब्रह्मलोकाची थोरवी केवढी आहे पाहा, की जो सर्व बीजाची सांठवण, पण तोहि पुनरावृत्तीच्या मापाचा शीग झाला आहे—म्हणजे ब्रम्हलोकापर्यंत पुनरावृत्ति आहे, असा अर्थ. ॥ १६६ ॥

**भूतग्राम: स एवायं भूत्वा भूत्वा प्रलीयते। रात्र्यागमेऽवश: पार्थ प्रभवत्यहरागमे ॥ १९ ॥**

**अर्थ**—अर्जुना! हा स्थावरजंगमात्मक भूतसमुदाय कालवश होऊन ब्रह्मदेवाच्या रात्रींत लय पावत जातो व ब्रह्मदेवाचा दिवस उगवला असतां उत्पन्न होत जातो. ॥ १९ ॥

**एऱ्हवीं त्रैलोक्य हें धनुर्धरा। तिये गांवींचा गा पसारा। तो हा दिनोदयीं एकसरां। मांडत असे ॥ १६७ ॥**
**पाठीं रात्रीचा समो पावे। आणि आपैसाचि सांठवे। म्हणिये जेथिंचें तेथ स्वभावें। साम्यासि ये ॥ १६८ ॥**
**जैसें वृक्षपण बीजासि आलें। कीं मेघ हें गगन जाहालें। तैसें अनेकत्व जेथ सामावलें। तें साम्य म्हणिपे ॥ १६९ ॥**

**अर्थ**—एऱ्हवीं अर्जुना! हें त्रैलोक्य म्हणजे ब्रह्मलोकाचा पसारा आहे. एकसारखा मांडला जातो. ॥ १६७ ॥ नंतर रात्रीचा समय प्राप्त झाला, की आपोआप जेथल्या तेथे सांठवला जाऊन, साम्यावस्थेला जातो. ॥ १६८ ॥ ज्याप्रमाणे वृक्षपण बीजावस्थेला येतें अथवा अभ्रें आकाशरूप होऊन राहतात, त्याप्रमाणे हा सृष्टीचा अनेकत्वाचा पसारा जेथे सांठविला जातो, त्याला साम्यावस्था किंवा अव्यक्त म्हणतात. ॥ १६९ ॥

**गूढार्थदीपिका**—बीजांकुरन्यायाने ही सर्व सृष्टि अनादि असून जीवाच्या ठिकाणीं मायाभ्रांति आहे तोपर्यंत तिचे आविर्भाव म्हणजे उत्पत्ति व तिरोभाव म्हणजे लय किंवा व्यक्ताव्यक्त भाव भासत असतात (ब्र. सू. २-१-३६).

**परस्तस्मात्तु भावोऽन्योऽव्यक्तोऽव्यक्तात्सनातनः। यः स सर्वेषु भूतेषु नश्यत्सु न विनश्यति॥ २०॥**

**अर्थ**—त्या साम्यावस्थारूप अव्यक्ताहून भिन्न असा जो दुसरा सनातन अव्यक्तभाव आहे, तो मात्र सर्व भूतें नष्ट झालीं तरी नष्ट होत नाही. ॥ २० ॥

**तेथ समविषम न दिसे कांहीं। म्हणोनि भूतें हे भाष नाहीं। जेविं दूधचि जाहालिया दहीं। नामरूप जाय॥ १७० ॥**

**तेवीं आकारलोपासरिसें। जगाचें जगपण भ्रंशे। परि जेथें जाहालें तें जैसें। तैसेंचि असे॥ १७१ ॥**

**अर्थ**—जगाच्या त्या साम्यावस्थारूप अव्यक्त दशेत सारखे किंवा भिन्न भाव दिसत नाहीत, म्हणून तेथे भूतसृष्टि हा शब्दहि लागत नाही. ज्याप्रमाणे दूधच दही झाल्यावर दुधाचें नामरूप नाहिसें होतें. ॥ १७० ॥ त्याप्रमाणे आकार दिसेनासा झाला की जगाचें जगपणच राहत नाही. पण ज्या वस्तूचे ठिकाणीं हें जग असते, ती वस्तु मात्र जशीच्या तशीच म्हणजे अविकारी असते. ॥ १७१ ॥

**गूढार्थदीपिका—जेथे जाहालें तें जैसें। तैसेंचि असें**—जेव्हा जगताचीं नामरूपें दिसतात, तेव्हा ती जगताची व्यक्त दशा म्हटली जाते. जेव्हा जगताची नामरूपें दिसत नाहीत तेव्हा ती जगताची अव्यक्त दशा म्हटली जाते. जगताच्या ह्या दोन्ही दशा सत्तारूप परब्रह्माच्या ठिकाणीं भासतात असे "जेथें जाहालें" या पदाने सुचविलें असून, तीं सत्तारूप परब्रह्मावर भासतात तरी तें परब्रह्म मात्र अविकारीच असतें. जगताच्या व्यक्ताव्यक्त या दशेच्या रूपाने परिणाम पावत नाही. म्हणजे जगत् व जगताच्या व्यक्ताव्यक्त दशा परब्रह्माचे ठिकाणीं कल्पित आहेत, हा "जैसें। तैसेचि असें" या शब्दसमूहाचा भाव आहे.

**तैं तया नांव सहज अव्यक्त। आणि आकारा ये तेंचि व्यक्त। हें एकास्तव एक सूचित। एऱ्हवीं दोनी नाहीं॥ १७२ ॥**

**अर्थ**—त्या वस्तूला स्वाभाविकच अव्यक्त म्हणतात आणि आकाराला जें आलें त्याला व्यक्त म्हणतात, पण ही व्यक्त अव्यक्त भाषा एकमेकांच्या अपेक्षेने आहे. वास्तविक तेथें दोन्ही अवस्था नाहीत. ॥ १७२ ॥

**गूढार्थदीपिका—तया नांव सहज अव्यक्त**—जगद्भ्रमाला आधार असणारें परब्रह्माचें सत्तारूप निर्गुण स्वरूप नामरूपरहित असल्यामुळे तें अव्यक्त होत नाही, तर तें मूळचेंच अव्यक्त आहे व त्यावरच जगताच्या साम्यरूप अव्यक्तदशेचा भ्रम होतो असें "सहज अव्यक्त" या शब्दांनी सांगितलें आहे.

**आकारा ये तेंचि व्यक्त**—त्या सत्तारूप अव्यक्त स्वरूपाचे ठिकाणीं नामरूपें व्यक्त झालीं असतां, तें नामरूपाच्या सत्तारूपानेच नामरूपाशीं ऐक्य पावतें असें "आकारा ये तेंचि व्यक्त" या वचनाने माऊलींनी सांगितलें आहे.

**जैसे आटलिया रूपें। आटलेपण ते खोटी म्हणिपे। पुढती तो घनाकारु हारपे। जे वेळीं अळंकार होती॥ १७३ ॥**

**अर्थ**—ज्याप्रमाणे अलंकारांची रूपें आटलीं गेलीं असतां त्या सर्वांचे आटणेंपणाला खोटी म्हणतात आणि नंतर जेव्हा तिचे अलंकार केले जातात तेव्हा, त्या खोटीचा आकार नाहिसा होऊन. अनेक अलंकार उत्पन्न होतात. ॥ १७३ ॥

**हीं दोन्हीं जैशीं होणीं। एकीं साक्षीभूत सुवर्णी। तैसी व्यक्ताव्यक्ताची कडसणी। वस्तूच्या ठायीं॥ १७४ ॥**

**तें तरी व्यक्त ना अव्यक्त। नित्य ना नाशवंत। या दोहीं भावां अतीत। अनादिसिद्ध॥ १७५ ॥**

**जें हें विश्वचि होऊनि असे। परि विश्वपण नासिलेनि न नासे। अक्षरें पुसिल्या न पुसे। अर्थु जैसा॥ १७६ ॥**

**अर्थ**—पण लगड किंवा अलंकार हे दोन्ही भाव ज्याप्रमाणें केवळ आधारभूत सोन्याचे ठिकाणी भासतात, त्याप्रमाणे जगताच्या व्यक्ताव्यक्तत्वाचा विचार, आधार असलेल्या सत्तारूप परब्रह्मवस्तूच्या ठिकाणीं होतो. ॥ १७४ ॥ वास्तविक ती सनातन ब्रह्मवस्तु व्यक्त होत नाही किंवा अव्यक्त होत नाही, नित्य नाही किंवा नाशिवंत नाही; या दोन्ही भावांहून निराळी, अशी ती अनादि व सिद्ध वस्तु आहे. ॥ १७५ ॥ ज्याप्रमाणे शब्दाचा अर्थ समजल्यावर शब्द पुसून टाकला तरी, अर्थ पुसला जात नाही, त्याप्रमाणे जगत् नाहिसे झाले असतां म्हणजे अव्यक्त झालें असतां—तें नाश पावत नाही—म्हणजे त्या जगताच्या अव्यक्त दशेलाहि परब्रह्म सत्तारूपाने आधार असतें. ॥ १७६ ॥

**पाहें पां तरंग तरी होत जात। परि तेथ उदक तें अखंड असत। तेवीं भूतभावीं नाशिवंत। अविनाश जें॥ १७७ ॥**

**नातरी आटतिये अळंकारीं। नाटतें कनक असे जयापरी। तेवीं मरतिये जीवाकारीं। अमर जें आहे॥ १७८ ॥**

**अर्थ**—हें पहा, अर्जुना! पाण्यावर तरंग उत्पन्न होतात, पण पाणी मात्र उत्पन्न होत नाही किंवा नाश पावत नाही. ते अखंड असतें. तसेंच भूतसृष्टि नाहिशी झाली, तरी जें नाश पावत नाही, अखंड असतें. ॥१७७॥ किंवा आटल्या जाणाऱ्या अलंकारांत जसें न आटलें जाणारें सोनें असतें, त्याप्रमाणे जीवाच्या नाशिवंत आकारात जें अविनाशी राहतें. ॥ १७८ ॥

**गूढार्थदीपिका**—परब्रह्मवस्तु अखंड अनादिसिद्ध असल्यामुळे तिचे व्यक्त किंवा अव्यक्तभाव किंवा उत्पत्ति-नाश सिद्ध होत नाहीत. पण त्याचे ठिकाणीं भासणाऱ्या जगताचे व्यक्त किंवा अव्यक्त भाव किंवा उत्पत्ति-नाश हे प्रत्ययाला येतात. याचें कारण असें आहे की ज्याप्रमाणे तरंग ही पाणी वस्तु आहे हें विसरून, तरंग ही पाण्याहून निराळी वस्तु आहे, अशी समजूत असली तरच, तरंगाचे व्यक्ताव्यक्त भाव किंवा उत्पत्ति-नाश दिसत असतात; त्याप्रमाणे परब्रह्माचे ठिकाणीं भासणारें जगत् परब्रह्माहून निराळी वस्तु आहे अशी अज्ञानाने जीवाची भ्रांत समजूत झाली असल्यामुळे, जीवाला जगताचें व्यक्ताव्यक्तभाव किंवा उत्पत्ति-नाश प्रत्ययाला येतात.

**अव्यक्तोऽक्षर इत्युक्तस्तमाहुः परमां गतिम् । यं प्राप्य न निवर्तन्ते तद्धाम परमं मम॥ २१ ॥**
**पुरुषः स परः पार्थ भक्त्या लभ्यस्त्वनन्यया। यस्यान्तःस्थानि भूतानि येन सर्वमिदं ततम्॥ २२ ॥**

**अर्थ**—ज्याला अव्यक्त अक्षर असें म्हटले आहे, तीच माझी परमगति होय. तीच माझी स्वरूपस्थिति असून तिला प्राप्त झाले असतां, पुरुष पुनः संसारात येत नाहीत. ॥ २१ ॥ अर्जुना! ज्या ह्या प्रकृतीच्या पलीकडे असणाऱ्या अक्षर पुरुषाचें ठिकाणीं हीं सर्व भूतें भासतात व जो ह्या सर्व भूतसृष्टींत भरून आहे तो परम पुरुष, माझ्या अनन्य भक्तीनेच प्राप्त होऊं शकतो. ॥ २२ ॥

**जयातें अव्यक्त म्हणों ये कोडें। म्हणतां स्तुति हे ऐसें नावडे। जें मना बुद्धि न सांपडे। म्हणऊनियां॥ १७९ ॥**
**आणि आकारा आलिया जयाचें। निराकारपण न वचे। आकारलोपें न विसंचे। नित्यता गा॥ १८० ॥**
**म्हणोनि अक्षर जें म्हणिजे। तेवींचि म्हणतां बोधुही उपजे। जयापरौता पैसु न देखिजे। या नाम परमगती॥ १८१ ॥**
**पै आघवा इहीं देहपुरीं॥ आहे निजेलियाचे परी। जे व्यापारु करवी ना करी। म्हणऊनियां॥ १८२ ॥**
**एऱ्हवीं जे शारीरचेष्टा। त्यांमाजीं एकही न ठके गा सुभटा। दाहीं इंद्रियांचिया वाटा। वाहतचि आहाती॥ १८३ ॥**
**उकलूंनि विषयांचा पेठा। होत मनाचां चोहटां। तो सुखदुःखाचा राजवांटा। भितराहि पावे॥ १८४॥**
**परि रावो पहुडलिया सुखें। जैसा देशींचा व्यापारु न ठके। प्रजा आपुलालेनि अभिलाखें। करितचि असती॥ १८५ ॥**
**तैसें बुद्धीचें हन जाणणें। कां मनाचे घेणें देणें। इंद्रियांचें करणें। स्फुरण वायूचें॥ १८६ ॥**
**हे देहक्रिया आघवी। न करवितां होय बरवी। जैसा न चलवितेनि रवी। लोकु चाले॥ १८७ ॥**

**अर्थ**—अक्षर परब्रह्म मनबुद्धीने जाणलें जाऊं शकत नाही, म्हणूनच त्याला कौतुकाने जें अव्यक्त म्हटलें जातें, ती त्याची स्तुति नव्हे. ॥ १७९ ॥ आणि जें साकार स्वरूप झालें तरी त्याचें निराकारपण यत्किंचित्‌हि कमी होत नाही. तसेंच आकार नाहिसा झाला तरी ज्याची नित्यता कधी जात नाही. ॥ १८० ॥ म्हणूनच त्याला अक्षर म्हणतात व तसेंच त्याने त्याचें ज्ञानहि होतें. ज्याच्या पलीकडे कांहीच नाही, म्हणूनच त्याला परमगति म्हणतात. ॥ १८१ ॥ या सर्व शरीरामध्ये जें व्यापार करीत नाही किंवा करवीत नाही, म्हणून निजल्यासारखे आहे. ॥ १८२ ॥ आणि पाहूं गेलें तर देहाच्या जेवढ्या क्रिया होतात, त्यापैकी एकहि त्याच्या सान्निध्यामुळे बंद पडत नाही. दहाहि इंद्रियांचे व्यापाररूपी मार्ग सारखें वाहतच असतात. ॥ १८३ ॥ विषयांचा बाजार मांडला जाऊन, मन त्या बाजारांतील चावडी होते. त्यामुळे राजाचा हिस्सा राजाला मिळावा, त्याप्रमाणे तेथील सुखदुःखाचा वांटा आंत मनाला मिळतो. ॥ १८४॥ पण राजा सुखाने झोंपला असतांहि, ज्याप्रमाणे शहरांतील व्यापार बंद पडत नाहीत, प्रजा आपआपल्या इच्छेप्रमाणे व्यापार करीतच असतात. ॥ १८५ ॥ त्याप्रमाणे बुद्धीचा जाणणें हा व्यापार, किंवा मनाचे त्याग-स्वीकार हे व्यापार, इंद्रियांचा क्रिया हा व्यापार, स्फुरणें हा वायूचा व्यापार॥ १८६ ॥ ह्या संपूर्ण क्रिया देहाचे ठिकाणीं, ज्याप्रमाणे सूर्य लोकांना चालवीत नाही पण लोक चालतात, त्याप्रमाणे पुरुषाकडून न करविल्या जातां, होत असतात. ॥ १८७ ॥

**गूढार्थदीपिका**—अद्वैत परब्रह्माचे ठिकाणीं त्याहून दुसरें कांहीच नाही व तें केवळ चैतन्यस्वरूप असल्यामुळे कांही व्यापार करीत नाही व करवित नाही. आपल्या आत्मस्वरूपाचें ज्ञान नसल्यामुळे जीवाला शरीरादिकांचा व त्यांच्या व्यापारांचा व त्यापासून होणाऱ्या सुखदु:खभोगांचा, जो अनुभव येतो तो सर्व भ्रांतीने येतो, असें वरील ओव्यांचें तात्पर्य आहे व श्रीज्ञानेश्वर माऊलींनी पांचव्या अध्यायांतील श्लोक १४ व १५ यावर टीका करतांना हें स्पष्टहि केले आहे.

**अर्जुना तयापरी। सुतला ऐसा आहे शरीरीं। म्हणोनि पुरुषु गा अवधारीं। म्हणिपे जयातें॥ १८८॥**
**आणि प्रकृति पतिव्रते। पडिला एकपत्नीव्रतें। येणेंही कारणें जयातें। पुरुषु म्हणों ये॥ १८९॥**
**पैं वेदांचें बहुवसपण। देखेचिना जयाचें आंगण। हें गगनाचें पांघरूण। होय देखा॥ १९०॥**
**ऐसें जाणूनि योगीश्वर। जयातें म्हणती परात्पर। जें अनन्यगतीचें घर। गिंवसीत ये॥ १९१॥**
**जे तनुवाचाचित्तें। नाइकती दुजिये गोष्टीतें। तयां एकनिष्ठेचें पिकतें। सुक्षेत्र जें॥ १९२॥**

**अर्थ**—अर्जुना! याप्रमाणे हा अक्षर पुरुष या देहाचे ठिकाणीं निजल्यासारखा आहे; म्हणून याला पुरुष असें म्हणतात. (पुरि शयनात् पुरुषत:) ॥ १८८ ॥ आणखी याला पुरुष म्हणण्याचें दुसरें कारण असेंहि आहे की, प्रकृति अत्यंत पतिव्रता आहे. ती या अक्षर स्वरूपाला सोडून क्षणभरहि स्वतंत्र राहत नाही, म्हणून त्या प्रकृतिपतिव्रतेशीं हाहि एकपत्नीव्रताने राहतो. म्हणूनहि त्याला पुरुष म्हणतात (उत्तम पुरुष एकपत्नीव्रतच असतो) ॥ १८९ ॥ हा अक्षर पुरुष गगनाचें पांघरूण-म्हणजे आकाशापेक्षांहि सूक्ष्म व व्यापक असल्यामुळे वेदाने प्रतिपादिलेल्या कर्म, देवता, कर्मांची फळें म्हणून सांगितलेले लोकालोक इत्यादि विषयांचें अनेकत्व त्याच्या अद्वितीय व्यापकतेत राहूं शकत नाही. ॥ १९० ॥ असें जाणून, श्रेष्ठ योगीजन, ज्या अक्षर पुरुषाला परात्पर म्हणतात आणि जो आपल्या अनन्य भक्ताच्या घराचा शोध करीत येतो. ॥ १९१ ॥ जे कोणी कायावाचामनाने एका अक्षर पुरुषावांचून दुसरी गोष्टच ऐकत नाहीत, अशा एकनिष्ठ पुरुषाच्या एकनिष्ठेचें उत्तम पीक देणारें, हा अक्षर पुरुष शेतच होय. ॥ १९२ ॥

**गूढार्थदीपिका**—जो अक्षर पुरुष एकनिष्ठ भक्तालाच प्राप्त होतो, असा अर्थ.

**हें त्रैलोक्यचि पुरुषोत्तमु। ऐसा साचु जयांचा मनोधर्मु। तयां आस्तिकांचा आश्रमु। पांडवा गा॥ १९३॥**

**अर्थ**—हें संपूर्ण त्रैलोक्य सच्चिदानंद भगवद्रूपच आहे, असा ज्याच्या मनाचा पक्का निश्चय झाला, त्या आस्तिक पुरुषाचा, अर्जुना! हा अक्षर पुरुष म्हणजे राहण्याचा आश्रय आहे. ॥ १९३ ॥

**गूढार्थदीपिका**—संपूर्ण त्रैलोक्य भगवंताहून निराळे नाही, भगवद्रूपच आहे असा आस्तिकांचा अनुभव असतो असा अर्थ.

**जें निगर्वाचें गौरव। जें निर्गुणाची जाणिव। जें सुखाची राणिव। निराशांसी॥ १९४॥**

**अर्थ**—जो निरभिमान्यांचें थोरपण आहे, जो निर्गुणस्वरूप झालेल्या पुरुषाची केवळ जाणीव आहे व जो अक्षर पुरुष, विषयसुखाविषयीं निरीच्छ झालेल्या पुरुषाचें, परमसुखाचें राज्य होय. ॥ १९४ ॥

**गूढार्थदीपिका—निगर्वाचें गौरव**—म्हणजे अत्यंत निरभिमानी पुरुषालाच जो अत्यंत श्रेष्ठ पुरुष वाटतो.

जे निर्गुणाची जाणीव—त्रिगुणातीत झाल्यावरच ज्याचा अनुभव येतो.

**सुखाची राणिव। निराशांसी**—विषयवासनारहित झालेल्या पुरुषांनाच, हा अक्षर पुरुष अपरिमित सुखाचें स्थान आहे, असा अनुभव येतो.

**जें संतोषियां वाढिलें ताट। जें अचिंतां अनाथांचें मायपोट। भक्तीसी उजू वाट। जया गांवा॥ १९५॥**

**अर्थ**—जें अखंड संतुष्ट राहणाऱ्या पुरुषापुढे वाढलेलें ताट आहे, संसाराची चिंता सोडून निश्चिंत झालेल्यांना व परमेश्वरावांचून ज्यांना दुसरा स्वामी नाही अशांना, जो अक्षर पुरुष आईप्रमाणे पोटाशीं घेणारा आहे आणि ज्या अक्षरपुरुषरूप गांवाला जाण्याकरिता भक्ति हाच सरळ मार्ग आहे. ॥ १९५ ॥

**गूढार्थदीपिका—संतोषियां वाढिलें ताट**—म्हणजे प्रारब्धाने प्राप्त होणाऱ्या सुखदु:खाचा हर्षविषाद न मानतां

चित्तात अखंड समाधान ठेवणाऱ्या पुरूषांनाच, समोर वाढलेल्या ताटाप्रमाणेच, ज्याची सुलभ प्राप्ति होते.

**हें एकैक सांगोनि वाया। काय फार करूं धनंजया। पैं गेलिया जया ठाया। तो ठावोचि होइजे॥ १९६॥**
**हिंवाचिया झुळुका। जैसें हिंवचि पडे उष्णोदका। कां समोर जालिया अर्का। तमचि प्रकाशु होय॥ १९७॥**
**तैसा संसारु जया गांवा। गेला सांता पांडवा। होऊनि ठाके आघवा। मोक्षाचाचि॥ १९८॥**

**अर्थ**—हें याप्रमाणे एक एक गुणाचें वर्णन करून, अर्जुना! किती विस्तार करायचा? ज्या ठिकाणाला गेलें असतां, जाणाराच ठिकाण होऊन जातो.॥ १९६॥ ज्याप्रमाणे थंड वाऱ्याच्या झुळुकांनी जसें ऊन पाणी थंड होतें किंवा अंधार सूर्याच्या समोर आला की ज्याप्रमाणे तोहि प्रकाश होऊन जातो.॥ १९७॥ त्याप्रमाणे ज्या गांवाला गेलें असतां अर्जुना! संपूर्ण संसारच मोक्षरूप होऊन जातो॥ १९८॥

**गूढार्थदीपिका**—ज्याला आपण संसार, जीव, सुख, दुःख, इत्यादि म्हणतो, तो सर्व मूळांत सच्चिदानंद परब्रह्म आहे. त्याचे ठिकाणीं अज्ञानाने सच्चिदानंद परब्रह्माहून भिन्न वस्तुत्वाची व भिन्न धर्माची कल्पना केली जाते व ती कल्पना आहे तोपर्यंत त्यांचा तसा अनुभव येतो. सच्चिदानंद ब्रह्मस्वरूपाच्या विचाराने भिन्न वस्तुत्वाची व भिन्न धर्माची कल्पना नाहिशी झाल्यावर, सर्व नामरूपात्मक संसार पूर्ण ब्रह्मस्वरूप आहे, असा अनुभव येतो. हेंच संसाराचे मोक्षरूप होणें होय.

**तरि अग्नीमाजीं आलें। जैसें इंधनचि अग्नि जाहालें। पाठीं न निवडेचि कांहीं केलें। काष्ठपण॥ १९९॥**
**नातरी साखरेचा माघौता। बुद्धिमंतपणेंही करितां। परि ऊंस नव्हे पंडुसुता। जियापरी॥ २००॥**
**लोहाचें कनक जहालें। हें एकें परिसें केलें। आतां आणिक कैंचें तें गेलें। लोहत्व आणी॥ २०१॥**
**म्हणोनि तूप होऊनि माघौतें। जेवीं दुधपणा न येचि निरुतें। तेविं पावोनियां जयातें। पुनरावृत्ति नाहीं॥ २०२॥**

**अर्थ**—जशीं लाकडें अग्नींत घातलीं की अग्निस्वरूप होऊन जातात; नंतर अग्नीपासून त्यांचें लांकूडपण अलग राहत नाही.॥ १९९॥ किंवा मोठाहि बुद्धिमान झाला, तरी ज्याप्रमाणे एकदां ऊंसाची साखर झाल्यानंतर पुनः त्या साखरेचा ऊंस तो करूं शकत नाही.॥ २००॥ एका परिसाच्या योगानेच लोखंडाचें सोनें झालें. आतां ते गेलेले लोखंडपण, आणिक म्हणजे पुनः परत कसें आणणार?॥ २०१॥ म्हणून ज्याप्रमाणे दूधाचे तूप होऊन गेल्यावर त्या तुपाला पुनः दूध निश्चयाने करता येत नाही. त्याप्रमाणे, ज्या अक्षर पुरुषाला प्राप्त झाले असता, पुनः जन्ममरणरूपी संसार प्राप्त होत नाही.॥ २०२॥

**गूढार्थदीपिका**—धर्माधर्माचें फळ जें सुखदुःख तें ज्या शरीराचें ठिकाणीं भोगलें जातें, त्या शरीराची प्राप्ति न होणें याला मोक्ष म्हणतात. हा मोक्ष अविद्यादोषरहित सच्चिदानंद परमेश्वराच्या प्राप्तीने होतो आणि सच्चिदानंद परब्रह्म नित्यसिद्ध व जीवाचें मूळ स्वरूपच असल्यामुळे 'तस्य स्वाभाविकत्वात्' ज्याला ब्रह्मप्राप्तिरूप मोक्ष स्वाभाविक आहे, म्हणून नित्य आहे. "नित्यश्च मोक्षः सर्वैर्मोक्षवादिभिरभ्युपगम्यते।" (ब्रह्मसूत्र १-१-४), सर्व दर्शनकारांनी मुक्ति नित्य मानली आहे, असें ब्रह्मसूत्रभाष्यांत आचार्य म्हणतात व माऊलींनी हेंच येथें सांगितलें आहे. मोक्ष किंवा परमेश्वरप्राप्ति नित्य आहे, त्या म्हणण्याचा अर्थ असा आहे का, सर्व कर्माचें फळ नाशिवंत आहे, असें सांगितले असल्यामुळे, मोक्ष हा कर्माचें फळ नव्हे आणि मोक्ष किंवा परमेश्वरप्राप्ति एकदां झाली म्हणजे पुनः ती नाहिशीं होते, त्याची (परमेश्वराची) विस्मृति होते व हा संसार प्राप्त होतो किंवा जीवदशा उत्पन्न होते, असें नाही, कारण जीवदशेचा आरंभ होतो, हें सिद्ध करतां येत नाही; पण ती परमेश्वरप्राप्तीने नाहिशी होणारी व पुनः उत्पन्न न होणारी आहे, असा वेदान्ताचा सिद्धान्त आहे.

**तें माझें परम। साचोकारें निजधाम। हें आंतुवट तुज वर्म। दाविजत असे॥ २०३॥**

**अर्थ**—अर्जुना! हेंच माझे खरोखर अविनाशी प्राप्तव्य स्वरूप होय. हें मी माझ्या अंतःकरणांतील गुह्य तुला दाखवीत आहे.॥ २०३॥

**यत्र काले त्वनावृत्तिमावृत्तिं चैव योगिनः। प्रयाता यान्ति तं कालं वक्ष्यामि भरतर्षभ॥ २३॥**

**अर्थ**—अर्जुना! ज्याकाळीं योगीलोक देह सोडून गेले असतां पुन: संसारात जन्म घेत नाहीत व ज्या काळी देह सोडून गेले असतां पुन: जन्म घेतात तो काळ मी तुला सांगतों, ऐक. ॥ २३ ॥

**तेवींचि आणिकेंही एकें प्रकारें। हें जाणतां आहे सोपारें। तरि देह सांडितेनि अवसरें। जेथै मिळती योगी ॥ २०४ ॥**
**अथवा अवचटें ऐसें घडे। जे अनवसरें देह सांडे। तरि माघौतें येणें घडे। देहासीचि ॥ २०५ ॥**
**म्हणोनि काळशुद्धी जरी देह ठेविती। तरी ठेवितखेवीं ब्रह्मचि होती। एऱ्हवीं अकाळीं तरी येती। संसारा पुढती ॥ २०६ ॥**
**तैसें सायुज्य आणि पुनरावृत्ती। ये दोन्ही अवसराआधीन आहाती। तो अवसरु तुजप्रती। प्रसंगें सांगों ॥ २०७ ॥**
**तरि ऐकें गा सुभटा। पातलिया मरणाचा माजिवटा। पांचै आपुलालिया वाटा। निघती अंतीं ॥ २०८ ॥**
**ऐसा वरिपडिला प्रयाणकाळीं। बुद्धीतें भ्रमु न गिळी। स्मृति नव्हे आंधळी। न मरे मन ॥ २०९ ॥**
**हा चेतनावर्गु आघवा। मरणीं असे टवटवा। परि अनुभविलिया ब्रह्मभावा। गंवसणी होऊनि ॥ २१० ॥**
**ऐसा सावध हा समवावो। आणि निर्वाणवेऱ्हीं निर्वाहो। हें तरीच घडे जरी सावावो। अग्नीचा आथी ॥ २११ ॥**
**पाहा पां वारेन कां उदकें। जैं दिवियाचें दिवेपण झांके। तैं असतीच काय देखे। दिठी आपुली ॥ २१२ ॥**
**तैसें देहांतींचेनि विषमवातें। देह आंत बाहेरि श्लेष्मा आते। तैं विझोनि जाय उजितें। अग्नीचें जेव्हां ॥ २१३ ॥**
**ते वेळीं प्राणासीचि प्राणु नाहीं। तेथ बुद्धि असोनि करील काई। म्हणोनि अग्नीविण देहीं। चेतना न थारे ॥ २१४ ॥**
**अगा देहींचा अग्नि जरी गेला। तरी देह नव्हे चिखलु वोला। वायां आयुष्यवेळु आपुला। आंधारां गिंवसी ॥ २१५ ॥**
**आणि मागील स्मरण आघवें। तें तेणें अवसरे सांभाळावें। मग देह त्यजुनि मिळावें। स्वरूपीं कीं ॥ २१६ ॥**
**तंव तया देहश्लेष्माचे चिखलीं। चेतनाचि बुडोनि गेली। तेथ मागिली पुढिली ही ठेली। आठवण सहजें ॥ २१७ ॥**
**म्हणोनि आदीचि अभ्यासु जो केला। तो मरण न येतांचि निमोनि गेला। जैसें ठेवणें न दिसतां मालवला। दीपु हातींचा ॥ २१८ ॥**
**आतां असो हें सकळ। जाण पां ज्ञानासि अग्नि मूळ। तया अग्नीचें प्रयाणीं बळ। संपूर्ण आथी ॥ २१९ ॥**

**अर्थ**—त्याचप्रमाणे माझें परमधाम कोणतें, हें अणिक एका प्रकाराने जाणतां येणें सोपें आहे. मरणसमयीं देह सोडल्यावर शेवटीं जेथे योगी मिळतात, तें माझें परमधाम होय. ॥ २०४ ॥ किंवा अकस्मात् असेंहि घडून येतें, की अकाळीच देह सोडला जातो व मग पुन: त्याला पुनर्जन्म घ्यावा लागतो. ॥ २०५ ॥ म्हणून शास्त्राने माझा प्राप्तिकाल जो सांगितला आहे, तो काळ पाहून योगी देहाचा त्याग करतील, तर देह सुटल्याबरोबर ते ब्रह्मरूपच होतात. नाही तर अकाळीं देह सोडला असतां, पुन: त्यांना संसारात यावें लागतें. ॥ २०६ ॥ त्याप्रमाणे ब्रह्मस्वरूप होणें व संसारात येणें, अशा या दोन्हीहि गती कालाच्या स्वाधीन आहेत. तोच प्रत्येक गतीचा काल कोणता, हें तुला या प्रसंगाने सांगतो. ॥ २०७ ॥ हे थोर योद्ध्या, अर्जुना! इकडे लक्ष दे. मरणकाळाची मूर्च्छा प्राप्त झाली असतां देहांत असलेलीं हीं पंचमहाभूतें शेवटीं आपल्या वाटेने-म्हणजे बाहेरच्या आपआपल्या भूतात मिळण्याकरितां-निघतात. ॥ २०८ ॥ अशारीतीने मरणकाळ येऊन पडला असतां, बुद्धि भ्रमाने गिळली गेली नाही—म्हणजे बुद्धीला भ्रम झाला नाही, स्मरणशक्ति ही आंधळी झाली नाही—म्हणजे स्मरणशक्ति उत्तम राहिली-व मन मेलें नाही—म्हणजे मन सावध आहे. ॥ २०९ ॥ याप्रमाणे सर्व चेतनतत्त्वें मरणाचे वेळीं टवटवीत-म्हणजे आपआपलीं कार्यें करण्यास समर्थ असतात, पण जर आपलें अंत:करण ब्रह्मभावाला गंवसणी होऊन ब्रह्मभावाचा अनुभव आला असेल, तरच हें घडणें शक्य आहे. ॥ २१० ॥ असा हा तत्त्वांचा समुदाय सावध असणें व मरेपर्यंत त्यांचा सावधपणा टिकून राहणें, हें अग्नीचें साह्य असलें तरच घडणें शक्य आहे. ॥ २११ ॥ अर्जुना! पहा, वाऱ्याने किंवा पाण्याने दिव्याचा प्रकाश विझला असतां, आपली दृष्टी जरी असली तरी दृष्टीला दिसते का? ॥ २१२ ॥ त्याप्रमाणे मरणाचे वेळीं त्रिदोषांच्या प्रकोपाने, देहाचे आंत व बाहेर, कफ व्यापतो, तेव्हा अग्नीचें तेज नाहीसें होतें. ॥ २१३ ॥ तेव्हा प्राणाचे ठिकाणीं जेथे प्राणशक्ति राहत नाही, तेथे बुद्धि असून ती काय करणार आहे? म्हणून अग्नीच्या बळावांचून—म्हणजे उष्णतेवांचून, देहामध्ये चैतन्यशक्ति राहूं शकत नाही. ॥ २१४ ॥ अर्जुना! देहांतील अग्नि म्हणजे उष्णता एकदा नाहिशी झाली की मग तो देह राहत नाही. तो देह म्हणजे ओला चिखल होय. त्या अंधारांत आयुष्य आपली संपायची वेळ पाहत

राहतें. ॥ २१५ ॥ आणि मागे प्राप्त करून घेतलेले ब्रह्मभावाचें स्मरण, त्यावेळी सांभाळलें गेलें, तरच देह टाकल्याबरोबर योगी ब्रह्मस्वरूपांत मिळतो. ॥ २१६ ॥ पण त्यावेळीं तर, देहाच्या आंतबाहेर व्यापलेल्या कफाच्या चिखलामध्ये चेतनाच बुडून गेली असल्यामुळे, मागील पुढील कांहीच आठवण राहत नाही. ॥ २१७ ॥ ज्याप्रमाणे ठेवलेली वस्तु दिव्याने शोधत असतां, ती सांपडण्यापूर्वीच हातांतील दिवा विझावा, त्याप्रमाणे अगोदर जो अभ्यास केलेला असतो, तो देह पडण्यापूर्वीच विसरला जातो. ॥ २१८ ॥ अर्जुना! हें निरूपण असूं दे. एवढे लक्षांत ठेव की मरतेवेळीं ब्रह्मज्ञानाचें स्मरण राहण्याकरिता, मुख्य अग्नी किंवा उष्णता कारण आहे. शरीरात अग्नीची उष्णता असली तर मरतेवेळीं त्या अग्नीचें संपूर्ण शरीराला किंवा शरीरांतील बुद्ध्यादी तत्त्वांना सामर्थ्य मिळतें. ॥ २१९ ॥

**अग्निर्ज्योतिरहः शुक्लः षण्मासा उत्तरायणम् । तत्र प्रयाता गच्छन्ति ब्रह्म ब्रह्मविदो जनाः ॥ २४ ॥**

**अर्थ**—आंत अग्नि व ज्योतीचा प्रकाश, बाहेर दिवस, शुक्लपक्ष, उत्तरायणांतील कोणता तरी महिना, असा उत्तरायण असतांना, ब्रह्माचा अनुभव घेतलेला योगी मरण पावला असतां, ब्रह्मस्वरूपाला प्राप्त होतो. ॥ २४ ॥

**आंत अग्निज्योतीचा प्रकाशु । बाहेरी शुक्लपक्षु आणि दिवसु । आणि सामासांमाजीं मासु । उत्तरायण ॥ २२० ॥**
**ऐशिया समयोगाची निरुती । लाहोनि जे देह ठेविती । ते ब्रह्मचि होती । ब्रह्मविद ॥ २२१ ॥**
**अवधारीं गा धनुर्धरा । येथवरी सामर्थ्य यया अवसरा । तेवींचि हा उजू मार्ग स्वपुरा । यावयासी ॥ २२२ ॥**
**एथ अग्नी हें पहिलें पायतरें । ज्योतिर्मय हें दुसरें । दिवस जाणें तिसरें । चौथें शुक्लपक्ष ॥ २२३ ॥**
**आणि सामास उत्तरायण । तें वरचील गा सोपान । येणें सायुज्यसिद्धिसदन । पावती योगी ॥ २२४ ॥**
**हा उत्तम काळु जाणिजे । यातें अर्चिरादि मार्गु म्हणिजे । आतां अकाळु तोही सहजें । सांगेन आईक ॥ २२५ ॥**

**अर्थ**—देहाचे आंत-अग्नि व जीवज्योतीचा प्रकाश असून; बाहेर-शुक्लपक्ष, दिवस व उत्तरायणांतील एखादा महिना. ॥ २२० ॥ अशा सर्व योगांची प्राप्ति असून जे ब्रह्मोपासक देह ठेवतात, ते शेवटीं ब्रह्मच होतात. ॥ २२१ ॥ अर्जुना! वर सांगितलेल्या गोष्टी एकत्र प्राप्त झाल्या आहेत अशा या काळाला एवढें सामर्थ्य आहे हें लक्षांत ठेव. त्याचप्रमाणे आपल्या शुद्ध आत्मस्वरूपाला प्राप्त होण्याकरिता हा मार्गहि सरळ आहे. ॥ २२२ ॥ या मार्गात अग्नि ही पहिली पायरी होय. तेज किंवा प्रकाश ही दुसरी पायरी आहे. दिवस ही तिसरी आणि शुक्लपक्ष ही चवथी पायरी होय. ॥ २२३ ॥ आणि उत्तरायणाचे सहा महिने ही वरची पायरी होय, असें समज. या मार्गाने योगी मोक्ष-सिद्धिरूप घराला प्राप्त करून घेतात. ॥ २२४ ॥ अर्जुना! हा काळ प्रयाणाला उत्तम असून याला अर्चिरादि मार्ग म्हणतात. आतां, अयोग्य काळ कोणता तो सांगतों ऐक. ॥ २२५ ॥

**धूमो रात्रिस्तथा कृष्णः षण्मासा दक्षिणायनम् । तत्र चान्द्रमसं ज्योतिर्योगी प्राप्य निवर्तते ॥ २५ ॥**

**अर्थ**—ज्या मार्गात धूर, रात्र, कृष्णपक्ष, दक्षिणायनांतील सहा महिन्यांतील एखादा महिना आहे. अशा मार्गाने गेलेला कर्मयोगी चंद्रलोकाला प्राप्त होऊन, पुनः संसारांत येतो. ॥ २५ ॥

**तरि प्रयाणाचेनि अवसरें । वातुश्लेष्मु सुभरे । तेणें अंतःकरणीं आंधारें । कोंदलें ठाके ॥ २२६ ॥**
**सर्वेंद्रियां लाकुड पडे । स्मृति भ्रमामाजीं बुडे । मन होय वेडें । कोंडे प्राण ॥ २२७ ॥**
**अग्नीचें अग्निपण जाये । मग तो धूमचि अवघा होये । तेणें चेतना गिंवसिली ठाये । शरीरींची ॥ २२८ ॥**
**जैसें चंद्राआड आभाळ । सदट दाटे सजळ । मग गडद ना उजाळ । ऐसें झांवळें होय ॥ २२९ ॥**
**कां मरे ना सावध । ऐसें जीवितासि पडे स्तब्ध । आयुष्य मरणाची मर्याद । वेळु ठाकी ॥ २३० ॥**
**ऐसी मनबुद्धिकरणीं । सभोंवतीं धूमाकुळाची कोंडणी । तेथ जन्में जोडलिये वाहणीं । युगचि बुडे ॥ २३१ ॥**
**हां गा हातींचे जे वेळीं जाये । ते वेळीं आणिका लाभाची गोठी कें आहे । म्हणऊनि प्रयाणीं तंव होये । येतुली दशा ॥ २३२ ॥**
**आणि देहाआंतु ऐसी स्थिती । बाहेरी कृष्णपक्षु वरि राती । आणि सामासही ते वोडवती । दक्षिणायन ॥ २३३ ॥**
**इये पुनरावृत्तीचीं घराणीं । आघवीं एकवटती जयाचिया प्रयाणीं । तो स्वरूपसिद्धीची काहाणी । कैसेनि आइके ॥ २३४ ॥**
**ऐसा जयाचा देह पडे । तया योगी म्हणोनि चंद्रवरी जाणें घडे । मग तेथूनि मागुता बहुडे । संसारा ये ॥ २३५ ॥**

**आम्हीं अकाळु जो पांडवा। म्हणितला तो हा जाणावा। आणि हाचि धूम्रमार्गु गांवा। पुनरावृत्तीचिया॥ २३६॥**
**येर तो अर्चिरादि मार्गु। तो वसता आणि असलगु। साविया स्वस्त चांगु। निवृत्तीवरी॥ २३७॥**

**अर्थ**—मरणसमयीं वातकफाच्या वृद्धीमुळे अंत:करणांत अंधारच अंधार होऊन राहतो. ॥ २२६ ॥ सर्व इंद्रिये लांकडासारखी व्यापाररहित होतात, स्मृति भ्रमांत बुडून जाते, मनाला कांही कळेनासें होते व प्राण कोंडला जातो. ॥ २२७ ॥ अग्नी विझून जातो, मग सर्व धूरच होतो. त्यामुळे त्या धुरांत शरीरांतील चेतना सांपडली जाते. ॥ २२८ ॥ ज्याप्रमाणे चंद्राचे आड भरगच्च व पाण्याने भरलेली अभ्रें आलीं असतां, अगदी अंधार नाही तर उजेडहि नाही, असें झुंजुक होऊन जाते. ॥ २२९ ॥ त्याप्रमाणे मेला नाही किंवा सावधहि नाही, अशी जीविताची स्तब्ध दशा होते आणि आयुष्य मरणाच्या मर्यादारूप वेळेवर येऊन राहते. ॥ २३० ॥ अशी मन, बुद्धि, इंद्रिये यांची स्थिति असते. सभोंवार संपूर्ण धूर कोंडलेला असतो. अशा स्थितींत, जन्मभर जो अभ्यास केला, तो सर्वस्वीं वायां जातो. ॥ २३१ ॥ अर्जुना! ज्यावेळीं हातीं आलेलें नाहिसें होते, त्या वेळीं अधिक लाभ होणें दूरच राहिले; म्हणून मरणाचे वेळीं अशी स्थिति होते. ॥ २३२ ॥ अशी देहाचे आंत स्थिति होते व बाहेर कृष्णपक्ष असून, त्यांतहि रात्र आहे आणि सहा महिन्यांचें दक्षिणायन आहे. ॥ २३३ ॥ हीं सर्व पुन्हा जन्माला घालणारीं कुळें, ज्याच्या मरणकाळीं एकत्र होतात, तो आत्मस्वरूपाच्या प्राप्तीची वार्ता कशी ऐकणार?॥ २३४ ॥ अशा समयीं ज्याचा देह पडतो, तो योगी म्हणून चंद्रलोकापर्यंत जातो, पण मग तेथून पुन: माघारा फिरून संसारांत येतो. ॥ २३५ ॥ अर्जुना! मरण्याला अकाल किंवा अयोग्य काल म्हणून जो मी तुला सांगितला, तो हा होय आणि पुन: संसारांत टाकणारा हाच धूम्रमार्ग म्हटला जातो. ॥ २३६ ॥ बाकीचा अर्चिरादि मार्ग जो आहे, तो 'वसता' म्हणजे ज्या मार्गाने लोक जातात असा (किंवा अर्चिरादि मार्गाने ब्रह्मलोकांत जाऊन तेथे पुष्कळ काळ राहण्याजोगा म्हणून तो वसता मार्ग होय) व पुनरावृत्तीच्या मार्गाहून स्वतंत्र आहे. तो स्वस्थ अंत:करणाने जाण्याजोगा असा खरोखर चांगला आहे. ॥ २३७ ॥

**गूढार्थदीपिका**—प्रथम सूर्यादिलोकांत भोग भोगून, नंतर ब्रह्मलोकांत जाणें, ह्याला अर्चिरादि मार्ग म्हणतात आणि अशा रीतीने ब्रह्मलोकांत गेल्यावर शुद्ध ब्रह्माचें ज्ञान होऊन महाप्रलयांत ब्रह्मदेवाबरोबर मुक्त होणें, याला क्रममुक्ति म्हणतात.

येथे अर्चिरादि मार्गाने जाणारा व धूम्रमार्गाने चंद्रलोकाला जाऊन परत पुनर्जन्माला येणारा, अशा दोघांनाहि 'योगी' म्हणून म्हटलें आहे.

'योग' या शब्दाचा अर्थ भगवंताच्या ठिकाणीं चित्त स्थिर करणे असा आहे, हें मागे आम्ही सांगितलेंच आहे. हा योग निरनिराळ्या साधनांनी साधू शकतो.

निर्गुण व सम अशा पूर्णब्रह्माचा, ज्ञानाने विचार करून, जे त्याचे अखंड अनुसंधान करतात, ते ज्ञानयोगी होत.

सगुण साकार रामकृष्णादि पूर्ण परब्रह्मस्वरूप भगवंताचे ठिकाणीं सर्वकर्मसमर्पणद्वारा व नामस्मरणादिद्वारा प्रेमाने चित्तवृत्ति स्थिर करून, जे भगवंताचे अखंड ध्यान करतात, ते भक्तियोगी होत. हे दोन प्रकारचे योगी (ज्ञानयोगी व भक्तियोगी) ज्ञानयोगी ज्ञानमार्गाने व भक्तियोगी भक्तिप्रेमाने-येथेच पूर्णब्रह्मस्वरूपाशीं ऐक्य पावतात व तद्रूप होतात. त्यांना अर्चिरादि मार्गाने जावें लागत नाही. किंवा त्यांना काळाची मुळीच अपेक्षा नाही; म्हणून या ठिकाणीं हे योगी अभिप्रेत नाहीत.

भक्तियोगी हे एकान्तभक्तीने कसे भगवत्स्वरूप होतात, याचें सविस्तर वर्णन पुढील नवव्या अध्यायांत करण्यांत देईल.

उपनिषदांतून कारणब्रह्म व कार्यब्रह्म असे ब्रह्माचे दोन प्रकार सांगितले आहेत. ज्या स्वरूपाला नित्यमुक्त, अमर्याद, सर्वज्ञ, सर्वशक्ति म्हटलें जातें तें कारणब्रह्म किंवा पूर्णब्रह्म होय.

जें हृदयदेशादिकांच्या उपाधीमुळे मर्यादित सगुण झालें आहे व ज्याचें सर्वज्ञत्वादि ऐश्वर्य मर्यादित सांगितलें आहे, अशा प्रादेशिक सगुण ब्रह्माला कार्यब्रह्म म्हणतात. अशी कार्यब्रह्माची उपासना श्रुतींत सांगितली आहे. ही

श्रौतउपासना करणारे जे योगी आहेत, त्यांनाहि काळाची अपेक्षा नाही. त्यांच्या उपासनाबलाने अर्चिरादि मार्गावरील अग्न्यादि अभिमानी देवता त्यांना ब्रह्मलोकांत नेतात, असा ब्रह्मसूत्रांत सिद्धान्त केला आहे. (ब्र. सू. ४-३-४).

ज्यांना ब्रह्मलोकांत जाण्याकरिता काळाची अपेक्षा आहे म्हणून वरील श्लोकांत सांगितले आहे, ते योगी म्हणजे सगुणाच्या भक्तीवांचून पातंजलक्रियायोग करणारे व तसेंच सांख्यशास्त्राप्रमाणे केवळ प्रकृतिपुरुषविवेक किंवा व्यतिरेक करणारे, असे स्मार्तयोगी होत (ब्र. सू. ४-२-२१).

खरोखर केवळ परमेश्वराची प्राप्ति व्हावी म्हणून निष्काम चिताने परमेश्वरप्रीत्यर्थ धर्माचरण करणाऱ्यांनाच कर्मयोगी ही संज्ञा दिली जाते; पण येथे चंद्रलोकात जाऊन परत मृत्युलोकांत येणारे जे लोक आहेत, त्यांनाहि येथे योगी म्हटलें आहे. याचे कारण हें आहे कीं, ते परमेश्वरैक्यरूप मुक्तीला प्राप्त करून घेण्याकरिता, विषयसुखाची आशा सोडून, निष्काम चित्ताने, परमेश्वरप्रीत्यर्थ धर्मानुष्ठान करणाऱ्या कर्मयोग्याप्रमाणे, या लोकांचें आचरण नसून, ते इहपरलोकांत विषयसुख प्राप्त होण्याकरिता तेवढ्यापुरते परमेश्वराच्या आज्ञेप्रमाणे धर्माचरण करतात, म्हणून या सामान्य अर्थाने यांना योगी म्हटलें आहे.

जें केवळ परमेश्वरप्रीत्यर्थ किंवा इहपरलोकांत विषयसुखभोगाकरिता परमेश्वराचे आज्ञेप्रमाणे धर्माचरण करीत नाहीत व इंद्रियांना वाटेल तसें स्वैर वागूं देतात; असे लोक सामान्ययोगी यांच्या वर्गांतहि येत नाहीत आणि ते चंद्रलोकांत जात नसून यमलोकांत जातात व तेथेच यमयातना भोगतात असा ब्रह्मसूत्रांत सिद्धान्त आहे (ब्र. सू. ३-१-१३). म्हणजे त्यांना सुखच मिळत नाही असा अर्थ.

**शुक्लकृष्णे गती ह्येते जगतः शाश्वते मते। एकया यात्यनावृत्तिमन्ययावर्तते पुनः॥ २६॥**

**अर्थ**—शुक्ल म्हणजे ज्ञानप्रकाशरूप व कृष्ण म्हणजे अज्ञान अंधःकाररूप, अशा ह्या दोन जगाच्या शाश्वत गती आहेत. पहिल्या गतीने पुरुष पुनः संसारांत येत नाही व दुसऱ्या गतीने मनुष्य संसारांत येतो.॥ २६॥

**ऐसिया अनादि या दोन्ही वाटा।एकी उजू एकी अव्हांटा।म्हणऊनि बुद्धिपूर्वक सुभटा।दाविलिया तुज॥ २३८॥**
**कां जे मार्गामार्ग देखावे। साच लटिकें वोळखावें। हिताहित जाणावें। हिताचिलागीं॥ २३९॥**
**पाहें पां नाव देखतां बरवी।कोणी आड घाली काय अथावीं।कां सुपंथ जाणोनियां अडवीं।रिगवत असे॥ २४०॥**
**जो विष अमृत वोळखे। तो अमृत काय सांडूं शके। तेविं जो उजू वाट देखे। तो अव्हांटा न वचे॥ २४१॥**
**म्हणोनि फुडें। पारखावें खरें कुडें। पारखिलें तरी न पडे। अनवसरें कहीं॥ २४२॥**
**एऱ्हवीं देहांतीं थोर विषम।या मार्गाचें आहे संभ्रम।जन्में अभ्यासिलियाचें हन काम।जाईल वायां॥ २४३॥**
**जरी अर्चिरादि मार्गु चुकलिया।अवचटें धूम्रपंथी पडलिया।तरी संसारपाथी जुंतलिया।भंवताचि असावें॥ २४४॥**
**हे सायास देखोनि मोठे।आतां कैसेनि पां एकवेळ फिटे।म्हणोनि योगमार्ग गोमटे।शोधले दोन्ही॥ २४५॥**
**तंव एकें ब्रह्मत्वा जाइजे। आणि एकें पुनरावृत्ती येइजे। परि दैवगत्या जो लाहिजे। देहांतीं जेणे॥ २४६॥**

**अर्थ**—अशा दोन अनादि वाटा आहेत. एक ब्रह्माकडे जाणारी सरळ वाट आहे व दुसरी ब्रह्माला सोडून संसाराकडे जाणारी आडवाट आहे. म्हणून अर्जुना! मुद्दाम तुला त्या सांगितल्या आहेत.॥ २३८॥ कारण आपल्या हिताकरितांच परमेश्वरप्राप्तीचा मार्ग कोणता व संसारप्राप्तीचा मार्ग कोणता हें पाहिलें पाहिजे. खरें काय? खोटें काय? हें ओळखिलें पाहिजे व आपलें हित कशांत आहे व अहित कशांत आहे, हे जाणलें पाहिजे.॥ २३९॥ हे पहा अर्जुना! चांगली नाव आहे. असें कळल्यावर कोणीहि, बाजूला असलेल्या अथांग पाण्यांत, उडी टाकील काय? किंवा राजमार्ग सोडून कोणी आडरानाने जाईल काय?॥ २४०॥ जो हें विष होय व हें अमृत होय, असें ओळखतो तो अमृत टाकून देईल काय? याप्रमाणे जो, सरळ मार्ग कोणता हें जाणतो, तो आडमार्गाने जात नाही.॥ २४१॥ म्हणून खरें काय व खोटें काय, तें स्पष्ट जाणून घ्यावें. असें जो स्पष्ट पाहून घेतो त्याला अकालाचा प्रश्नच राहत नाही.॥ २४२॥ नाही तर मरणाचे वेळीं, या धूम्रमार्गांतील भ्रांतीचें मोठें संकट असतें आणि जन्मभर केलेला अभ्यास वायां जातो.॥ २४३॥ जर अर्चिरादि मार्ग चुकला व अकस्मात् धूम्रमार्गाची वाट लागली, तर संसारमार्गांत पुरुष

जुंपला जाऊन, त्याला सारखे जन्ममरणाचे फेर भोगावे लागतात. ॥ २४४ ॥ त्याप्रमाणे धूम्रमार्गाने मोठे कष्ट आहेत व ते एकदांचे कसें चुकतील म्हणून या दोन्ही मार्गांचा विचार केला आहे. ॥ २४५ ॥ त्यांत एका मार्गाने जाणारा पुरुष ब्रह्मस्वरूपाला मिळतो आणि दुसऱ्या मार्गाने जाणारा पुरुष संसारांत येतो. पण हें ब्रह्मस्वरूपाला येणें किंवा संसारांत येणें, मरणाचे वेळीं दैवाने जो मार्ग मिळेल त्यावर अवलंबून आहे. ॥ २४६ ॥

**नैते सृती पार्थ जानन्योगी मुह्यति कश्चन। तस्मात्सर्वेषु कालेषु योगयुक्तो भवार्जुन॥ २७॥**

**अर्थ**—हे दोन मार्ग अशा प्रकारें अनिश्चित आहेत असें जाणून विचार करणारा योगी, मोह पावत नाही. म्हणून अर्जुना! आत्मस्वरूपाचा विचार. करून, सदा सर्वदा तेथे चित्तवृत्ति स्थिर कर. ॥ २७ ॥

**ते वेळीं म्हणितलें हें नव्हें। वायां अवचटें काय पावे। देह जाऊनि वस्तु होआवें। मार्गेंच कीं॥ २४७॥**
**तरी आतां देह असो अथवा जावो। आम्ही तों केवळ वस्तूचि आहों। कां जे दोरीं सर्पत्व वावो। दोराचिकडुनी॥ २४८ ॥**

**अर्थ**—तेव्हा देव म्हणतात, अर्जुना! यांत अर्थ नाही. व्यर्थ अनिश्चितपणाने काय प्राप्ति होणार? देह सोडून या अर्चिरादि मार्गाने ब्रह्मस्वरूपच व्हायचें ना!॥ २४७ ॥ ज्याप्रमाणे दोरी कळून आली असतां, दोरीवरील सर्प मिथ्या ठरतो. (त्याप्रमाणे आपण केवळ ब्रह्मस्वरूपच आहों असें ज्ञान झाल्यानंतर देहाचें मिथ्यात्व अनुभवाला येतें). देह असो की जावो, आम्ही केवळ ब्रह्मस्वरूपच आहों. ॥ २४८ ॥

**गूढार्थदीपिका**—सगुण भगवंताची भक्ति करणाऱ्या योग्याला मी सच्चिदानंदरूप आहे व देहादिक पदार्थ खोटे आहेत, असें व्यतिरेकपूर्वक जेव्हा आत्मज्ञान होतें, तेव्हाच त्याचें देहावरील प्रेम नाहिसें होऊन, तो देहाची काळजी करीत नाही.

**मज तरंगपण असे का नसे। ऐसें हें उदकासी कहीं प्रतिभासे। तें भलतेव्हां जैसें तैसें। उदकचि कीं॥ २४९ ॥**
**तरंगाकारें न जन्मेचि। ना तरंगलोपें न निमेचि। तेविं देहीं जे देहेंचि। वस्तु जाहले॥ २५०॥**

**अर्थ**—मी आतां तरंगरूप झालों किंवा मी आता तरंगरूप नाही, असें पाण्याला कधी ज्ञान होतें काय? कारण तें केव्हाहि जसेंच्या तसें पाणीच असतें. ॥ २४९ ॥ पाणी तरंगाकार झालें तरी (तरंग पाणीच असल्यामुळे व तें तरंगाकार होण्यापूर्वीहि असतें म्हणून) तरंगरूपानेहि पाण्याचा जन्म मानतां येत नाही. किंवा (तरंग नाहिसा झाला असतां पाणी असतेंच म्हणून) तरंगाच्या लोपाने पाण्याचा नाश मानतां येत नाही. त्याप्रमाणे दुसऱ्याला देहधारी दिसत असले तरी स्वत: अनुभवाने जे देहासह ब्रह्मस्वरूप झाले. ॥ २५० ॥

**गूढार्थदीपिका**—पुढे एक अखंड अद्वैत परब्रह्मच आहे. त्यावांचून सत्य किंवा मिथ्या, किंवा उत्पन्न होणारें व नाश पावणारें, असें दुसरें काहीच नाही; अशा उपपत्तीने देहादिक दृश्य देखील परब्रह्माहून वेगळें नसून, परब्रह्मस्वरूप आहेत, असा अन्वयज्ञानाचा अनुभव येतो.

**आतां शरीराचें तयाचिया ठाईं। आडनांवही उरले नाहीं। तरी कोणें काळें काई। निमे तें पाहें पां॥ २५१ ॥**

**अर्थ**—आतां त्याचे ठिकाणीं देहाचें आडनांवहि उरत नाही; तर मग केव्हा काय नाहिसें होतें, याचा, अर्जुना! विचार कर. ॥ २५१ ॥

**गूढार्थदीपिका**—ब्रह्मवस्तु अविनाशी असल्यामुळे ती जन्मत नाही व नाश पावत नाही. अशी ब्रह्मवस्तूच देहासह आपण आहों, असा अनुभव आल्यानंतर नाशाची कल्पनाच नाहिशी होते.

**मग मार्गाते कासया शोधावे। कोणें कोठूनि कें जावें। जरी देशकालादि आघवें। आपणचि असिजे॥ २५२ ॥**

**अर्थ**—आपण ब्रह्मस्वरूप असून, देह, देश, काल, इत्यादि सर्व जर ब्रह्मस्वरूप आहेत, तर मग ब्रह्मप्राप्तीच्या मार्गाचा विचार कशाला करायला पाहिजे आणि त्या मार्गाने कोण, कोठून व कोठें जाणार?॥ २५२ ॥

**आणि हां गा घटु जे वेळीं फुटे। ते वेळीं तेथिंचे आकाश लागे नीटे वाटे। वाटा लागे तरि गगना भेटे। एऱ्हवीं चुके॥ २५३ ॥**
**पाहें पां ऐसें हन आहे। कीं तो आकारुचि म्हणों जाये। येर गगन तें गगनींचि आहे। घटत्वाहि आधीं॥ २५४ ॥**
**ऐसिया बोधाचेनि सुरवाडें। मार्गामार्गाचें सांकडें। तया सोहंसिद्धां न पडे। योगियांसी॥ २५५ ॥**

**अर्थ**—बा अर्जुना! जेव्हा घट फुटतो तेव्हाच, त्यांतील आकाश बाहेरच्या आकाशाशीं मिळण्याच्या नीट वाटेला लागते; नाही तर तें बाहेरच्या आकाशांत मिळत नाही, असें आहे की, घट फुटला असता, घटाचा नुसता आकारच नाहिसा होतो, बाकी घटांतील आकाश, बाहेरच्या आकाशाशीं, घट फुटण्यापूर्वीच मिळालेलें असतें. याचा विचार कर. ॥ २५३-२५४ ॥ एक सच्चिदानंद परब्रह्मच आहे, त्यावांचून दुसरे कांहीच नाही, म्हणून माझें त्या परब्रह्माशीं मूळचेंच ऐक्य आहे, म्हणजे मीच परब्रह्म आहे. असा उत्तम बोध ज्याला झाला आहे. अशा ज्ञानयोग्याला अर्चिरादि मार्गाचें संकट पडत नाहीं. ॥ २५५ ॥

**गूढार्थदीपिका**—एकदेशीय परब्रह्माचे ज्ञान ज्या योग्यांना आहे, तेच अर्चिरादि मार्गांने जाणारे असल्यामुळे, त्यांना मार्गामार्गाची काळजी घ्यावी लागते. पण सर्वव्यापक अद्वैत परब्रह्माचें ज्यांना ज्ञान झाले आहे. अशा व्यापक ब्रह्मज्ञान्याला "**न तस्य प्राणा उत्क्रामन्ति। ब्रह्मैव सन् ब्रह्माप्येति**" (बृ. उ. ४-४-६) त्यांचे प्राण कोठे जात नाहीत, येथेच लीन होतात व ते मूळचे ब्रह्मस्वरूप असलेले ब्रह्मस्वरूपच होऊन राहतात असें श्रुतीने सांगितलें आहे.

**याकारणें पंडुसुता। तुवां होआवें योगयुक्ता। येतुलेनि सर्वकाळी साम्यता। आपणपां होईल॥ २५६ ॥**
**मग भलतेथ भलतेव्हां। देहबंधु असो अथवा जावा। परि अबंधा नित्य ब्रह्मभावा। विघड नाहीं॥ २५७ ॥**
**तो कल्पादि जन्मा नागवे। कल्पांतीं मरणें नाप्लवे। माजि स्वर्गसंसाराचेनि लाघवें। झकवेना॥ २५८ ॥**
**येणें बोधें जो योगी होये। तयासीचि या बोधाचेंचि नीटपण आहे। कां जे भोगातें पेलूनि पायें। निजरूपा ये॥ २५९ ॥**
**पैं गा इंद्रादिकां देवां। जयां सर्वस्वें गाजती राणिवा। तें सांडणें मानूनि पांडवा। डावली जो॥ २६० ॥**

**अर्थ**—म्हणून अर्जुना! तूं योगयुक्त व्हावें. योगयुक्त झालास की सदासर्वदा तुझें समब्रह्माशीं आपोआप ऐक्य होऊन राहील. ॥ २५६ ॥ मग कोठेहि व केव्हाहि, देह जावो कीं राहो, तुझ्या देहादि उपाधीरहित अखंड अविनाशी ब्रह्मस्थितीचा कधी भंग होणार नाही. ॥ २५७ ॥ हा अखंड ब्रह्मभाव कल्पादि जन्मत नाही, कल्पाच्या नाशाने नाश पावत नाही आणि मध्ये स्वर्गसंसाराच्या भासाने फसत नाही. ॥ २५८ ॥ अशा ज्ञानाने जो ज्ञानयोगी झाला त्यालाच या ज्ञानाचा उत्तम उपयोग होतो. कारण तो विषयभोगाला पायाने लोटून देऊन आपल्या मूळच्या ब्रह्मस्वरूपाला प्राप्त होतो. ॥ २५९ ॥ जें इंद्रादिक देवांचें सर्वस्वी राज्य म्हणून प्रसिद्ध आहे तें त्याज्य समजून जो दूर लोटतो. ॥ २६० ॥

**वेदेषु यज्ञेषु तपःसु चैव दानेषु यत्पुण्यफलं प्रदिष्टम् । अत्येति तत्सर्वमिदं विदित्वा योगी परं स्थानमुपैति चाद्यम्॥ २८ ॥**

*ॐतत्सदिति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे अक्षरब्रह्मयोगो नामाष्टमोऽध्यायः॥ ८ ॥*

**अर्थ**—ज्याचें चित्त भगवंताचे ठिकाणीं स्थिर झालें आहे तो योगी, हें वर सांगितलेलें सर्व जाणून वेदाध्ययनाने, यज्ञाने, तपाने, दानाने जें पुण्यफळ मिळतें म्हणून. शास्त्रांत सांगितलें आहे, तें सर्व मार्ग टाकून जातो आणि श्रेष्ठ व मूळ कारणरूप असें जें ब्रह्मपद, त्याला प्राप्त होतो. ॥ २८ ॥

**जरी वेदाध्ययनाचें जालें। अथवा यज्ञाचें शेतचि पिकलें। कां तपोदानांचे जोडलें। सर्वस्व हन जें॥ २६१ ॥**
**तया आधवयांचि पुण्याचा मळा। भारु आंतौनि जया ये फळा। जें परब्रह्मा निर्मळा। सांठि न सरे॥ २६२ ॥**
**जें नित्यानंदाचेनि मानें। उपमेचा कांटाळां न दिसे सानें। पाहा पां वेदयज्ञादि साधनें। जया सुखा॥ २६३ ॥**
**जें विटे ना सरे। भोगितयाचेनि पवाडें पुरे। पुढती महासुखाचें सोयरें। भावंडचि॥ २६४ ॥**
**ऐसें दृष्टीचेनि सुखपणें। जयासी अदृष्टाचें बैसणें। जें शतमखींही आंगवणें। नोहेचि एका॥ २६५ ॥**
**तयातें योगीश्वर अलौकिकें। दिठीचेनि हाततुकें। अनुमानिती कौतुकें। तंव हळुवट आवडे॥ २६६ ॥**
**मग तया सुखाची किरीटी। करूनियां गा पाउठी। परब्रह्माचिये पाठीं। आरूढती॥ २६७ ॥**

**अर्थ**—जरी वेदाध्ययनाचें पुण्य प्राप्त झालें किंवा यज्ञानुष्ठानरूप पुण्याचें शेतच पिकलें अथवा तपदान यांच्यापासून उत्पन्न होणारें सर्व पुण्य प्राप्त झालें. ॥ २६१ ॥ या सर्व पुण्यांचा मेळ होऊन, त्या पुण्याच्या मेळाव्यांचे आंतून भरभराटून, जें फळ येईल, तें शुद्ध अशा परब्रह्माच्या प्राप्तीच्या लाभाची बरोबरी करूं शकत नाही. ॥ २६२ ॥ जें परब्रह्माच्या नित्यानंदाच्या मानाने पाहतां, उपमेच्यां तराजूत कमी भरणार नाही आणि ज्या सुखाच्या प्राप्तीकरिता

देवयज्ञादि साधने सांगितलीं आहेत. ॥ २६३ ॥ ज्या सुखाचा वीट येत नाही किंवा जें संपत नाही. भोगणाऱ्याची जितकी इच्छा असेल तितकें तें भोगतां येतें. पुढती म्हणजे आणखी परब्रह्माचें जें महासुख, त्याचें हें सुख सोयरें किंवा भावंड म्हणतां येईल. ॥ २६४ ॥ जें सुख दृष्टविषयसुखाचे अपेक्षेने अदृष्ट किंवा मेल्यावर मिळणारें सुख, अशा संज्ञेस प्राप्त झालें व जें सुख एखाद्या शंभर यज्ञ करून झालेल्या इंद्रालाहि प्राप्त होत नाही. ॥ २६५ ॥ जें सुख योगेश्वरांनी अलौकिक ज्ञानदृष्टिरूप हाताने सहज तोलून पाहिलें, तेव्हा त्यांना तें कमी प्रतीचें वाटलें. ॥ २६६ ॥ अर्जुना! म्हणून मग त्या अशा ब्रह्मलोकांतील सुखाची पायरी करून योगी परब्रह्मस्थितीवर आरूढ होतात. ॥ २६७ ॥

**गूढार्थदीपिका**—येथें महासुखाचें म्हणजे ब्रह्मसुखाचें भावंड म्हणून ज्या सुखाचें माऊलींनी वर्णन केलें आहें. तें स्वर्गसुख नसून ब्रह्मलोकांतील सुख होय. ब्रह्मलोक व ब्रह्मलोकांतील सुख यापेक्षां स्वर्गलोकांतील सुख कितीतरी अनित्य आहे, हें मागें सांगितलेंच आहे.

ब्रह्मलोकांतील सुखच महाकल्पपर्यंत विटत नाही. शंभर यज्ञ करणारा स्वर्गाधिपति इंद्र, पण अशा इंद्रालाहि ब्रह्मलोकांतील सुख प्राप्त होत नाही, आणि हेंच ब्रह्मलोकांतील सुख भोगून आणि अर्चिरादि मार्गाने ब्रह्मलोकांत गेलेले योगी, तेथूनच ब्रह्मदेवाबरोबर मुक्त होतात, असें सांगितलें असल्यामुळे ब्रह्मलोकांतील सुखच परब्रह्मरूप मोक्षसुखाची पायरी होऊं शकते.

स्वर्गलोकांतून कोणी मुक्त होऊं शकत नाही. स्वर्गलोकांत गेलेले योगी पुनः परत येतात हें मागे सांगितलेंच आहे व पुढेहि ''त्रैविद्या मां सोमपाः पूतपापा'' या श्लोकाने सांगितलें आहे.

पुण्यकर्माने प्राप्त होणारें श्रेष्ठांत श्रेष्ठ फळ स्वर्ग नसून, ब्रह्मलोक आहे, असें श्रुतींत सांगितलें आहे.

त्याचप्रमाणे तैत्तिरीय उपनिषदांतील ब्रह्मानंदवल्लीत (तै, उ० २-८) आनंदाची मीमांसा केलीं आहे, तींत ब्रह्मानंदाला लागून ब्रह्मानंदाचे पूर्वी ब्रह्मदेवाचा म्हणजे ब्रह्मलोकाचा आनंद सांगून, तोच ब्रह्मानंदाची पायरी किंवा भावंड होण्यास योग्य आहे.

इंद्राच्या स्वर्गलोकांतील आनंद त्यापेक्षा कितीतरी पटीने कमी दाखविला आहे.

**ऐसें चराचरैकभाग्य। जें ब्रह्मेशां आराधनायोग्य। योगियांचें भोग्य। भोगधन जें ॥ २६८ ॥**
**जो सकळ कळांची कळा। जो परमानंदाचा पुतळा। जो जिवाचा जिव्हाळा। विश्वाचिया ॥ २६९ ॥**
**जो सर्वज्ञतेचा वोलावा। जो यादवकुळींचा कुळदिवा। तो श्रीकृष्ण जी पांडवा-। प्रती बोलिला ॥ २७० ॥**

**अर्थ**—याप्रमाणे (पूर्ण ब्रह्म असल्यामुळे) जें स्थावर जंगम ब्रह्मांडाचें एक थोर भाग्यच होय, जें ब्रह्मा व शंकर यांनाहि उपास्य आहे आणि जें योग्यांना भोगण्याजोगें योगरूप धन होय. ॥ २६८ ॥ जो सर्व कळांचीहि कळा आहे, जो परमानंदाची मूर्ति आहे व या विश्वांतील सर्व जीवांचा जो जिव्हाळा आहे. ॥ २६९ ॥ जो सर्वज्ञतेचें जीवन आहे, जो यादवकुळाचा कुलदीपक आहे, तो भगवान श्रीकृष्ण, अर्जुनाशीं याप्रमाणे बोलला. ॥ २७० ॥

**गूढार्थदीपिका**—येथे श्रीज्ञानेश्वर माऊलींनी परब्रह्माचें, चराचरैकभाग्य, ब्रह्माशंकर यांना सेव्य, सर्व कळांची कळा व परमानंदमूर्ति असें वर्णन करून, तोच भगवान श्रीकृष्ण होय, असें म्हणून भगवान श्रीकृष्णाचें पूर्ण ब्रह्मत्व पुनः प्रतिपादिलें आहे.

**ऐसा कुरुक्षेत्रींचा वृत्तांतु। संजयो रायासी असे सांगतु। तेचि परियसा पुढां मातु। ज्ञानदेव म्हणे निवृत्तीचा ॥ २७१ ॥**

**इति श्रीज्ञानदेवविरचितायां भावार्थदीपिकायां अष्टमोऽध्यायः ॥ ८ ॥**

**अर्थ**—श्रीज्ञानेश्वर महाराज म्हणतात असा कुरुक्षेत्रांत झालेला सर्व वृत्तांत संजय धृतराष्ट्राला सांगत आहे. तोच पुढील वृत्तान्त तुम्ही ऐका. ॥ २७१ ॥

**याप्रमाणे श्रीसद्गुरु कृपेने श्रीज्ञानेश्वरीच्या आठव्या अध्यायाचा अनुवाद पूर्ण झाला. तो त्यांचे चरणीं समर्पण असो!**



## समारोप

ब्रह्म म्हणजे काय, अध्यात्म म्हणजे काय, कर्म कशाला म्हणतात अधिभूत, म्हणजे काय, अधिदैवत तें कोणतें, अधियज्ञ कोण आहे व मरणाचे वेळी भगवंताची आठवण कशी राहील, असे सात प्रश्न, अर्जुनाने भगवंताला विचारलें. त्या प्रश्नांचे या अध्यायांत भगवंतांनी उत्तर दिलें आहे. आपल्या प्रियभक्त अर्जुनाचें भगवंताला अत्यंत प्रेम असल्यामुळे अर्जुनाचीं कोणतीहि इच्छा सफल व्हावयाला वेळच लागत नसे. किंबहुना अर्जुनाच्या अंत:करणांतील इच्छा जाणून भगवान आपणच त्याच्या शंकांचें उत्तर देऊन त्याचें समाधान करीत.

सर्व नामरूपात्मक प्रपंच कार्यरूप म्हणजे उत्पन्न होणारा व नाश पावणारा आहे; म्हणून तो अनित्य व खोटा आहे. नित्यता, अनित्यता ही नित्यतेच्या अपेक्षेनेच राहत असते. नित्यता म्हणजें सदा सर्वदा कोठेहि व केव्हाहि असणें होय. किंवा ज्या अस्तित्वाला अमुक काळीं आहे, अमुक ठिकाणीं आहे व ही अमुक आहे अशी मर्यादा नसते त्यालाच नित्य अस्तित्व म्हणतां येते. अशा व्यापक अस्तित्वाचे ठिकाणींच नित्यता असते. हें नित्य अस्तित्व स्वत:सिद्ध अविनाशीच असूं शकतें. तें शून्यरूप किंवा अभावरूप असूं शकत नाही. किंबहुना शून्यभाव किंवा अभाव देखील त्या अस्तित्वाचे आश्रयानेच भासतो. ही जी नित्य अस्तित्व किंवा सत्ता आहे, तिच्यावरच सर्व नामरूपाचा भास व त्याचा उत्पत्ति-नाश किंवा बदल भासत असतो. या नित्यसत्तेवरच सर्व जगत् सांठविणारी आकाशरूप पोकळीची कल्पना झाली आहे; म्हणून ती आकाशाच्या पूर्वी आहे. या नित्यसत्तेला परब्रह्म म्हणतात. या नित्यसत्तारूप परब्रह्मांत नित्य अस्तित्व, नित्य ज्ञान व नित्य आनंद हे तिन्ही धर्म राहतात. कारण ते एकमेकांना सोडून बुद्धीला ग्रहण करतां येत नाहीत, म्हणून सत्तामात्र सच्चिदानंद स्थितीला परब्रह्म म्हणतात.

उत्पत्तिरहित व नाशरहित अशा या सत्तामात्र सच्चिदानंद परब्रह्माचा प्रत्येक नामरूपाने किंवा शरीराने मर्यादित केलेला प्रत्येक शरीरांत जो स्वाभाविक भाव आहे, ज्याला प्रत्यगात्मा म्हणतात—त्याला अध्यात्म म्हणतात.

निर्मल आकाशांत ज्याप्रमाणे अभ्रे उत्पन्न होतात, त्याप्रमाणे उत्पत्तिनाशरहित अशा निर्विकल्प सच्चिदानंद परबह्माचे ठिकाणीं महदादि कार्यसृष्टीची जी उत्पत्ति दिसते त्या उत्पत्तीला कर्म म्हणतात. अशी अनंत सृष्टि उत्पन्न झालेली भासत असली तरी परब्रह्माच्या अमर्याद अफूट अद्वैतसत्तेच्या सृष्टीने पाहतां एका परब्रह्मावांचून जडविनाशी सृष्टीचें अस्तित्वच मानतां येत नाही; म्हणून ती सर्व काल्पनिक आहे, सृष्टीची काल्पनिक उत्पत्ति ही जीवाला काल्पनिक न वाटतां खरी वाटते, म्हणूनच त्याला उत्पत्तिरूप कर्माचा भास होतो.

ज्या नामरूपाचे ठिकाणीं उत्पत्तिनाश दिसतात त्या नामरूपाला जीव भूतसृष्टि समजतो. वास्तविक हीं नामरूपें परब्रह्माच्या सत्तेवरच भासत असल्यामुळे व त्यांना परब्रह्माचीच सत्ता असल्यामुळे ते परब्रह्माहून निराळे नसून ब्रह्मस्वरूपच आहेत; पण जीव मात्र त्यांना परब्रह्माहून निराळे समजतो व त्यांचे ठिकाणीं भूतसृष्टीची कल्पना करतो, म्हणून त्यांना अधिभूत संज्ञा प्राप्त झाली आहे.

देहामध्ये सुखदु:खाचा भोग घेणारा जो जीव त्याला अधिदैव ही संज्ञा आहे. खऱ्या दृष्टीने पाहतां जीव पूर्ण ब्रह्मरूपच आहे, पण आपल्या विवक्षित नामरूपाचा अभिमान धरून आत्मस्वरूपाला तो विसरला आहे.

आत्मस्वरूपाला विसरून मी म्हणजे देह असा देहाशीं ऐक्य करून ऐक्याहंकार वागविणाऱ्या जीवाचा देहभाव, ज्या भगवंताच्या सगुण स्वरूपाचे ठिकाणी चित्तवृत्ति स्थिर झाली असतां, नि:शेष नाहिसा होतो, तो मी सगुण परमात्मा या शरीरांत अधियज्ञ आहे असें भगवान म्हणतात.

सारांश कर्म, आधिभूत, अधिदैव, हे भाव सच्चिदानंद परब्रह्माचे ठिकाणी जीवाने भ्रांतीनेच कल्पिले आहेत,

बाकी राहिलेले ब्रह्मभाव, अध्यात्मभाव व अधियज्ञ हे तीन भाव स्वत: उत्पत्तिनाशरहित असून त्यांचे उत्पत्तिनाश सांगितले नाहीत, म्हणून ते नित्य आहेत हें सिद्ध होते. त्यांच्या ठिकाणीं अहंकार नाही व अहंकाराने होणारं आत्मविस्मृतिरूप अविद्याहि नाही. ते केवळ सच्चिदानंदरूपच आहेत; म्हणूनच ब्रह्म, अध्यात्म म्हणजे आत्मस्वरूप किंवा अधियज्ञ म्हणजे सगुण रामकृष्णादिस्वरूप या तीनपैकी कोठेहि चित्तवृत्ति स्थिर झाली असतां, जीव आत्मविस्मृतिरूप अविद्या व देहभाव या विरहित होऊन, मुक्त होतो-म्हणजे ब्रह्मरूपांत मिळतो, त्यांतल्यात्यांत अधियज्ञाचे ठिकाणीं चित्तवृत्ति स्थिर करून ब्रह्मरूप होणें सुलभ व निश्चित आहे.

श्रीज्ञानेश्वर माऊली म्हणतात हा अधियज्ञ भगवान श्रीकृष्ण सर्व जीवाचें विश्रांतिस्थान असून पूर्ण नैष्कर्म्य-सुखाचा म्हणजे ब्रह्मसुखाचा सांठा आहे, म्हणून जेवढे कांही जीवाकडून कर्मरूप यज्ञ होतात, ते त्यांनी त्याच्या ठिकाणीं चित्तवृत्ति स्थिर करून केले असतां, त्याच्या ध्यानाने त्याला समर्पण होऊन, समर्पण करणारा जीव नैष्कर्म होतो—म्हणजे केवळ ज्ञानरूप ब्रह्म होऊन राहतो—व तेथे तें ज्ञान, मायेचा नि:शेष नाशकरून, तेंहि नाहीसे होतें.

भगवान् श्रीकृष्ण शुद्ध निरुपाधिक ब्रह्मस्वरूप असल्यामुळेंच मरणाचे वेळी त्याचे स्मरण जर केले, तर त्या स्मरणाने त्याचें जे ध्यान घडतें त्या ध्यानाने तो जीव श्रीकृष्णस्वरूपांत मिळतो. प्रथमपासून कर्मयोगीभक्त भगवंताचे ठिकाणीं चित्त ठेवूनच भगवंताला सर्व कर्मे समर्पण करीत असल्यामुळे मरणकाळपर्यंत त्याला भगवंताचें ध्यान दृढ होतें व मरणसमयीं पूर्व अभ्यासामुळे भगवंताचे त्याला स्मरण व ध्यान कायम राहतें; म्हणून तो देह सोडल्याबरोबर भगवंतांत मिळतो. ज्या वस्तुचें सदा समर्पण व ध्यान घडतें त्या वस्तूला जीव प्राप्त होतो हा नियम आहे, म्हणून भगवान म्हणतात माझें सदा स्मरण करावें. त्या स्मरणाने मन व बुद्धि सहज भगवंताला अर्पण होतात, म्हणजे मनानें भगवंताचें स्मरण व बुद्धीने भगवंताचें ध्यान घडत जातें. मनांत भगवंताचें ध्यान अखंड राहण्याकरिता बाहेर इंद्रियांद्वारा राहाटणाऱ्या मनाचे सर्व इंद्रियव्यापार भगवत्परायण झाले पाहिजेत.

मरणाच्या अत्यंत विकल स्थितींतहि भगवान आपल्या भक्ताला सांभाळतो व आपली प्राप्ति करून देतो. पण अभक्तयोग्याला मात्र काळशुद्धि पाहून प्राण सोडला असतांच ब्रह्मलोक मिळतो, नाही तर परत संसारांत येतो. तसेच परब्रह्मावांचून दुसरे कांहीच नसल्यामुळे मीहि सच्चिदानंद परब्रह्मस्वरूपच आहे त्याहून निराळा नाही असे ज्याचे ज्ञान अत्यंत दृढ आहे, त्याचे प्राणहि ब्रह्मलोकास न जातां परब्रह्मांत लीन होतात.

ज्ञानी पुरुषाला निर्गुण परब्रह्माची प्राप्ति होते हें येथे सांगून, पुढील अध्यायांत भक्तांना परब्रह्माची प्राप्ति कशी सुलभ होते हें भगवान व माऊली सांगतील.

**श्रीमद्सद्गुरु श्रीज्ञानेश्वरमहाराजार्पणमस्तु**



॥ श्रीज्ञानेश्वर माउली समर्थ ॥

# अध्याय नववा

**अवतरणिका—सगुणस्वरूपाची भक्ति न केल्यास सांख्ययोगी व पांतजलयोगी यांना मार्गामार्गाचें सांकडे पडते, पण माझें सगुणस्वरूपहि पूर्ण ब्रह्म आहे हें जाणून त्याची भक्ति करणाऱ्यांना मार्गामार्गाचे सांकडे पडत नाही व ते देह सोडण्यापूर्वीच परब्रह्मस्वरूप होतात; म्हणून माझ्या सगुणस्वरूपाची भक्ति करणें चांगलें, असा आशय, मागील आठव्या अध्यायांत भगवंतांनी व्यक्त केला आणि या भक्तिधर्माची सर्वश्रेष्ठता अर्जुनाला पटवून देऊन, अर्जुनाने त्या मार्गाचाच अवलंब करावा, म्हणून भगवंतांनी या नवव्या अध्यायांत भक्तिमार्गाचें किंवा एकान्तधर्माचें विवेचन केलें आहे.**

महाभारतांतील शांतिपर्वात एक नारदनारायण संवाद आला आहें. त्यांत भगवंतांनी नारदाला तीन प्रकारचे धर्म सांगितले आहेत.

(१) संन्यासियांचा यतिधर्म (२) परमेश्वराची आज्ञा समजून परमेश्वरप्रीत्यर्थ निष्कामचित्ताने यज्ञादिक दैव व पितृ कर्म करणें व (३) एकान्तधर्म; असे हे तीन धर्म होत. हेच धर्म भगवद्गीतेंत, भगवान श्रीकृष्णांनी अर्जुनाला सांगितले आहेत असेंहि त्यांत म्हटलें आहे. पण "यतीनां चापि यो धर्मः स ते पूर्वं नृपोत्तम। कथितो हरिगीतासु समासविधिकल्पितः" (शां. प. अ. ३४८, श्लो. ५३) "एवमेष महान् धर्मःसते पूर्वं नृपोत्तम। कथितो हरिगीतासु समासविधिकल्पितः" (शां. प. अ. ३४६-११) या श्लोकांनी संन्यासियांचा यतिधर्म व मर्यादित कर्मयोग, हे दोन्ही संक्षेपाने सांगितले आहेत, असें म्हटलें आहे.

तिसरा जो एकान्तधर्म, तो सांगतांना "समूपोढेष्वनीकेषु कुरुपांडवयोर्युधे। अर्जुने विमनस्के च गीता भगवता स्वयम्" (श. पं. अ. ३४८-८) कौरव पांडवांच्या युद्धाचा उल्लेख करून त्या प्रसंगी विमनस्क व युद्धापासून पराङ्मुख झालेल्या अर्जुनाला, भगवान् श्रीकृष्णांनी हा एकान्तधर्म सांगितला असें म्हटलें आहे. संक्षेपाने तो सांगितला, असें म्हटलें नाही.

वक्त्याला ज्या विषयाचा ठसा श्रोत्यांच्या मनांवर बिंबवावयाचा असतो, त्या विषयाचे निरूपण तो वक्ता सविस्तरपणे करीत असतो व ज्या विषयाचा ठसा श्रोत्यांच्या मनांत उमटवायचा नसतो त्या प्रासंगिक विषयाचें तो ओझरतें किंवा संक्षिप्त निरूपण करीत असतो. हा सर्वांचा अनुभव आहे या अनुभवानुसार भगवंतांनी अर्जुनाला मुख्यतः एकान्त अशा भक्तिधर्माचाच उपदेश केला, असें म्हणावें लागतें.

हा एकान्तधर्म, सृष्टीच्या आरंभी जें कृतयुग असतें त्या कृतयुगांतच प्रवृत्त होतो व त्याचेंच त्या युगांत सर्व लोक अनुष्ठान करीत असतात "ततः प्रावर्तत तदा आदौ कृतयुगं शुभम्। ततो हि सात्वतो धर्मो व्याप्त लोकानवस्थितः" (शां. पं. अ. ३४८-३४) असें या श्लोकांत महाभारतकारांनी म्हटलें आहे.

एकान्तधर्म ज्या विशेषामुळें कर्मयोगाहून व यतिधर्माहून निराळा व श्रेष्ठ मानला जातो ते विशेष या अध्यायांत योग्य प्रसंगी दाखविले जातील.

तत्पूर्वी "माझी भक्ति आणि नामकीर्ती। यांची जननी सत्संगती। तो सत्संग जोडल्या हातीं। विघ्नें न बाधिती साधका"॥ ६३६ ॥ (ए. भा. अ. २८) हा एकान्तधर्म किंवा भक्ति "मुख्यतस्तु महत्कृपयैव"॥ ३८ ॥ (नारदभक्ति सूत्र) संताच्या कृपेशिवाय प्राप्त होऊं शकत नाही हें श्रीज्ञानेश्वर महाराजांनी संतांची स्तुति करून दाखविलें आहे.

**तरी अवधान एकलें दीजे। मग सर्वसुखासि पात्र होइजे। हें प्रतिज्ञोत्तर माझें। उघड ऐका॥ १॥**

**अर्थ**—(श्रीज्ञानेश्वर माऊली सर्व श्रोते मंडळीना उद्देशून म्हणतात की, महाराज!) आपण माझें म्हणणे नुसते अत्यंत लक्ष देऊन ऐकलें की पुरे. तेवढ्यानेच आपल्याला सर्व सुखाची प्राप्ति होईल, असें मी उघड प्रतिज्ञा करून सांगतों. ॥ १ ॥

**गूढार्थदीपिका**—परब्रह्माची प्राप्ति होण्याकरिता ब्रह्मसूत्रभाष्यांत ''आवृत्तिरसकृदुपदेशात्'' (ब्र. सू. ४-१-१) या सूत्राने परब्रह्मस्वरूपाचे वारंवार श्रवण, मनन, निदिध्यासन करावें असें सांगितले आहे. श्रवण, मनन, निदिध्यासनांत श्रवणच मुख्य आहे. जितक्या आवडीने व एकाग्रतेने श्रवण होईल, तितकेंच श्रवणाबरोबर मनन निदिध्यासन दृढ होत जातें; म्हणून श्रीज्ञानेश्वर महाराज येथे ''येकलें अवधान'' द्या असे म्हणत आहेत.

**येकलें अवधान**—अत्यंत आवडीने श्रवण करण्याकरिता एकाग्र केलेलें चित्त ''येकलें अवधान'' होय. चुकल्या पुत्राची शुद्धिवार्ता। जेणें सादरें एके माता। तेणें आदरें हरिकथा। सार्थकता परिसावी. ॥ ५१९ ॥ (ए. भा. अ. २) या ओवींत एकाग्र श्रवणाचें लक्षण केलें आहे. हेंच ''येकलें अवधान'' होय. किंवा श्रवण करतांना लय, विक्षेप, कषाय, रसास्वाद हीं विघ्नें उत्पन्न होत असतात. लय म्हणजे चित्त झोपेंत जाणें. विक्षेप म्हणजे चित्त दुसरीकडे ओढले जाणें, कषाय म्हणजे श्रवणाचा विषय चित्तांत शिरणार नाही असे चित्त अभिमानादिकांनी ताठ किंवा स्तब्ध होणें व रसास्वाद म्हणजे आपल्याला समजतें, आपण धन्य आहो, असें वाटणें. या विघ्नांनी श्रवणाची एकतानता नाहीशी होते. म्हणून ही विघ्नें उत्पन्न होणार नाहीत, अशा रीतीने अवधान देणें याला ''येकलें अवधान'' म्हणतात.

असें अवधान प्रेमपूर्वक श्रवणांतच राहूं शकतें; म्हणून ''येकलें अवधान दीजे'' याचा अर्थ अत्यंत प्रेमाने श्रवण करा असा होतो. अशा प्रकारच्या श्रवणांत तात्काळ मनननिदिध्यासनहि होतें. ''काना वचनाचिये भेटी-। सरिसाचि पैं किरीटी। वस्तु होऊनि उठी। कवणि एक जो''॥ ९९१ ॥ (ज्ञा. अ. १८) माऊलींनी या ओवींतहि असें म्हटले आहे. म्हणजे प्रेमाने श्रवण करणाऱ्याला स्वतंत्र मनननिदिध्यासन करावे लागत नाही.

**सर्व सुखासि**—परब्रह्म सुखस्वरूप असून त्यावांचून दुसरी वस्तुच नाही, म्हणून आपण जेवढें सुख भोगतों, तें सर्व परब्रह्माचेंच सुख होय. ''यस्य कस्यापि योगेन यत्र कुत्रापि दृश्यते। आनंदः स परस्यैव ब्रह्मणः स्फूर्तिलक्षणः'' (स. वे. सि. सा. सं. ६७१) भोगकालीं भोग्यविषयाचे ठिकाणीं चित्तवृत्ति एकाग्र होते व त्या एकाग्रतेमुळें सत्त्वगुणाचा उत्कर्ष होतो, ज्याप्रमाणे निर्मळ पाण्यांत सूर्याचें प्रतिबिंब दिसतें, त्याप्रमाणे विषयाचे ठिकाणीं एकाग्र होऊन सात्विक झालेल्या चित्तांत, आधार असलेल्या सुखरूप परब्रह्माचें सुख प्रतिबिंबित होतें व तें आपण भोगतों. ''सत्त्वप्रधाने चित्तेऽस्मिंस्त्वात्मैव प्रतिबिंबति आनंदलक्षणः स्वच्छे पयसीव सुधाकरः'' (स. वे. सि. सा, सं. ६४०) पण हें ज्ञान नसल्यामुळें आपण भ्रांतीने विषयसुख भोगलें, असें समजतों याप्रमाणें संसारांत भोगलें जाणारें सर्व सुख ब्रह्मसुखच असून, ब्रह्मानुभवांत तें एकवटलेलें अनुभविलें जाते, म्हणून 'सर्व सुख' म्हणजे ब्रह्मसुख असा अर्थ आहे.

किंवा कोणत्याही प्रकारचा दुःखाचा अनुभव न येता सर्व संसारच सुखमय होणें असाहि सर्वसुखाचा अर्थ करतां येतो. ''अवघाचि संसार सुखाचा करीन। आनंदें भरीन तिन्ही लोक'' (ज्ञा. गा. अभंग ८१) अशा या सुखाची प्राप्ति अत्यंत आवडीने व एकाग्रतेने केलेल्या एकट्या श्रवणानेच होईल, असे श्रीज्ञानेश्वर महाराज प्रतिज्ञेने सांगतात.

**परि प्रौढी न बोलें हो जी। तुम्हां सर्वज्ञांचां समाजीं। देयावें अवधान हे माझी। विनवणी सलगीची॥ २॥**

**अर्थ**—परंतु महाराज! तुम्हा सर्वज्ञ संतांच्या समाजापुढे मी आढ्यतेनें बोलत नाही. आपण अवधान द्यावें अशी माझी लडिवाळपणाची विनंति आहे (हे आपण जाणतां)॥ २॥

**गूढार्थदीपिका**—''आतां नमूं संतजन। जे सर्वांगीं चैतन्यघन। जया सगुण निर्गुण समसमान। जे निजजीवन सद्भावा॥ ७॥'' (ए. भा.) ज्यांना परब्रह्माच्या सगुण निर्गुण दोन्ही स्वरूपांचा, ज्ञान व भक्ति यांच्या योगाने पूर्ण अनुभव आला व जे नामरूपासहित सर्व सच्चिदानंदघनच पाहतात त्यांनाच नाथांनी 'संत' संज्ञा दिली

आहे. सच्चिदानंदघन निर्गुण परमात्माच, आपल्या सच्चिदानंदघन स्वरूपाला धरून असलेल्या सर्वज्ञ सर्वशक्तिमत्वादि षड्गुणैश्वर्याने सगुण होतो. असा परमात्मा, ज्ञानभक्तीच्या बळाने ज्यांच्या हृदयांत शिरून राहिला व त्या परमात्म्याशीं ज्यांचे ऐक्य झालें ''तैसे मी होऊनि माझे भक्त। अनन्यभावें मजचि भजत। तैं माझें ऐश्वर्य समस्त। प्रतिबिंबित तयामाजी''॥ ११३४॥ (ए. भा. अ. ११) असे संतहि सगुण परमेश्वराप्रमाणे सर्वज्ञत्वादि षड्गुणैश्वर्यसंपन्न होतात. म्हणून येथे श्रीज्ञानेश्वर माउलींनी ''तुम्हां सर्वज्ञांच्या समाजीं'' असे संबोधिले आहे. एवढेच नव्हे तर ''मुक्तीवरील मागतां भक्ति। श्रीकृष्णाची अवतारशक्ति। मायानियंतृत्वाची पूर्ण स्थिति। उद्धवाचे हाती स्वयें आली''॥ ७७०॥ (ए. भा. अ. २९) ज्ञानानंतर होणाऱ्या भक्तीच्या योगानें संत, परमेश्वरप्रमाणें मायानियंते होतात. असें नाथांनीं म्हटले आहें.

श्रीज्ञानेश्वर महाराज म्हणतात, अशा संतांना माहित नाही असें सांगण्याजोगे कांही राहणे शक्य नाही, म्हणून अवधान द्या, हें माझें बोलणें आढ्यतेचें नव्हे, केवळ लडिवाळपणाची विनंति आहे, हें तुम्ही सर्वज्ञ असल्यामुळें जाणतां ''न करिता व्युत्पत्तींचा श्रम। सकळ शास्त्रार्थ होय सुगम। सत्समागमाचें वर्म। तें हें ऐसें असें॥ ३८॥ जें व्युत्पत्तीने न कळे। तें सत्समागमें कळे। सकळ शास्त्रार्थ आकळे। स्वानुभवेसी''॥ ३९॥ (दासबोध द. ७ स. १) असा तुम्हां संतांच्या सलगीचा महिमा असल्यामुळे मला गीतार्थाचें यथार्थ आकलन व्हावें याकरितां मी आपल्याशीं सलगी करीत आहे.

मग येथे अशी शंका येतें की, श्रीज्ञानेश्वर महाराजांनी श्रोत्यांपुढे निरूपण कशाकरितां केलें?

त्याचें उत्तर असें आहे की, ''पढियंते सदा तेचि। परि भोगी यवी रुचि। म्हणूनि उचितचि। अनुवादु सिद्धु''॥ १३॥ (अमृ. प्र. १०) सत्पुरुषांना परमप्रेमरूप असलेलें परब्रह्मच सदा आवडत असते. सदा आवडणे यालाच परमप्रेम किंवा अवीट प्रेम म्हणतात. ज्याप्रमाणें विषयासक्तजनांना विषयाचें सामान्यत: अवीट किंवा सदा प्रेम असतें, म्हणून ते भोगलेलेच विषय वारंवार भोगत असतात, त्याप्रमाणे भगवंताचें अवीट किंवा सदा प्रेम असलेल्या संतांनाहि वारंवार, भगवंताच्या स्वरूपाची चर्चा करून व भगवंताचे गुणानुवाद गाऊन किंवा श्रवण करून अखंड भगवत्प्रेमांत मग्न असावें असें वाटत असतें.

त्याचप्रमाणे जीवाची अहंकार ही मोठी दृढ उपाधि आहे. त्यामुळें तो आपलेपणा वागवून परमेश्वरापासून भिन्न राहत असतो. अहंकार आहे तोपर्यंत आपलेपणा जात नाही व आपलेपणा आहे तोपर्यंत अहंकार जात नाही. ''तैसा देहाहंकार नाथिला। हा समूळ जयाचा नाशिला। तोचि परमात्मा संचला। आधींचि आहे''॥ ८४॥ (ज्ञाने. अ. ६) अहंकार नाहीसा झाला की जीव परमेश्वरस्वरूप होतो. म्हणून श्रीज्ञानेश्वर महाराजांनी ''म्हणोनि थोरपण पन्हा मांडिजे। एथ व्युत्पत्ति आघवी विसरिजे। जैं जगा धाकुटें होइजे। तैं जवळीक माझी''॥ ३७८॥ (ज्ञा. अ. ९) असे सांगितले आहे.

ही शिकवण प्राप्तपुरुषांच्या ठिकाणीं स्वाभाविक झालेली असते किंवा आंगवळणी पडलेली असते. त्या स्वाभाविक धर्माने संतांची प्रार्थना करून इतर जीवांनी संतांची कृपा कशी संपादन करावी याचा, श्रीज्ञानेश्वर महाराज धडा घालून देत आहेत.

लीनपणाच्या भाषणाने प्रेम उत्पन्न होते व साहंकार भाषेने असलेले प्रेम नाहीसे होते असा सर्वांचा अनुभवहि आहे.

**कां जे लळेयांचे ल्ळे सरती। मनोरथांचे मनोरथ पुरती। जरी माहेरें श्रीमंतें होती। तुम्हांऐसीं॥ ३॥**

**अर्थ**—महाराज! तुमच्यासारखे प्रेमळ व श्रीमंत आईबाप ज्या लाडक्यांना प्राप्त होतात त्यांनी जी जी आळी घ्यावी किंवा जे जे मनोरथ करावे, ती तीं आळी व ते ते त्यांचे मनोरथ सहज पूर्ण होतात.॥ ३॥

**गूढार्थदीपिका**—येथे आळी घेणाऱ्या व मनोरथ करणाऱ्या मुलांचा व ते पूर्ण करणाऱ्या मायबापांचा जो उल्लेख केला आहे, तो विषयाविषयींची आळी घेणारा किंवा विषयाच्या प्राप्तीचे मनोरथ करणाऱ्या मुलाचा व ते पूर्ण करणाऱ्या आईबापांचा उल्लेख नाही. कारण ''जो अमृतासि ठी ठेवी। तो जैसा कांजी न सेवी'' (ज्ञा. अ. २-३६४) अमृताकडे

दृष्टि ठेवणारा जशी कांजीची इच्छा करीत नाही, त्याप्रमाणे अखंड ब्रह्मरस गोडी चाखणारा विषयसुखाकडे कधी ढुंकूनहि पाहत नाही व त्याची इच्छा करणाऱ्याचे तो लाडहि करीत नाही. त्याच्या दृष्टीने लौकिक, नाशिवंत अशी विषयसमृद्धि म्हणजे श्रीमंती नव्हे, तर "तुका म्हणे धन। ज्याचे निज नारायण" (तु. गा. १९३०) "परमार्थ महाधन। जोडी देवाचे चरण" (तु. गा. ३०६४) अनंत ब्रह्मांडाचा स्वामी जो परमात्मा त्याची प्राप्ति हीच संताना अविनाशी म्हणून खरी श्रीमंती वाटत असते.

संत हे अशा श्रीमंतीनेच संपन्न असतात आणि परमेश्वर-प्राप्तीकरिता तळमळणारे व संतांच्या वचनावर विश्वास ठेवणारे जीव हे त्यांना लाडके वाटतात. अशा लाडक्या जीवांनी परमेश्वर प्राप्ति व्हावी म्हणून ज्ञानाची किंवा भक्तीची आळी घेतली असतां किंवा मनोरथ केले असतां, ते सहज केवळ कृपादृष्टीने पुरवूं शकतात, इतके ते समर्थ असतात. "मोक्षाची सोडी बांधी करी"॥ २२०॥ (ज्ञाने. अ. १२), "तो म्हणे तेथ राहे। महाबोधु"॥ ७४॥ (ज्ञाने. अ. ५)

**तुमचेया दिठिवेयाचिये वोलें। सासिन्नले प्रसन्नतेचे मळे। ते साउली देखोनि लोळें। श्रांतु जी मी॥ ४॥**

**अर्थ**—तुमच्या कृपादृष्टीचा ओलावा, माझ्या अंत:करणांत प्राप्त झाल्यामुळे जिकडे तिकडे प्रसन्नतेचे हिरवेगार मळे भरास आले. ती सावली पाहून संसारतापाने तापलेला जो मी, त्या सावलींत आनंदाने लोळत आहे. (म्हणजे तुमच्या कृपादृष्टीमुळे जिकडे तिकडे चित्ताची प्रसन्नताच झाली व त्यामुळे माझा त्रिविधताप नाहीसा झाला असा भाव). ॥ ४॥

**गूढार्थदीपिका**—श्रीगुरुच्या किंवा संतांच्या कृपादृष्टीचें अगाध सामर्थ्य असतें. "जयाचेनि अपांगपातें। बंध मोक्षपणीं आते. ॥ ४॥", "जयाचेनि कृपातुषारें। परतले अविद्येचि मोहिरे॥ १४॥" (अमृ. प्र. २), "तो जयाकडे वास पाहे। तेऊति सुखाची सृष्टी होये"॥ ७४॥ (ज्ञाने. अ. ५) ती कृपादृष्टि झाली असतां त्रिविध तापाला कारणीभूत असलेला संसार मुळींच अस्तित्वांत नाही व एक परमसुखरूप भगवंतच सर्वत्र आहे असा प्रत्यय येऊन, भगवंताचें प्रेम लागते व दु:खाची नि:शेष निवृत्ति होते "त्रिविधतापाची जाहाली बोळवण। देखिल्या चरण वैष्णवांचे" (एक. अभंगगाथा—११७४).

अध्यात्मिकादि त्रिविधतापाने जो पोळलेला आहे तोच येथे "श्रांत" या शब्दांने घेतला आहे. त्याच्यावरच संत कृपा करून त्याला ते अखंड ब्रह्मसुखाचा लाभ करून देतात "तैसे अध्यात्मशास्त्रीं इये। अंतरंगचि अधिकारिये"॥ १७५०॥ (ज्ञाने. अ. १८)

**प्रभू तुम्ही सुखामृताचे डोहो। म्हणोनि आम्ही आपुलिया स्वेच्छा वोलगवो लाहों। येथही जरी सलगी करूं बिहों। तरी निवों कें पां॥ ५॥**

**अर्थ**—महाराज! तुम्ही संत त्या सुखरूप अमृताचे अथांग खोल डोह आहांत, म्हणून आपले इच्छेनुसार मला त्यांत मनसोक्त स्नान करतां येतें. अशा तुमच्या ठिकाणींहि जर आम्ही सलगी करायला भ्यालों, तर आमचा ताप कोठें शांत होईल?॥ ५॥

**गूढार्थदीपिका**—"आनंदपदी जया म्हणती हरी" (एक. गाथा हरिपाठ अभंग ११) सगुण परमात्मा हा परब्रह्माचा साकारलेला आनंदांश होय, असे नाथादिक संत म्हणतात. त्या सगुणाच्या प्रेमभक्तीने संतहि परमानंदाचे डोह होतात. आनंदरूप परब्रह्म अखंड निरवयव व अखंड पूर्ण असल्यामुळें, तें केव्हाहि कोठेहि अपूर्ण होत नाही. म्हणून असीम ब्रह्मानंदरूप सगुण स्वरूपाशीं मिळालेले किंवा ऐक्य पावलेले संतहि असीम ब्रह्मानंदरूपच असतात, म्हणून त्यांना "सुखामृताचे डोहो" म्हटले आहे. "अर्जुना अनंतसुखाच्या डोहीं। एकसरां तळचि घेतला जिहीं। मग थिराऊनि तेही। तेंचि जाहले"॥ १४४॥ (ज्ञा. अ. ५). सुखामृताचे डोहो असलेल्या संताचे ठिकाणीं आत्मप्रेमाप्रमाणे जो संकोचरहित प्रेम करतो, तोच सर्व संसारदु:खापासून सुटतो.

संसारदु:खापासून सुटण्याकरिता नि:शेष अहंकार सोडून संताचें प्रेम करणें याशिवाय दुसरा उपाय नाही. आसक्ति किंवा मोह याची वेदांतशास्त्रात निंदा केली आहे खरी, पण परमप्रेमरूप आत्म्याला न जाणतां जडविनाशी अशा देहालाच आत्मा समजून त्या देहाचे ठिकाणीं जी आसक्ति असते त्या आसक्तीचीच ती निंदा आहे. परमप्रेमरूप

आत्म्याच्या आसक्तीची ती निंदा नव्हे. त्याचप्रमाणे ''प्रसंगमजरं पाशमात्मन: कवयो विदु:। स एव साधुषु कृतो मोक्षद्वारमपावृतम्'' (भाग. स्कं. ३, अ. २५ श्लोक २०) विषयाची आसक्ति ही संसारांत गुंतविणारें एक जाळेंच आहे, पण तीच संतजनाचे ठिकाणीं ठेविली असतां मोक्षाचें द्वार खुलें होतें—म्हणजे विषयाची आसक्ति सोडून संताचे ठिकाणीं आसक्ति ठेविली असतां पुरुष मुक्त होतो—असें भागवतांत स्पष्ट विधान आहे.

**नातरी बाल्क बोबडा बोलीं। कां वांकुडा विचुका पाउलीं। ते चोज करूनि माउली। रिझे जेवीं॥ ६॥**

**तेवीं तुम्हां संतांचा पढियावो। कैसेनि तरी आम्हांवरी हो। या बहुवा आळुकिया जी आहों। सल्गी करित॥ ७॥**

**अर्थ**—किंवा लहान मूल जरी बोबडें बोलतें व वांकडें तिकडें पाऊल टाकून चालूं लागतें, तरी आई त्याचें कौतुक करून आनंद मानते. ॥ ६ ॥ त्याप्रमाणेच तुम्हां संताचें मजवर कोणत्या तरी निमित्ताने प्रेम बसावें, म्हणून मी मोठ्या आवडीने आपल्याशीं सलगी करीत आहे. ॥ ७ ॥

**गूढार्थदीपिका**—पूर्ण ब्रह्मस्वरूप झालेले संत हे ''अमूर्तचि मूर्तू कारुण्याचा'' (अमृ. प्र. २ ओ. १) संसाररूपी दु:खसागरांत बुडणाऱ्या जीवाच्या कळवळ्याने त्याचा उद्धार करण्याकरिता गुरुरूपाने अवतरलेलें परब्रह्मच होय. ''ब्रह्म एव गुरुरूपेण अवतिष्ठते'' अशी श्रुति असून ''म्हणूनिया तुका येतो काकुळती'' असें तुकाराम महाराजहि म्हणतात.

या जीवाच्या प्रेमामुळे, ज्याप्रमाणे आईला आपल्या अपत्याचें बोलणे कौतुकाचें वाटतें, त्यांप्रमाणे परमेश्वरप्राप्तीच्या तळमळीने संताना शरण गेलेल्या जीवाचेंहि संत कौतुक करतात व त्याच्यावर प्रेम करतात, असा हा संतांचा स्वभाव आहे, म्हणून अपत्याच्या लडिवाळपणाने आईचें प्रेम जसें दुणावते, त्याप्रमाणे परमार्थ साधूं पाहणारा पुरुष आपला सर्व अहंकार सोडून लडिवाळपणाने संतांना शरण गेला असतां संत त्याच्यावर कृपा करतात.

भगवंताचे ठिकाणीं व संताचें ठिकाणीं आत्मवत् प्रेम असणें याला भक्ति म्हणतात. हे भक्तिप्रेम प्राप्त होण्याकरिता सर्व भक्त भगवंताचे व श्रीगुरुचे ठिकाणीं व्यवहारांतील प्रेमाचे नातेसंबंध ठेवीत असतात. श्रीज्ञानेश्वर महाराज, येथे गुरुस्वरूप संतांशीं आईचें प्रेमळ नातें लावून, त्यांच्याशीं प्रेमसलगीने बोलत आहेत. ''दोषाननवलोकनं प्रेम'' (प्रेम रसायन) हें प्रेमाचें लक्षण घेऊन श्रीज्ञानेश्वर महाराज संतांची प्रार्थना करतात की, ज्याप्रमाणे प्रेमळ आई अपत्याच्या बोबडे बोलण्याकडे व वांकडे तिकडे पाऊल टाकण्याकडे दोषदृष्टि करीत नाही, उलट त्याचें कौतुक करून ती आनंद मानते. त्याप्रमाणेच माझ्या निरूपणांतील दोषाकडे आपलें मुळीच लक्ष जाणार नाही व त्याचेंच आपण मोठ्या प्रेमाने कौतुक कराल, असें मातृप्रेम माझ्यावर तुमचें असावें, म्हणून मोठ्या आवडीने मी आपल्याशीं सलगी करीत आहे.

**''वेदस्येश्वरवाक्यत्वाद्यथार्थत्वे न संशय:।'' मुक्तस्येश्वररूपत्वाद्गुरोर्वागपि तादृशीं॥**

(२१६-२१७) सर्व वेदान्त सि. सा. सं.

परमात्मा नित्य मुक्त असल्यामुळे त्याचें ज्ञान भ्रमरहित आहे. म्हणूनच त्याच्यापासून निर्माण झालेल्या वेदोपनिषदादिकांचें परम प्रामाण्य मानले जातें. तसेंच ज्ञानभक्तीच्या योगाने नि:शेष अहंकाररहित होऊन परमेश्वराशीं समरस झालेल्या संतांच्या हृदयांत स्वत: परमात्मा बसून त्यांचे मुखाने बोलत असल्यामुळे संताचें वचन देखील भगवंताच्या वेदवचनाप्रमाणे प्रमाण मानावें लागतें, असें आचार्य म्हणतात. असे संत ज्याच्यावर कृपा करतील त्यांच्या मुखाने ते स्वत:च बोलत असल्यामुळे, त्यांच्या मुखांतूनहि अपसिद्धान्त निघणे शक्य नसतें असा भाव.

**वांचूनि माझिये बोल्तिये योग्यते। सर्वज्ञ भवादृश श्रोते। काय धड्यावरी सारस्वतें। पढों सिकिजे॥ ८॥**

**अर्थ**—(मी तुमचें प्रेम संपादन करण्याकरिता सलगी करीत आहे) त्यावांचून माझ्या गीतार्थ निरूपण करण्याच्या योग्यतेच्या दृष्टीने आपल्यासारख्या सर्वज्ञांना श्रोते होण्यासारखें-म्हणजे श्रवण करण्यासारखें-कांही नाही. कारण सरस्वतीच्या मुलाला धडे घेऊन शिकायला पाहिजें काय?॥ ८॥

**गूढार्थदीपिका**—वक्त्याने श्रोत्याचा गौरव करून आपल्या ठिकाणीं लहानपणा घेतला असतां, श्रोत्याच्या

ठिकाणीं, साहजिकच वक्त्याविषयीं प्रेम उत्पन्न होतें असा सामान्य नियम आहे, मग खरोखरच संतांच्या श्रेष्ठत्वाचा योग्य गौरव करून संतापुढे असें आपलें लहानपण व्यक्त केलें असतां त्यांना प्रेम उत्पन्न होईल, हें काय सांगायचें? म्हणून येथे श्रीज्ञानेश्वर महाराजांनी संतांचें प्रेम उत्पन्न होण्याकरिता वरील गौरवाचे उद्गार काढले आहेत व आपला लहानपणा दाखविला आहे. अहंकार हा अविद्यारूप भ्रमाचें कार्य असल्यामुळे, जाणीवेचा अहंकार उत्पन्न झाला की तो बुद्धींत अर्थाचा भ्रम उत्पन्न करतो, पण नि:शेष अहंकाररहित बोलणें हें परमेश्वराचेच होत असल्यामुळें, तें भ्रमरहित राहतें असा भाव.

**अवधारां आवडे तेसणां धुंधुरु। परि महातेजीं न मिरवे काय करूं। अमृताचिया ताटीं वोगरूं। ऐसी रससोय कैंची॥ ९ ॥**
**हां हो हिमकरासी विंजणें। की नादापुढें आइकवणें। लेणियासी लेणें। हें कहीं आथी॥ १०॥**
**सांगा परिमळें काय तुरंबावें। सागरें कवणे ठायीं नाहावें। हें गगनचि आडे आघवें। ऐसा पवाडु कैंचा॥ ११॥**
**तैसें तुमचें अवधान धाये। आणि तुम्ही म्हणा हें होये। ऐसें वक्तृत्व कवणा आहे। जेणें रिझा तुम्ही॥ १२॥**

**अर्थ**—महाराज! पहा केवढ्याहि मोठ्या काजव्याचा किंवा टेंभ्याचा प्रकाश असला, तरी तो महातेजरूपी सूर्यप्रकाशापुढे आपलें तेज मिरवूं शकत नाही, काय करणार? अमृत वाढलेल्या ताटांत त्याच्या बरोबरीने वाढतां येईल, असें योग्य पक्वान्न कोणतें असणार?॥ ९॥ अहो! हें पहा चंद्राला वारा घालणें किंवा सुस्वरालाच सुस्वर ऐकविणें अथवा अलंकाराला अलंकार घालणें, हें कधी कोठे दिसतें काय?॥ १०॥ सांगा बरें! सुवासाने कशाचा वास घ्यावयाचा? किंवा समुद्राने कोठे जाऊन आंघोळ करावी? अथवा आकाशाचा जीमध्ये समावेश होईल, अशी जगांत (आकाशापेक्षा) मोठी वस्तु कोठून असणार?॥ ११॥ त्याप्रमाणे महाराज! तुम्हां सर्वज्ञ संतांच्या, एकाग्र करून श्रवण करणाऱ्या चित्ताची तृप्ति होईल व तुम्हाला संतोष होऊन "हें होय वक्तृत्व" असें तुम्ही म्हणाल, असें वक्तृत्व कोणापाशीं असणें शक्य आहे?॥ १२॥

**गूढार्थदीपिका**—संत परिपूर्ण होऊनहि त्यांना पूर्णत्वाचा यत्किंचित्‌हि अभिमान नसतो. ते आपल्याकडे अत्यंत लहानपणा घेऊनच राहतात. कारण "गुरुत्वें जेवढा चांगु। तेवढाचि तारूनि लघु। गुरु लघु जाणे जो पांगु। तुझा करी"॥ ६७॥ (अमृ. प्र. ९) श्रेष्ठपणा व लहानपणा हे विरुद्ध धर्म आहेत, हें खरें आणि ते जगांत कोण्या वस्तूचे ठिकाणीं राहूं शकत नाहींत, पण ते परमेश्वराचे ठिकाणीं व संताचे ठिकाणीं अविरोधाने राहतात. म्हणजे जो अत्यंत थोर, तोच अत्यंत लघु असतो. जो आपल्याला अत्यंत लघु समजतो तोच अत्यंत श्रेष्ठ असतो. अत्यंत श्रेष्ठपणा व अत्यंत लहानपणा यांना आधार असलेले संत, यांच्या सर्वस्वीं जे स्वाधीन होतात त्यांनाच या लहानपणाचा व श्रेष्ठपणाचा अनुभव येतो.

**तरि विश्वप्रगटितया गभस्ती। काय हातिवेन न कीजे आरती। कां चुळोदकें अपांपती। अर्घ्यु नेदिजे॥ १३॥**
**प्रभू तुम्ही महेशाचिया मूर्ती। आणि मी दुबळा अर्चितसें भक्ती। म्हणोनि बोल जऱ्ही गंगावती। नऱ्ही स्वीकाराल कीं॥ १४ ॥**
**बाळक बापाचिये ताटीं रिगे। रिगौनि बापातेंच जेवऊं लागे। कीं तो संतोषलेनि वेगें। मुखचि वोडवी॥ १५॥**
**तैसा मी जरी तुम्हांप्रती। चावटी करीतसें बाळमती। तरी तुम्ही तोषिजे ऐसी जाती। प्रेमाची या॥ १६॥**
**आणि तेणें आपुलेपणाचेनि मोहें। तुम्ही संत घेतले असा बहुवें। म्हणोनि केलिये सलगीचा नोहे। आभारु तुम्हां॥ १७ ॥**
**अहो तान्हयाची लागतां झटें। तरी अधिकचि पान्हा फुटे। रोषें प्रेम दुणवटे। पढियंतयाचेनि॥ १८॥**

**अर्थ**—तरी पण सर्व जगताला प्रकाशित करणाऱ्या तेजस्वी सूर्याला प्रेमाने काडवातीने ओवाळीत नसतात काय? किंवा समुद्राला समुद्राचें पाणी घेऊन आदरपूर्वक अर्घ्य देत नसतात काय?॥ १३॥ महाराज! आपण शंकराच्या मूर्ती आहांत व मी अत्यंत दरिद्री, प्रेमभक्तीने माझ्या निर्गुडीच्या पानाप्रमाणे असलेल्या बोलाने तुमचें अर्चन करीत आहे, तें तुम्ही स्वीकारालच॥ १४॥ लहान मुलगा आपल्या बापाचे ताटांत जेवायला बसतो व बापाला जेऊं घालतो. ते पाहून बापाला अत्यंत आनंद होतो व आनंदाने मुलाच्या हातचा घांस घेण्याकरिता आपलें तोंड पुढें करतो॥ १५॥ त्याप्रमाणे मी जरीं तुमच्यापुढे नेणतेपणाने गीतार्थ निरूपणाचा चावटपणा केला तरी तुम्ही संतुष्ट व्हावें

असा प्रेमाचा स्वभावच आहे॥ १६॥ आणि तुम्हा संतांचे ठिकाणीं शरण आलेल्याविषयीं आपलेपणाचा मोह फारच असतो, म्हणून मी आपल्याशीं केलेल्या सलगीचा किंवा लडिवाळपणाचा आपल्याला भार वाटणार नाही॥ १७॥ महाराज! तान्ह्या वासराने गाईच्या स्तनास जसजशा ढुसण्या द्याव्या तसतसा गाईला जास्त पान्हा फुटतो, तसेंच लाडक्याच्या रागावण्याने त्याच्या विषयींचें प्रेम दुप्पट वाढतें.॥ १८॥

**गूढार्थदीपिका—**भक्तिप्रेमाची वृद्धि होण्याकरिता ''कामक्रोधाभिमानादिकं तस्मिन्नेव करणीयम्'' (ना. भ. सू.) भगवंताचे ठिकाणीं आपले कामक्रोधादिक विकार समर्पण करावे, असें नारदभक्तिसूत्रांत प्रतिपादिले आहे.

**म्हणऊनि मज लेंकुरुवाचेनि बोलें। तुमचें कृपाळूपण निदैलें। तें चेइलें हें जी जाणवलें। यालागीं बोल्लिों मी॥ १९॥**

**अर्थ—**म्हणून मज लेकराच्या बोलण्याने तुमचें निजलेलें किंवा सुप्त असलेलें कृपाळुपण जागें झालें, असें कळून आलें म्हणून ''अवधान द्या'' असें मी बोलिलों॥ १९॥

**गूढार्थदीपिका—**अविद्यावर्ती जीवाचें प्रेम करणें म्हणजे आपणहि अविद्येत पडणें आहे. कारण एक जीव दुसऱ्या जीवाचें प्रेम करतांना त्याच्या शुद्ध आत्मस्वरूपावर प्रेम करीत नसतो, तर त्याच्या नाशिवंत अज्ञानजन्य देहावर करीत असतो. प्रेम करणारा व ज्यावर प्रेम करावयाचें ते दोघेहि ''आपण कोण'' हें जाणत नसतात. मी म्हणजे देह हीच दोघांची समजूत असते. तें प्रेम विचारपूर्वक किंवा विवेकपूर्वक नसतें, त्या प्रेमाला मोह म्हणतात. तसा तो मोह घातक आहे, पण संतजन हे ज्ञानभक्तीने पूर्ण ब्रह्मस्वरूप झालेले असतात. त्यांचे ठिकाणीं चित्त आसक्त झालें असतां त्यांचें जें ध्यान घडतें तें ब्रह्माचें ध्यान होतें व त्या ध्यानाने, भगवंताच्या ध्यानाप्रमाणे जीव मुक्त होतो म्हणजे ब्रह्मांत मिळतो.

अशा प्रेमळ लाडक्याचे ठिकाणीं संतांचेंहि चित्त आसक्त होते; पण ''शिष्याची जो नेघे सेवा। मानी देवासारिखें'' या तुकाराम महाराजांच्या उक्तीप्रमाणे ते शिष्यालाहि ब्रह्मस्वरूपच पाहत असल्यामुळे, त्यांना ती आसक्ति बाधत नाही.

**एऱ्हवीं चांदिणें पिकविजत आहे चेपणीं। कीं वारया घापत आहे वाहणी। हां हो गगनासि गंवसणी। घालिजे केवीं॥ २०॥**
**आइकां पाणी वोथिजावें न लगे। नवनीतीं माथुला न रिगे। तेवीं लाजिलें व्याख्यान न निगे। देखोनि जयांतें॥ २१॥**
**हें असो शब्दब्रह्म जिये बाजे। शब्द मावळलेया निवांतु निजे। तो गीतार्थु म्हाटीया बोलिजे। हा पाडु काई॥ २२॥**

**अर्थ—**आढीमध्यें घालून चांदिणें पिकवितात काय? वाऱ्याला लोटून वाहावें लागतें काय? अहो महाराज! तसेंच आकाशाला गवसणी कशी घातली जाईल?॥ २०॥ महाराज! ऐका. पाणी पातळ करावें लागत नाही, लोण्यांत रवी शिरूं शकत नाही, त्याप्रमाणे ज्या वस्तूला पाहतांच तिचें वर्णन करणारे शब्द लाजून मागें फिरतात.॥ २१॥ हें असो. ज्या ब्रह्मवस्तूचें ठिकाणी शब्दाची प्रवृत्ति नाही असें जाणून वेद देखील मौन धारण करतो व परब्रह्मरूप होऊन राहतो, ती गीतेची अर्थरूप ब्रह्मवस्तु मराठी भाषेंत सांगतां येईल अशी योग्यता कोठली?॥ २२॥

**गूढार्थदीपिका—**बोलणारा, शब्दाने ज्या वस्तूचा उल्लेख करीत असतो तो ती वस्तु आपल्याहून निराळी मानीत असतो. पण परब्रह्म किंवा आत्मा, बोलणाऱ्यांचें केवळ स्वरूपच असल्यामुळे तो तें आपल्याहून निराळें करूं शकत नाही, म्हणून शब्दाने बोलूं शकत नाही असें ''जें जें बोलिजें तें तें नव्हे। होय तें तंव न बोलवे'' (अमृ. प्र. ५-२६) या वचनाने माऊलींनी सांगितलें आहे.

आचार्यांनीहि ''तस्मादेव च न ज्ञानशब्दवाच्यमपि तद् ब्रह्म'', ''सत्यशब्देनापि न तु सत्यशब्दवाच्यमेव ब्रह्म'' (तै. उ. २-१) या पंक्तींनी तैत्तिरीयोपनिषदांतील भाष्यांत असेंच सांगितलें आहे. ''वेद वानुनि तंवचि चांग। जंव न दिसे तुझें अंग। मग आम्हां तया मुग। एके पांती'' (ज्ञा. अ. १४-११), ''वेदु काय काय न बोले। परि नांवचि नाहीं घेतलें। ऐसें कांही जोडलें। नाही जेणें'' (अमृ. प्र. ७-१०७).

**परि ऐसियाही मज धिंवसा। तो पुढतियाचि येकी आशा। जे धिटींवा करूनि भवादृशां। पढियंतया होआवें॥ २३॥**

**अर्थ—**गीतार्थ निरूपण करण्यास मी असा अयोग्य असूनहि निरूपण करण्यास धजलों, तें एकाच आशेने

की धीटाई करून तुमच्यासारख्या संतांचें आवडते किंवा लाडकें व्हावें. ॥ २३ ॥

**गूढार्थदीपिका**—परब्रह्माचें ज्ञान नसल्यामुळें जोपर्यंत नामरूपें परब्रह्माहून निराळी वस्तु वाटते व त्यामुळें परब्रह्म झांकलें जातें, तोपर्यंत त्या नामरूपाचा परब्रह्माशीं संबंध नसतो; म्हणून नामरूपें निराळीं करून परब्रह्माचें ज्ञान करून घ्यावें लागतें. पण परब्रह्माहून निराळीं केलेलीं नामरूपें मिथ्या-म्हणजे त्यांना स्वतंत्र अस्तित्व व वस्तुत्व नाही असें-ठरल्यावर अन्वयाने परब्रह्माशीं ऐक्य होऊन ''सदात्मना सत्यत्वाभ्युपगमात् सर्वं च नामरूपादि सदात्मनैव सत्यं विकारजातम्'' (छां. उ. ६-३-२ आचार्यभाष्य) नामरूपें परब्रह्मस्वरूपच होतात.

असें हे नामरूपाने भासणारें परब्रह्म सगुणच राहणार यांत शंका नाही; पण तें सगुण असलें तरी निर्गुण म्हणजे मायागुणरहित असतें. मायारहित म्हणून निर्गुण व सर्वज्ञ सर्वशक्ति व षड्गुणैश्वर्याने संपन्न असते म्हणून सगुण, अशा नामरूपाने सगुण झालेल्या भगवद्रूपाचे ठिकाणीं संतांच्या कृपेने प्राप्त झालेल्या आत्मप्रेमाने भक्ति करून ज्याची ब्रह्मैक्याची जाणीव नाहीशी झाली, अशा पूर्ण ब्रह्मस्वरूप झालेल्या प्रेमळ भक्ताच्या मुखांतून निघणाऱ्या शब्दाने परब्रह्म वर्णिलें जाऊं शकतें असा भाव.

अशा भक्तांनी परब्रह्माचें वर्णन करणें म्हणजें परब्रह्मानेंच परब्रह्माचें वर्णन करणें होय.

दशमस्कंधांतर्गत वेदस्तुतींतील ''ब्रह्मन् ब्रह्मण्यनिर्देशे निर्गुणे गुणवृत्तय:'' या श्लोकावर टीका करतांना श्रीधराचार्यांनी ''सगुणमेव गुणैरनभिभूत..........सच्चिदानंदं भगवंतं श्रुतय: प्रतिपादयन्ति'' या वचनाने हाच भाव दाखविला आहे.

म्हणून मी लाडका झालों, तर भगवंताचें प्रेम प्राप्त होऊन माझीं ब्रह्मैक्य जाणीव नाहीशी होईल व मग गीतार्थाचें वर्णन माझेकडून होऊं शकेल, असें श्रीज्ञानेश्वर महाराज सुचवित आहेत.

**परि आतां चंद्रापासोनि निववितें। जें अमृताहूनि जीववितें। तेणें अवधानें कीजे वाढतें। मनोरथा माझिया॥ २४॥**

**अर्थ**—तरी चंद्रापेक्षाहि प्रसन्नता उत्पन्न करणाऱ्या किंवा अमृताहूनहि जीवित अमर करणाऱ्या एकाग्रचित्ताने श्रवण करून, गीतार्थ निरूपण करण्याचा माझा मनोरथ उत्तेजित करा. ॥ २४ ॥

**गूढार्थदीपिका**—श्रोते वक्त्याचें निरूपण जर निर्मत्सर दृष्टीने व प्रेमाने ऐकत असले, तर वक्त्यालाहि प्रेम उत्पन्न होऊन तोहि अधिक उल्हासाने निरूपण करतो.

**कां जैं दिठिवा तुमचा वरुषे। तैं सकळार्थसिद्धि मती पिके। एऱ्हवीं कोंभेला उन्मेषु सुके। जरी उदास तुम्ही॥ २५॥**

**अर्थ**—कारण तुमच्या कृपादृष्टीचा वर्षाव झाला असतां, बुद्धीच्या ठिकाणीं सर्व अर्थसिद्धीचें पीक येतें-म्हणजे बुद्धीत सर्व शब्दार्थ बरोबर स्फुरतात-आणि जर तुम्ही उदासीन राहिला, तर ज्ञानाचा फुटलेला अंकुरहि सुकून जातो. ॥ २५ ॥

**गूढार्थदीपिका**—ज्ञानभक्तीने कृतार्थ झालेल्या संतरूपी सद्गुरुंच्या कृपादृष्टीचा वर्षाव अत्यंत निरहंकार पुरुषावरच होतो व तो इतका समर्थ असतो की त्याच्या बुद्धींत यथार्थाचें ज्ञान होऊन तो कृतार्थ होतो. ''जी आपुलिया स्नेहाची वागेश्वरी। जरी मुकेयाते अंगीकारी। तो वाचस्पतीसीं करी। प्रबंध होडा'' (ज्ञा. अ. १०-८) आणि त्याच्या जाणीवेचा अहंकार पाहून ते संत उदास राहिले असतां, प्राप्त झालेले ज्ञानहि मावळतें हाच सिद्धान्त श्रीज्ञानेश्वर माऊलींनी ''जयाचेनि सावायें। जीव ब्रह्म उपरो लाहे। ब्रह्महि हातातळील जाये। उदासें जेणे'' (अमृ. प्र. २-१६) या अमृतानुभवांतील ओवींतहि मांडला आहे.

**सहजें तरी अवधारा। वक्तृत्वा अवधानाचा होय चारा। तरी दोंदें पेलती अक्षरां। प्रमेयाचीं॥ २६॥**
**अर्थ बोलाची वाट पाहे। तेथ अभिप्रावो अभिप्रायातें विये। भावाचा फुलौरा होत जाये। मतिवरी॥ २७॥**
**म्हणूनि संवादाचा सुवावो ढळे। तरी हृदयाकाशा सारस्वतें वोळे। आणि श्रोता दुश्चित तरि वितुळे। मांडला रसु॥ २८ ॥**

**अर्थ**—महाराज! हे स्वभाविकच आहे पहा, जर वक्त्याच्या वक्तृत्वाला श्रोत्याच्या एकाग्रतेने व प्रेमाने श्रवण करण्याचे खाद्य मिळालें, तर वक्त्याच्या मुखांतून जीं अक्षरें निघतात, ती सिद्धान्ताने भरलेलीं असतात. ॥ २६ ॥ अर्थ

बोलण्याचीच वाट पाहत असतो (म्हणजे तोंडांतून अक्षरें निघण्याचीच वाट, की लगेच अर्थ शब्दांत शिरतो.) तेथे मग अभिप्रायांतून अभिप्राय उत्पन्न होऊं लागतात व बुद्धीवर सद्भावाची किंवा तद्रूपतेची पुष्पवृष्टि होते किंवा त्याच्या बुद्धीवर सद्भावाचा फुलवरा बांधला जातो--म्हणजे बुद्धि यथार्थाकार होत जाते. ॥ २७ ॥ म्हणून संवादाचा अनुकूल वायु वाहला तर वक्त्याच्या अंत:करणांत ब्रह्मविद्येचे मेघ वळून येतात, आणि श्रोता दुश्चित्ताने ऐकत असला तर मांडलेला रसहि नाहीसा होतो. ॥ २८ ॥

**गूढार्थदीपिका—संवादाचा सुवावो ढळे**—संवाद म्हणजे श्रोत्याची वक्त्याच्या विचाराशीं अनुकूलता. या संवादाला श्रीज्ञानेश्वर महाराजांनी सुवायूची उपमा दिली आहे. सुवायु म्हणजे जलवर्षाव करणाऱ्या मेघांना एकत्र करणारा वायु होय. ज्याप्रमाणे सुवायूच्या योगाने मेघ एकत्र होऊन जलवर्षाव करतात, त्याप्रमाणे संवादरूपी सुवायूच्या योगाने भक्ताच्या हृदयांत ब्रह्मविद्येचे मेघ वळून येतात.

**श्रोता दुश्चित तरी वितुळे। मांडला रसु**—आणि श्रोता दुश्चित म्हणजे लय विक्षेपादि विघ्नांनी युक्त किंवा आढ्यतादि विकाराने युक्त असला, तर वक्त्याचें रसाळ निरूपणहि वक्त्याला किंवा श्रोत्याला दोघांनाहि आनंद उत्पन्न करूं शकत नाही.

**अहो चंद्रकांतु द्रवता कीर होये। परि ते हातवटी चंद्रीं कीं आहे। म्हणऊनि वक्ता तो वक्ताचि नोहे। श्रोतेनिविण ॥ २९ ॥**

**अर्थ**—अहो महाराज! चंद्रकांतमणि पाझरतो यांत शंकाच नाही, पण त्याला पाझर फोडण्याची कला मात्र चंद्राचे ठिकाणींच असते. म्हणून प्रेमपूर्वक एकाग्रतेने श्रवण करणाऱ्या श्रोत्यावांचून वक्त्याचेंहि वक्तृत्व उचंबळून येत नाही. ॥ २९ ॥

**गूढार्थदीपिका**—या ओवींत श्रीज्ञानेश्वर माऊलींनी श्रोता व वक्ता यांच्या संवादांत श्रोता व वक्ता या दोघांनाहि त्या संवादापासून आनंद प्राप्त होण्याची जबाबदारी सर्वस्वीं श्रोत्यावरच टाकली आहे. वक्त्याविषयी प्रेम बाळगून एकाग्र अंत:करणाने श्रवण करणारा श्रोता, वक्त्याच्या वक्तृत्वाला पुष्टि देणारा होतो व दोषैकदृष्टि ठेवून श्रवण करणारा श्रोता स्वत:हि आनंद भोगत नाही व वक्त्याला आनंद भोगूं देत नाही, तो आपलाच मोठा गौरव करून, अहंकाराच्या नाठरवृत्तींत मग्न असतो.

**परी आतां आमुतें गोड करावें। ऐसें हें तांदुळीं कासया विनवावें। साइखडियानें काइ प्रार्थावें। सूत्रधारातें॥ ३० ॥**
**तो काय बाहुल्यांचिया काजा नाचवी। की आपुलिये जाणिवेची कळा वाढवी। म्हणऊनि आम्हां या ठेवाठेवी। काय काज॥ ३१ ॥**

**अर्थ**—पण आम्हांला गोड करून घ्या, अशी तांदुळाने जेवणारांना प्रार्थना कशाला करायला पाहिजे? किंवा आम्हांला चांगलें नाचवा अशी कळसूत्री बाहुल्यांनी सूत्रधाराला प्रार्थना करायची असते काय?॥ ३० ॥ सूत्रधार कळीच्या बाहुल्या बाहुल्यांकरिता नाचवितों काय? कीं आपल्या ठिकाणचें कलाकौशल्य दाखविण्याकरिता नाचवितो? म्हणून मला या प्रार्थना वगैरेची उठाठेव करण्याची आवश्यकता नाही. ॥ ३१ ॥

**गूढार्थदीपिका**—ज्ञानभक्तीने पूर्ण अद्वैतरूप झालेल्या संतांच्या अद्वैतज्ञानाची बैठक केव्हाहि भंग पावत नाही. "म्हणोनि शिष्य आणि गुरुनाथु। या दोहो शब्दांचा अर्थु। श्रीगुरुचि परी होतु। दोहो ठायी"॥ ६१ ॥ (अमृ. प्र., २) शिष्य व गुरु, भक्त व भगवान, वक्ता व श्रोता इत्यादि सर्व भावाने एक भगवान किंवा श्रीगुरुच अखंड लीलानाट्य दाखवित आहेत, असेंच संत समजत असतात.

आपल्या भक्तिप्रेमाने त्यांचा व्यष्ट्यहंकार संपूर्ण नाहीसा झालेला असतो व सर्व भगवंताची लीला आहे असेच ते दृढ समजत असल्यामुळे त्यांच्या ठिकाणीं व्यष्ट्यहंकार पुन: कधी उत्पन्न होत नाही.

हाच भाव वरील ३०-३१ या ओव्यांत श्रीमाऊलींनी सुचविला आहे.

**तंव श्रीगुरु म्हणती काइ जाहलें। हें समस्तही आम्हां पावलें। आतां सांगें जें निरोपिलें। नारायणें॥ ३२ ॥**
**येथ संतोषोनि निवृत्तिदासें। जी जी म्हणऊनि उल्हासें। अवधारां श्रीकृष्ण ऐसें। बोलते जाहले॥ ३३ ॥**

**अर्थ**—तेव्हा श्रीगुरू निवृत्तिनाथ म्हणतात, अरे बाबा! कां चिंता करतोस? तुझें सर्व म्हणणें आम्ही मान्य

केलें आहे. आता तूं श्रीकृष्णाने अर्जुनाला जें कांही सांगितलें, तें आम्हांला सांग म्हणजे झालें. ॥ ३२ ॥ निवृत्तिदास श्रीज्ञानेश्वर महाराजांना श्रीगुरुचें भाषण ऐकून संतोष झाला व ते उल्हासाने म्हणाले की, अहो जी सद्गुरुनाथ! भगवान श्रीकृष्ण काय बोलले, तें ऐका. ॥ ३३ ॥

**अवतरणिका—एकान्तभक्ति म्हणजे सगुण परमेश्वरचें निःसीम प्रेम होय. असें निःसीम प्रेम, आपल्या आत्म्याचे ठिकाणींच असतें. ते निःसीम प्रेम सगुण परमेश्वराचे ठिकाणीं होण्याकरिता आत्मा व सगुणपरमात्मा एकच आहे—म्हणजे परमेश्वराचें निर्गुणस्वरूप जसें शुद्ध निरुपाधिक आहे, तसेंच परमेश्वराचें सगुण स्वरूपहि शुद्ध निरुपाधिक आहे—हें ज्ञान आवश्यक आहे म्हणून आता भगवान विज्ञानासह ज्ञानाचें म्हणजे ज्ञानदृष्टिनें पाहतां, विज्ञान म्हणजे प्रपंचहि ज्ञानस्वरूपच आहे असें निरूपण करतात.**

*श्रीभगवानुवाच*

**इदं तु ते गुह्यतमं प्रवक्ष्याम्यनसूयवे। ज्ञानं विज्ञानसहितं यज्ज्ञात्वा मोक्ष्यसेऽशुभात्॥ १॥**

**अर्थ**—श्रीभगवान म्हणतात—अर्जुना! जें जाणून तूं सर्व धर्माधर्मरूप पापापासून मुक्त होशील असें हें अत्यंत गूढ जें विज्ञानासह ज्ञान तें आता मी, निर्मत्सर अशा तुला सांगतों. ॥ १ ॥

**नातरि अर्जुना हें बीज। पुढती सांगिजेल तुज। जें हें अंतःकरणींचें गुज। जिवाचिये॥ ३४॥**

**अर्थ**—किंवा अर्जुना! जें सर्वाचें मूळ कारण आणि सर्व जीवांच्या अंतःकरणांत गुप्त असलेली अशी जी वस्तु ती, मी आता तुला पुढे सांगत आहे. ॥ ३४ ॥

**गूढार्थदीपिका**—ज्याप्रमाणे झाडाच्या बीजापासून झाडाचा विस्तार होतो, त्याप्रमाणे ज्ञानविज्ञान समजल्याने, ज्ञान हेच विज्ञानाचें बीज असून, विज्ञान हा ज्ञानाचा विस्तार होय, असा अनुभव येतो. म्हणून येथें भगवंतांनी ज्ञानाला विज्ञानाचें बीज म्हटलें आहे आणि ही ज्ञानविज्ञान स्थिति जीवाला न कळलेली व जीवाच्या अंतःकरणांत गुप्त असलेली गोष्टहि होय; म्हणून याला गूजहि म्हटलें आहे.

कृतार्थ झालेल्या ज्ञानी पुरुषांना हें ज्ञानविज्ञान अत्यंत गुह्य म्हणूनच गुरुपरंपरेने प्राप्त झालेलें असतें आणि ते ज्ञानी पुरुष कोणालाहि सहजासहजीं न सांगण्याजोगें असें गुह्य म्हणूनच वागवितात.

**येणें मानें जीवाचें हियें फोडावें। मग गुज कां पां मज सांगावें। ऐसें कांहीं स्वभावें। कल्पिशी जरी॥ ३५॥**

**तरी परियेसीं गा प्राज्ञा। तूं आस्थेचीच संज्ञा। बोलिलिये गोष्टीची अवज्ञा। नेणसी करूं॥ ३६॥**

**अर्थ**—अशा प्रकारें जीवाचें अंतःकरण उघडें करावें व त्यांतील गुप्त गोष्ट मला कां सांगावी, असें कदाचित् मनुष्यस्वभावानुसार तूं कल्पना करशील. ॥ ३५ ॥ तर, सुबुद्धि अर्जुना! सांगतों ऐक, तुझें अर्जुन हें नांव म्हणजे आस्थेचेंच किंवा श्रद्धेचेंच दुसरें नाव आहें आणि तूं सांगितलेल्या गोष्टीचा कधीहि अनादर करीत नाहीस. ॥ ३६ ॥

**गूढार्थदीपिका—प्राज्ञ**—प्रज्ञा म्हणजे बुद्धि. ती ज्यांना प्राप्त झाली, त्यांना 'प्राज्ञ' म्हणतात. व्यवसायात्मिका व अव्यवसायात्मिका अशी दोन प्रकारची बुद्धि आहे. व्यवसायात्मिका म्हणजे अत्यंत सत्याचा निश्चय करणारी व अव्यवसायात्मिका म्हणजे वाटेल त्याला सत्य समजणारी बुद्धी.

मुळांत बुद्धि ही सत्वगुणाचें कार्य असल्यामुळें, ती शुद्धच आहे, पण जीवाच्या पापकर्मानें ती अशुद्ध होते व तींत काम म्हणजे विषयवासना, बुद्धिमांद्य इत्यादि दोष उत्पन्न होतात. हे दोष नाहीसे झाले की, ती आपल्या मूळच्या स्वरूपाला प्राप्त होते. आपल्या मूळच्या स्वरूपाला प्राप्त झालेल्या शुद्धबुद्धीला किंवा सात्विकबुद्धीला चरमबुद्धि किंवा अग्रबुद्धि किंवा सूक्ष्मबुद्धि म्हणतात. "दृश्यते त्वग्रया बुद्ध्या" ही सूक्ष्म बुद्धीच आत्मज्ञानाला उपयोगी असते. हीच खरी प्रज्ञा होय. ही ज्यांना प्राप्त झाली तेच खरे प्राज्ञ होत.

भगवद्भक्तीनें बुद्धींतील दोष नाहीसे होऊन, ती शुद्ध होते. अर्जुन भक्त असल्यामुळे त्याची बुद्धि सूक्ष्म झाली होती, म्हणूनच ज्ञानेश्वर महाराजांनी त्याला 'प्राज्ञ' असें म्हटलें आहे. अशा प्राज्ञपुरुषाच्या ठिकाणीं ज्ञानाची आस्था किंवा अत्यंत आवड असते आणि ते ज्ञानाचा अनादर कधी करीत नाहीत.

अर्जुन माझा भक्त आहे, "तैसे स्वामिचिया मनोभावा। न चुके हेचि परमसेवा" सांगितलेलें ज्ञान, अनादर न करतां अत्यंत आस्थेने घेईल असा भगवंतांनी येथे आत्मविश्वास व्यक्त केला आहे, आणि त्याचप्रमाणे "आस्थेचीच संज्ञा" या पदाने जो श्रद्धास्वरूप होऊन जातो, त्यालाच ज्ञान प्राप्त होतें असें सुचविलें आहे.

**म्हणोनि गूढपण आपुलें मोडो। वरि न बोलावेंही बोलावें घडो। परि आमुचिये जीवींचें पडो। तुझ्या जिवीं॥ ३७॥**
**अगा थानीं कीर दूध गूढ। परि थानासीचि नव्हे कीं गोड। म्हणोनि सरो कां सेवितयाची चाड। जरी अनन्य मिळे॥ ३८॥**
**मुडाहूनि बीज काढिलें। मग निर्वाळलिये भूमीं पेरिलें। तरि तें सांडीविखुरीं गेलें। म्हणों ये कायी॥ ३९॥**
**यालागीं सुमनु आणि शुद्धमती। जो अनिंदकु अनन्यगती। पैं गा गौप्यही परी तयाप्रती। चावळिजे सुखें॥ ४०॥**

**अर्थ**—म्हणून तें ज्ञानाचें गुप्तपण नाहीसें होवो व बोलण्याजोगे नाही तें बोलावें लागो, पण माझ्या अंत:करणांत जी गुप्त गोष्ट आहे ती तुझ्या अंत:करणांत प्राप्त होवो!॥ ३७॥ बा अर्जुना! दूध स्तनांतच असतें पण स्तनाला त्याची गोडी मिळत नाही; म्हणून दुधासाठी तळमळणाऱ्या व आईवर विसंबून असणाऱ्या लेकराची इच्छा पूर्ण होवो, असें आईला वाटतें.॥ ३८॥ कणगींतून बीजाचें धान्य काढून जर उत्तम मशागत केलेल्या जमिनीत तें पेरलें तर तें व्यर्थ सांडलें गेलें, असें म्हणतां येईल काय?॥ ३९॥ म्हणून जो शुद्ध मनाचा, शुद्ध बुद्धीचा, निंदा न करणारा आणि अनन्य आहे, अशालाच जिव्हाळ्याची गोष्ट खुशाल सांगावी.॥ ४०॥

**गूढार्थदीपिका**—सुमन म्हणजे ज्याचें मन संकल्पविकल्प सोडून श्रुतिसंतांच्या वचनावर दृढ विश्वास ठेवणारें असें श्रद्धाळू आहे.

**शुद्धमति**—म्हणजे दृढ वैराग्याने ज्याच्या बुद्धीतील विषयवासनारूपी मल व साधनाची चंचलता म्हणजे विक्षेप नाहीसे होऊन, ज्याची बुद्धि सूक्ष्म आत्मज्ञान समजून घेण्याला पात्र झाली.

**अनिंदक**—म्हणजे जो परमार्थसाधनाकडे किंवा परमार्थ साधन सांगणाऱ्याकडें दोषदृष्टीने पाहत नाही.

**अनन्य**—म्हणजे जो एकनिष्ठ आहे "और तु सन्त सवै सिर ऊपर। सुंदर के उर है गुरु दादू॥ ५॥" (सुंदर विलास) सर्व संतांना पूज्य मानणारा पण आपल्या गुरूला श्रेष्ठ समजून अखंड शरण असणारा.

आत्मज्ञान, हें जीवाला कृतार्थ म्हणजे संपूर्ण दु:खरहित करणारें आहे. तें गुरुपरंपरेनेच प्राप्त होतें व सुमन, शुद्धमति अनिंदक, अनन्यगति इत्यादि गुणांनी युक्त होऊन तें घेतलें असतां टिकतें व कृतार्थ करणारें होतें; म्हणून तशा गुणांनी युक्त असलेल्या शिष्यालाच श्रीगुरु तें देतात. "ब्रूयु: स्निग्धस्य शिष्यस्य गुरवो गुह्यमप्युत" (भाग. स्कं. १०) श्रीगुरुनी आपल्या प्रेमळ शिष्यालाच आत्मज्ञानासारखे गुह्यज्ञान द्यावें असें भागवतांत सांगितलें आहे.

**तरि प्रस्तुत आतां गुणीं इहीं। तूंवांचूनि आणिक नाहीं। म्हणोनि गुज तरी तुझां ठायीं। लपवूं नये॥ ४१॥**
**आतां किती नावानावा गुज। म्हणतां कानडें वाटेल तुज। तरि ज्ञान सांगेन सहज। विज्ञानेंसीं॥ ४२॥**
**परि तेंचि ऐसेनि निवाडें। जैसें भेसळलें खरें कुडें। मग काढिजे फाडोवाडें। पारखूनियां॥ ४३॥**
**कां चांचूचेनि सांडसें। खांडिजे पय पाणी राजहंसें। तुज ज्ञान विज्ञान तैसें। वांटूनि देऊं॥ ४४॥**
**मग वारयाचियां धारसा। पडिन्नला कोंडा कां नुरेचि जैसा। आणि अन्न कणांचा आपैसा। राशिवा जोडे॥ ४५॥**
**तैसें जें जाणितलेयासाठीं। संसार संसाराचिये गांठीं। लाऊनि बैसवी पाटीं। मोक्षश्रियेच्या॥ ४६॥**

**अर्थ**—माझ्या अंत:करणांत असलेली गुप्त गोष्ट सांगण्याकरिता जसा सद्‌गुणी पुरुष आवश्यक आहे, तसा सद्‌गुणी सध्यां तरी तुझ्यावांचून कोणी नाही; म्हणूनच अंत:करणांतील गुप्त गोष्ट आहे तरी मला तुझ्यापासून लपवून ठेवतां येत नाही.॥ ४१॥ आतां अर्जुना! मी तुला वारंवार गुज सांगतों, गुज सांगतों म्हणतानां कंटाळा वाटेल; तेव्हा विज्ञानासह ज्ञान मी तुला सांगणार आहे.॥ ४२॥ खरी व खोटी वस्तु परस्परांत मिसळल्या असतां, ज्याप्रमाणे त्यांना पारखून अलग केलें जातें त्याप्रमाणे ज्ञान विज्ञान पारखून अलग करून सांगणार आहे.॥ ४३॥ किंवा ज्याप्रमाणे राजहंसाने आपल्या चोंचरूपी चिमट्याने, मिसळलेलें दूधपाणी अलग करावें त्याप्रमाणे मी हें तुला मिसळलेलें ज्ञानविज्ञान अलग करून सांगतों.॥ ४४॥ किंवा मळलेलें धान्य, भूस व बीं मिळून असतें आणि तें वाऱ्याच्या प्रवाहांत

धरल्यावर कोंडा उडून जातो आणि खाली सहजच धान्याचा ढीग पडतो. ॥ ४५ ॥ त्याप्रमाणे जें विज्ञानासहित ज्ञान जाणले असतां विज्ञानरूप सर्व संसार संसाराचे गांठीं लावला जातो व पुरुषाला मोक्षलक्ष्मीच्या सिंहासनावर बसविते ॥ ४६ ॥

**गूढार्थदीपिका—तैसें जें जाणितलेयासाठीं**—एका सच्चिदानंद अद्वैत परब्रह्मावांचून दुसरी वस्तुच नाही, असें जाणणें याला ज्ञान म्हणतात. हें ज्ञान बुद्धींत दृढ ठसवावयाचें असतें आणि तें बुद्धींत दृढ ढसलें गेलें की सर्व संसाराचा निरास होतो. आता ज्ञानाने संसाराचा नाश कसा होतो हें सांगतात.

**संसार संसाराचिया गांठीं। लावूनि**—ज्ञानाने संसाराची संसाराशीं गांठ लाविली जाते. परब्रह्माला विसरून भासणारीं नामरूपें ही एक स्वतंत्र वस्तु आहे, असें जें जीव मानतो, हाच संसार होय.

मूळांत जी परब्रह्म वस्तु आहे, ती विसरून, तिच्या ठिकाणीं भासणाऱ्या नामरूपाला जगद्वस्तु समजून, जीव ब्रह्मवस्तूशीं व संसार वस्तूशीं गांठ बांधतो—म्हणजे संबंध लावतो व त्याच्या समजुतीप्रमाणेच शास्त्रानेहि संसार किंवा जगत् व परब्रह्म यांचा कार्यकारणसंबंध लावला आहे; पण आत्मज्ञान झाल्यावर तें ज्ञान, नामरूपात्मक संसाराची परब्रह्माशीं लावलेली गांठ तोडून, संसाराची संसाराशीं गांठ बांधते—म्हणजे नामरूपात्मक मानलेली संसारवस्तु परब्रह्माचे ठिकाणीं मुळींच नाही, संसाराचेच ठिकाणीं आहे—म्हणजे संसारवस्तु केवळ नाममात्र आहे असा अनुभव आणून देतें.

''**वाचारंभणं विकारो नामधेयं मृत्तिकेत्येव सत्यम्**'' (छां. उ. ६-१-४) या श्रुतीने हाच सिद्धान्त सांगितला असून श्रीज्ञानेश्वर माउलींनी ''संसार संसाराचिये गांठीं। लावूनि'' या पदांनी तोच सिद्धान्त मांडला आहे.

**मोक्षश्रियेच्या पाटीं बैसवी**—मोक्ष म्हणजे ब्रह्मस्थिति, ही एकच आहे, पण सर्वदु:खनिवृत्ति व परमानंदप्राप्ति अशी तिचीं दोन अंगे आहेत.

मोक्षाचें, सर्वदु:खनिवृत्तिरूप अंग, आत्मज्ञानाने सर्व संसार केवळ शब्दमात्र आहे, वस्तुत: नाही असे कळल्याने साध्य होतें, पण परमानंदप्राप्तिरूप अंग साधत नाही. समाधिव्युत्थानीं अखंड आनंद असणे याला परमानंदप्राप्ति म्हणतात.

नामरूपाच्या आविष्काराला जो आपण संसार म्हणून म्हणत होतो तो वस्तुत: नाही, असें ज्ञानाने कळले तरी पूर्वसंस्काराने आविष्काराचे ठिकाणीं जगताची स्मृति होते व त्या ठिकाणीं उपेक्षाबुद्धि होते. ही उपेक्षावृत्ति अखंड ब्रह्मानंदाला विरोधि होते; म्हणून उपेक्षावृत्ति जोपर्यंत आहे तोपर्यंत परमानंद मिळत नाही.

चैतन्यवत् सुखं चास्य स्वभावश्चेद् चिदात्मन:। धीवृत्तिष्वनुवर्तेत सर्वास्वपि चितिर्यथा॥ ७३ ॥ (पं. द. प्र. १२)

चैतन्याप्रमाणेच सुखहि परब्रह्माचा स्वभावच असल्यामुळे, ज्ञान झाल्याबरोबर, ज्याप्रमाणे सर्व वृत्तीत चैतन्यच भरलें असा अनुभव येतो, त्याप्रमाणें तेथे सुखाचीहि अनुवृत्ति राहिलीच पाहिजे, असें जें भक्तिरहित ज्ञानी प्रतिपादन करतात त्यांना विद्यारण्यस्वामींनी चोख उत्तर दिलें आहे. स्वामी म्हणतात—

मैवमुष्णप्रकाशात्मा दीपस्तस्य प्रभा गृहे। व्याप्नोति नोष्णता तद्वच्चितेरेवानुवर्तनम्॥ ७४॥ (पं. द. प्र. १२)

प्रकाश व उष्णता असा दिव्याचा दोन प्रकारचा स्वभाव आहे, परंतु घरांत दिवा लावला असतां, प्रकाशाचा जसा विशेष अनुभव येतो, तसा त्याच्या उष्णतेचा येत नाही. त्याप्रमाणेच जीव हा वृत्तिस्वरूप आहे, म्हणूनच त्याच्या वृत्तिरूपतेमुळे त्याला परब्रह्माचा अनुभव घेतांना प्रथम परोक्षज्ञानाने सदंशाचा अनुभव येतो व नंतर अपरोक्षज्ञानाने चिदंशाचा अनुभव येतो व प्रेमवृत्तीने परमानंदाचा अनुभव येतो.

ज्ञाननिष्ठेच्या परिपाकाने, नंतर एकजिनसी अद्वैत असा परब्रह्माचे ठिकाणीं॥ ''ग्राह्यं वा शंकरादन्यत् त्याज्यं वा यदि विद्यते''॥ ५९ ॥ (सू. सं. य. वै. खं.) ग्राह्य किंवा त्याज्य अशी परब्रह्माहून दुसरी कोणतीच वस्तु अनुभवाला येणें शक्य नाही. म्हणून परब्रह्माच्या सत्तेवर भासणारीं नामरूपें परब्रह्माच्या स्वाभाविक चैतन्यशक्तीचाच आविर्भाव असून तीं परब्रह्मस्वरूपच आहेत, असा अन्वयरूप अनुभव येतो.

मग परब्रह्म परमप्रेमस्वरूप असल्यामुळें, परब्रह्मस्वरूप झालेल्या नामरूपावरहि प्रेम बसतें. अशा रीतीने नामरूपासह परब्रह्माचें जें परमप्रेम लागतें त्यालाच भक्ति म्हणतात.

ही भक्ति पूर्ण ज्ञाननिष्ठा बाणल्यावर प्रगट होते "ते ज्ञाननिष्ठा जेथ हातवसे। तेथ भक्ति माझी उल्लसे"॥ १२४८॥ (ज्ञा. अ. १८) असें माऊलींनी म्हटलें आहे. या भक्तीनेच मोक्षाचें जें परमानंदरूप दुसरें अंग तें साध्य होतें. अशा रीतीने साधक दु:खरहित परमानंदप्राप्तिरूप मोक्षलक्ष्मीच्या सिंहासनावर आरूढ होतो.

**राजविद्या राजगुह्यं पवित्रमिदमुत्तमम्। प्रत्यक्षावगमं धर्म्यं सुसुखं कर्तुमव्ययम्॥ २॥**

**अर्थ**—हें ज्ञान म्हणजे सर्व विद्येंत म्हणजे सर्व ज्ञानांत श्रेष्ठ होय व सर्व गुह्यांतहि गुह्य होय. हें अत्यंत पवित्र म्हणजे सर्व पवित्रांत पवित्र आहे. त्याचा साक्षात् अनुभव येतो. हें ज्ञान धर्माला धरून आहे. तें प्राप्त करून घ्यायला अत्यंत सोपें आहे व प्राप्त झाल्यावर अक्षय टिकणारें आहे. ॥ २ ॥

**जें जाणणें या सुविद्येच्या गांवीं। गुरुत्वाची आचार्यपदवी। जें सकळ गुह्यांचा गोसावी। पवित्रां रावो॥ ४७॥**

**अर्थ**—जाणण्याला योग्य अशा जितक्या उत्तम विद्या आहेत त्या सर्व विद्यामध्ये या ब्रह्मविद्येला सर्वश्रेष्ठ अशी थोरपणाची आचार्य ही पदवी मिळाली आहे आणि सर्व गुह्यांत गुह्य अशी ही ब्रह्मविद्या गुह्यांचा राजा आहे व सर्व पावन करणाऱ्यांमध्यें श्रेष्ठ आहे. ॥ ४७ ॥

**गूढार्थदीपिका—जाणणेया या सुविद्येच्या गांवीं। गुरुत्वाची आचार्य पदवी**—"**द्वे विद्ये वेदितव्ये...........परा चैवापरा च**" (मुं. उ. १-१-४) जाणण्याजोग्या अशा दोन विद्या आहेत. एक परा व दुसरी अपरा, पराविद्या ही ब्रह्मविद्या होय. अपरा ही अविद्या होय. अविद्यारूप सर्व अपराविद्या संसारदायक म्हणून दु:खदायक आहे. आणि पराविद्या ही, सर्व अविद्याजन्य दु:खाचें निर्मूलन करून सच्चिदानंद परब्रह्माची प्राप्ति करून देणारी आहे. दु:ख मुळींच नको व अखंड सुख असावें अशी प्रत्येक जीवाची जी इच्छा ती पूर्ण करणारी हीच एक विद्या आहे; म्हणून ब्रह्मविद्या सर्व विद्येंत श्रेष्ठ म्हणून गणली गेली आहे. अर्थात् तिला 'आचार्य' अशी जी पदवी श्रीमाऊलींनी येथे दिली आहे ती सार्थच आहे.

**सकळ गुह्यांचा गोसावी**—व्यवहारामध्ये पुष्कळ गुह्य गोष्टी असतात. त्या व्यवहारांतील तज्ज्ञापासून जाणल्या जातात पण आत्मज्ञानरूपी गुह्य गोष्ट ही कोणत्याहि व्यावहारिक पुरुषांकडून कळूं शकत नाही. तिचा बोध करून देणारा पुरुष दुर्मिळ असतो आणि ती कळली असतां सर्व गुह्यगोष्टींचा गुह्यपणा तुच्छ ठरतो; पण आत्मज्ञानरूपी गुह्यगोष्टीचा गुह्यपणा कायमच राहतो, म्हणून ब्रह्मविद्या ही सर्व विद्येंतील गुह्यामध्ये गुह्य आहे.

**पवित्रां रावो**—जो पदार्थ अशुद्धि नाहीशी करतो त्याला पवित्र म्हणतात. परब्रह्म अत्यंत शुद्ध असून, जीवहि पूर्ण ब्रह्म आहे, म्हणून शुद्ध आहे. पण अविद्यारूप अशुद्धीने तो अशुद्ध झाला आहे. त्याच्या ठिकाणची ही अविद्यारूप अशुद्धि, सत्कर्म, प्रायश्चित्त, तीर्थ इत्यादि जेवढ्या अशुद्धि नाहीशी करणाऱ्या म्हणून पवित्र वस्तु सांगितल्या आहेत, त्यांच्या संगतींत कितीहि काळ राहिलें तरी ती अशुद्धि जात नाही. कारण त्या सर्वांचे अस्तित्व मुळीं अविद्यारूप अशुद्धिवरच अवलंबून असतें. अशी अविद्यारूप अशुद्धि नाहीशी करून, जीवाला मूळचें अविनाशी शुद्धस्वरूप प्राप्त करून देण्याकरिता, एक अध्यात्मज्ञानच समर्थ आहे. हें अध्यात्मज्ञान प्राप्त झालें असतां अशुद्धीचें नांवच राहत नाही. त्याच्या पवित्रपणाला उपमा देण्यासारखा दुसरा पदार्थ नाही; म्हणून अध्यात्मज्ञान सर्व पवित्रांत पवित्र आहे.

**आणि धर्माचें निजधाम। तेंविचि उत्तमाचें उत्तम। पैं जया येतां नाहीं काम। जन्मांतराचें॥ ४८॥**

**अर्थ**—त्याचप्रमाणे ही ब्रह्मविद्या, सर्व धर्माचें नित्य राहण्याचें ठिकाण आहे व उत्तमाचें उत्तम-म्हणजे हिच्यापेक्षा उत्तम दुसरी कोणतीच विद्या नाही. ही विद्या प्राप्त झाली असतां पुन: जन्ममरणाचें दु:ख भोगावें लागत नाही. ॥ ४८ ॥

**गूढार्थदीपिका—धर्माचें निजधाम**—प्रत्येक मनुष्याला अखंड सुख असावेसें वाटतें. अखंड सुखप्राप्तीलाच

मोक्ष म्हणतात; म्हणून प्रत्येक मनुष्याची मोक्षप्राप्ति हें ध्येय आहे, असें म्हणतां येतें ''धर्मस्य ह्यापवर्ग्यस्य'' (भाग. स्क. १-२-९) धर्म हा मुख्यत: मोक्षसुखाच्या प्राप्तीकरिताच आहे, असें भागवतादिकांतून सांगितलें आहे. पण परमार्थपराङ्मुख अशा विषयासक्त पुरुषांनाहि त्यांच्या इच्छेप्रमाणे सुख मिळावें, म्हणून भगवदाज्ञेने धर्मशास्त्र निर्माण करणाऱ्या पुरुषांनी, विषयासक्त पुरुषाची दया येऊन त्याच धर्माचरणाने विषयसुखहि मिळेल अशी व्यवस्था करून ठेविली आहे. पण ''भवत्यधर्मो धर्मोहि धर्माधर्मावुभावपि। कारणात् देशकालस्य'' (महाभारत) देशकालानुसार धर्मच अधर्म होतो व अधर्म धर्म होतो असे भारतांत सांगितलें आहे.

कोणतेवेळीं कोणता धर्म आपल्याला कल्याणकारक होईल हें विषयासक्त पुरुषाला समजणें अत्यंत कठीण असतें. ''सर्वमात्मनि संपश्यन् नाधर्मे कुरुते मन:'' (मनु. स्मृ. १२-११८) ''नाकृतात्मा वेदयते धर्माधर्म विनिश्चियम्'' ''महाजनो येन गत: स पंथा:'' रजस्तमोगुणी विषयसुखाची वासना नि:शेष नाहीशी झाल्यामुळें, ज्यांच्या ठिकाणीं सत्वगुणाचा उत्कर्ष झाला व ज्यांनी पूर्ण आत्मज्ञान संपादन केलें अशा पुरुषांचे मनांत अधर्म येतच नाही—म्हणजे अशा पुरुषानाच धर्माधर्म निर्णय कळतो असें मनुस्मृतींत व भारतांत सांगितलें आहे व ''वेदाचा तो अर्थ आम्हांसीची ठावा। येरांनीं वहावा भार माथां'' (तु. गा. १८८८) असे तुकाराम महाराजांनीहि म्हटलें आहे. सारांश आत्मज्ञान हे धर्माचें निजधाम आहे, हें सिद्ध आहे.

**उत्तमाचें उत्तम। जया येतां नाहीं काम। जन्मांतराचें**—''तैसें येणें पाहलेया। ज्ञानजात जाय लया। म्हणोनिया धनंजया। उत्तम हें'' (ज्ञा. अ. १४-४८) आत्मज्ञानाच्या दृष्टीने बाकींचीं सर्व ज्ञानें विपरीत आहेत. आत्मज्ञान झाल्यावर तीं सर्व ज्ञानें नाहीशी होतात, म्हणून आत्मज्ञान हें जन्मांतराचें खंडण करून पुनर्जन्मच न देणारें आहे.

जैसी अमृताची चवी निवडिजे ''तरी अमृताचि सारखी म्हणिजे। तैसें ज्ञान हें उपमिजे। ज्ञानेसींचि'' (ज्ञा. अ. ४-१८३) आत्मज्ञान हें सर्व ज्ञानापेक्षा उत्तम कां आहे हें श्रीज्ञानेश्वर माऊलींनीच आपल्या मुखाने सांगितलें आहे.

**मोटकें गुरुमुखें उदैजत दिसे। आणि हृदयीं स्वयंभचि असे। प्रत्यक्ष फावों लागे तैसें। आपैसयाचि॥ ४९॥**

**अर्थ**—श्रीगुरुमुखाने आत्मज्ञानाचा थोडा उदय झाला की तें आपल्या हृदयांत मूळचेंच आहे असा आपोआप प्रत्यक्ष अनुभव येतो. ॥ ४९ ॥

**गूढार्थदीपिका**—जाणीवेने जाणली जाणारी वस्तु जाणीवेहून निराळी असल्यामुळें जाणलीं जाते; पण ''एवं वस्तूसी जाणो जातां। जाणणेंचि वस्तु तत्वतां। मग जाणणें आणि जाणता। कैंचा उरे'' (अमृ. प्र. ५-१८) ''तैसें आपणया आपण। जाणतें नव्हे जाण। म्हणोनि ज्ञानपणेंविण। ज्ञानमात्र जें''॥ २२॥ (अमृ. प्र. ४) ज्या जाणीवेने वस्तु जाणली जाते त्या जाणीवेच्या ठिकाणीं जाणणें आणि जाणता हें राहत नाहीत—म्हणजे ती जाणीव जाणली जात नाही—ती जाणीवच ब्रह्मरूप असून जीवाचें तेंच स्वरूप आहे. परंतु जीवभ्रमाने मी ब्रह्मस्वरूप जाणत नाही, असें जे म्हणतो, ती त्याची भ्रांति नाहीशी करण्याकरिता गुरुपदेशाची आवश्यकता आहे.

गुरुहि, उपनिषदादि ग्रंथांतून जी आत्मस्वरूपाची चर्चा केली गेली आहे, तदनुसार आत्मस्वरूपाचा बोध करून देतात. आणि मी आत्मस्वरूप जाणत नाही, असें आत्मस्वरूपाविषयीं प्रगट केलेलें अज्ञान जाणणारा तूं, त्या अज्ञान भ्रांतीहून निराळा, केवळ ज्ञानस्वरूप आहेस, इतक्याच बोधाने, मी मूळचाच ''सर्वदु:खविनिर्मुक्तैकचैतन्यात्मकोऽहमित्येष आत्मानुभव:'' (ब्र. सू. ४-१-२) सर्व दु:खरहित केवल ज्ञानमात्र चैतन्यस्वरूप आहे ''कोणाचें कांहीं न घेसी। आपुलेंही तैसेंचि न देसी''॥ ६६॥ (अ. प्र. ९) गुरुने माझें कांही घेतलें नाही किंवा आपलें कांही दिलेंहि नाही, असा प्रत्यक्ष आपोआप अनुभव येतो.

**तेवींचि गा सुखाचां पाउटीं। चढतां येइजे जयाचिया भेटी। मग भेटल्या कीर मिठी। भोगणेंयाहि पडे॥ ५०॥**

**अर्थ**—ज्या ब्रह्मवस्तूच्या भेटीला, सुखाच्या पायरी पायरीने चढतां येते आणि मग ब्रह्मवस्तु भेटल्यावर भोक्तेपणालाहि मिठी पडते॥ ५०॥

**गूढार्थदीपिका—तेवींचि गा सुखाच्या पाउटीं। चढतां येईजे जयाच्या भेटी**—परब्रह्म हें जीवाचें मूळ स्वरूपच

आहे, तरी जोपर्यंत परब्रह्माशीं त्याचें ऐक्य होत नाही तोपर्यंत तो तें, आपल्याहून निराळें समजतो आणि म्हणूनच त्याला परब्रह्माशीं ऐक्य पावण्याकरिता पायरी पायरीने चढावें लागतें. ह्या पायऱ्या, शुभेच्छा, सुविचारणा, तनुमानसा, सत्त्वापत्ति, असंसक्ति, पदार्थाभाविनी व तूर्यगा अशा सात, योगवासिष्ठांत सांगितल्या आहेत.

(१) गुरुमुखाने वेदान्ताचें श्रवण व शास्त्रसज्जनांच्या साहाय्याने आत्मप्राप्ति करून घेतली पाहिजे अशी जी इच्छा, तिला शुभेच्छा म्हणतात. या पायरीवर चढल्यानंतर संसारदु:खाची उपेक्षा झाल्यामुळें थोडें समाधान प्राप्त होतें.

(२) पुढें संत व सच्छास्त्र यांच्या सहवासांत वैराग्यपूर्वक आत्मस्वरूपाचा विचार करणें याला सुविचारणाभूमिका, म्हणतात.

(३) आत्मस्वरूपाच्या विचाराने विषयाविषयीं दृढ वैराग्य उत्पन्न होऊन आत्मस्वरूपाकडेच चित्त लागणें, याला तनुमानसा भूमिका म्हणतात.

विषय हे स्थूल आहेत, म्हणून विषयाकार चित्त स्थूल म्हटलें जातें. वैराग्याने चित्ताचें विषयाकार होणें बंद पडलें आणि तें सूक्ष्म आत्माकार होऊं लागलें म्हणजे त्या चित्ताला तनुमानस म्हणतात (तनुमानस म्हणजे मनाचा सूक्ष्मपणा).

(४) या तीन भूमिकांच्या दृढ अभ्यासाने चित्त आत्म्याचे ठिकाणीं स्थिर झालें असतां त्याला सत्त्वापत्ति म्हणतात. या भूमिकेवर सत्व म्हणजे ब्रह्म, त्याची आपंत्ति म्हणजे प्राप्ति होते—म्हणजे या भूमिकेवर ब्रह्मसाक्षात्कार किंवा आत्मसाक्षात्कार होतो.

(५) या चार भूमिकांच्या अभ्यासाने चित्त विषयांशीं संसर्ग न ठेवतां आत्मस्वरूपाचे ठिकाणीं स्थिर होतें, याला असंसक्ति भूमिका म्हणतात.

(६) कोणत्याहि बाह्य किंवा आंतर पदार्थाच्या आकाराचें चित्त न होतां केवळ तें आत्माकार होऊन राहतें तेव्हा ती चित्ताची पदार्थाभाविनी भूमिका होय.

(७) प्रयत्नाने आत्मस्वरूपाकडे चित्त लावलें न जातां, जेव्हां तें प्रयत्नावांचून आत्मस्वरूपाचे ठिकाणीं स्थिर राहतें तेव्हा त्या चित्ताची ती तूर्यगा भूमिका होय. तूर्यगाभूमिकेवरच वृत्ति, आत्मस्वरूपाचे ठिकाणीं निश्चळ होते.

या सात भूमिकांवरून चित्त, वरच्या वरच्या भूमिकेवर जातांना, जसें जसें चढतें, तसा तसा सत्वगुणांचा उत्कर्ष होतो आणि सुखरूप आत्मा त्यांत प्रतिबिंबित होत असल्यामुळे सुख वाढत जाते, म्हणून या सात भूमिकांना, सुखाच्या पायऱ्या म्हटलें आहे.

**मग भेटलिया कीर मिठी। भोगणेयाहि पडे**—या सात भूमिकांवर आत्मैक्याची व आत्मसुखाची जाणीव राहते. जाणीव नाहीशी झाली असतां निर्विकल्प समाधि साधला जातो.

निर्विकल्प ब्रह्मस्थितीचा अनुभव जीवाला व्यवहारांत क्षणोक्षणीं जो येत असतो तो आता श्रीज्ञानेश्वर माऊली येथे दाखवित आहेत.

**परि भोगाचिया ऐलीकडिलिये मेरे। चित्त उभें ठेलेंचि सुखा भरे। ऐसें सुलभ आणि सोपारें। वरि परब्रह्म॥ ५१॥**

**अर्थ**—पण भोगाच्या अलीकडील कांठावरच चित्त केवळ सुखाने भरून राहतें, असे तें सुलभ आणि सोपें असून शिवाय तेंच परब्रह्महि आहे.॥५१॥

**गूढार्थदीपिका**—''भोग'' म्हणजे मी सुखी झालों व मला सुख झालें अशी जाणीव. ''ऐलीकडिलिये मेरे'' म्हणजे सुखाच्या भोक्तृत्वाची जाणीव होण्यापूर्वी, ''सुखभरें उभें ठेलें'' म्हणजे चित्त केवळ सुखरूप होऊन राहतें.

सुखाची जाणीव किंवा मी सुखी झालों, अशी जी वृत्ति, तिचे स्फुरण होण्यापूर्वी चित्त केवळ सुखरूप होऊन राहते. हीच समाधीची स्थिति होय.

कोणताहि विषय जाणतांना किंवा कोणताहि विषय भोगतांना मला विषय कळला, ही जाणीव उत्पन्न होते, त्याचप्रमाणे विषय भोगल्यावर मी सुखी झालों किंवा मला सुख झालें, अशी भोगाची जाणीव उत्पन्न होण्यापूर्वीचा

क्षण असा असतो की तेव्हा चित्त जाणीवरहित ब्रह्मस्वरूप होऊन राहते. चिताच्या या स्थितीला निर्विकल्पसमाधि किंवा ब्रह्मस्थिति म्हणतात, हें श्रीज्ञानेश्वर माऊलींनी ''भोगाचिये ऐलीकडिलिये मेरे। चित्त उभे ठेलें सुखभरें'' व ''वरि परब्रह्म'' ह्या चरणांनी दाखविलें आहे.

**सुलभ आणि सोपारे**—ही ब्रह्मस्थिति केवळ संतांच्या कृपेने प्राप्त होते म्हणून सुलभ आणि कष्टाशिवाय प्राप्त होते, म्हणून सोपी आहे.

परब्रह्मस्थितीची जाणीव व ब्रह्मसुखाचें भोक्तृत्व उठूं दिलें नाही म्हणजे जीव निर्विकल्प ब्रह्मस्थितींतच राहतो, असें माऊलींनी येथे सुचविलें आहे.

**पैं गा आणिकही एक याचें। जें हाता आलें तरी न वचे। आणि अनुभवितां कांहीं न वेचे। वरी विटेहि ना॥ ५२॥**

**अर्थ**—परंतु, अर्जुना! आणखीहि एक या ब्रह्मज्ञानप्राप्तीचा विशेष असा आहे की ही प्राप्ती झाली असतां कधीं नाहीशी होत नाही, तिचा अनुभव घेत असतांना कांही कमी होत नाही, शिवाय कधीं तिचा वीट येंत नाही. ॥ ५२ ॥

**गूढार्थदीपिका**—जी सावयव वस्तु असते ती नाश पावते, कमी होते व स्वत:विकृत होते पण परब्रह्म हें निरवयव व अविनाशी असल्यामुळें, तें नाश पावणें, कमी होणें किंवा विकृत होणें शक्य नाही, उलट ''इयं ज्ञानकला राजन् सकृज्ज्ञाताभिवर्धते'' ती वाढते म्हणजे व्यापक होते, असें योगवासिष्ठांत म्हटलें असून ''तैसें आत्मत्वें वेठिला होये। तो जयातया दृश्यातें पाहे। तें दृश्य दृष्टेपणेंसीं होत जाये। तयाचेचि रूप''॥ ४१० ॥ (ज्ञा. अ. १८) असें श्रीज्ञानेश्वरमाऊलींनीहि पुढें अठराव्या अध्यायांत सांगितलें आहे.

''विटे हि ना'' या पदाचा वीट येत नाही असाहि अर्थ करतां येईल. आत्मा परमप्रेमरूप असल्यामुळें त्याचा वीट येणें शक्य नाही.

**येथ जरी तूं तार्किका। ऐसी हन घेसी शंका। ना येवढी वस्तु हे लोकां। उरली केविं॥ ५३॥**

**अर्थ**—हे तर्क करणाऱ्या अर्जुना! या माझ्या म्हणण्यावर तूं कदाचित् अशी शंका घेशील की एवढी ही थोर लाभाची वस्तु लोकांपासून वांचली कशी? (म्हणजे लोक तिच्या प्राप्तीची इच्छा कां करीत नाहीत?) ॥ ५३ ॥

**जे एकोत्तरेयाचिया वाढी। जळतिये आगीं घालिती उडी। ते अनायासें स्वगोडी। सांडिती केविं॥ ५४॥**

**अर्थ**—(आपल्यापाशी असलेल्या रकमेंत) एक रुपयाने जरी अधिक भर पडत असली तरी जळत्या आगींत देखील उडी घेण्याचें साहस करणारें, अनायासें आत्मगोडी कशी सोडतील?॥ ५४॥

**गूढार्थदीपिका**—येथें ''एकोत्तरेयाचिया'' या शब्दाचा एक आणि अधिक असा अर्थ आहे. ''सहस्त्रवरी बाहिया। आहाति सहस्त्रार्जुना राया। तरी तो काय तिया। एकोत्तरावा''॥१४०॥ (अमृ. प्र. ७) अमृतानुभवांतील या ओवीत हा अर्थ आला आहे.

**तरि पवित्र आणि रम्य। तेविंचि सुखोपायेंचि गम्य। आणि सुसुख परम धर्म्य। वरि आपणपां जोडे॥ ५५॥**

**ऐसा अवधाचिहा सुरवाडु आहे। तरी जनाहातीं केवीं उरों ल्हे। हा शंकेचा ठाव कीर होये। परि न धरावी तुवां॥ ५६॥**

**अर्थ**—पुन: हें ज्ञान अत्यंत पवित्र म्हणजे शुद्ध असून, रम्य म्हणजे मनाला तल्लीन करून सोडणारें आहे, तसेंच तें सुलभ उपायाने प्राप्त होणारे आहे. तें अत्यंत सुख स्वरूप असून परम धर्मस्वरूप आहे. शिवाय आपणच तें आहों असा अनुभव आणून देणारें आहे. ॥ ५५ ॥ अशा सर्वच प्रकाराने जर आत्मज्ञान उत्तम आहे तर लोक त्याची प्राप्ति कां करून घेत नाहीत, अशी शंका येणें साहजिक आहे, पण ती शंका तूं धरूं नकोस॥ ५६॥

**अश्रद्दधाना: पुरुषा धर्मस्यास्य परन्तप। अप्राप्य मां निवर्तन्ते मृत्युसंसारवर्त्मनि॥ ३॥**

**अर्थ**—शत्रूला ताप देणाऱ्या अर्जुना! या आत्मज्ञानरूप परमधर्मावर पुरुष श्रद्धा ठेवीत नाहीत, म्हणून ते मला प्राप्त न होतां मृत्युरूपी संसारमार्गांतच पुन: पुन: परत येतात. ॥ ३ ॥

**पाहें पां दूध पवित्र आणि गोड। पासीं त्वचेचिया पदराआड। परि तें अव्हेरूनि गोचिड। अशुद्ध चि सेवी॥ ५७॥**

**कां कमळकंदा आणि दर्दुरीं। नांदणूक एकेचि घरीं। परि परागु सेविजे भ्रमरीं। जवळिला चिखलुचि उरे॥ ५८॥**

**नातरि निदैवाचां परिवरीं। लेह्या रुतलिया आहाति सहस्रवरी। परि तेथ बैसोनि उपवासु करी। कां दरिद्रें जिये॥ ५९॥**
**तैसा हृदयामध्यें मी रामु। असतां सर्वसुखाचा आरामु। कीं भ्रांतासि कामु। विषयावरी॥ ६०॥**

**अर्थ**—अर्जुना! पहा. पवित्र आणि गोड दूध जवळच कातडीरूपी पडद्याच्या आड असते, पण तें टाकून गोचीड रक्ताचेंच सेवन करीत असतो.॥ ५७॥ किंवा कमलाचा कंद आणि बेडुक एके ठिकाणीच असतात, पण भ्रमर परागाचेच सेवन करतो आणि बेडकाला चिखलच मिळतो.॥ ५८॥ किंवा दुर्दैवी पुरुषाच्या घरी (त्याच्या पूर्वजांनी) हजारों मोहरा पुरलेल्या असल्या तरी त्याला ठिकाण माहीत नसल्यामुळे तो (दरिद्री) तेथेच राहून उपवास करतो किंवा दारिद्र्यात दिवस काढतो.॥ ५९॥ त्याप्रमाणे सर्वांच्या हृदयामध्यें सर्व सुखाचा बगीचा असा मी राम आहे, पण मला न जाणणारा भ्रांत पुरुष विषयसुखांचीच इच्छा करतो.॥ ६०॥

**गूढार्थदीपिका**—मनुष्याच्या बुद्धीला जें खरें वाटतें, तेंच ती बुद्धि धरून ठेवते. बुद्धीच्या या धरून ठेंवण्याच्या व्यापाराला श्रद्धा किंवा विश्वास म्हणतात व त्याच्याच प्राप्तीचा मग इंद्रियांकडून प्रयत्न होतो. अत्यंत सत्य एक आत्माच आहे व इतर सर्व विषयादि संसार खोटा आहे; पण मनुष्य आत्म्याचा विचार करीत नाही, म्हणून मनुष्याची विषयासक्त रजोगुणी बुद्धि विषयाला सत्य समजते व त्या रजोगुणी बुद्धीची तेथेच श्रद्धा बसते.

कोणालाहि विषयापासून अखंड सुख मिळालें असा अनुभव नाही, म्हणून विषयापासून अखंड सुखाची इच्छा करणे शुद्ध भ्रांति आहें. अखंड सुख इतरत्र कोठें नसून अखंड सुखाची इच्छा करणाऱ्याचे ठिकाणीच तें असतें पण रजस्तमोगुणाने घेरलेल्या व देहादिक विषयावर अहंताममता ठेवून आसक्त झालेल्याची श्रुतिसंतावर श्रद्धा बसत नाही व त्यांना अखंड सुखाचा लाभ होत नाही.

**बहु मृगजळ देखोनि डोळां। थुंकिजे अमृताचा गिळितां गळाला। तोडिला परिसु बांधिला गळा। शुक्तिकालाभें॥ ६१॥**
**तैसी अहंममतेचिये ल्वडसवडीं। मातें न पवतीचि बापुडीं। म्हणोनि जन्ममरणाचिये दुथडीं। डहुळितें ठेलीं॥ ६२॥**

**अर्थ**—(मला सोडून विषयसुखाची इच्छा करणें म्हणजे) पुष्कळ पसरलेलें मृगजळ डोळ्याने पाहून तोंडांतील अमृताचा गुळणा न गिळतां थुंकून द्यावा किंवा शुक्तिकेची प्राप्ति होते, असें पाहून गळ्यांत बांधलेला परिस तोडून फेकून द्यावा (याप्रमाणे होय)॥ ६१॥ त्याप्रमाणे देहादिकांचे ठिकाणीं अहंताममतेच्या लगबगीमुळें बिचारे जीव, मला प्राप्त होत नाहीत, म्हणून जन्ममरणाच्या दोन्ही तीरांच्या मध्यें फिरत राहतात.॥ ६२॥

**गूढार्थदीपिका**—अहंता म्हणजे बुद्धि, मन, इंद्रियें व देह हें मी आहे असा अहंकार धारण करणें.

ममता—म्हणजे बुद्धि, मन, इंद्रियादिकांसह बाह्य विषय माझे आहेत असा अहंकार धरणें.

ह्या अहंताममतावृत्ती जीवाच्या ठिकाणीं अखंड उठत राहतात व जीव तद्रूप होत राहतो, म्हणून या सर्वांच्या अंतर्यामीं राहणाऱ्या परमेश्वराला जीव विसरला आहे व त्यामुळें तो जन्मपरंपरा भोगतो. "देहयोगाद्वा सोऽपि" (ब्र. सू. ३-२-६) या सूत्रावर भाष्य करतांना आचार्यांनीहि म्हटलें आहे की "जीवस्य ज्ञानैश्वर्यतिरोभावो देह योगाद्देहेंद्रियमनोबुद्धि-विषयवेदनादियोगाद्भवति" जीव मुळांत ब्रह्मस्वरूप म्हणजे ज्ञानऐश्वर्यादि संपन्न आहे, पण देह इंद्रियादिकांचे ठिकाणीं अत्यंत (अहंता-ममता) अहंकार असल्यामुळे त्याची ब्रह्मरूपता झांकली गेली आहे. याप्रमाणे जीवाची अहंताममता हीच मुख्य उपाधि होय. एवढी उपाधि गेली की तो पूर्ण ब्रह्मस्वरूप होतो.

**एऱ्हवीं मी तरी कैसा। मुखाप्रति भानु कां जैसा। कहीं दिसे न दिसे ऐसा। वाणीचा नोहे॥ ६३॥**

**अर्थ**—खरोखर पाहतां मी कसा आहें तें सांगतों. ज्याप्रमाणे सूर्य सदा सन्मुख असतो, तसा मी सर्वांच्या समोर आहे. कोठें नाही म्हणून दिसत नाही असा दुर्मिळ नाही.॥ ६३॥

**गूढार्थदीपिका**—जेवढें दृश्य दिसतें तेवढे सर्व खरोखर दृष्ट चैतन्यच आहे. "यालागीं वस्तुप्रभा। वस्तूचि पावे शोभा। जातसे लाभा। वस्तूचिया"॥ २९१॥ (अमृ. प्र. ७) चैतन्यस्वरूप भगवान, आपल्या प्रेमाचें सुख भोगण्याकरिता आपणच द्रष्टा व दृश्य स्वरूप झाला आहे; म्हणून तोच सर्वत्र आहे व सूर्यप्रकाशाप्रमाणे सुलभ आहे. पण जीवाला हें कळत नाही व तो दृश्याला द्रष्ट्याहून (आपल्याहून) निराळें समजतो. दृश्य द्रष्ट्याहून निराळें आहें

असें जीवाला वाटतें म्हणूनच त्याला तें दृश्य चेतन दिसत नाही जडविनाशी असें तें त्याच्या अनुभवाला येतें.

आत्मविचाराने म्हणजे परोक्ष ज्ञान होऊन, आत्मा सच्चिदानंदरूप असून तोच सर्व ब्रह्मांडाचें उपादान व निमित्तकारण, म्हणजे तोच एक आहे, दुसरें कांही नाही असें कळून येत असल्यामुळे तो कोठें नाही असा विकल्प राहत नाही. उलट तो सर्वत्र आहे व कोठेहि त्याचा अनुभव घेतां येतो असा निश्चय होतो.

पुढे आत्म्याच्या अपरोक्षज्ञानाने देहादिकांहून मी निराळा सच्चिदानंदस्वरूप आहे असा अनुभव येऊन देहादिकांवरील अहंता नाहीशी होते आणि पुढें सगुण भगवंताच्या भक्तीने "विषयचि त्यांचा झाला नारायण" सर्व दृश्य, भगवत्स्वरूप भासतें आणि ममता अहंकार नाहीसा होतो.

**मया ततमिदं सर्वं जगदव्यक्तमूर्तिना। मत्स्थानि सर्वभूतानि न चाहं तेष्ववस्थितः॥ ४॥**

**अर्थ**—मी आपल्या अव्यक्तमूर्तीने म्हणजे सर्व नामरूपाने नटलेल्या अतींद्रिय व व्यापक अशा सगुण स्वरूपाने सर्व जगांत व्यापून आहे. माझ्या ठिकाणीं सर्व भूतें आहेत पण मी त्यांत नाही. ॥ ४॥

**माझेया विस्तारलेंपणाचेनि नांवें। हें जगचि नोहे आघवें। जैसें दूध मुरालें स्वभावें। तरि तेंचि दहीं॥ ६४॥**

**अर्थ**—ज्याप्रमाणे स्वभावतःच विरजलेलें दूध दही म्हटलें जातें, त्याप्रमाणे माझ्या नामरूपाने होणाऱ्या विस्ताराचेंच जग हें नांव नाही काय? (म्हणजे परब्रह्माच्या नामरूपाने होणाऱ्या विस्तारालाच जग हें नांव आहे, असें माऊलीचें म्हणणें आहे). ॥ ६४॥

**गूढार्थदीपिका**—वर अर्जुनाला भगवंतांनी मी तुला ज्ञानविचार सांगतों असें जें म्हटलें आहे, तेंच आता भगवान सांगत आहेत.

ज्ञान म्हणजे आत्मवस्तूचें यथार्थ स्वरूप समजणें होय. हें यथार्थस्वरूप जाणलें असतां विज्ञान म्हणजे प्रपंचाचेंहि यथार्थ स्वरूप कळून येतें.

या श्लोकांत भगवान म्हणतात, माझ्या अव्यक्तमूर्तीने हें जग व्यापिलें आहे. श्रीज्ञानेश्वर माऊलींनी "अव्यक्तमूर्ति" शब्दाचा अर्थ "माझिये विस्तारलेपणाचेनि नांवें" असा केला आहे—म्हणजे माझा विस्तारच जग नव्हे काय? असा प्रश्न करून भगवंताचा विस्तार म्हणजेच जग होय असा सिद्धान्त केला आहे.

भगवान अखंड, निरवयव, पूर्ण सच्चिदानंदस्वरूप, अद्वितीय व अविकारी असल्यामुळे तो संकोच पावूं शकत नाही किंवा विकास पावूं शकत नाही. मग भगवंताचा विस्तार कसा होतो, हें जाणणें आवश्यक आहे.

विस्तार म्हणजे बहुरूप होणें, हेंच सर्वांना माहीत आहे. तैत्तिरीयश्रुतीत व त्यावरील भाष्यांत आचार्यांनी भगवंताचा विस्तार कसा होतो याचा उलगडा केला आहे. सर्व नामरूपासह अत्यंत एकरूप असलेला परमात्मा "**सोऽकामयत। बहुत स्यां प्रजायेय**" मी बहूरूप व्हावें अशी इच्छा करिता झाला. इच्छा सुखाच्या प्राप्तीकरितां होते. भगवान स्वतः परमसुखरूपच आहे. तेव्हा "आप्तकामस्य का स्पृहा" आप्तकाम परमेश्वराला इच्छा कशी होणार? परंतु ही इच्छा म्हणजे सुखप्राप्तीकरिता नसून परमेश्वराच्या परमप्रेमस्वरूपाची ही स्वाभाविक लीला होय. परमेश्वर '**एकाकी न रमते**' (बृ. उ. १-४-३) सदा सर्वदा एकरूपच राहत नाही असें सांगितलें असून "जे एकचि नव्हे एकसरें" असें माऊलीनीहि अमृतानुभवांत म्हटले आहे. म्हणजे अत्यंत एकरूप राहणे हा जसा परब्रह्माचा स्वभाव आहे तसा बहुरूप होणें हाहि परब्रह्माचा स्वभावच आहे. "एवमीश्वरस्याप्यनपेक्ष्य किंचित्प्रयोजनान्तरं स्वभावादेव केवलं लीलारूपा प्रवृत्तिर्भविष्यति" (ब्र. सू. २-१-३३) कांही एक प्रयोजनावांचून परमेश्वराची, लीलामात्र बहुरूप होण्याची प्रवृत्ति होते, असा भाव वेदान्तसूत्राने व त्यावरील भाष्याने दाखविला आहे.

"स्वरूप निर्विकल्प पूर्ण। तेथ मी म्हणाया म्हणतें कोण। ऐसेहि ठायी स्फुरे 'मी' पण। तें मुख्यत्वें जाण मूळमाया॥ ७२॥ तया मीपणाचे पोटी। म्हणे मजचि मियां पहावें दिठी। मजसी मियां सांगाव्या गोठी। अत्यादरें भेटी माझी मज होवावी॥ ७३॥ मज माझी अती प्रीति। माझी मज होवावि रति। माझ्याचि मियां घेऊनि युक्ति। मज माझी प्राप्ति सद्बोधे॥ ७४॥ म्हणे मज मिया आलिंगावें। मज मियां संभोगावें। मज मियां नियोगावें। स्वामीसेवकत्वें"॥ ७५॥

(ए. भा. अ. ३) इत्यादि ओव्यांतून नाथांनी हाच आशय प्रगट केला आहे. अर्थात् परमात्म्याचें बहुरूप होण्यावी इच्छा परमात्म्याप्रमाणे "**सत्यज्ञानलक्षणाः स्वात्मभूतत्वाद्विशुद्धाः**" (तै. उ. ३-६) सत्यज्ञानस्वरूप व परमात्म्याशी एकरूप अभिन्नच असतें, म्हणून ती शुद्धच असते, असे आचार्यांनी म्हटलें आहे.

याचा अर्थ असा की परमात्मा अद्वैतस्वरूप असल्यामुळे मी बहुरूप व्हावें—म्हणजे मी सच्चिदानंदस्वरूपाने बहूरूप व्हावें—अशी तो इच्छा करतो. "नहि पुत्रोत्पत्तेरिवार्थान्तरविषयं बहुभवनम्" मी आपल्या सच्चिदानंदस्वरूपाहून अनेक भिन्न वस्तुरूपाने बहुरूप व्हावें अशी इच्छा करीत नाही, तर "आत्मस्थानभिव्यक्तनामरूपाभिव्यक्त्या........... आत्म-स्वरूपापरित्यागेनैव ब्रह्मणाऽप्रविभक्तदेशकाले सर्वावस्थासु व्याक्रियेते। तदेतन्नामरूपव्याकरणं ब्रह्मणो बहुभवनम्" परमात्म्याच्या शक्तिरूपाने परमात्म्याशीं एकरूप होऊन राहिलेली अव्यक्तनामरूपें जेव्हा व्यक्त होतात, तेव्हा तीं सर्व अवस्थेंत आपलें नामरूपात्मक स्वरूप कायम ठेवून, परब्रह्माशी अभिन्न एकरूप राहून, परब्रह्मसत्तेवरच व्यक्त होतात, अशारीतीने नामरूपाने व्यक्त होणें हेंच परमात्म्याचें बहुभवन होय आणि श्रीज्ञानेश्वर माऊलींनी "माझिये विस्तारलेपणाचेनि नांवें" या चरणाने परमात्मा नामरूपाने जो व्यक्त होतो तोच त्याचा विस्तार होय, असें सुचविलें आहे.

सच्चिदानंद परमात्मा अतींद्रिय म्हणजे ज्ञानदृष्टिगम्य आहे, म्हणून त्याच्याशीं अभिन्न राहून, त्याच्याच ठिकाणीं भासणारा नामरूपात्मक विस्तारहि ज्ञानदृष्टिगम्यच आहे, असा वरील श्लोकांतील "अव्यक्त" शब्दाचा अर्थ असून, नामरूपाने परमात्मा व्यक्त झाल्यावर सगुणहि होतो हेंच "मूर्ति" या शब्दाने दाखविलें आहे.

अव्यक्तमूर्ति म्हणजें सर्व नामरूपाने नटलेलें परमेश्वराचें व्यापक सगुणसाकार विश्वरूप होय. ज्ञानदृष्टिगम्य अशा या अव्यक्तमूर्तीने मी या जगांत कसा व्यापून आहे, हें भगवंताने अर्जुनाला ज्ञानदृष्टि देऊन पुढें अकराव्या अध्यायांत प्रत्यक्ष दाखविलें आहे.

हा नामरूपाने झालेला परमात्म्याचा विस्तार, परमेश्वराच्या परमार्थसत्तेवरच व परमात्मस्वरूपानेच होत असल्यामुळें, परमात्म्याच्यां परमार्थसत्तेवांचून दुसरी सत्ता त्याला राहणें शक्य नाही.

**जैसे दुध मुरालें स्वभावे। तरि तेंचि दहीं**—श्रीज्ञानेश्वर माऊलींनी परमात्म्याच्या नामरूपविस्ताराला दुधापासून स्वभावतः होणाऱ्या दह्याचा दृष्टान्त दिला आहे.

दुधापासून ज्या रीतीने दहीरूप कार्य होतें, तसें कार्य होण्याला परिणामकार्य म्हणतात. परिणामकार्यांत कारण नाहीसें होतें व कार्याचे ठिकाणी कारणाहून भिन्न धर्म उत्पन्न होऊन, कार्यहि कारणाहून वस्तूरूपाने भिन्न पडते. दुधाचा दहीरूप जो परिणाम होतो. तो दोन प्रकारचा होतो. दूध कांही काल तसेंच राहिलें, तर आपोआप दहीरूप होतें, हा एक प्रकार आणि आंबटांचे विरजण घालून दुधाचे दही करतां येतें, हा दुसरा प्रकार होय.

परब्रह्माच्या नामरूपाने नटण्यास येथें दुधाचें दही होण्याचा दृष्टांत दिला असला, तरी सावयव विकारी व नाशिवंत अशा वस्तूचाच परिणाम होऊं शकतो आणि परब्रह्म नित्य, निरवयव, अविकारी आणि अद्वितीय असल्यामुळें त्याचें नामरूपात्मक अवस्थांतर होतांना त्याचा नाश होतो व तें अवस्थांतर परब्रह्माहून निराळ्या वस्तुरूपाने प्रगट होतें, असें मानतां यावयाचें नाहीं; म्हणून दुधाचें आंबट विरजणावांचून स्वभावतः दहीरूपकार्य होण्याचा जो दृष्टान्त येथे परब्रह्माच्या नामरूपाने प्रगट होण्याकरिता दिला आहे, त्याचा एवढाच अर्थ आहे की, परमात्मा त्रिगुणात्मक मायेवांचूनच स्वभावाने नामरूपात्मक होतो.

नामरूपात्मक होण्यांत तोच उपादान कारण आहे व निमित्त कारणहि आहे—म्हणजे तोच आपल्याला नामरूपात्मक करून घेतो "**तदात्मानं स्वयमकुरुत**" (तै. उ. २-७) परमात्मा आपणच आपल्याला नामरूपात्मक करून घेतो अशी श्रुतीहि आहे आणि या श्रुतीवर आधारलेल्या "आत्मकृतेः परिणामात्" (ब्र. सू. १-४-२६) या सूत्रावर भाष्य करतांना आचार्यांनीहि "स्वयमिति...................निमित्तान्तरानपेक्षत्वमपि प्रतीयते", "आत्मा विशेषेण विकारात्मना परिणामः आत्मानमिति" माया वगैरे दुसरें कांहीहि एक निमित्त

नसतांना, परमात्मा नामरूपाने व्यक्त होतो, असें म्हटलें आहे.

सारांश, नित्य, निरवयव, अविकारी व अद्वितीय सच्चिदानंदरूप असणारा परमात्मा, मायेवांचूनच नामरूपात्मक होतो; म्हणून नामरूपात्मक दशेंतहि तो पूर्ण अद्वैत ब्रह्मरूपच असतो. अशा पूर्ण अद्वैत ब्रह्मरूप नामरूपात्मक दशेलाच जग हें नांव आहे असा माऊलीच्या म्हणण्याचा अर्थ आहे.

**कां बीजचि जाहलें तरु। अथवा भांगारचि अळंकारु। तैसा मज एकाचा विस्तारु। तें हें जग॥ ६५॥**

**अर्थ**—किंवा बीजच जसें झाड होतें अथवा सोनेंच अलंकार होतें, असें हें जग म्हणजे केवळ माझ्या एकाचाच विस्तार होय.॥ ६५॥

**गूढार्थदीपिका**—परमेश्वराचें नामरूपात्मक होणें परिणामरूप नाही, तें विवर्तरूप आहे, असें माऊली सांगत आहेत.

ज्याप्रमाणे प्रथम बीज, ही एक वस्तु असते व मग त्यापासून खोड, फांद्या, पानें, फुलें, फळें असा विस्तार होतो, पण त्या सर्वांसह एक झाडवस्तुच असतें. किंवा सोन्याचे अलंकार अनेक असले तरी त्या अलंकारासह सोनें हीच एक वस्तु असते, त्याप्रमाणे परब्रह्माचा अनेकरूपाने विस्तार झाला तरी त्याचें अद्वैतरूप एक वस्तुत्व नाहीसें होत नाही. ''गुण भूतें विषय करणें। जीव भोक्ता सुखदु:खपणें। ज्ञान क्रिया कर्माचरणें। हें सर्व जाणणें पूर्ण ब्रह्म॥ ७०४॥ साखरेचा फणस प्रबळ। तेथे कांटे त्वचा बीज गोळ। अवघे साखरचि केवळ। तेविं ब्रह्मचि सकळ जगदाकारें''॥ ७०५॥ (ए. भा. अ. ३) ''पूर्वावस्थामपरित्यज्यैवावस्थांतरभानं विवर्त:'' कारणाचा नाश न होतां कारणाहून भिन्न वस्तूने वेगळें न पडतां कारणाचा नुसता रूपांतराने प्रत्यय येणें, याला विवर्त असें वेदान्तांत म्हटलें आहे. परमेश्वराची मूळस्थिति कायम ठेवूनच केवळ नामरूपाने परमेश्वराचें जगद्रूप अवस्थांतर होतें, म्हणून हें जगद्रूप अवस्थांतर सच्चिदानंदरूप परमेश्वराचें विवर्तकार्य मानावें लागतें व शास्त्रांतून तसें सांगितलेंहि आहे.

हें विवर्तकार्यहि दोन प्रकारचें आहे. एक अनध्यस्तविवर्त व दुसरा अध्यस्तविवर्त. ज्या विवर्तांत विशेषरूपाने अधिष्ठानभूत वस्तुच प्रतीत होते, त्याला अनध्यस्तविवर्त म्हणतात व ज्या विवर्तात अधिष्ठानभूत वस्तु न दिसतां, अधिष्ठानभूत वस्तुच भिन्न वस्तुरूपाने प्रत्ययाला येते त्याला अध्यस्तविवर्त म्हणतात.

जग हें नांव, परब्रह्माच्या नामरूपात्मक विस्तारालाच असल्यामुळें मुळांत जग हें परब्रह्माचें निरुपाधिक किंवा अनध्यस्त विवर्त कार्य आहे. असें हें कार्य ''**अत: सदात्मना सर्वव्यवहाराणां सर्वविकाराणां च सत्यत्वम्**'' (छां. उ. ६-३-२) परब्रह्माशीं एकरूप आहे म्हणून तें सत्य आहे, असें आचार्य म्हणतात.

**हें अव्यक्तपणें थिजलें। तेंचि मग विश्वाकारें वोथिजलें। तैसें अमूर्तमूर्ति मियां विस्तारलें। त्रैलोक्य जाणें॥ ६६॥**

**अर्थ**—ज्याप्रमाणे हे जग अव्यक्तपणाने थिजल्यासारखें असतें. तेंच मग विश्वरूपाने प्रगट होतें, त्याप्रमाणे अमूर्तमूर्ति असा जो मी, तोच नामरूपाने विस्तारलें गेलेलें त्रैलोक्य होय असें जाण.॥ ६६॥

**गूढार्थदीपिका**—मागीत ६५ व्या ओवीच्या शेवटील चरणांत ''जग'' हा शब्द आला असून, त्या लागूनच या ओवींत ''हें'' हा शब्द आला असल्यामुळे ''हें'' हा शब्द मागील ''जग'' या शब्दाचाच दर्शक आहे हें स्पष्ट आहे.

जगाच्या व्यक्त व अव्यक्त अशा दोन दशा आहेत. अव्यक्तदशेंत तें जग थिजल्याप्रमाणे सर्वनामरूपासह एक वस्तुरूप होऊन राहतें आणि तेंच मग ''विश्वाकारें वोथिजलें'' म्हणजे अनेक नामरूपात्मक भिन्न भिन्न वस्तुरूपाने प्रगट होतें. त्याप्रमाणे अत्यंत एकरूप निर्विकल्प अवस्थेंत असलेलें सच्चिदानंद परब्रह्म आपल्या स्वभावशक्तीने जें नामरूपाने प्रगट होतें, तेंच त्रैलोक्य होय असें श्रीज्ञानेश्वर महाराज म्हणतात—म्हणजे जग दुसरें कांही नसून सच्चिदानंद परब्रह्माच्या नामरूप विस्तारालाच जग हें नांव आहे. अर्थात् जग मुळांत पूर्ण ब्रह्मस्वरूपच किंवा अनध्यस्तविवर्त आहे. ''घृताचें थिजलेपण। न मोडितां धृतचि जाण। कां नाटितां कंकण। सोनेचि तें॥ ३७८॥ न उकलितां पटु। तंतूचि असे स्पष्टु। न विरवितां घटु। मृत्तिका जेवीं॥ ३७९॥ म्हणोनि विश्वपण जावें। मग तैं मातें घेयावें। तैसा नव्हें आघवें। सकटचि मी''॥ ३८०॥ (ज्ञा. अ. १४) असें श्रीज्ञानेश्वर माउलींनीच स्वत: चवदाव्या अध्यायांत पुढें सांगितलें आहे.

"अव्याकृत नामरूपभेदमात्मभूतमात्मैकशब्दप्रत्ययगोचरं जगत् व्याकृतनामरूपभेदत्वादनेकशब्दप्रत्ययगोचर-मात्मैकशब्दगोचरं चेति" (ऐ. उ. १-१ शंक. भाष्य.) परब्रह्माची निरवयव, अविकारी, अद्वितीय सच्चिदानंदरूप अवस्था नाहीशीं न होतांच, परमेश्वराच्या स्वभावशक्तिस्वरूपाने, परमेश्वराशीं अभिन्न एकवस्तुरूप होऊन असलेलीं, परमेश्वर या शब्दानेच निर्देशिलीं जाणारी व केवळ परमेश्वरस्वरूपाने अनुभवाला येणारीं, नामरूपें पृथक-पृथक होऊन अनेक शब्दांनी जेव्हा त्यांची प्रतीति येते, तेव्हा त्याला अज्ञानी जीव, जगत् म्हणतो असें आचार्यहि म्हणतात.

**महदादि देहांतें। इयें अशेषेंही भूतें। परि माझ्या ठायीं बिंबितें। जैसें जळीं फेण॥ ६७॥**

**अर्थ—**बुद्धीपासून देहापर्यंत जीं संपूर्ण भूतें दिसतात, तीं पाण्यावर जसा फेंस असतो, त्याप्रमाणे माझ्या ठिकाणीं बिंबित झालीं आहेत. ॥ ६७ ॥

**गूढार्थदीपिका—**मागील ओव्यांतून परब्रह्माचा स्वाभाविक नामरूपात्मक विकास जग होय—म्हणजे जग हें मुळांत अनध्यस्तविवर्त किंवा एक पूर्ण ब्रह्मवस्तुरूपच आहे, असें माऊलींनी प्रतिपादिलें आहे.

हें अनध्यस्तविवर्तरूप जगत् ज्ञानदृष्टिगम्य आहे. ज्ञानदृष्टि नसलेल्या अज्ञानी जीवाला तेंच ब्रह्मवस्तूहून जडविनाशी अशा महदादि भिन्न भिन्न वस्तुरूपाने व भिन्न भिन्न धर्माने प्रतीत होतें, म्हणून असें प्रतीत होणारें जग अध्यस्तविवर्तरूप आहे, हे माऊलींनी "माझ्याठायीं बिंबितें। जैसें जळीं फेण" या चरणाने सांगितलें आहे.

**माझ्या ठायीं—**परब्रह्म अमर्याद, व्यापक व अद्वितीय असल्यामुळें त्याहून भिन्न धर्माच्या वस्तूचें अस्तित्व त्यावर कल्पितच असणार हें उघड आहे. पण ज्ञानाचा विषय न होणाऱ्या परब्रह्माच्या निर्गुण स्वरूपावर अध्यास होणें शक्य नाही. तें स्वरूप जेव्हा ज्ञानाचा विषय होईल तेव्हाच त्याच्यावर अध्यास होऊं शकतो. निर्गुणस्वरूप जेव्हा नामरूपाने नटून, आपणच आपल्याला विषय करतें, तेव्हाच विषयरूप झालेल्या अंशावर अध्यासरूप भ्रम होतो; असा आचार्यांनी अध्यासभाष्यांत आशय दाखविला आहे. म्हणून माझें सर्व नामरूपाने नटलेले अव्यक्त म्हणजे अतींद्रिय किंवा ज्ञानदृष्टिगम्य असें सगुण स्वरूपच जीवाला त्याच्या अज्ञानानामुळें अध्यस्तविवर्त असें जड विनाशी जगद्रूप भासतें, असा "माझे ठायी" या चरणाचा अर्थ आहे.

"**बिंबितें**"—येथे बिंबिते या शब्दाने वरील तत्त्वच श्रीमाऊलींनी प्रतिबिंबवादाचा आश्रय करून स्पष्ट केलें आहे. "तस्य च प्रतिबिंबस्य सत्यत्वमेवेति प्रतिबिंबवादिन:" (सि. बिं. श्लो. १) प्रतिबिंबवादांत, प्रतिबिंब हें बिंबच असल्यामुळे तें सत्य आहे. त्याचें प्रतिबिंबत्व म्हणजे उपाधिमुळे भासणारें त्याचें बिंबाहून निराळे वस्तुत्व व निराळे धर्म हे खोटे किंवा अज्ञानमूलक आहेत, असें मानिलें जातें.

येथेहि जगत् हें परब्रह्माहून निराळी वस्तु नसून, तिचे धर्महि निराळे नाहीत, पण अज्ञानामुळें जगत् परब्रह्माहून निराळी वस्तु आहे, असें वाटतें व तिचे धर्महि परब्रह्माच्या सच्चिदानंदधर्माहून निराळे असे जडविनाशी प्रतीत होतात, असें माऊलींनी "बिंबितें" या शब्दाने सुचविलें आहे.

**जैसें जळीं फेण—**ज्याप्रमाणें जलापासून झालेला फेंस जलस्वरूपच असतो, फेंस जळाहून निराळी वस्तु आहे, असें अज्ञान्याचें म्हणणें मिथ्या ठरतें, त्याप्रमाणें जगत् परमेश्वराहून निराळी वस्तु आहे, असें अज्ञान्याचें म्हणणेंहि खोटें मानिलें पाहिजे असें "**सतोऽन्यत्वे चानृतत्वम्**" (छां. उ. ६-३-२) या पंक्तीने आचार्यांनी प्रतिपादिलें असून "**अब्रह्मप्रत्ययः सर्वोऽविद्यामात्रो रज्ज्वामिव सर्पप्रत्ययः**" (मुंडक. उ. २-२-१२) दोरीवर भासणाऱ्या मिथ्या सर्पाप्रमाणे अब्रह्मप्रत्ययाचें—म्हणजे जडविनाशीस्वरूपाचें— जगत् अविद्याजन्य आहे म्हणजे खोटेंच म्हटलें पाहिजे, असें मुंडकोपनिषदांतहि त्यांनी (आचार्यांनी) म्हटलें आहे.

**परि तया फेणांआंतु पाहतां। जेवीं जळ न दिसे पंडुसुता। नातरी स्वप्नींची अनेकता। चेइलिया नोहिजे॥ ६८ ॥**

**अर्थ—**पण, अर्जुना! त्या फेसाआंत पाणी पाहूं गेल्यास दिसत नाही किंवा स्वप्नांत आपणच आपल्या कल्पनेनुसार जे अनेकपदार्थरूप होतो, तो आपला अनेकपणा जागृतींत दिसत नाही. ॥ ६८ ॥

**तैसीं भूतें इयें माझा ठायीं। बिंबती तयांमाजि मी नाहीं। इया उपपत्ती तुज पाहीं। सांगितलिया मागां॥ ६९ ॥**

**अर्थ**—त्याप्रमाणें ही सर्व भूतसृष्टि माझे ठिकाणीं भासते, पण त्या भूतसृष्टींत मी नाही. हें मागेंहि तुला अनेक दृष्टान्तांनी सांगितलें आहे. ॥ ६९ ॥

**गूढार्थदीपिका**—फेंस पाण्यापासूनच होतो, पण पाण्याच्या पातळपणाहून भिन्न अशा घनरूपाने तो प्रतीत होत असल्यामुळे, त्यांत जसें पाणी दिसत नाही. किंवा स्वप्नाहून भिन्न असलेल्या जागृति अवस्थेंत जशी स्वप्नाची अनेकता राहूं शकत नाही, त्याप्रमाणे सच्चिदानंद परमेश्वरावर भ्रांतीने जडविनाशी धर्माने भासत असलेल्या व परब्रह्माहून वस्तुरूपाने भिन्न पडलेल्या मिथ्या जगताचे ठिकाणीं सच्चिदानंद परब्रह्माचा अनुभव येणें शक्य नाही असें माऊलींचें म्हणणें आहे.

**म्हणऊनि बोलिलिया बोलाचा अतिसो। न कीजे यालागीं हें असो। परि मजआंत पैसो। दिठी तुझी॥ ७० ॥**

**अर्थ**—सांगितलेल्या गोष्टीच पुनः पुनः सांगून विस्तार करणें योग्य नाही, म्हणून आता हें पुरे. पण माझ्या स्वरूपाचे ठिकाणीं तुझी दृष्टि प्रवेश करो॥ ७० ॥

**गूढार्थदीपिका**—अज्ञानी जीवाला परब्रह्माचा नामरूप विस्तार, परब्रह्माहून निराळी वस्तु आहे, असे जोपर्यंत वाटतें, तोपर्यंत परब्रह्मवस्तु झांकली जाऊन त्याला तिचा अनुभव येत नाही; म्हणून ज्याप्रमाणे फेंसांनी झांकलें गेलेलें पाणी फेंस अलग करून घ्यावें लागतें, त्याप्रमाणे नामरूपाचे ठिकाणीं कल्पिली गेलेली जगद्वस्तु सोडून देऊन एक सच्चिदानंद परमात्माच नामरूपाने नटला आहे, अशी दृढ बुद्धि ठेविली असतां परमेश्वराचे ठिकाणीं बुद्धीचा प्रवेश होतो, असें माऊली येथे सांगत आहेत.

**न च मत्स्थानि भूतानि पश्य मे योगमैश्वरम्। भूतभृन्न च भूतस्थो ममात्मा भूतभावनः॥ ५॥**

**अर्थ**—माझ्या ईश्वरस्वरूपाचा विचार करून पाहशील तर माझें—ईश्वरस्वरूप सर्व भूतांचें धारण पोषण करणारें व सर्व भूतांना उत्पन्न करणारें आहे असें (अज्ञान्याला) वाटत असलें तरी मी भूतांचे ठिकाणीं नाही व भूतें माझ्या ठिकाणीं नाहीत (असें तुला कळून येईल)॥ ५॥

**गूढार्थदीपिका**—"पतीचेनि अरूपपणें। लाजोनि अंगाचें मिरवणें। केलें जगाएवढें लेणें। नामरूपाचें" (अमृ. प्र. १-३०) परब्रह्माचे ठिकाणीं लीन असलेलीं नामरूपें जेव्हां परब्रह्माचे स्वभावशक्तीने परब्रह्मावरच व्यक्त होतात, तेव्हा त्या नामरूपाचे योगाने परब्रह्मच सगुण होतें. म्हणोनि वन्हि आणि ज्वाळ। दोन्ही वन्हीचि केवळ। तेवीं मी गा सकळ। संबंध वावो"॥ १२३॥ (ज्ञाने. अ. १४) ज्याप्रमाणे वन्हि आणि ज्वाळ हे दोन्ही जसा एक अग्निच असतो त्या दोन भिन्न वस्तु नाहीत, म्हणून त्यांचा कार्यकारणसंबंध खोटा आहे, त्याप्रमाणें परब्रह्म व नामरूपें दोन्ही एक पूर्ण परब्रह्मस्वरूपच आहेत. त्या दोन निराळ्या वस्तु नाहीत; असें भगवान सांगत आहेत.

**आमुचा प्रकृतीपैलीकडील भावो। जरी कल्पनेवीण लागसी पाहों। तरी मजमाजीं भूतें हेंही वावो। जें मी सर्व म्हणऊनि॥ ७१ ॥**

**अर्थ**—अर्जुना! माझे प्रकृतीच्या पलीकडील जें स्वरूप आहे तें, जर दुसऱ्या कांही वस्तूची कल्पना न करितां तूं पाहूं लागशील, तर मीच सर्व आहे—म्हणजे माझ्या ठिकाणीं भूतें आहेत, हें म्हणणें व्यर्थ आहे—असें तुला कळून येईल. ॥ ७१ ॥

**गूढार्थदीपिका**—अविनाशी सच्चिदानंद परब्रह्मापासून जडविनाशी अशा भिन्न धर्माचें जगत् कसें झालें, हे दृष्टिसृष्टि व सृष्टिदृष्टि या दोन वादांनी वेदान्तशास्त्रांतून सांगितलें आहे.

जडविनाशी सृष्टि खोटी किंवा मिथ्या आहे असेंच दोन्ही वादांचें तात्पर्य असलें तरी या दोन वादांत संक्षेपतः फरक असा आहे—

(१) सृष्टिदृष्टिवादांत, शुद्धब्रह्म, मायाविशिष्ट ईश्वर व अज्ञानोपाधिक जगत्रूप जीवसृष्टि असे तीन पदार्थ मानले आहेत, तर दृष्टिसृष्टिवादांत "अज्ञानानुपहितं चैतन्यमीश्वरः। अज्ञानोपहितं जीव इति" अज्ञानाला आधार असलेलें चैतन्य, जीव असून, त्याच्या अपेक्षेने अज्ञानरहित शुद्ध चैतन्यच ईश्वर आहे, असे दोनच पदार्थ मानले आहेत.

(२) सृष्टिदृष्टिवादांत ब्रह्माची पारमार्थिकसत्ता, जीवजगतूईश्वर यांची व्यावहारिकसत्ता आणि रज्जुसर्पादिकांची

प्रातिभासिकसत्ता, अशा तीन सत्ता मानल्या आहेत, तर दृष्टिसृष्टिवादांत परब्रह्माची किंवा ईश्वराची परमार्थिकसत्ता व परब्रह्माव्यतिरिक्त सर्वांची प्रातिभासिक म्हणजे काल्पनिकसत्ता, अशा दोनच सत्ता मानल्या आहेत.

पारमार्थिकसत्ता म्हणजे अविनाशी अस्तित्व, व्यावहारिकसत्ता म्हणजे ब्रह्मज्ञान होईपर्यंत अविनाशी वाटणारें अस्तित्व व प्रातिभासिकसत्ता म्हणजे पदार्थ कळतो तेव्हाच त्याचें अस्तित्व असणें.

(३) सृष्टिदृष्टिवादांत मायोपाधिक ईश्वर सृष्टीचा कर्ता असून दृष्टिसृष्टिवादांत जीवाच्या कल्पनेनुसार सृष्टि भासते, असें मानिलें जातें.

(४) सृष्टिदृष्टिवादांत ईश्वर मायोपहित असला तरी त्याला बंध मोक्ष नाहीत. तसेच दृष्टिसृष्टिवादांत अज्ञानोपहित जो जीव त्यालाहि बंधमोक्ष नाहीत.

(५) सृष्टिदृष्टिवादांत अज्ञान नाना असून तत्प्रतिबिंबित जीवहि अनेक आहेत व त्यांनाच बंधमोक्ष आहेत; पण दृष्टिसृष्टि-वादांत अज्ञान एकच मानलें असून, अज्ञानाचें कार्य जें अंत:करण तें नाना असून त्यांत पडलेलें प्रतिबिंबरूप जीवाभास अनेक आहेत व त्यालाच बंधमोक्ष आहे असें मानिलें आहे.

(६) सृष्टिदृष्टिवादांत ब्रह्मप्राप्तीकरिता वेदान्तविचाराने जीव व ईश्वर या दोघांच्याहि उपाधीचा निरास करावा लागतो, पण दृष्टिसृष्टिवादांत नुसत्या अंत:करणप्रतिबिंबितजीवाभासाच्या अंत:करणउपाधीचा निरास केला की पुरे. श्रीज्ञानेश्वर माऊलींनी "तैसा देहाहंकार नाथिला। हा समूळ जयाचा नाशिला। तोचि परमात्मा संचला। आधींचि आहे"॥ ८४॥ (ज्ञाने. अ. ६) या ओवींतहि हेच सांगितलें आहे.

(७) सृष्टिदृष्टिवादांत कार्यरूप सृष्टीची उत्पत्ति क्रमवार होते, असें मानलें जातें, पण ज्याप्रमाणें स्वप्नात बाप व मुलगा एकदमच उत्पन्न होतात, तरी मुलगा, माझा बाप माझ्यापूर्वी उत्पन्न झाला अशी कल्पना करतो, त्याप्रमाणें दृष्टिसृष्टिवादांत अनादिषट् पदार्थ सोडून बाकीचा कारणकार्यरूप प्रपंच एकदम उत्पन्न होतो असे मानलें जातें.

हा वाद बौद्धांच्या विज्ञानवादावारखा आहे, अशी कित्येक विद्वानांची गैरसमजूत होते. पण विज्ञानवादांत व दृष्टिसृष्टिवादांत फरक आहे.

विज्ञानवादांत "सर्वं क्षणिक क्षणिकम्" आत्म्यासह सर्व क्षणिक मानलें जातें, तर दृष्टिसृष्टिवादांत आत्मा अविनाशी मानला जातो. आणि "यावद्दृष्टि: तावत्सृष्टि:" म्हणजे जोपर्यंत पदार्थाचें ज्ञान किंवा पदार्थाची कल्पना आहे तोपर्यंत पदार्थाचें बाह्य अस्तित्व मानिलें जातें व विज्ञानवादी वस्तूचें बाह्य अस्तित्व मुळींच मानत नाहीत.

हा दृष्टिसृष्टिवाद योगवासिष्ठ, बृहदारण्यकोपनिषद्, मांडुक्यकारिका इत्यादि ग्रंथांत निरूपिला गेला असून, हा वादच वेदान्तांत मुख्य मानिला आहे, असे सिद्धान्तबिंदूत श्रीमधुसूदनसरस्वति म्हणतात आणि श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी आपल्या भावार्थदीपिकेंत व अमृतानुभवग्रंथांत विशेषत: दृष्टिसृष्टिवादच प्रतिपादिला आहे.

या वादानुसार अर्थ भूतसृष्टि जीवकल्पित आहे, हें आतां श्रीज्ञानेश्वर माऊली दाखवित आहेत.

प्रकृति म्हणजे अविद्या किंवा त्रिगुणात्मक माया "न ह्यस्त्यविद्या मनसोऽतिरिक्ता"॥ १७१॥ (विवेकचू.) ही मनापासून निराळी नाही. मन म्हणजेच अविद्या असे आचार्य म्हणतात, "वायां मन हें नांव। एऱ्हवीं कल्पनाचि सावेव"॥ ११०॥ (ज्ञाने. अ. १३) आणि मन म्हणजे कल्पना दुसरे काही नाही असें माऊलींनीहि म्हटले आहे; म्हणून माया म्हणजेच कल्पना होय.

ही कल्पना दोन प्रकारची आहे. एक यथार्थ कल्पना व दुसरी विपरीत कल्पना. ब्रह्मवस्तु ज्या लक्षणाची सांगितली आहे तशी ती अंत:करणांत ग्रहण करणें ही यथार्थ कल्पना होय. हिलाच विद्याहि म्हणतात आणि शास्त्रांवरून ब्रह्मवस्तूचें लक्षण न जाणतां, त्या वस्तूची मूळ लक्षणाहून निराळ्या लक्षणाची कल्पना होणें याला विपरीत कल्पना म्हणतात. हिला अविद्या असेंहि नांव आहे.

येथे 'प्रकृति' या शब्दाने विपरीत कल्पनारूप अविद्या घेतली आहे. ही विपरीत कल्पना ज्या परब्रह्म स्वरूपाच्या ठिकाणीं होते, त्या परब्रह्माचा, त्या विपरीत कल्पनेशीं कांही संबंध नसल्यामुळें, तें परब्रह्म अर्थात्

कल्पनेच्या पलीकडे असते आणि या विपरीत कल्पनेच्या पलीकडे असलेला जो ब्रह्मभाव किंवा ईश्वरभाव आहे, तो नित्य, शुद्ध, बुद्ध, मुक्त, कूटस्थ, निरवयव, अद्वैत सच्चिदानंदघन असा आहे.

या ब्रह्मभावाचा, त्याच्याहून विपरीत लक्षणाच्या भिन्न जगत्‌वस्तूची कल्पना न करतां जर विचार केला तर ''परि काळकुटी चोखट। सुधा कैची'' ज्याप्रमाणे काळकूट विषापासून त्याच्या विरुद्ध धर्माचें अमृत उत्पन्न होणें शक्य नाही, त्याप्रमाणे अस्फुट अद्वैत सच्चिदानंद अशा परब्रह्मापासून त्याच्या विशुद्ध धर्माची जडविनाशी भूतसृष्टिच उत्पन्न होणें शक्य नाहीं; म्हणून सर्व नामरूपासह एक परब्रह्मच आहे असा अनुभव येतो. या ठिकाणीं जगत् हें जीवकल्पित आहे हा दृष्टिसृष्टिवादाचा सिद्धान्त माऊलींनी स्वीकारला आहे.

**एऱ्हवीं संकल्पाचिये सांजवेळे। नावेक तिमिरेजती बुद्धीचे डोळे। म्हणोनि अखंडित परि झांवळे। भूतभिन्न ऐसें देखे॥ ७२॥**

**अर्थ**—विचार करून पाहतां, परब्रह्मावर भासणारीं नामरूपें यांचे ठिकाणीं परब्रह्म विसरल्यामुळें, परब्रह्माहून भिन्न जगद्वस्तूची जी कल्पना होते, तो संध्यासमय होय. त्या संध्यासमयीं बुद्धीचे ज्ञानडोळे, तेवढ्यापुरते अंधुक होतात व एक अखंड ब्रह्म असलें, तरी तें अंधुक डोळ्यांनी नानाप्रकारच्या भूतांनी विभागलें गेलें असें दिसतें. ॥ ७२ ॥

**गूढार्थ दीपिका**—प्रत्येक वस्तु नामरूपात्मक आहे. त्या नामरूपाने ती वस्तु ओळखिली जाते. सूर्यप्रकाशांत वस्तूचीं नामरूपें कळून आलीं म्हणजे ही अमुक वस्तु आहे असा यथार्थ निश्चय होतो; म्हणून त्या वस्तूवर दुसऱ्या वस्तूचा कधीं भ्रम होत नाही. पण सायंकाळीं जेव्हा कोणत्या वस्तूचीं हीं नामरूपें आहेत हें स्पष्ट कळून येत नाही, तेव्हा दुसऱ्या वस्तूचा भ्रम होतो.

परब्रह्म सर्व नामरूपासह अखंड एकरूप आहे, पण ही नामरूपें परब्रह्माचीं आहेत हें ज्ञान जीवाला नाही. हीच सांजवेळ होय. या सांजवेळेमुळें नामरूपासहित असलेलें अखंड परब्रह्म त्याला अनेक नामरूपद्वारा भिन्न भिन्न भूतरूपाने दिसूं लागतें.

**तेचि संकल्पाची सांज जैं लोपे। तैं अखंडितचि आहे स्वरूपें। जैसें शंका जातखेवों लोपे। सापपण माळेचें॥ ७३॥**

**अर्थ**—ज्याप्रमाणे समोर पडलेल्या माळेवर सर्पाची कल्पना होते आणि सर्पाची कल्पना निघून गेली की, माळेवर सर्प दिसत नाही, त्याप्रमाणे भूतांची कल्पनारूपी सायंकाल निघून गेली की, तें ब्रह्मस्वरूप अखंडच आहे. तें विभागलें गेलें नाही असा अनुभव येतो. ॥ ७३ ॥

**गूढार्थदीपिका**—जीवाला, वेदान्तविचाराने आपल्या नित्यज्ञानदृष्टिरूप साक्षीस्वरूपाचा अनुभव आला म्हणजे सर्वच कल्पितसृष्टीच्या भासाचा नाश होतो व माझ्या कूटस्थ आत्मस्वरूपाचे ठिकाणीं, आत्म्याहून निराळी असलेली जगद्वस्तु पूर्वी केव्हा नव्हती, आतां नाही व पुढें कधीं राहणार नाही असा निश्चय होतो.

**एऱ्हवीं तरी भूमीआंतूनि स्वयंभ। काय घडेया गाडगेयांचे निघती कोंभ। परि ते कुलालमतीचे गर्भ। उमटले कीं॥ ७४॥**

**अर्थ**—नाही तर अर्जुना! जमिनींतून आपोआप घडेगाडग्याचे स्वयंभ कोंभ निघतात काय? परंतु ते सर्व मातीचे घडेगाडगे म्हणजे कुंभाराच्या बुद्धींत जे गुप्त आकार होते, तेच मातीच्या ठिकाणीं प्रकट झाले. ॥ ७४ ॥

**गूढार्थदीपिका**—कांहीं वेदान्ती असा प्रश्न करतात की ''एका वस्तूवर दुसऱ्या वस्तूचा जेव्हा भ्रम होतो, तेव्हा त्याला अधिष्ठानभूत मूळ वस्तूचें अज्ञान आणि ज्या वस्तूचा भ्रम होतो त्या वस्तूच्या अनुभवाचा पूर्वी मनावर संस्कार असतो, पण परब्रह्मावर जेव्हा प्रथमच जीवाला भ्रम झाला, तेव्हा त्याला कारणभूत असणारा पूर्व जगताचा संस्कार नव्हता. मग जगद्भ्रम कसा झाला हें सांगता येत नाही. पारमार्थिक दृष्टिसृष्टिवादमतें, ज्यावेळीं जो सृष्टिविषयक पदार्थ मनांत येतो, त्याचवेळी व त्याचकाळीं तो उत्पन्न झाल्याचें भासतें, असें म्हणणें संयुक्तिक ठरते.''

पण हे म्हणणें वेदान्ताला धरून नाही. जगताचा भ्रम ज्याला होतो त्याला जीव म्हणतात. या जगद्भ्रमाचा आदि किंवा प्रथमच आरंभ मानला, तर हा भ्रम जीवाला झाला, त्याच्यापूर्वी जीव भ्रमरहित मुक्त होता किंवा पूर्ण ब्रह्मस्वरूप होता आणि मग त्याला भ्रम झाला म्हणजे जीवदशा उत्पन्न झाली असा त्याचा अर्थ होतो. असें मानलें तर ज्याप्रमाणें आधीं ब्रह्मस्वरूप असलेलें चेतन जीवदशेला आलें त्याप्रमाणें वेदान्तविचाराने व गुरुकृपेने पूर्ण मुक्त

झालेलें पुरुषहि पुन: भ्रमयुक्त होऊन जीवदशेला येणारच. असें झाल्यास वेदान्ताची मोक्षस्थिति अनित्य होईल व मोक्षाकरिता सांगितलेलीं साधनें व्यर्थ ठरतील.

त्याचप्रमाणे ''ब्रह्मभावश्च मोक्ष:'' (ब्र. सू. १-१-४) वेदान्तांत ब्रह्मभावाला मोक्ष म्हटलें असून तो नित्य आहे असे मानिलें आहे. ''नित्यश्च मोक्ष: सर्वैर्मोक्षवादिभिरभ्युपगम्यते'' आणि सर्व दर्शनकारांनीहि मोक्ष नित्यच मानला आहे. कोणीहि अनित्य मानला नाही. मोक्ष अनित्य ठरल्यास ब्रह्मभावच अनित्य ठरतो. जीवाच्या ठिकाणीं जो जगद्भ्रम आहे तो प्रथम केव्हा तरी झाला, असें मानण्यात वरप्रमाणें अनर्थपरंपरा उत्पन्न होते; म्हणून ''उत्पत्त्यसंभवात'' (ब्र. सू. २-२-४२) या सूत्रात जीवाची उत्पत्ति संभवत नाही असा सिद्धान्त भगवान व्यासांनी मांडला आहे.

जीवदशेची उत्पत्ति होत नाही असा सिद्धान्त आहे आणि ज्या जगद्भ्रमामुळे जीव पदार्थ मानला गेला, तो जगद्भ्रमहि अर्थातच प्रथम केव्हा तरी उत्पन्न होतो असें मानतां येत नाही. म्हणूनच पूर्व सर्व वेदान्त्यांनी ''जीव ईशो विशुद्धाचित् तथा जीवेशयोर्भिदा। अविद्या तत् चित्तोर्योग:षडस्माकमनादय:'' जीव, ईश्वर, शुद्ध चैतन्य, जीव व ईश्वर यांचा भेद, अविद्याभ्रम व त्याचा चैतन्याशीं संबंध ह्या सहा गोष्टी अनादि म्हणजे प्रथमारंभरहित आहेत, असें मानलें आहे.

वेदान्तांत दृष्टिसृष्टिवाद प्रमाण मानला असला तरी ''अनाद्यतिरिक्तसृष्टिविषय एव दृष्टिसृष्टिस्वीकारात्। कारणात्मना च स्थायित्वस्वीकाराच्च'' तो कार्यरूप जगताविषयींच मानला आहे. कार्यरूप जगताचे कारणभूत असे जे अनादि षट्पदार्थ मानले आहेत ते दृष्टिसृष्टिवादांतहि ब्रह्म सोडून बाकीचे पांच ब्रह्मज्ञान होईपर्यंत स्थिर मानले असल्यामुळें त्यांचे ठिकाणीं दृष्टिसृष्टिवाद मानतां येत नाही असे मधुसूदनसरस्वतींनी अद्वैतसिद्धींत म्हटले आहे, परब्रह्म हे अनादि अनंत आहे.

किंवा अनादिपदार्थाचे ठिकाणीं दृष्टिसृष्टिवाद जर मानला तर अंत:करणवृत्त्यवच्छिन्न जो जीवाभास तोच सृष्टीची कल्पना करीत असल्यामुळें त्यानेच जीव, ईश, जीव व ईश्वर याचा भेद, अविद्याभ्रम व त्याचा चैतन्याशीं संबंध या पांच पदार्थाचे ठिकाणीं अनादित्वाची ब्रह्मज्ञान होईपर्यंत स्थिरत्वाची कल्पना केली आहे असें मानावें लागतें म्हणून दृष्टिसृष्टिवादांतहि जगद्रूपभ्रम होण्याकरिता पूर्व जगताच्या संस्काराची अडचण येत नाही. ''न च सुषुप्तं प्रति संस्कारादेरप्यभावेन तस्य पुन: प्रबोधायोग: कारणात्मना संस्कारादे: सत्वात्'' सुषुप्तींत गेलेल्या पुरुषाचे ठिकाणीं संस्कारादि राहत नसल्यामुळें पुन: तो जागा होणार नाही अशी शंका येत नाही. कारण संस्कारादिकांचा कारणांतच अंतर्भाव होत असल्यामुळे ते संस्कारादि स्थिर राहतातच, असें मधुसूदनसरस्वतींनीच म्हटलें आहे.

**नातरी सागरींच्या पाणीं। काय तरंगाचिया आहाती खाणी। ते अवांतर करणी। वारयाची नव्हे॥ ७५॥**
**पाहें पां कापसाचां पोटीं। काय कापडाची होती पेटी। तो वेढितयाचिया दिठी। कापड जाहला॥ ७६॥**
**जरी सोनें लेणें होऊनि घडे। तरी तयाचें सोनेंपण न मोडे। येर अळंकार हे वरचिलीकडे। लेतयाचेनि भावें॥ ७७॥**
**सांगें पडिसादाची प्रत्युत्तरें। कां आरिसा जें आविष्करे। तें आपलें कीं साचोकारें। तेथेंचि होतें॥ ७८॥**
**तैसी इये निर्मळ माझ्या स्वरूपीं। जो भूतभावना आरोपी। तयासि तयाचां संकल्पीं। भूताभासु असे॥ ७९॥**

**अर्थ**—किंवा समुद्राच्या पाण्यांत तरंगाच्या खाणी आहेत काय? ते वाऱ्याचेंच निराळें आनुषंगिक कार्य नव्हे काय?॥ ७५॥ किंवा कापसाच्या पोटांत कापडाचा गठ्ठा असतो काय की तो वस्त्र नेसणाऱ्याच्या कल्पनेनुसार कापडरूप झाला?॥ ७६॥ सोनें जरी अलंकाररूपाने घडलें गेले तरी त्याचें सोनेपण नाहीसें होत नाही. बाकी सोन्याला अलंकार जें म्हटले जातें तें अलंकार घालणाऱ्याच्या वरच्या दृष्टीने असते.॥ ७७॥ सांग बरें, अर्जुना! एखादें ठिकाणीं जेथें आपल्या बोलण्याचा प्रतिध्वनि येतो तो किंवा आपल्यासमोर धरलेल्या आरशामध्ये जें (प्रतिबिंब) दिसतें तें खरोखर आपले कीं तेथेच होतें.॥ ७८॥ त्याप्रमाणे माझ्या सर्व नामरूपाने नटलेल्या शुद्ध निरुपाधिक स्वरूपाचे ठिकाणीं जो भूतसृष्टीची कल्पना करतो, त्यालाच त्याच्या कल्पनेमुळें भूतसृष्टि भासते.॥ ७९॥

**गूढार्थदीपिका**—मातीपासून होणारे गाडगेघडे, समुद्राच्या पाण्यावर उठणारे तरंग, कापसापासून होणारें कापड, प्रतिध्वनि, प्रतिबिंब इत्यादि दृष्टान्त, जीवाला शुद्ध सच्चिदानंदस्वरूपाचे ठिकाणी जगद्भ्रम कसा होतो हें दाखविण्याकरितां दिले आहेत.

मातीपासून झालेला घडा म्हणजे वस्तुतः मातीलाच आलेला आकार होय, कारण मातीवस्तूहून घडा म्हणून यत्किंचित्हि निराळी वस्तु नाही. फरक इतकाच झाला की पूर्वी ज्या आकाराला आपण घडा म्हणत होतो तो आकार नव्हतां व घडा हें नावहि नव्हतें, तेव्हा माती किंवा मातीचा पेंड, हें नांव व त्याचा आकार जो होता, तो जाऊन मातीचेच ठिकाणीं घडा हें नांव व दुसरा आकार आला. पण दोन्ही नामरूपांत एक मातीच आहे, "अवतरली गाडग्यां घडां। पृथ्वी अनोळख झाली मूढा" (ज्ञा. अ. १८-५४३) हें अद्वैतज्ञान ज्याला नाही तो पुरुष मातीवस्तूहुन निराळ्या घडावस्तूची कल्पना करतो व घडांवस्तूची तीं नामरूपें आहेत असें समजतो.

त्याचप्रमाणे "कापूसापासोनी होय दोरा। परि तो कापुसचि खरा" (परमामृत) कापसापासून झालेला दोरा कापूसच असतो. पण हे न जाणणारा मूर्ख पुरुष कापसापासून झालेल्या दोऱ्याला कापसाहून निराळी वस्तू समजतो व दोरा हें नांव व त्याचा आकार, दोरा वस्तूचीं आहेत. असे समजतो.

याप्रमाणेच एका अद्वैतसच्चिदानंद परब्रह्मवस्तुचे ठिकाणीं सर्व नामरूपें आहेत व त्या नामरूपाने ती परब्रह्मवस्तूच नटली आहे. परमेश्वराचें हें स्वरूप निर्मळ म्हणजे शुद्ध निरुपाधिकच आहे. परमेश्वराचें निर्गुणस्वरूप शुद्ध आहे असें जें वेदन्तांत म्हटले जातें त्याचा अर्थ "सत्वरजतमांसिगुणाः तद्रहितम्" परमेश्वराचे ठिकाणीं मायेचे सत्व, रज, तम हे तीन गुण नाहीत एवढाच आहे आणि हें स्वरूपहि परमेश्वर, मायेवांचून स्वभावशक्तीने घेतो, म्हणून तें शुद्ध निर्गुणच आहे. पण अज्ञानी जीवाला हें ज्ञान नसल्यामुळें तो प्रत्येक नामरूपाचे ठिकाणीं निरनिराळ्या वस्तूची कल्पना करतो.

येथे कोणी अशी शंका घेतील की जगताचें अधिष्ठानभूत म्हणून तुम्ही वर सांगितलेलें स्वरूप सगुण साकार आहे. पण परमेश्वर निर्गुण असून तो नित्य, शुद्ध, बुद्ध, मुक्त, सच्चिदानंदस्वरूप आहे, असे वेदान्तांत सांगितलें आहे.

याचें उत्तर असें की "सत्यादीनि हि त्रीणि विशेषणार्थानि पदानि विशेषस्य ब्रह्मणः" (तै. उ. २-१) विशेष्यरूप परब्रह्माची सत्, चित्, आनंद, शुद्ध, बुद्ध, मुक्त इत्यादि पदें विशेषणरूप आहेत असें आचार्य म्हणतात.

त्या विशेषणांनी विशेष्य झालेलें परब्रह्म सगुणच होणार. अशा विशेषणविशेष्य परब्रह्माला त्रिपादमहानारायणोपनिषदांत ब्रह्मविद्यासाकार म्हटलें आहे.

**तेचि कल्पिती प्रकृती पुरे। आणि भूताभासु आधींच सरे। मग स्वरूप उरे एकसरें। निखळ माझें॥ ८०॥**

**अर्थ**—भूतसृष्टीची कल्पनारूपी प्रकृति नाहीशी झाली की भूताभास मुळीं नव्हताच असा तो होऊन राहतो आणि एक माझें शुद्ध अखंड स्वरूपच उरतें. ॥ ८० ॥

**गूढार्थदीपिका—कल्पिती प्रकृतिं पुरे**—येथे "कल्पिती प्रकृती पुरे" या शब्दांनी माऊलींनी वेदान्तांतील एक रहस्य प्रगट केलें आहे. तें असें की सच्चिदानंद परब्रह्मापासून निराळे नामरूपात्मक जडविनाशी जगज्जीवादि पदार्थ उत्पन्न झाले आहेत, असें जें वेदान्तशास्त्रांतून सांगितलें आहे, तें कांही एक उत्पन्न झालें नसून, त्यांच्या उत्पत्तीची, त्यांच्या निराळ्या वस्तुत्वाची व जडविनाशीपणाची वगैरे केवळ जीवाची कल्पनाच झाली आहे व कल्पनेप्रमाणे ते तसे त्याच्या अनुभवाला येतात.

**तरी भूताभास आधींच सरे। मग स्वरूप उरे एकसरें। निखळ माझें**—नामरूपादि भूतसृष्टीची कल्पना सोडून पाहतां, जेवढें कांही वस्तुरूपानें अनुभविलें जातें, तेवढे सर्व पूर्ण सच्चिदानंद परब्रह्मच आहे, म्हणून कल्पना नाहीशी झाल्याबरोबर तसाच अनुभव येतो.

आत्मज्ञानाने भूतसृष्टीची कल्पना नाहीशी झाल्यावर भूतसृष्टि भासत होती तेव्हाहि ती नव्हती, आतांहि ती नाही व पुढें कधीं होणार नाही अशी तिची त्रैकालिक निवृत्ति अनुभवाला येते.

''दिसतचि स्वप्न लटिके। हें जागरीं होय ठाउके। तेविं अविद्याकाळीं सतुके। अविद्या नाही''॥ ३१ ॥ (अमृ. प्र. ६) भूतसृष्टीचें अस्तित्व केवळ कल्पनामात्र असतें, म्हणून ज्ञानानंतर तिची त्रैकालिक निवृत्ति होते असें श्रीज्ञानेश्वर माऊलींनी अमृतानुभवांतहि सांगितलें आहे.

**हें असो आंगीं भरलिया भवंडी। जैशा भोंवत दिसती अरडीदरडी। तैशीं आपुलिया कल्पना अखंडीं। गमती भूतें॥ ८१ ॥**
**तेचि कल्पना सांडूनि पाहीं। तरि मी भूतीं भूतें माझिया ठायीं। हें स्वप्नीही परि नाहीं। कल्पावयाजोगें॥ ८२ ॥**
**आतां मी एक भूतांतें धर्ता। अथवा भूतांमाजीं मी असता। या संकल्पसन्निपाता-। आंतुलिया बोलिया॥ ८३ ॥**
**म्हणोनि परियेसीं गा प्रियोत्तमा। यापरी मी विश्वेंसीं विश्वात्मा। जो इया लटकिया भूतग्रामा। भाव्यु सदा॥ ८४ ॥**
**रश्मीचेनि आधारें जैसें। नव्हतेंचि मृगजळ आभासे। माझां ठायीं भूतजात तैसें। आणि मातेंही भावीं॥ ८५ ॥**
**मी ये परीचा भूतभावनु। परि सर्व भूतांसि अभिन्नु। जैसी प्रभा आणि भानु। एकचि ते॥ ८६ ॥**
**हा आमुचा ऐश्वर्ययोगु। तुवां देखिला कीं चांगु। आतां सांगें कांहीं एथ लागु। भूतभेदाचा असे॥ ८७ ॥**

**अर्थ**—हे असो. ज्याप्रमाणे आंगांत भोवंड भरली असतां आजूबाजूच्या सर्व अरडीदरडी देखील फिरतांना दिसतात, त्याप्रमाणे भूतांची कल्पना झाली असतां, अखंड आत्मस्वरूपाचे ठिकाणीं भूतसृष्टि भासूं लागते. ॥ ८१ ॥ केलेली ती कल्पना सोडून देऊन पाहशील, तर मी भूतांमध्यें आहे व भूतें माझ्या ठिकाणीं आहेत असें स्वप्नात देखील मानतां येण्याजोगें नाही. ॥ ८२ ॥ अशा स्थितींत मीच एक सर्व भूतसृष्टीला धारण करणारा आहे किंवा भूतसृष्टीमध्ये असणारा आहे, हें म्हणणें कल्पनारूपं सन्निपातांतील बडबड आहे. ॥ ८३ ॥ हे प्रियोत्तमा अर्जुना! ऐक, मी याप्रमाणे संपूर्ण विश्वाचा आत्मा होऊन मिथ्याभूत सृष्टीचा आधार झालों आहे. ॥ ८४॥ सूर्याच्या किरणाच्या आधारावर जसें नसत्या मृगजळाची कल्पना होते, त्याप्रमाणे माझ्या ठिकाणी भूतसृष्टीची आणि भूतसृष्टीच्या ठिकाणीं माझी कल्पना केली जाते, असें समज. ॥ ८५ ॥ याप्रमाणे मी भूतसृष्टि उत्पन्न करणारा आहे. तरीपण ज्याप्रमाणे सूर्य व प्रकाश दोन्ही एकच असतात, त्याप्रमाणे मी सर्व भूतसृष्टीशीं एकरूप आहे. ॥ ८६ ॥ अर्जुना! ही माझी ईश्वरी घटना तूं नीट ओळखिलीस ना! मग माझ्या ठिकाणीं माझ्याहून भिन्न असा भूतसृष्टीचा संबंध आहे काय, सांग बरें. ॥ ८७ ॥

**गूढार्थदीपिका**—गीतेंत ऐश्वर्ययोग म्हणून जो कित्येक ठिकाणीं शब्द आला आहे, याचा अर्थ ''सर्व भूतांसि अभिन्नु। जैसी प्रभा आणि भानु। एकचि ते'' या चरणाने माऊलींनी स्पष्ट केला आहे. सर्व नामरूपासह पूर्ण ब्रह्मस्वरूप होऊन राहणें हा परमेश्वराचा ऐश्वर्ययोग होय असा अर्थ. हा ऐश्वर्ययोग अनुभवाला आला असतां जडविनाशी सृष्टीचें नांवच राहत नाही.

**यालागीं मजपासूनि भूतें। आनें नव्हती हें निरुतें। आणि भूतांवेगळिया मातें। कहींच न मनीं हो॥ ८८ ॥**

**अर्थ**—म्हणून माझ्याहून भूतसृष्टि कधी निराळी नाही व भूतसृष्टीहून मी निराळा आहे, असें कधी मनांत येऊं देऊं नकोस. ॥ ८८ ॥

**गूढार्थदीपिका**—अज्ञानी लोक ज्याला जगत् म्हणतात तें खरोखर जगत् नसून, सच्चिदानंद परब्रह्माचा निरुपाधिक असा नामरूपाचा आविष्कार आहे, हाच माऊलींच्या निरूपणाचा सारांश असून, तो या ओवींत माऊलींनी स्पष्ट केला आहे.

मागील श्लोक व त्यावरील विवरणांत, जगत् हे परब्रह्माचा विवर्त मानिला पाहिजे असें सांगितलेंच आहे. ''की चिद्रत्नाची कीळ। तें हें चराचर सकळ। ऐसी कळा न दिसे तें समूळ। पडळसृष्टि॥'' (स्वात्म सुख ७४) हा चराचर प्रपंच परब्रह्मरूपी रत्नाची कांति आहे, असे जोपर्यंत कळत नाही तोपर्यंत त्या दृष्टींत अविद्यारूपी पडळ (अविद्यालेश) कायम आहे, असे समजावें.

**यथाकाशस्थितो नित्यं वायुः सर्वत्रगो महान्। तथा सर्वाणि भूतानि मत्स्थानीत्युपधारय॥ ६ ॥**

**अर्थ**—ज्याप्रमाणे सर्वत्र संचार करणारा व थोर असा वायु आकाशाच्या ठिकाणीं नित्य असतो, त्याप्रमाणें सर्व भूतसृष्टि माझे ठिकाणीं आहे असें जाण॥ ६ ॥

**पैं गगन जेवढें जैसें। पवनु गगनीं तेवढाचि असे। सहजें हालविलिया वेगळा दिसे। एऱ्हवीं गगन तेंचि तो ॥ ८९ ॥**

**अर्थ**—जेवढें आकाश आहे, तेवढाच आकाशाचे ठिकाणीं राहणारा वायूहि आहे, सहज हालवला गेला, तर तो आकाशाहून निराळा दिसतो; नाही तर आकाशाशीं एकरूप होऊन राहतो. ॥ ८९ ॥

**गूढार्थदीपिका**—भ्रमजन्य कार्याचा असा नियम आहे की तें ज्या वस्तूवर भासतें, त्या वस्तूचें जें परिणाम असेल तेंच परिणाम भ्रमजन्य कार्यवस्तुचेंहि असतें. दोरीवर भासणारा सर्प, जेवढी दोरी तेवढा असतो, त्याप्रमाणे अनंत अशा परब्रह्मावर होणारा जगद् भ्रमहि अनंतच भासतो.

**तैसें भूतजात माझ्या ठायीं। कल्पिजे तरी आभासे कांहीं। निर्विकल्पीं तरि नाहीं। तेथ मीचि मी आघवें ॥ ९० ॥**
**म्हणऊनि नाहीं आणि असे। हे कल्पनेचेनि सौरसें। जें कल्पनालोपें भ्रंशे। आणि कल्पनेसवें होय ॥ ९१ ॥**
**तेंचि कल्पितें मुदल जाये। तैं असे नाहीं हें कें आहे। म्हणऊनि पुढती तूं पाहें। हा ऐश्वर्ययोगु ॥ ९२ ॥**

**अर्थ**—याप्रमाणें माझे ठिकाणीं भूतांची कल्पना झाली, तर भूतें भासतात आणि कल्पना झाली नाही, तर सर्व एक मीच असतो. ॥ ९० ॥ म्हणून नाही आणि आहे, हे परब्रह्माहून निराळ्या वस्तूची कल्पना करूनच तिच्या विषयीं म्हटलें जातें. कारण भूतांची कल्पना नाहीशी झाली की भूतें दिसत नाहीत आणि भूतांची कल्पना केली जाते तोपर्यंत तीं दिसतात. ॥ ९१ ॥ आणि भूतसृष्टीच्या भासाला कारण जी कल्पना तीच नि:शेष नाहीशी झाली की, आहे-नाही हे म्हणणें कोठे राहिले? म्हणून अर्जुना! माझी ही ईश्वरीसामर्थ्यघटना कशी आहे, हें पुन: पहा ॥ ९२ ॥

**गूढार्थदीपिका**—आकाशांत असलेला वायु वाहतो, त्यावेळीं तो आकाशांहून निराळा पडतो आणि वाहत नाही तेव्हा आकाशाशीं एकरूप असतो. त्याप्रमाणेच भूतसृष्टीची कल्पना झाल्याबरोबर परब्रह्माचे ठिकाणीं परब्रह्माहून निराळ्या अशा भूतसृष्टीची अनिर्वचनीय (काल्पनिक) उत्पत्ति होते आणि तेव्हा तिच्याविषयीं आहे—नाही, असें म्हणतां येतें. भूतसृष्टीची कल्पना जेव्हा नसते, तेव्हा स्वत:सिद्ध निर्विकल्प अशा पूर्ण परब्रह्माचे ठिकाणीं आहे—नाही हे शब्द लागूं शकत नाहीत.

**ऐसिया प्रतीतिबोधसागरीं। तूं आपणेयातें कल्लोळु एक करीं। मग जंव पाहासी चराचरीं। तंव तूंचि आहासी ॥ ९३ ॥**
**या जाणणेयाचा चेवो। तुज आला ना म्हणती देवो। तरी आतां द्वैतस्वप्न वावो। जालें कीं ना ॥ ९४ ॥**

**अर्थ**—(सर्व नामरूपात्मक देखावा निरुपाधिक सगुण ब्रह्माकार आहे) अशा ज्ञानानुभवरूप समुद्रांत, अर्जुना! तूं एक ज्ञानानुभवरूप समुद्राचा तरंग होऊन राहा. मग त्या तरंगरूप ज्ञानवृत्तीने चराचर भूतसृष्टीकडे पाहशील, तेव्हा सर्व तूंच आहेस, असें तुला कळून येईल. ॥ ९३ ॥ देव म्हणतात, अर्जुना! हा अनुभवरूप बोध तुझ्या ठिकाणीं जागृत झाला ना! मग आता आत्म्याहून जडविनाशीधर्माने भिन्न भासणारी भूतसृष्टि खोटी झाली की नाही, सांग ॥ ९४ ॥

**गूढार्थदीपिका**—सच्चिदानंद आत्मस्वरूपाच्या ठिकाणीं जडविनाशी जगताच्या प्रत्ययाला, कोणत्याच दृष्टीने अवकाश नसल्यामुळें, जडविनाशी जगताचा प्रत्यय काल्पनिक म्हणावा लागतो. "प्रपंच मुळीं झांलाचि नाहीं। हें कळलें जयाच्या ठायीं। तोचि देहीं विदेही। निरस्तोपाधि पाहे तो एक" ॥ ११७ ॥ (हस्तामलक).

**तरी पुढती जरी विपायें। बुद्धीसि कल्पनेची झोंप ये। तरी अभेदबोधु जाये। जैं स्वप्नीं पडिजे ॥ ९५ ॥**
**म्हणोनि ये निद्रेची वाट मोडे। निखळ उद्‌बोधाचेंचि आपणपें घडे। ऐसें वर्म जें आहे फुडें। तें दावीं आतां ॥ ९६ ॥**
**तरी धनुर्धरा धैर्या। निकें अवधान देईं बा धनंजया। पैं सर्व भूतांतें माया। करी हरी गा ॥ ९७ ॥**

**अर्थ**—जडविनाशी भूतसृष्टि खोटी आहे, असें कळल्यावरहि (ब्रह्माद्वैतबोध दृढ झाला नसल्यामुळें) पुन: जर बुद्धीला कदाचित् तिच्या कल्पनेची झोंप येईल व द्वैतरूप स्वप्नांत पडशील, तर सर्व सच्चिदानंद परब्रह्मच आहे हा अद्वैतबोध नाहीसा होईल. ॥ ९५ ॥ ह्या कल्पनारूपी झोंपेची वाट नि:शेष नाहीशी होईल आणि संपूर्ण सच्चिदानंदस्वरूप मीच झालों आहे असा शुद्ध बोध होईल, असे जें वर्म तें मी आतां स्पष्ट करून सांगतों. ॥ ९६ ॥ तर मूर्तिमंत धैर्यस्वरूप अशा धनुर्धारी अर्जुना! माझ्या म्हणण्याकडे उत्तमप्रकारें लक्ष देऊन श्रवण कर. ही जडविनाशी भूतसृष्टि मायाच उत्पन्न करते आणि तीच त्याचा नाश करते. ॥ ९७ ॥

**गूढार्थदीपिका**—द्वैतरूप संसाराचा अनंत जन्माचा संस्कार असल्यामुळें तो एकदम नाहीसा होऊन अद्वैतब्रह्मदृष्टि दृढ होत नाही. द्वैतबुद्धि नाहीशी होऊन अद्वैतबोध, ज्या उपायाने होईल तो उपाय श्रीज्ञानेश्वर महाराज सांगत आहेत. तो उपाय म्हणजे सर्व भूतसृष्टीची उत्पत्ति व नाश हे दोन्ही केवळ कल्पनारूप मायेनेच होतात, आत्म्याचा येथे कांही संबंध नाही, आत्मा केवळ साक्षी आहे, असें जाणून आपण कल्पनेचे साक्षी होऊन राहणें हा होय.

**सर्वभूतानि कौन्तेय प्रकृतिं यान्ति मामिकाम्। कल्पक्षये पुनस्तानि कल्पादौ विसृजाम्यहम्॥ ७॥**

**अर्थ**—हे कौन्तेय! ही सर्व भूतसृष्टि कल्पाचे शेवटीं माझ्या प्रकृतींत किंवा मायेत लीन होते व कल्पाच्या आरंभीं पुन: मी तिला उत्पन्न करतों.॥ ७॥

**जिये नांव गा प्रकृती। जे द्विविध सांगितली तुजप्रती। एकीं अष्टधा भेदव्यक्ती। दुजी जीवरूपा॥ ९८ ॥**
**हा प्रकृतीविखो आघवा। तुवां मागां परिसिलासे पांडवा। म्हणोनि असो काइ सांगावा। पुढतपुढतीं॥ ९९ ॥**
**तरी ये माझिये प्रकृती। महाकल्पाचां अंती। सर्व भूतें अव्यक्तीं। ऐक्यासि येती॥ १००॥**

**अर्थ**—अर्जुना! जिला प्रकृति हें नांव आहे. ती दोन प्रकारची आहे हें तुला मागें सांगितलेंच आहे. एक प्रकृति आठ पदार्थाच्या भेदाने भिन्न अशी असून, दुसरी जीवरूप आहे.॥ ९८॥ हा प्रकृतिविषय मागें तूं ऐकलाच आहेस, म्हणून पुन: पुन: काय सांगायचा?॥ ९९॥ महाकल्पाच्या शेवटीं ही सर्व भूतसृष्टि माझ्या अव्यक्त प्रकृतींत लीन होते.॥ १००॥

**गूढार्थदीपिका**—कल्पान्त म्हणजे ब्रह्मदेवाच्या रात्रींत सर्व कार्यसृष्टि अव्यक्त होणें आणि महाकल्पान्त म्हणजे ब्रह्मदेवासह सर्व सृष्टि अव्यक्त होणें.

**ग्रीष्माचां अतिरसीं। सबीजें तृणें जैसीं। मागुती भूमीसी। सुलीनें होती॥ १०१॥**
**कां वार्षिये ढेंढें फिटे। जेव्हां शारदीयेचा अनुघडु फुटे। तेव्हां घनजात आटे। गगनींचें गगनीं॥ १०२॥**

**अर्थ**—ग्रीष्मऋतूच्या कडक उन्हाळ्यांत, ज्याप्रमाणें गवत वाळून जाऊन बीजरूप होतें व नंतर जमिनींत अगदी लीन होते.॥ १०१॥ वर्षाऋतूंतील अभ्रांचें अवडंबर नाहीसें होऊन, जेव्हा त्यामागून येणाऱ्या शरद्‌ऋतूचें आगमन व्यक्त होते, तेव्हा संपूर्ण आकाशांतील अभ्रे आकाशांतच नाहीशीं होतात.॥ १०२॥

**नातरी आकाशाचिये खोंपे। वायु निवांतुचि लोपे। कां तरंगता हारपे। जळीं जेवीं॥ १०३॥**
**अथवा जागिनलिये वेळे। स्वप्न मनींचें मनीं मावळे। तैसें प्राकृत प्रकृतीं मिळे। कल्पक्षयीं॥ १०४॥**
**मग कल्पादीं पुढती। मीचि सृजीं ऐसी वदंती। तरी इयेविषयीं निरुती। उपपत्ति आईक॥ १०५॥**

**अर्थ**—किंवा आकाशाचे पोकळींत वायू निवांत होऊन नाहीसा होतो किंवा तरंगाचे आकार पाण्यांतच नाहीसे होतात.॥ १०३॥ अथवा जाग आल्याबरोबर स्वप्न मनांतल्या मनांत मावळते, त्याप्रमाणें प्रकृतीपासून झालेली ही भूतसृष्टि कल्पाचे शेवटीं प्रकृतींतच मिळून जाते.॥ १०४॥ मग कल्पाच्या आरंभीं मीच पुन: सर्व सृष्टि निर्माण करतों, अशी जी बोलवा आहे त्या विषयीचा खरा विचार ऐक.॥ १०५॥

**प्रकृतिं स्वामवष्टभ्य विसृजामि पुन: पुन:। भूतग्राममिमं कृत्स्नमवशं प्रकृतेर्वशात्॥ ८॥**

**अर्थ**—अर्जुना! मी प्रकृतीला आपल्या स्वाधीन ठेवून प्रकृतीच्या स्वाधीन असलेली ही संपूर्ण भूतसृष्टि प्रकृतीच्या स्वभावानुसार पुन: पुन: उत्पन्न करीत असतों.॥ ८॥

**तरी हेचि प्रकृति किरीटी। मी स्वकीया सहजें अधिष्ठीं। तेथ तंतुसमवाय पटीं। जेविं विणावणी दिसे॥ १०६॥**

**अर्थ**—अर्जुना! मी ह्या आपल्या प्रकृतीला सहज अधिष्ठानभूत झालों की तंतूंचा संबंध होऊन असलेल्या वस्त्राच्या ठिकाणीं ज्याप्रमाणे वस्त्राची वीण दिसून पडते.॥ १०६॥

**गूढार्थदीपिका—तरी हेचि प्रकृती किरीटी**—'प्रकृति' शब्दाने येथे जीवाची कल्पनारूप त्रिगुणात्मक प्रकृति घेतली आहे. आत्मस्वरूपाला विसरून जी कल्पना उठते, ती आपोआप त्रिगुणात्मक होते, असें ''तैसे अज्ञानांगीकारे।

निघाली वृत्ति विखुरे। ते सत्वरजद्वारें। तमहि होय'' (ज्ञाने. अ. १४-१४४) श्रीज्ञानेश्वर माऊलींनी म्हटलें आहे.

**मी स्वकीया**—येथे भगवंतांनी त्रिगुणात्मक प्रकृतीला स्वकीया म्हणजे माझी प्रकृति असें जें म्हटलें आहे तें परमेश्वराची जी मूळ चैतन्यशक्ति तीच जीवाला अज्ञानामुळें त्रिगुणात्मक प्रकृतिरूप भासते म्हणून जीवाचे दृष्टीने म्हटलें आहे.

''सूर्य आंधाराते नाशी। परि तो सन्मुख नये तयेपाशी। तेविं मायानियंता हृषीकेशी। परि माया देवासी दृष्ट नव्हे.॥ १९४॥'' (ए. भा. अ. २५)

एऱ्हवीं ज्याप्रमाणे सूर्य अंध:काराचा नाश करतो असें म्हटलें जातें, पण अंध:कार सूर्याला कधींहि दिसत नाही. त्याप्रमाणे मायेचा अंगीकार करून परमात्मा सृष्टि निर्माण करतो असें वेदान्तांत म्हटलें असलें तरी जगत्कारण जी माया ती परमेश्वराला कधीं गोचर होत नाही; म्हणून परमात्मा मायेचा अंगीकार करून सृष्टि निर्माण करतो, हें म्हणणेंहि खरें नाही. ''प्रकृतिं स्वामवष्टभ्य'' या पदाचा मी प्रकृतीला वश करून—म्हणजे मी प्रकृतीला सहज अधिष्ठानभूत होऊन—असा अर्थ करावा लागतो.

**सहजें अधिष्ठी**—परमेश्वराचें प्रकृतीला आपल्या स्वाधीन करणें म्हणजे प्रकृतीला सहज अधिष्ठानभूत होणे किंवा आश्रयभूत होणे होय. परमेश्वराच्या चैतन्यशक्तीचीच त्रिगुणात्मक मायारूपाने जीव कल्पना करतो व ती कल्पना परमेश्वरस्वरूपावरच भासते, म्हणून परमेश्वर सहजच तिला अधिष्ठानभूत होतो. त्याला स्वतंत्रपणें तिचा अंगीकार करावा लागत नाही.

**तेथ तंतुसमवाय पटीं**—याप्रमाणें जीवाच्या कल्पनारूप त्रिगुणात्मक प्रकृतीला परमात्मा सहज आधार झाला की कल्पनेनुसार सृष्टि होऊं लागते, हेंच ''हेंच तंतुसमवाय पटीं। जेवि विणावणी दिसे'' या चरणांनी व पुढील ओवीने दाखविलें आहे.

''समवाय'' हा न्यायशास्त्रांतील पारिभाषित शब्द असून त्याचा ''नित्यसंबंधस्समवाय:'' नित्यसंबंध असा अर्थ आहे, पण तो शब्द येथें संबंध या सामान्य अर्थानेच वापरला गेला आहे.

**मग तिये विणावणीचेनि आधारें। ल्हाना चौकडियां पटत्व भरे। तैसी पंचात्मकें आकारें। प्रकृतीचि होये॥ १०७॥**
**जैसें विरजणियाचेनि संगें। दूधचि आटेजों लागे। तैशी प्रकृती आंगा रिगे। सृष्टिपणाचिया॥ १०८॥**

**अर्थ**—मग त्या विणकरीच्या आधाराने लहान लहान चौकड्याने जसें वस्त्र भरलें जातें तशी पंचभूतांच्या आकाराची प्रकृतिच होते.॥ १०७॥ ज्याप्रमाणे विरजणाच्या संगाने दूधच आटून दही होतें त्याप्रमाणे प्रकृतिच सृष्टीच्या रूपाने परिणाम पावते.॥ १०८॥

**गूढार्थदीपिका**—वरील १०६ ते १०८ ओव्यांचें तात्पर्य असें आहे की परमात्मा जगताला विवर्तोपादन कारण आहे म्हणजे परमेश्वराची सत्ताच जगताला आधार आहे आणि जीवाची कल्पना ही जी त्रिगुणात्मक प्रकृति, ती जगाचे परिणामउपादानकारण आहे—म्हणजे जीवाची कल्पनाच जगद्रूपाने परिणाम पावते. परमेश्वराची सत्ताच जीवाच्या कल्पनेनुसार सृष्टिरूप भासते असा भाव.

**बीज जळाची जवळीक ल्हे। आणि तेंचि शाखोपशाखीं होये। तैसें मज करणें आहे। भूतांचे हें॥ १०९॥**

**अर्थ**—बीजाला पाण्याचें सान्निध्य प्राप्त झालें की तेंच अनेक लहानमोठ्या डाहाळ्याच्या रूपाने विस्तार पावतें, तसा मी भूतांचें उत्पत्तीला कारण आहे.॥ १०९॥

**अगा नगर हें रायें केलें। या म्हणणया साचपण कीर आलें। परि निरुतें पाहतां काय शिणले। रायाचे हात॥ ११०॥**
**अणि मी प्रकृती अधिष्ठीं तें कैसें। जैसा स्वप्नीं जो असे। मग तोचि प्रवेशे। जागृतावस्थे॥ १११॥**
**तरि स्वप्नौनि जागृती येतां। काय पाय दुखती पंडुसुता। कीं स्वप्नमाजीं असतां। प्रवासु होय॥ ११२॥**
**या आघवियाचा अभिप्रावो कायी। जे हें भूतसृष्टीचें कांहीं। मज एकही करणें नाहीं। ऐसाचि अर्थु॥ ११३॥**
**जैशी रायें अधिष्ठिली प्रजा। व्यापारे आपुलालिया काजा। तैसा प्रकृतिसंगु माझा। येर करणें तें इयेचें॥ ११४॥**

**पाहें पां पूर्णचंद्राचिये भेटी। समुद्रीं भरते अपार दाटी। तेथ चंद्रासि काय किरीटी। उपखा पडे॥ ११५॥**
**जड परि जवळिका। लोह चळे तरि चळो कां। कवणु शीणु भ्रामका। सन्निधानाचा॥ ११६॥**
**किंबहुना यापरी। मी निजप्रकृती अंगीकारीं। आणि भूतसृष्टी एकसरी। प्रसवोंचि लागे॥ ११७॥**

**अर्थ**—बा अर्जुना! राजाने शहर वसविलें हें म्हणणें खरें समजलें जातें, पण खरोखर पाहूं गेलें तर शहर वसवितांना राजाच्या हाताला कांही श्रम करावे लागले काय?॥ ११०॥ आणि मी प्रकृतीचा अधिष्ठाता होतो तो कसा, असें विचारशील तर जसा स्वप्नावस्थेंत असलेला मनुष्य जागृतावस्थेंत येतो.॥ १११॥ तर स्वप्नावस्थेंतून जागृतावस्थेंत येतांना, अर्जुना! त्याचे पाय दुखतात काय? किंवा स्वप्नात प्रवास केला, तर तो प्रवास होतो काय?॥ ११२॥ या सर्व म्हणण्याचा अभिप्राय हाच की, या भूतसृष्टीच्या उत्पत्तिस्थितिलयाचें मला कांही एक करावें लागत नाही. माझा भूतसृष्टीशीं संबंधच नाही.॥ ११३॥ ज्याप्रमाणें (प्रजेला) राजा असला की, प्रजा आपआपले व्यापार करते, त्याप्रमाणे माझा व प्रकृतीचा केवळ जीवाने कल्पिलेला संबंध आहे बाकी सर्व प्रकृतीच करते.॥ ११४॥ हे पहा, अर्जुना! पौर्णिमेला चंद्र पूर्ण झाला की समुद्राला भरती दाटून येते. तेथे चंद्राला काय श्रम पडतात? सांग बरें॥ ११५॥ लोखंडाचा तुकडा चुंबकाच्याजवळ असला तर तो ओढला जातो तरी ओढला जावो! पण तेथे चुंबकाला जवळ असण्यांत काय श्रम होतात?॥ ११६॥ किंबहुना याप्रमाणे मी आपल्या प्रकृतीचा अंगीकार करतो आणि प्रकृतीपासून भूतसृष्टि एकदम होऊं लागते.॥ ११७॥

**गूढार्थदीपिका**—परमेश्वरसत्तेचा व प्रकृतीचा नुसता संबंध हाच केवळ भूतसृष्टीच्या उत्पत्तीचें निमित्तकारण आहे.

**जो हा भूतग्रामु आघवा। असे प्रकृतिअधीन पांडवा। जैसी बीजाचिया वेलपालवा। समर्थ भूमि॥ ११८॥**
**नातरि बाळादिकां वयसा। गोसावी देहसंगु जैसा। अथवा घनावळी आकाशा। वार्षिये जेवीं॥ ११९॥**
**कां स्वप्नासि कारण निद्रा। तैसी प्रकृती हे नरेंद्रा। या अशेषाहि भूतसमुद्रा। गोसाविणी गा॥ १२०॥**
**स्थावरा आणि जंगमा। स्थूळा अथवा सूक्ष्मा। हे असो भूतग्रामा। प्रकृतीचि मूळ॥ १२१॥**

**अर्थ**—ज्याप्रमाणे बीजाला वेल-पानें उत्पन्न करण्याची शक्ति भूमींतच आहे, त्याप्रमाणे ही सर्व भूतसृष्टि प्रकृतीच्या स्वाधीन आहे.॥ ११८॥ किंवा बाल्य, यौवन, वार्धक्य या वयाला जसा देहाचा संबंधच मुख्य कारण आहे, किंवा पाऊस पाडणारे मेघ आकाशांत जमण्याकरिता वर्षाऋतुच कारण आहे.॥ ११९॥ किंवा स्वप्न पडण्याला जशी निद्राच कारण असते, त्याप्रमाणे नरश्रेष्ठ अर्जुना! ही जीवाची कल्पनारूप प्रकृतिच या सर्व भूतसृष्टीचें मुख्य कारण होय.॥ १२०॥ स्थावर, जंगम, स्थूल, सूक्ष्म या सर्व जीवसृष्टीला प्रकृतिच कारण आहे.॥ १२१॥

**न च मां तानि कर्माणि निबध्नन्ति धनञ्जय। उदासीनवदासीनमसक्तं तेषु कर्मसु॥ ९॥**

**अर्थ**—जड विनाशी जगाच्या उत्पत्ति, स्थिति, लय या कर्माचे ठिकाणीं उदासीन पुरुषाप्रमाणें, आसक्तिरहित, केवळ साक्षीभूत होऊन मी राहत असल्यामुळे तीं कर्में मला बांधू शकत नाहीत.॥ ९॥

**म्हणोनि भूतें हन सृजावीं। कां सृजिलीं प्रतिपाळावीं। इयें करणीं न येती आघवीं। आमुचिया आंगा॥ १२२॥**
**जळीं चंद्रिकेचिया पसरती वेली। ते वाढी चंद्रे नाहीं वाढविली। तेविं मातें पावोनि ठेलीं। दूरी कर्में॥ १२३॥**
**आणि सुटलिया सिंधुजळाचा लोटु। न शके धरूं सैंधवाचा घाटु। तेविं सकळ कर्मां मीच शेवटु। तीं काय बांधती मातें॥ १२४॥**

**अर्थ**—म्हणून भूतसृष्टि निर्माण करावी किंवा निर्माण केलेल्या सृष्टीचें पालन करावें, हें कर्माचें कर्तृत्व माझ्याकडे मुळींच येत नाही.॥ १२२॥ ज्याप्रमाणे पाण्यांत चंद्राच्या प्रकाशाचा ताटवा पसरलेला दिसतो, पण तो विस्तार चंद्राने केलेला नसतो, त्याप्रमाणे अज्ञान्याला माझ्याशीं कर्माचा संबंध दिसत असला, तरी मी असंग असल्यामुळे खरोखर माझा संबंध मुळींच नसतो.॥ १२३॥ ज्याप्रमाणे समुद्राच्या पाण्याचा लोंढा वाहूं लागला असतां त्याला मिठाचा बांधलेला बांध थोपवून धरूं शकत नाही, त्याप्रमाणे भगवान म्हणतात, अर्जुना! ज्या कर्माचा मीच शेवट आहे—म्हणजे यथार्थ-विचाराने सर्व कर्में मद्रूपच होतात—तीं कर्में मला कशी बांधूं शकतील?॥ १२४॥

**गूढार्थदीपिका**—या ओवींत भगवान मला कर्माचा बंध होत नाही असें सांगत आहेत.

कर्माचा बंध म्हणजे कर्तृत्व व फळाचें भोक्तृत्व उत्पन्न होणें होय. कर्तृत्व म्हणजे मी कर्म केलें असें वाटणें व भोक्तृत्व म्हणजे कर्माने प्राप्त होणाऱ्या विषयसुखाने मी सुखी झालों असें वाटणें. एका अद्वैत परमेश्वरावांचून दुसरी वस्तुच नाही असें ज्ञान ज्यांना नाही, त्या जीवांनाच कर्म आहे, भोक्तृत्व आहे इत्यादि द्वैत सत्य वाटतें व तेच आपल्याला कर्माचे कर्ते व भोक्ते समजून कर्माने बद्ध होतात, पण परमेश्वराला आपल्या अद्वैत सच्चिदानंदघन स्वरूपाचें पूर्णज्ञान अखंड असल्यामुळे, त्याच्यावांचून दुसरी वस्तूच भासत नाही व जीवाने खोटेंच मानून घेतलेल्या कर्म, कर्तृत्व, भोक्तृत्व, इत्यादिकांचा तो साक्षी होऊन राहतो.

या परमेश्वराचे ज्या जीवाला ज्ञान होऊन मीच तो परमेश्वर आहे असा अनुभव येतो, त्याच्याहि सर्व कर्मकर्तृत्व-भोक्तृत्वाचा अद्वैतबोधामुळे शेवट होतो. अशा परमेश्वराचे ठिकाणीं उत्पत्ति स्थिति-लय-रूप कर्म व कर्तृत्व कोठून असणार व त्याला ते काय बंधनकारक होऊं शकेल?

**धूम्ररजांची पिंजरी। वाजतिया वायूतें जरी होकारी। कां सूर्यबिंबामाझारीं। आंधारें शिरे॥ १२५॥**
**हें असो पर्वताचिये हृदयींचें। जेविं पर्जन्यधारास्तव न खोंचे। तेविं कर्मजात प्रकृतीचें। न लगे मज॥ १२६॥**
**एऱ्हवीं इये प्रकृतीं विकारीं। एकु मीचि असे अवधारीं। परि उदासीनाचिया परी। करीं ना करवीं॥ १२७॥**

**अर्थ**—धूराच्या कणांचा पिंजरा शब्द करीत वाहत असलेल्या वायुला थांबवील? की सूर्यबिंबामध्ये आंधार शिरूं शकेल!॥ १२५॥ हे असूं दे. पावसाच्या धारा पर्वताच्या आंतील भागांपर्यंत शिरत नाहीत, त्याप्रमाणे प्रकृतीचा झालेला कर्मसमूह मला लागत नाही.॥ १२६॥ खरोखर पाहता या प्रकृतीपासून निर्माण झालेल्या कार्यरूप भूतसृष्टींत एका माझ्यावांचून दुसरी वस्तूच नाही; पण मी तेथे उदासीनाप्रमाणे असून, कांही करीत नाही व करवितहि नाही.॥ १२७॥

**गूढार्थदीपिका**—वेदान्तांत प्रमाता आणि साक्षी असा चैतन्याचा दोन प्रकारचा भेद केला आहे.

प्रत्यक्षादिक प्रमाणाने वस्तु जाणून ती खरी समजणारा प्रमाता म्हटला जातो. या प्रमात्यालाच जीव म्हणतात. आणि जीवाच्या कर्तृत्व, भोक्तृत्व, ज्ञातृत्व, इत्यादि सर्व राहाटीला खोटे समजून—म्हणजे यांपैकीं कांही एक अस्तित्वांत नाही, असे समजून—त्रयस्थाप्रमाणे केवळ पाहत राहणारा याला साक्षी म्हणतात.

**जैसा दीपु ठेविला परिवरीं। कवणातें नियमी ना निवारी। आणि कवण कवणिये व्यापारीं। राहाटे तेंहि नेणें॥ १२८॥**
**तो जैसा कां साक्षिभूतु। गृहव्यापारप्रवृत्तिहेतु। तैसा भूतकर्मीं अनासक्तु। मी भूतीं असें॥ १२९॥**

**अर्थ**—ज्याप्रमाणे घरांत दिवा ठेविला असतां तो कोणाला कर्म करण्याला लावत नाही किंवा कोणाला कर्मापासून परावृत्त करीत नाही व कोण कोणता व्यापार करीत आहे, हेहि तो जाणत नाही.॥ १२८॥ तो दिवा जसा साक्षीभूत राहून घरांतील सर्व व्यापार होण्याला निमित्त होतो, त्याप्रमाणे सर्व भूतांत मी असतो, पण त्यांच्या कर्माचे ठिकाणीं मी अनासक्त म्हणजे साक्षीभूत राहतों.॥ १२९॥

**गूढार्थदीपिका**—परमेश्वराच्या केवळ सत्तामात्रें करून सृष्टीची उत्पत्त्यादि व सृष्टींतील जीवांचीं सर्व कर्मे होतात व परमात्मा केवळ साक्षी राहतो.

**हा एकचि अभिप्रावो पुढतपुढती। काय सांगों बहुतां उपपत्तीं। येथ एकवेळां सुभद्रापती। येतुलें जाण पां॥ १३०॥**

**अर्थ**—हा एकच अभिप्राय वारंवार निरनिराळे दृष्टान्त देऊन काय सांगूं? सुभद्रापति अर्जुना! येथे एकदां एवढें जाण॥ १३०॥

**मयाध्यक्षेण प्रकृतिः सूयते सचराचरम्। हेतुनानेन कौन्तेय जगद्विपरिवर्तते॥ १०॥**

**अर्थ**—मी प्रकृतीचा अध्यक्ष झालों असतां—म्हणजे ज्ञानरूपाने प्रकृतीचां साक्षी झालों असतां-प्रकृति सर्व चराचर उत्पन्न करिते व एवढ्याच माझ्या निमित्ताने, हे अर्जुना! जगताच्या उत्पत्तिनाशादि सर्व घडामोडी होतात.॥ १०॥

**जे लोकचेष्टां समस्तां। जैसा निमित्तमात्र कां सविता। तैसा जगत्प्रभवीं पंडुसुता। हेतु मी जाणें॥ १३१॥**
**कां जे मियां अधिष्ठिलिया प्रकृती। होती चराचराचिया संभूती। म्हणोनि मी हेतु हे उपपत्ती। घडे यया॥ १३२॥**

**अर्थ**—ज्याप्रमाणे भूतांच्या व्यापाराला सूर्य निमित्तमात्र आहे, त्याप्रमाणे, अर्जुना! जगाच्या उत्पत्त्यादिकांचे ठिकाणीं मीहि निमित्त आहे, असें जाण॥ १३१ ॥ कारण मी प्रकृतीला आश्रय झाल्यामुळेंच चराचर सृष्टीची उत्पत्ति होते; म्हणून मी जगाचे उत्पत्त्यादिकाला निमित्तकारण आहे अशी उपपत्ति दिली जाते. ॥ १३२ ॥

**गूढार्थदीपिका**—कोणतेंहि कार्य उत्पन्न होण्याला उपादान व निमित्त अशीं दोन कारणें लागत असतात, हें मागें सांगितलेंच आहे. जडविनाशी अशा जगद्रूपकार्यांत परमेश्वराची एक अखंड सत्ताच भरलेली असल्यामुळे, सत्तारूपाने भगवान्, जगताचें विवर्तउपादान कारण आहे. किंवा भगवंताच्या सत्तेच्या ठिकाणींच जगद्रूप वस्तु कल्पिली गेली आहे हें मागें सांगून, आता येथे भगवान आपल्या ज्ञानरूप साक्षीस्वरूपाने जगताचें निमित्त कारणहि आहे, हें माऊली सांगत आहे.

ज्याप्रमाणे दोन पुरुषांचें भांडण मिटविण्याचें सामर्थ्य असणारा पुरुष तें न मिटवितां, तटस्थ होऊन नुसतें भांडण पाहत राहिल्यास, तो जसा त्या भांडण्याला अनुमोदन देणारा व भांडण कायम ठेवण्याला निमित्त समजला जातो, त्याप्रमाणें जीव व जीवाची सृष्टिविषयक कल्पना हे दोन्ही साक्षीरूप असलेल्या परमेश्वराच्या ज्ञानाचे विषय झाले की तो (परमात्मा) अनुमोदन देणारा समजला जाऊन, त्याद्वारा सृष्टीच्या उत्पत्तीचें निमित्त होतो. हेंच भगवंताचें अध्यक्ष होणें होय.

**आतां येणें उजिवडें निरुतें। न्याहाळीं पां ऐश्वर्ययोगातें। जे माझ्या ठायीं भूतें। परी भूतीं मी नसें॥ १३३ ॥**

**अर्थ**—आतां माझ्या या सर्व नामरूपाने नटलेल्या व्यापक स्वरूपाकडे या शुद्ध ज्ञानदृष्टीने पहा म्हणजे माझ्या ठिकाणीं भूतसृष्टि जीवाला भासते, पण मी त्या कल्पनामात्र भूतसृष्टीत मुळींच नाही हें तुला कळून येईल. ॥ १३३ ॥

**गूढार्थदीपिका**—आतां येणें उजियेडें निरूतें—या नामरूपात्मक सृष्टीमध्यें केवळ एक सच्चिदानंद परमेश्वराची सत्ताच भरली आहे, म्हणून नामरूपात्मक भूतसृष्टीचें स्वतंत्र अस्तित्व नाही आणि भूतसृष्टीचें वस्तुत्वहि कल्पनाजन्यच आहे असें भगवंतांनी प्रतिपादन केलें आहे, म्हणून जडविनाशी भूतसृष्टि मुळींच नाही, असें जाणणें हाच ''उजियेडें निरुतें'' म्हणजे सत्यज्ञानप्रकाश होय.

**न्याहाळी पां ऐश्वर्य योगातें**—या सत्यज्ञानप्रकाशाने पाहिले असतां एक सच्चिदानंद परमात्माच नामरूपाने नटला आहे, असा अनुभव येतो.

**अथवा भूतें ना माझ्या ठायीं। आणि भूतांमाजि मी नाहीं। या खुणा तूं कहीं। चुकों नको॥ १३४॥**
**हें सर्वस्व आमुचें गूढ। परि दाविलें तुज उघड। आतां इंद्रियां देऊनि कवाड। हृदयीं भोगीं॥ १३५॥**

**अर्थ**—किंवा भूतसृष्टीं माझ्या ठिकाणीं मुळींच नाही व त्या भूतसृष्टींत मी नाही ही माझी खूण, कधी अर्जुना! विसरू नकोस. ॥ १३४ ॥ हें माझ्या स्वरूपाचें सर्वस्वीं गूढ वर्म आहे, पण तुला उघड करून दाखविले आहे. आतां इंद्रियांचीं द्वारें बंद करून—म्हणजे इंद्रियांचे द्वारा विषयाकार न घेतां-आपल्या अंत:करणांत त्याचा अनुभव घें. ॥ १३५ ॥

**गूढार्थदीपिका—हें सर्वस्व आमुचें गूढ**—नामरूपासह एक परमात्माच आहे, त्याच्यांवांचून दुसरें कांही नाही, हाच परमेश्वराचा व सर्व पूर्ण संतांचा अनुभव असतो; पण जोपर्यंत जीवाला नामरूपात्मक हें जगत आहे व तें सत्य आहे असें वाटतें तोपर्यंत त्याला नामरूपासह पूर्ण ब्रह्म आहें असा अन्वयाचा अनुभव येत नाही व श्रीगुरु तो देतहि नाहीत; म्हणूनच या अनुभवाला गूढ म्हटलें आहे.

**परि दाविलें तुज उघड**—पण भगवद्भक्तालाच हा अन्वयाचा अनुभव सुखाने येत असल्यामुळें व अर्जुन भक्त असल्यामुळें, भगवान ''दाविलें तुज उघड'' तुझ्यापाशीं हा अनुभव उघड केला आहे, असें म्हणत आहेत.

**इंद्रियां देऊनि कवाड। हृदयीं भोगीं**—सर्वनामरूपासह पूर्ण ब्रह्म आहे असा अन्वयाचा अनुभव येण्याकरितां ''इद्रियांचीं द्वारें बंद कर'' म्हणजे अंत:करणांत सगुण परमेश्वराला धरून ठेव, असा येथे सगुणाचा व्यतिरेकाने अनुभव घेण्यास सांगितले आहे.

सच्चिदानंद भगवंताला विसरून, बाह्य सृष्टि सत्य आहे, अशी दृढ समजूत झाल्यामुळे, अंत:करणाला इंद्रियद्वारा सृष्टींतील विषयाच्या आकाराचे होण्याची जी सवय पडली, ती कायम आहे, तोपर्यंत नामरूपासह पूर्ण सच्चिदानंद परब्रह्म आहे असा अनुभव येणे शक्य नाही.

नामरूपात्मक सगुण परमात्म्याचे इंद्रियांना ध्यान लागून, हृदयांत ते ध्यान ठसलें गेलें की, सर्व विषयच परमात्मस्वरूप आहेत असा अन्वयाचा अनुभव येतो. ''विषयचि ज्याचा झाला नारयण'' ''विषयी विसर पडला नि:शेष। आंगीं ब्रह्मरस ठसावला'' असा तुकाराम महाराजांनी आपला अनुभव सांगितला असून ''अनंतवेशे अनंतरूपें देखिलें म्यां त्यासी'', ''लाजलें गा माय आतां कवणा ओवाळू। जिकडे पाहे तिकडे अवघा गोविंदा गोपाळु'' इत्यादि वचनांनी माऊलींनी व नामदेव महाराजांनी असाच आपला अनुभव सांगितला आहे.

नाथ म्हणतात ''ब्रह्म इंद्रियां गोचर नसे। गुण गेलिया डोळां दिसे। हे अनुभवियासीचि भासे। बोलावें ऐसें तें नव्हें'' (ए. भा. अ. ९-१५१)

व्यतिरेककालीं जें परब्रह्म इंद्रियांना गोचर होत नाही, तें परब्रह्म अन्वयाने सत्वादि त्रिगुणाची नि:शेष निवृत्ति झाली असतां, डोळ्यानेहि दिसूं लागते—म्हणजे नामरूपासह ब्रह्म पूर्ण निरुपाधिक आहे असा अनुभव येतो.

नाथांनी व्यतिरेक आणि अन्वय यांचा उलगडा आपल्या ग्रंथांतून केला आहे. ''कारणापासोनि कार्य अभिन्न। या नांव अन्वय जाण। कार्य मिथ्या सत्य कारण तें व्यतिरेक लक्षण विधातिया ऐक'' (ए. भा. ६००) कार्य पूर्ण कारणरूपच असतें, असे पाहणे याला अन्वय म्हणतात आणि कारण खरें असून कार्य खोटें आहे असें पाहणें याला व्यतिरेक म्हणतात.

**हा दंशु जंव न ये हातां। तंव माझें साचोकारपण पार्था। न संपडे गा सर्वथा। जेविं तुषीं कणु॥ १३६ ॥**

**अर्थ**—हें खरें वर्म जोपर्यंत अर्जुना! हातीं येत नाही, तोपर्यंत ज्याप्रमाणे भुश्यांत धान्याचा कण सांपडत नाही, त्याप्रमाणे माझे यथार्थ स्वरूप समजत नाही. ॥ १३६ ॥

**गूढार्थदीपिका—हा दंश जंव न ये हातां**—नामरूपाचें कारण जें सच्चिदानंद ब्रह्म, त्या परब्रह्माशीं कार्यरूप नामरूपें यांचें पूर्ण ऐक्य आहे—म्हणजे नामरूपें हीं पूर्ण ब्रह्मस्वरूप आहेत—हा अन्वयबोध येथील दंश म्हणजे वर्म होय.

**तंव माझें साचोकारपण पार्था। न सांपडे गा**—अन्वय दृढ झाल्याखेरीज नुसत्या व्यतिरेक विचाराने—म्हणजे ब्रह्म सत्य आहे व नामरूपें मिथ्या आहेत या विचाराने—कृतार्थता किंवा परमानंदाचा लाभ होत नाही.

**एऱ्हवीं अनुमानाचेनि पैसें। आवडे कीर कळलें ऐसें। परि मृगजळाचेनि वोलांशें। काय भूमि तिमे॥ १३७॥**
**जें जाळ जळीं पांगिलें। तेथ चंद्रबिंब दिसे आतुडलें। परि थडिये काढूनि झाडिलें। तेव्हां बिंब कें सांगें॥ १३८॥**
**तैसें बोल्वरी वाचाबळें। वायांचि झकविजती प्रतीतीचे डोळे। मग साचोकारें बोधावेळे। आथि ना होईजे॥ १३९॥**

**अर्थ**—येऱ्हवीं व्यतिरेक विचारांत, कराव्या लागणाऱ्या अनुमानाचे योगाने, ब्रह्मस्वरूप कळलें असें वाटतें खरें, पण मृगजळाच्या ओलाव्याने जमीन ओली होते काय?॥ १३७॥ पाण्यांत जाळें पसरले असतां, त्यात चंद्रबिंब सापडले असें दिसतें पण जाळें बाहेर काढून झाडल्यानंतर त्या जाळ्यांत चंद्रबिंब राहतें काय? सांग बरे॥ १३८॥ त्याप्रमाणे वाचेच्या बळावर शब्दांनी माझ्या स्वरूपाचा कितीहि विचार केला, तरी ते शब्द आपल्या अनुभवदृष्टीला फसवितात. मग नुसत्या शब्दाने खरोखर अनुभव आला काय, हें पाहूं गेल्यास, तो आला नाही व येणे शक्य नाही, असें कळून येतें. ॥ १३९ ॥

**गूढार्थदीपिका**—सत्वं न चेद्धातरिदं निजं भवेत् विज्ञानमज्ञानभिदापमार्जनम्। गुणप्रकाशैरनुमीयते भवान् प्रकाशते यस्य च येन वा गुण: (भाग. स्कं. १०-२-३५) नामरूपासह पूर्ण सच्चिदानंद ब्रह्म आहे अशा अन्वयविचाराने सगुण साकार परमेश्वराचा आश्रय केला नाही, तर परब्रह्म सत्य आहे व नामरूपें मिथ्या आहेत, या नुसत्या व्यतिरेकविचाराने अज्ञान नाहीसें करणारें विज्ञान म्हणजे अपरोक्ष ज्ञान हातीं लागत नाही. तें ज्ञान, ज्याच्या

योगानें गुण प्रकाशित होतें तें परब्रह्म होय असें आनुमानिकच राहतें असें श्रीमद्‌भागवतांत म्हटलें असून तोच आशय श्रीज्ञानेश्वर माऊलींनी ''येऱ्हवीं अनुमानाचेनि पैसें'' इत्यादि चरणांनी सांगितला आहे.

**अवतरणिका—वर सांगितल्याप्रमाणे नामरूपासह पूर्ण ब्रह्म असलेल्या सगुण साकार परमेश्वराचें ध्यान लागलें, तरच सर्व नामरूपासह पूर्ण ब्रह्म आहे, असा अन्वयाचा व्यापक अनुभव येतो. अशा रीतीने परमेश्वराला जाणणें हेंच त्याचें खरें जाणणें होय. म्हणून नामरूपासह सगुण साकार झालेल्या परमेश्वराचा अनादर करणाऱ्यांची भगवंतांनी मूर्ख म्हणून निंदा केली आहे.**

**अवजानन्ति मां मूढा मानुषीं तनुमाश्रितम् । परं भावमजानन्तो मम भूतमहेश्वरम्॥ ११॥**

**अर्थ**—मी मनुष्यदेहासारखा देह धारण केला, तरी मी सर्व ब्रह्मांडाचा स्वामी आहे, हा माझा शुद्ध ब्रह्मभाव, मूर्ख लोक जाणत नसल्यामुळें, तें माझ्या सगुण साकार स्वरूपाला तुच्छ लेखतात. ॥ ११ ॥

**गूढार्थदीपिका**—जी वस्तु इंद्रियगोचर असून तुच्छ वाटते तिचाच अनादर होत असतो. परमेश्वराचें निर्गुणस्वरूप इंद्रियातीत असून, सर्व जीवांचें तें परमप्रिय आत्मस्वरूप असल्यामुळें, त्या स्वरूपाचा कोणी अनादर करतात असें भगवंताचें म्हणणें संभवत नाही.

परमेश्वराचें सगुणस्वरूप सर्वांना अवतारकाळीं इंद्रियगोचर होत असल्यामुळें, त्या स्वरूपाविषयीं अनादर संभवतो, म्हणून येथें भगवंतांनी आपल्या सगुणस्वरूपाचा अनादर करणाऱ्यांनाच मूर्ख म्हटलें आहे, असें म्हणावें लागतें.

ह्या मुद्याचा अंगीकार करूनहि या श्लोकाचा अर्थ कित्येक असा करतात की (मानुषीं तनुम्) मनुष्याच्या देहाप्रमाणे पांच भौतिक देह मी घेतला, तरी मी आपल्या अविनाशी व सर्व ब्रह्मांडाचा स्वामी अशा ब्रह्मभावाला विसरत नसतो. हें न जाणतां माझ्या सगुणस्वरूपाचा अनादर, करणारे मूर्ख होत, असें भगवान म्हणतात.

दुसरें कित्येक असा अर्थ करतात की, मी आपल्या नामरूपात्मक सगुण साकार देहासह पूर्ण सच्चिदानंद ब्रह्मस्वरूपच असल्यामुळें, मी अविनाशी आहे व सर्व ब्रह्मांडाचा स्वामी आहे, पण हें न जाणतां माझ्या सगुण स्वरूपाचा अनादर करणारे मूर्ख होत, असें भगवान म्हणतात.

यापैकीं कोणता अर्थ वेदान्ताला अनुसरून आहे, हें आता पाहूं—

(१) जीव या ज्ञानऐश्वर्यसंपन्न अशा परमेश्वराचाच अंश असतांना त्याची ऐश्वर्यसंपन्न परमेश्वरस्थिति कां नाहीशी झाली, याचा विचार वेदान्तसूत्रांत केला गेला असून ''देहयोगाद्वा सोऽपि'' (ब्र. सू. ३-२-६) या सूत्राने भगवान व्यासांनी व त्यावरील भाष्यांत आचार्यांनी पांचभौतिक देहामुळे जीवाचा ईश्वरभाव नाहीसा झाला असें म्हटलें आहे. याचा अर्थ असा की पांचभौतिक देह हा ब्रह्मभावाची विस्मृति करणारा आहे, असा वेदान्ताचा सिद्धान्त आहे.

इतर वेदान्तग्रंथांतूनहि, आत्मविस्मृति, आत्मविस्मृतीमुळेंच कर्म व कर्माने पांचभौतिक देहाची प्राप्ति होते असाच पांचभौतिक देहाच्या प्राप्तीचा क्रम सांगितला आहे. या क्रमावांचून दुसऱ्या कोणत्याहि प्रकाराने पांचभौतिक देहाची प्राप्ति होते, असें वेदान्तात कोठेहि मानिलें नाही. म्हणून परमेश्वराला पांचभौतिक देहाची प्राप्ति होऊन, त्याचा परंभाव म्हणजे ब्रह्मभाव कायम राहतो किंवा आपला परंभाव कायम ठेऊन-म्हणजे आत्मविस्मृति न होऊं देतां-परमेश्वर पांचभौतिक देह धारण करूं शकतो, असें वेदान्ताला अनुसरून म्हणतां येणें शक्य नाही. आणि परंभाव कायम ठेवून, परमेश्वर पांचभौतिक देह धारण करूं शकत असेल, तर तसें पांचभौतिक जडविनाशी सगुणस्वरूप भगवंतांनी व सर्व संतांनी तुच्छच मानलें असल्यामुळें, त्याचा अनादर करणाऱ्यांना भगवान मूर्ख म्हणतील असें संभवत नाही.

(२) आत्मज्ञानाने आत्मविस्मृति व कर्म नाश पावून मुक्त झाल्यावर मुक्तांना जर पांचभौतिक देह, पुन: घेतां येत नाही, तर जे अवतार—

**ब्रह्माविष्णुमहेशानामाविर्भावाऽपि द्विजाः। परमात्मविभागस्था न जीव व्यूहसंस्थिताः॥ १४॥**

परमेश्वर कोटींतच असतात—म्हणजे नित्यमुक्त असतात—त्यांना पांचभौतिक देह घेतां येतो, असेहि वेदान्ताच्या आधारें म्हणतां येणें शक्य नाही.

म्हणून माझा देह पांचभौतिक असला, तरी माझा परंभाव कायमच असतो हें न जाणतां, माझा अनादर करणारे लोक मूर्ख होत, असें भगवंताचें म्हणणें आहे, असा वरील श्लोकाचा अर्थ करतां येत नाही. परिशेषात्, अखंड सच्चिदानंदरूप असलेल्या परमेश्वराचा सगुण विग्रहहि पूर्ण ब्रह्मस्वरूपच असतो; म्हणून त्याचा अनादर करणाऱ्यांना भगवंतांनी मूर्ख म्हटलें आहे असा या श्लोकाचा अर्थ करणेंच वेदान्तसिद्धान्ताला धरून होतें.

परमेश्वराचा अवतार सदेहसच्चिदानंदरूपच असतो असें श्रुत्यादिकांतून प्रतिपादिलेल्यां वेदान्तशास्त्राचें मत आहे.

''पूर्णमदः पूर्णमिदं पूर्णात्पूर्णमुदच्यते'' (बृ. उ. ५-१-१) या श्रुतींत व त्यावरील भाष्यांत आचार्यांनी ब्रह्म पूर्ण, अस्फुट, सच्चिदानंदस्वरूप असून, त्यापासून झालेलें कार्यरूप जगतहि, पूर्ण सच्चिदानंदस्वरूपच आहे, असें म्हटलें आहे.

पांचभौतिक दिसणारें जगत्, जर खरोखर सच्चिदानंद स्वरूपच आहे, तर अवतारदेह पांचभौतिक असतो असें कशाच्या आधारें म्हणतां येईल? मूळांत सच्चिदानंदस्वरूप असलेली सृष्टि, अज्ञान्याला जशी पांचभौतिक दिसते, तसा सदेह सच्चिदानंद परमेश्वराचा देहहि अज्ञान्याला पांचभौतिक वाटतो, असा या श्रुतीचा व त्यावरील भाष्यांतून आशय निघतो.

भगवान मायेनेच देहधारण करतो, असेंहि कोठे कोठे वेदान्तशास्त्रांतून सांगितलें आहे, पण आत्मज्ञानाने माया नाश पावते व भगवान नित्य आत्मज्ञानी आहे. अशा भगवंताचे ठिकणीं माया म्हणजे अविद्या राहणें शक्यच नाही. म्हणून येथील 'माया' शब्दाचा अविद्या असा अर्थ नसून, विद्या असा करावा लागतो आणि विद्या ही सच्चिदानंदस्वरूप असल्यामुळें, भगवंताचा देह ब्रह्मस्वरूपच ठरतो, हें मागे (अ. ४-श्लो. ६) विशद केलेंच आहे.

किंवा 'माया' शब्दाचा अविद्या असाच अर्थ केला, तर वेदान्तसिद्धान्ताला बाध न येऊं देतां, ''भगवान मायेने देह धारण करतो'' या वचनाचा असा अर्थ करावा लागतो की, ज्याप्रमाणे पाण्यावर तरंग उत्पन्न होण्याला, वायु हा निमित्त असला तरी तो तरंगांत राहत नाही. किंवा तरंग त्याचा बनलेला नसतो तो पाण्याचाच असतो. त्याप्रमाणे जीवाचे ठिकाणीं असणारी त्रिगुणात्मक माया, शुद्ध सच्चिदानंद निरुपाधिक परब्रह्माच्या सगुण साकार देहाला निमित्त असली, तरी त्यांत ती मुळींच नसते. किंवा भगवंताचा तो साकार देह मायेचा बनलेला नसतो, शुद्ध परब्रह्माचाच बनलेला असतो.

सारांश परमेश्वराचा अवतारदेह पूर्ण ब्रह्मस्वरूप असतो, असेंच वेदान्तविचाराने सिद्ध होतें.

संतांनीहि असाच आपला अनुभव सांगितला आहे—

''भगवदेह चैतन्यघन। तेथ वसेना देहाभिमान''॥ ४५॥ (ए. भा.)

''केवळ चैतन्यविग्रहो। सत्यसंकल्प भगवद्देहो''॥ ५४॥

''निर्गुणाहूनि सगुण न्यून। म्हणे तो केवळ मूर्ख जाण।
सगुण निर्गुण दोन्ही समान। न्यून पूर्ण असेना''॥ १४५७॥ (ए. भा. अ. ११)

''घृतकाठिन्यवन्मूर्ति सच्चिदानंदलक्षणा।'' (सूतसंहिता य. वै. खं. अ. ५)

**अर्थ**—ज्याप्रमाणे पातळ तूप थिजलें म्हणजे साकार होते, त्याप्रमाणे सच्चिदानंद निराकार स्वरूपाची सच्चिदानंद साकारमूर्ति बनते.

''**अथ च रामकृष्णाद्यवतारेष्वद्वैतपरमानन्द लक्षणपरब्रह्मणः परमतत्त्वपरमविभवानुसंधानं स्वीयत्वेन श्रूयते सर्वत्र.........तस्मात् परब्रह्मणः परमार्थतः साकारनिराकारौ स्वभावसिद्धौ**'' (त्रिमहानारायण उपनिषद् अ. २)

**अर्थ**—रामकृष्णादि अवताराचे ठिकाणी अद्वैत परमानंदलक्षणात्मक परब्रह्माचें परमतत्त्व व परमैश्वर्याचें अनुसंधान असतें असें सर्वत्र सांगितलें आहे. म्हणून परब्रह्माचीं साकारनिराकार दोन्ही रूपें स्वभावसिद्ध आहेत.

निर्गुण, निरवयव, निराकार परमात्मा सगुणसाकार कसा होतो अशी सामान्य माणसाला शंका येते. त्याला नाथांनी ''तू स्वलीला देह कैसा धरिसी। अवतार चरित्रें कैसें करिसी। कैसेनि देह सांडसी। हे ब्रह्मादिकां कळेना''॥ २६८॥ (ए. भा. अ. ३०) असें उत्तर दिलें आहे.

**किंबहुना भवा बिहा या। आणि साचें चाड आथि जरी मियां। तरि तुम्हीं गा उपपत्ती इया। जतन कीजे॥ १४०॥**

**एऱ्हवीं दिठी वेधली कवळें। तैं चांदणियातें म्हणे पिवळें। तेविं माझां स्वरूपीं निर्मळें। देखाल दोष॥ १४१॥**

**अर्थ**—किंबहुना अर्जुना! तुला या संसाराचें भय वाटत असेल व माझी प्राप्ति व्हावी अशी जर खरी इच्छा असेल तर आतां सांगितलेली सयुक्तिक विचारसरणी नीट लक्षांत ठेव.॥ १४०॥ नांही तर, डोळ्याला कावीळ रोग झाला असतां, तो रोगी चंद्राच्या पांढऱ्या स्वच्छ प्रकाशालाहि पिवळें म्हणतो, त्याप्रमाणे माझ्या निर्मळ-म्हणजे निरुपाधिक सगुण-स्वरूपाचे ठिकाणीं देखील दोष अज्ञ लोक पाहतात.॥ १४१॥

**गूढार्थदीपिका**—कोणी असें म्हणतात की ''मायाविशिष्ट चैतन्य अथवा ईश्वर हा सर्वांना उपास्य आहे. विष्णुशिवादि हे कार्यब्रह्म होत. या कार्यब्रह्माच्या उपासनेने निर्गुण ब्रह्माची प्राप्ति व्हावी, म्हणूनच सगुणोपासना किंवा कार्यब्रह्माची उपासना सांगितली आहे. या सगुणोपासनेने किंवा कार्यब्रह्माच्या उपासनेने मायाविशिष्ट निर्गुण अशा कारणब्रह्माची जी प्राप्ति होते, तो संवादिभ्रम होय.''

पण हें म्हणणें वेदान्ताला धरून नाही.

(१) नित्य, शुद्ध, बुद्ध, मुक्त, सर्वज्ञ, सर्वशक्ति, असें आचार्यांनी ब्रह्मसूत्रांत कारणब्रह्माचें लक्षण केलें आहे. म्हणजे कारणब्रह्म शुद्ध सच्चिदानंदस्वरूप असून त्याचें सर्वज्ञत्वादि षड्गुणैश्वर्य अमर्याद असतें व त्याच्या उपासनेने साक्षान्मुक्ति मिळते असे गीतेंतच सांगितलें आहे. पण कार्यब्रह्माचें ऐश्वर्य मर्यादित असतें व त्याच्या उपासनेने क्रममुक्ति मिळते हें छांदोग्यउपनिषदांत ज्या अक्षिपुरुषादि कार्यब्रह्माच्या उपासना सांगितल्या आहेत त्यावरून स्पष्ट होतें. रामकृष्णादि अवतार पूर्ण सच्चिदानंदस्वरूप असून ते ज्ञानऐश्वर्यादि षड्गुणसंपत्तीने सदा पूर्ण असतात व सर्व ब्रह्मांडाचे स्वामी असतात, असें भगवान आचार्यानीहि गीताभाष्याच्या आरंभीं सांगून, त्यांचें कारणब्रह्मत्व मान्य केलें आहे. म्हणून रामकृष्णादि अवतारांची उपासना कारणब्रह्माचीच उपासना होय, कार्यब्रह्माची नव्हे, हें सिद्ध आहे.

(२) भ्रम संवादि असो की विसंवादि असो. दोन्ही प्रकारच्या भ्रमांत मूळवस्तूचें परोक्ष किंवा अपरोक्ष ज्ञान नसतें, असें विद्यारण्यांनी संवादिभ्रमाचें लक्षण करतांना ''अयथावस्तुविज्ञानात्फल लभ्यत ईप्सितम्। काकतालीयत: सोऽयं संवादिभ्रम उच्यते''॥ १२॥ (पं. द. ध्यानदीप) सांगितलें आहे. विसंवादिभ्रमांत मूळवस्तूहून विपरीत वस्तूची कल्पना केली जाते आणि संवादिभ्रमांत मूळवस्तूचें ज्ञान नसतांना काकतालीयन्यायाने मूळ वस्तूची कल्पना केली जाते, असा या दोन भ्रमांत फरक आहे.

पण ''शास्त्रोक्तेनैव मार्गेण सच्चिदानंद निश्चयात्। परोक्षमपि तज्ज्ञानं तत्त्वज्ञानं न तु भ्रम:॥ १९॥ (पं. द. ध्या. दी.) रामकृष्णादि अवतार सच्चिदानंदस्वरूप आहेत असें शास्त्रावरून जाणून त्यांची उपासना केली जाते; म्हणून तो भ्रम नसून, तें परोक्षज्ञान आहे, असें पुन: विद्यारण्यच म्हणतात. अर्थात् रामकृष्णादि सगुणस्वरूपाच्या उपासनेने निर्गुणब्रह्माची प्राप्ति होणे, हा संवादिभ्रम होय असें म्हणणें अज्ञानमूलक आहे. कारण त्यांच्या (रामकृष्णादिकांच्या) प्राप्तीहून निर्गुणब्रह्माची प्राप्ति निराळी राहत नाही.

**नातरी ज्वरें विटाळलें मुख। तें दुधातें म्हणे कडू विख। तेविं अमानुषा मानुष। मानाल मातें॥ १४२॥**

**म्हणऊनि पुढत पुढतीं धनंजया। झणें विसंबसी या अभिप्राया। जे इयां स्थूलदृष्टीं वायां। जाइजेल गा॥ १४३॥**

**पैं स्थूलदृष्टी देखती मातें। तेंचि न देखणें जाण निरुतें। जैसें स्वप्नींचेनि अमृतें। अमर नोहीजे॥ १४४॥**

**एऱ्हवीं स्थूलदृष्टी मूढ। मातें जाणती कीर दृढ। परि तें जाणणेंचि जाणणेया आड। रिगोनि ठाके॥ १४५॥**

**जैसा नक्षत्राचिया आभासा-। साठीं घातु झाला तया हंसा। माजी रत्नबुद्धीचिया आशा। रिगोनियां॥ १४६॥**

**सांगें गंगा या बुद्धी मृगजळ। ठाकोनि आलियाचें कवण फळ। काय सुरतरु म्हणोनि बाबुळ। सेविली करी॥ १४७॥**

हा निळयाचाचि दूसरा। या बुद्धी हातु घातला विखारा। कां रत्ने म्हणोनि गारा। वेंची जेविं॥ १४८॥
अथवा निधान हें प्रगटलें। म्हणोनि खदिरांगार खोळे भरिले। कां साउली नेणतां घातलें। कुहां सिंहें॥ १४९॥
तेविं मी म्हणोनि प्रपंची। जिहीं बुडी दिधली कृतनिश्चयाची। तिहीं चंद्रासाठीं जेविं जळींची। प्रतिमा धरिली॥ १५०॥
तैसा कृतनिश्चय वायां गेला। जैसा कोण्ही एकु कांजी प्याला। मग परिणाम पाहों लागला। अमृताचा॥ १५१॥
तैसें स्थूळाकारीं नाशिवंतें। भरंवसा बांधोनि चित्तें। पाहती मज अविनाशातें। तरि कैंचा दिसें॥ १५२॥
काइ पश्चिमसमुद्राचिया तटा। निघिजेत आहे पूर्विलिया वाटा। कां कोंडा कांडतां सुभटा। कणु आतुडे॥ १५३॥
तैसें विकारलें हें स्थूळ। जाणितलेया मी जाणवतसें केवळ। काइ फेण पितां जळ। सेविलें होय॥ १५४॥
म्हणोनि मोहिलेनि मनोधर्में। हेंचि मी मानूनि संभ्रमें। मग येथिंची जियें जन्मकर्में। तियें मजचि म्हणती॥ १५५॥
येतुलेनि अनामा नाम। मज अक्रियासि कर्म। विदेहासि देहधर्म। आरोपिती॥ १५६॥
मज आकारशून्या आकारु। निरुपाधिका उपचारु। मग विधिविवर्जिता व्यवहारु। आचारादिक॥ १५७॥
मज वर्णहीना वर्णु। गुणातीतासि गुणु। मज अचरणा चरणु। अपाणिया पाणी॥ १५८॥
मज अमेया मान। सर्वगतासी स्थान। जैसें सेजेमाजी वन। निदेला देखे॥ १५९॥
तैसें अश्रवणा श्रोत्र। मज अचक्षूसी नेत्र। अगोत्रा गोत्र। अरूपा रूप॥ १६०॥
मज अव्यक्तासि व्यक्ती। अनार्तासि आर्ती। स्वयंतृप्ता तृप्ती। भाविती गा॥ १६१॥
मज अनावरणा प्रावरण। भूषणातीतासि भूषण। मज सकळ कारणा कारण। देखती ते॥ १६२॥
मज सहजातें करिती। स्वयंभातें प्रतिष्ठिती। निरंतरातें आव्हानिती। विसर्जिती गा॥ १६३॥
मी सर्वदा स्वत:सिद्धु। तो कीं बाळ तरुण वृद्धु। मज एकरूपा संबंधु। जाणती ऐसे॥ १६४॥
मज अद्वैतासि दुजें। मज अकर्तयासि काजें। मी अभोक्ता कीं भुंजें। ऐसें म्हणती॥ १६५॥
मज अकुळाचें कुळ वानिती। मज नित्याचेनि निधनें शिणती। मज सर्वांतरातें कल्पिती। अरि मित्र गा॥ १६६॥
मी स्वानंदाभिरामु। तया मज अनेकां सुखाचा कामु। आघवाचि मी असें समु। कीं म्हणती एकदेशी॥ १६७॥
मी आत्मा एक चराचरीं। म्हणती एकाचा कैंपक्ष करीं। आणि कोपोनि एकातें मारीं। हेंचि वाढविती॥ १६८॥
किंबहुना ऐसे समस्त। जे हे मनुष्यधर्म प्राकृत। तयाचि नांव मी ऐसें विपरीत। ज्ञान तयांचे॥ १६९॥
जंव आकारु एक पुढां देखती। तंव हा देव येणें भावें भजती। मग तोचि विघडलिया टाकिती। नाहीं म्हणोनि॥ १७०॥
मातें येणें येणें प्रकारें। जाणती मनुष्य ऐसेनि आकारें। म्हणऊनि ज्ञानचि तें आंधारें। ज्ञानासि करी॥ १७१॥

**अर्थ**—किंवा ज्वराने तोंड दूषित झालें असतां त्या तोंडाला दूधहि विषासारखें कडू वाटतें, त्याप्रमाणें अमानुषा म्हणजे मनुष्यधर्म नाहीत अशा पूर्णब्रह्मस्वरूप असलेल्या मला मनुष्यदेहधारी जीव समजतात.॥ १४२॥ म्हणून अर्जुना! वारंवार तुला सांगणें आहे की माझ्या सगुणस्वरूपाला स्थूलदृष्टीने म्हणजे पांचभौतिक दृष्टीने पाहणें चुकीचें आहे. हा माझ्या म्हणण्याचा अभिप्राय तूं कदाचित् विसरशील॥ १४३॥ परंतु ज्याप्रमाणें स्वप्नातील अमृत पिऊन मनुष्य अमर होत नाही, त्याप्रमाणें स्थूलदृष्टीने मला जे पाहतात, त्यांचें तें मला पाहणेच नव्हे, हें सत्य जाण.॥ १४४॥ साधारणत: मूर्खलोक मला, स्थूलदृष्टीने म्हणजे माझा विग्रह पांचभौतिक आहे असें पक्कें समजतात, पण तें त्यांचें विपरीत जाणणेंच, खऱ्या जाणण्याच्या—म्हणजे माझा विग्रह पूर्ण सच्चिदानंदस्वरूप आहे असें जाणण्याच्या आड येतें.॥ १४५॥ ज्याप्रमाणें पाण्यांत पडलेल्या नक्षत्राच्या आभासाला पाहून, हीं रत्ने आहेत अशा आशेने हंस पाण्यांत बुडून आपला नाश करून घेतो.॥ १४६॥ अर्जुना! मृगजळाला गंगाप्रवाह समजून कोणी एखादा, त्या मृगजळापाशीं स्नान करावयास आला, तर त्याचें त्याला काय फल मिळेल? सांग बरें. बाभळीच्या झाडाची कल्पतरु म्हणून सेवा केली, तर ती बाभूळ काय इच्छापूर्ति करील?॥ १४७॥ दोन सरांचा हा नीलमण्यांचा हार आहे असें समजून काळ्या विषारी सर्पाला हातीं धरलें किंवा रत्ने समजून गारा वेंचिल्या॥ १४८॥ किंवा सोन्याचा ढीग समजून खदिराचे लाल तप्त निखारे पिशवींत भरले, किंवा माझीच ही पडछाया आहे असें न जाणतां, दुसरा सिंह आहे, असें वाटून सिंहाने

विहिरींत उडी टाकली॥ १४९ ॥ त्याप्रमाणें हा भौतिक जडविनाशी प्रपंच म्हणजेच परमात्मा आहे किंवा सगुण श्रीकृष्णस्वरूप प्रपंचाप्रमाणेच भौतिक आहे, असा ठाम निश्चय करून ज्यांनी तेथेंच बुडी मारली म्हणजे बुद्धि स्थिर केली त्यांनी सत्य चंद्र मिळावा म्हणून पाण्यांत पडलेल्या चंद्राच्या प्रतिबिंबाला धरलें॥ १५० ॥ ज्याप्रमाणे एखाद्या मनुष्याने कांजी पिऊन अमृताचा परिणाम पहावा—म्हणजे अमर होण्याची आशा बाळगावी—त्याप्रमाणे त्या मनुष्याचा केलेला निश्चय व्यर्थ गेला समज. ॥ १५१ ॥ त्याचप्रमाणे मीं नाशिवंत, दृश्य असा, स्थूलाकाराने आहे असा चित्तांत भरंवसा ठेवून जे कोणी अविनाशी अशा मला पाहतील, तर त्यांना मी कसा दिसणार?॥ १५२ ॥ बा! उत्तम योद्ध्या! पश्चिम समुद्राच्या किनाऱ्याला येण्याकरिता पूर्वदिशेच्या वाटेने कोणी निघतो काय? किंवा नुसता कोंडा कांडल्याने धान्याचा कण सांपडेल काय?॥ १५३ ॥ फेंस पिल्याने पाणी पिण्यासारखे होतें काय? त्याप्रमाणे जडविनाशी वस्तुरूपाने परिणाम पावलेला हा स्थूल प्रपंच जाणल्याने माझे सगुणस्वरूप जाणले जाईल काय?॥ १५४ ॥ म्हणून अविचारी भ्रांत मनाने, त्रिगुणात्मक स्थूल प्रपंचासारखें, माझें सगुणस्वरूप आहे, असें समजून जगांतील पदार्थांच्या जन्मकर्माप्रमाणे माझें जन्मकर्म आहेत असे अज्ञानी समजतात. ॥ १५५ ॥ नामरहित अशा मला नाम ठेवलें जातें, अकर्ता असा जो मी, त्या माझ्या ठिकाणीं कर्म मानतात व पांचभौतिक देहाचे धर्म मानतात. ॥ १५६ ॥ तशाप्रमाणे आकाराहून मला निराळे समजून माझे ठिकाणीं आकाराचा संबंध झाला असें मानतात. उपाधिरहिताला मला उपचारांनी संतोष होतो, असें समजतात आणि मी विधिवर्जित आहे पण मलाहि आचारआदिक व्यवहार कर्तव्य आहे असें मानतात. ॥ १५७ ॥ वर्णरहित अशा माझ्या सच्चिदानंद स्वरूपाचे ठिकाणीं पांचभौतिक देहाप्रमाणे वर्ण मानतात. त्रिगुणातीत अशा माझ्या ठिकाणीं त्रिगुण मानतात. व भौतिक करचरणरहित अशा माझे ठिकाणीं भौतिक करचरणाची कल्पना करतात. ॥ १५८ ॥ ज्याप्रमाणे झोंपलेला मनुष्य स्वप्नांत अरण्य पाहतो त्याप्रमाणे प्रमाणरहिताला मला प्रमाणगम्य मानतात, सर्व व्यापकाला मला विवक्षित स्थान मानतात. ॥ १५९ ॥ भौतिक श्रवणेंद्रिय व चक्षुरिंद्रिय नसलेल्या माझ्या ठिकाणीं भौतिक श्रवणेंद्रिय व चक्षुरिंद्रिय आहेत असे मानतात. तसेंच भौतिक देहाचे ठिकाणीं राहत असलेला गोत्रसंबंध माझ्या अभौतिक देहाचे ठिकाणीं मानतात. भौतिकरूप नसलेल्या क्रिया माझ्या ठिकाणीं भौतिकरूप मानतात. ॥ १६० ॥ अव्यक्त म्हणजे अतींद्रिय असा मी, भौतिक इंद्रियांनी गोचर होतो, असें समजतात. इच्छारहित अशा मला इच्छा आहे, असे समजतात. स्वयंतृप्ताला मला विषयवासनेने तृप्ति होते असें मानतात. ॥ १६१ ॥ सर्वदा आवरणरहित किंवा उघडा असणाऱ्या मला वस्त्रांनी झांकण्याची गरज मानतात. भूषणावांचून अपरिमित सुंदर अशा माझे ठिकाणीं, भूषणाची आवश्यकता मानतात—म्हणजे भूषणांनी मला सौंदर्य येतें, असें समजतात. सर्व ब्रह्मांडाचें कारण व स्वत:सिद्ध असा जो मी, त्या मला कारण आहे, असें समजतात—म्हणजे आईबापापासून उत्पन्न झालों असें समजतात. ॥ १६२ ॥ जो मी स्वभावत:च आहे, त्या मला तयार करतात, स्वयंभू जो मी, त्या माझी प्रतिष्ठा करतात. अखंड असणारा जो मी, त्या माझें आवाहन विसर्जन करतात. ॥ १६३ ॥ मी सदासर्वदा स्वत:सिद्ध आहे, पण मला बाल, तरुण, वृद्ध समजतात. याप्रमाणे एक अद्वैतरूप असणाऱ्या मला असें संबंध आहेत, असें समजतात. ॥ १६४ ॥ अखंड अद्वैत ब्रह्मस्वरूपाहून मला निराळें समजतात. मी अकर्ता असतां माझे ठिकाणीं कर्मकर्तृत्व पाहतात आणि मी अभोक्ता असतां, मला भोक्ता समजतात. ॥ १६५ ॥ मला कुळ नाही, पण कुळाचा संबंध लावून, माझ्या कुळाचें वर्णन करतात मी अविनाशी आहे पण मी मेलों असें समजून दु:खी होतात आणि सर्वांच्या अंतर्यामी राहणाऱ्या मला शत्रुमित्र मानतात. ॥ १६६ ॥ अर्जुना! मी निजानंदांत अखंड निमग्न असणारा आहे, पण मला अनेक सुखाची इच्छा आहे, असें मानतात. मी सर्व असून, सर्वत्र सम आहे पण मला एके ठिकाणीं राहणारा मानतात. ॥ १६७ ॥ सर्व चराचर सृष्टींत मीच एक सर्वांचा आत्मा आहे, पण मी आपल्या भक्तांचा पक्ष घेतों व दुष्टांचा संहार करतों, असें जगांत रूढ करितात. ॥ १६८ ॥ विशेष काय सांगूं, संपूर्ण जीवाचे व जीवाच्या देहाचे ठिकाणी राहणारे संपूर्ण अज्ञानजन्य जे धर्म आहेत तेच माझ्या ठिकाणीं (म्हणजे मी जीव असून माझा देहहि पांचभौतिक) आहेत असे त्यांचें विपरींत ज्ञान असते. ॥ १६९ ॥ समोर एखादा आकार पाहून त्याचें, देव म्हणून भजन

करतात आणि तो भंगला असतां आतां हा देव नाही, असे वाटून टाकून देतात. ॥ १७० ॥ पण, अर्जुना! अशा नाना प्रकाराने मला मनुष्याकारच समजतात; म्हणून त्यांचें हें विपरीत ज्ञान माझ्या सगुण साकार स्वरूपाच्या यथार्थ ज्ञानाला झांकून टाकतें (माझें खरें ज्ञान होऊं देत नाही) ॥ १७१ ॥

**गूढार्थदीपिका**—या ओव्यांवरून नामरूपरहित अशा निर्गुण स्वरूपाहून, भगवंताचें नामरूपात्मक सगुणस्वरूप कनिष्ठ आहे, असे कोणी म्हणतील, पण तें बरोबर नाही, हें वर जें सगुण स्वरूपाचें विवेचन केलें आहे त्यावरून कळून येईल. ज्याप्रमाणे परिसाच्या संगाने झालेल्या सोन्यांत, कमी अधिक कसोटी असूं शकत नाही, त्याप्रमाणे पूर्णब्रह्म नित्य, शुद्ध, बुद्ध, निरवयव, अस्फूट, स्वयंभू, व्यापक, अद्वितीय, नामरूपसंबंधरहित, कर्मकर्तृत्वरहित अशा लक्षणाचें आहे म्हणून त्याची सगुणनिर्गुण दोन्ही स्वरूपेंहि पूर्ण ब्रह्मच असतात असे वेदान्तांत सांगितलें आहे. फरक इतकाच की, निर्गुण परब्रह्म नामरूपरहित घेतले जाते, तर सगुण परब्रह्म अखंड नामरूपसहित घेतलें जातें. ''अनामा नाम'' या चरणाचा सगुणदृष्टीने अर्थ करायचा म्हणजे सगुण परमात्मा अखंड नामरूपसहितच असतो, हें न जाणणरे मूर्ख लोक, ज्याप्रमाणे जीव जन्माला येण्यापूर्वी नामरूपरहित असतो व तो देहधारी होऊन जन्माला आला की त्याला नाम ठेविलें जातें, तसेंच सगुण परमेश्वराला जीव समजून तो जन्मला व त्याला नांव ठेविलें गेलें किंवा नामाचा व भगवंताचा आतां संबंध झाला, असें समजतात, असा माऊलींच्या म्हणण्याचा अर्थ होतो.

सगुण परमात्मा अद्वितीय व व्यापक असल्यामुळे कर्म नाही व अहंकार नसल्यामुळे कर्तृत्वहि नाही म्हणून तो अकर्ताच आहे. याप्रमाणेच शेष ओव्यांचाहि अर्थ सगुणाच्या दृष्टीने लावतां येतो.

**मोघाशा मोघकर्माणो मोघज्ञाना विचेतसः । राक्षसीमासुरीं चैव प्रकृतिं मोहिनीं श्रिताः ॥ १२ ॥**

**अर्थ**—सगुण भगवंताला तुच्छ समजून त्याचे ठिकाणीं चित्त न लावणारे जे पुरुष असतात, ते अत्यंत अविवेक उत्पन्न करणाऱ्या राक्षसी किंवा आसुरी प्रकृतीचा आश्रय करून राहतात. म्हणून त्यांचे मनोरथ व्यर्थ होतात, त्यांचीं कर्मेहि निष्फळ होतात. त्यांचें ज्ञानहि व्यर्थच असतें. ॥ १२ ॥

**यालागीं जन्मलेचि ते मोघ। जैसें वार्षियेवीण मेघ। कां मृगजळाचे तरंग। दुरूनीचि पाहावे॥ १७२ ॥**
**अथवा कोल्हेरीचे असिवार। नातरी वोडंबरीचे अळंकार। की गंधर्वनगरीचे आवार। आभासती कां॥ १७३ ॥**
**साबरी वाढिन्नल्या सरळा। वरी फळ ना आंतु पोकळा। कां स्तन जाले गळां। शेळिये जैसें॥ १७४ ॥**
**तैसें मूर्खांचें तयां जियालें। आणि धिग कर्म तयांचें निपजलें। जैसें सांवरी फळ आलें। घेपे ना दीजे॥ १७५ ॥**
**मग जें कांहीं ते पढिन्नलें। तें मर्कटें नारळ तोडिले। कां आंधळ्या हातीं पडिलें। मोतीं जैसें॥ १७६ ॥**
**किंबहुना तयांचीं शास्त्रें। जैशीं कुमारीहातीं दीधलीं शस्त्रें। कां अशौच्या मंत्रे। बीजें कथिलीं॥ १७७ ॥**
**तैसें ज्ञानजात तया। आणि जें कांहीं आचरलें गा धनंजया। तें आघवेंचि गेलें वायां। जें चित्तहीन॥ १७८ ॥**
**पैं तमोगुणाची राक्षसी। जें सद्बुद्धीतें ग्रासी। विवेकाचा ठावोचि पुसी। निशाचरी जे॥ १७९ ॥**
**तिये प्रकृती वरपडे जाले। म्हणऊनि चितेंचेनि कपाटें गेले। वरि तामसीयेचिये पडिले। मुखामाजीं॥ १८० ॥**
**जेथ आशेचिये लाळे। आंतु हिंसा जीभ लोळे। तेवींचि असंतोषाचे चाकळे। अखंड चघळी॥ १८१ ॥**
**जे अनर्थाचे कानवेरी। आवाळुवें चाटीत निघे बाहेरी। जे प्रमादपर्वतींची दरी। सदाचि मातली॥ १८२ ॥**
**जेथ द्वेषाचिया दाढा। खसखसां ज्ञानाचा करिती रगडा। जे त्वगस्थि गवसणी मूढां। स्थूळबुद्धि॥ १८३ ॥**
**ऐसे आसुरिये प्रकृतीचे तोंडीं। जे जाले गा भूतोंडीं। ते बुडोनि गेले कुंडीं। व्यामोहाचां॥ १८४ ॥**
**एवं तमाचिये पडिले गर्ते। न पविजतीचि विचाराचेनि हातें। हें असो ते गेले जेथें। तें शुद्धीचि नाहीं॥ १८५ ॥**

**अर्थ**—म्हणूनच ज्याप्रमाणे वर्षाऋतुवांचून आलेले मेघ व्यर्थ असतात किंवा मृगजळाचे तरंग केवळ दुरून पाहण्याजोगे असतात, त्याप्रमाणे भगवंताच्या सगुण स्वरूपाला भौतिक समजून तुच्छ लेखणारे लोक व्यर्थच जन्माला आले म्हणजे त्यांचा जन्म व्यर्थ असतो. ॥ १७२ ॥ किंवा जसे मातीचे घोडेस्वार दिसावे किंवा जसे गारूड्यांनी केलेले अलंकार दिसावे किंवा जशी आकाशांतील ढगांची नगराप्रमाणे दिसणारी रचना असते. ॥ १७३ ॥ साबर निवडुंगाचे

झाड सरळ वाढलें, तरी त्याला फळ नसल्यामुळे व आंतून पोकळ असल्यामुळे तें जसें निरर्थक असते किंवा शेळीच्या गळ्याला असलेले स्तन निरर्थक असतात. ॥ १७४ ॥ किंवा सांवरीच्या झाडाला आलेलें फळ घेतां येत नाही व देतां येत नाही, त्याप्रमाणे भगवंताच्या सगुण स्वरूपाचा अनादर करणाऱ्या त्या मूर्खाचें जीवन व त्यांच्याकडून घडलेलीं कर्मे व्यर्थ होत. ॥ १७५ ॥ पुढे त्यांनी जेवढें कांही अध्ययन करून ज्ञान संपादन केलेंले असतें, तें सर्व वानरांनी नारळ तोडल्याप्रमाणे किंवा आंधळ्याहातीं मोतीं पडल्याप्रमाणेच निरर्थक समजावें. ॥ १७६ ॥ एवढेंच नाही, तर ज्याप्रमाणे लहान मुलीचे हातीं दिलेली शस्त्रे किंवा अपवित्र माणसाला दिलेले सबीज मंत्र हानिकारक होतात. ॥ १७७ ॥ त्याचप्रमाणे माझ्या सगुण परमेश्वराच्या ठिकाणीं आदरयुक्त चित्त नसल्यामुळे त्यांचें नानाप्रकारचें ज्ञान व नानाप्रकारचें धर्माचरण हीं सर्व व्यर्थ होत. ॥ १७८ ॥ आणखी सुबुद्धीचा नाश करणारी, विवेकाचा ठावठिकाण नाहीसा करणारी, अशी जी तमोगुणात्मक अत्यंत अविवेकरूप अज्ञानांत वावरणारी राक्षसी प्रकृति आहे. ॥ १७९ ॥ त्या राक्षसी प्रकृतीच्या स्वाधीन होतात; म्हणून चिंतेच्या कपाटांत शिरतात (म्हणजे अखंड चिताक्रांत असतात) आणि मग तमोगुणी प्रकृतीच्या मुखांतच सांठवितात. ॥ १८० ॥ (तामसी प्रकृतीच्या मुखांत साठवितात म्हणजे काय याचें स्पष्टीकरण करतात) ज्या तामसी प्रकृतीच्या मुखामध्ये आशा हीच लाळ आहे, त्यांत हिंसारूप जीभ लळलळ करते आणि असंतोषरूपी मांसाचे तुकडे सारखे चघळत असते. ॥ १८१ ॥ ती जीभहि अनर्थ म्हणजे दु:खद परिणाम हाच कोणी कान, त्या कानापर्यंत ओंठ चाटीत बाहेर निघते. अशी ही राक्षसी प्रकृति, प्रमाद—जाणून बुजून पाप करण्याची प्रवृत्ति-हाच कोणी पर्वत, त्या पर्वताची सदा माजलेली दरीच होय. (त्या राक्षसी प्रकृतीच्या माणसाचे ठिकाणीं अखंड पाप करण्याची किंवा दुसऱ्याला दु:ख देण्याची प्रवृत्ति भरलेली असते. दुसऱ्याला सुख द्यावें, हें त्याच्या मनांत कधीं येतच नाही असा अर्थ). ॥ १८२ ॥ ज्या ठिकाणीं तामसप्रकृतीच्या द्वेषरूपी दाढेने विचाररूपी ज्ञानाचा नि:शेष चुराडा केला जातो आणि जी तामसी प्रकृति स्थूलबुद्धि—म्हणजे स्थूल पांचभौतिक शरीरादिक सत्य आहेत अशी बुद्धि-उत्पन्न करून मूर्खांना त्वचा आणि अस्थि यांची गवसणी करते—म्हणजे शरीराहून मी भिन्न आहे असा विवेक होऊं देत नाही. ॥ १८३ ॥ असे हे, त्यां आसुरीप्रकृतीच्या तोंडांत बळी होतात व ते (अर्जुना!) अज्ञानभ्रांतीच्या डोहांत बुडून जातात, असें समज. ॥ १८४ ॥ तसेंच ते तमोगुणाच्या खाईंतच पडलेले असतात. विचाराचे हाताला कधीं सांपडत नाहीत. असो काय सांगू! त्यांची काय गति होते याचा पत्ता लागत नांही. किंवा आपली काय गति झाली, हें त्यांना समजत देखील नाही. ॥ १८५ ॥

**गूढार्थदीपिका**—रामकृष्णादि सगुण परमेश्वराला तुच्छ लेखणाऱ्या पुरुषांचे ठिकाणीं सत्वगुणाची वृद्धि न होतां रजोगुण तमोगुणाचीच वृद्धि होते, म्हणून त्यांना परमेश्वरप्राप्ती किंवा मोक्षप्राप्ति कधीं होत नाही असा भाव.

**म्हणोनि असोतु इयें वायाणीं। कायशीं मूर्खांचीं बोलणीं। वायां वाढवितां वाणी। शिणेल हन॥ १८६ ॥**
**ऐसें बोलिलें देवें। तेथ जी जी म्हणितलें पांडवें। आइकें जेथ वाचा विसवे। ते साधुकथा॥ १८७ ॥**

**अर्थ**—म्हणून या राक्षसी प्रकृतीच्या मूर्ख लोकांचें वर्णन करणें व्यर्थ आहे. जितकी त्यांची कथा सांगावी तितका वाणीला व्यर्थ शीणच देणें होय. ॥ १८६ ॥ असें देवांनी म्हटलें असतां, अर्जुन म्हणतो, देवा! तुमचें म्हणणें अगदीं यथार्थ आहे. यावर देव म्हणतात, अर्जुना! ज्यांची कथा वर्णन केली असतां वाणीला विसावा किंवा सुख मिळतें, त्या सत्पुरुषांची आतां कथा ऐक. ॥ १८७ ॥

**गूढार्थदीपिका**—साधुकथा म्हणजे सत्पुरुषांचें वर्णन किंवा अंतश्चिन्हें किंवा स्वाभाविक लक्षणें. सत्पुरुषांची अंत:स्थिति, परमात्मा अंतर्यामी असल्यामुळें जाणूं शकतो. दुसरा जाणूं शकत नाही. बाह्यचिन्हांवरूनहि तीं कळूं शकत नाहीत. "तुका म्हणे हे तो ठावे पांडुरंगा। काय करी जगा अंतरींचे" "भक्ताचा महिमा भक्तचि जाणती। दुर्लभ या गती आणिकांसि" किंवा स्वत: जो भक्त असेल त्यालाहि भक्ताचें अंत:करण कळूं शकतें.

**जेथ वाचा विसवे**—सत्पुरुषांचे गुण वर्णन करण्यातच वाणीला समाधान मिळतें व तिचें सार्थक होतें. तिला दुसरें बोलावेसें वाटत नाही. "जेणें सांगतयाचे बोलणें खुंटे। ऐकतयाचे व्यसन तुटे" त्याचप्रमाणें 'जे मुक्ताते निर्धारितां।

लाभे आपलीच मुक्तता। जैसी दीपे दिसे पाहतां। आपली वस्तु"॥ ३९७॥ (ज्ञाने. अ. १८) तैंसै हारपलें आपणवें पावें। तैं संताते पाहातां गिवसावें। म्हणोनि वानावें ऐकावें। तेचि सदा"॥ ४००॥ (ज्ञा. अ. १८) संतांची कथा वर्णन करतांना व ऐकतांना आपल्यालाच ज्ञानाची व भक्तीची प्राप्ति होते अशी ही साधुकथा श्रेष्ठलाभ करून देणारी आहे "संत होऊनियां संतासी पाहावें। तरीच तरावे तुका म्हणे".

**महात्मानस्तु मां पार्थ दैवीं प्रकृतिमाश्रिताः। भजन्त्यनन्यमनसो ज्ञात्वा भूतादिमव्ययम्॥ १३॥**

**अर्थ**—महात्मे जे पुरुष असतात, ते सात्विक अशा दैवी प्रकृतीचा आश्रय करून मला सर्व सृष्टीचें कारण व अविनाशी असें समजून, अनन्यभावाने माझें भजन करतात.॥ १३॥

**तरी जयांचिये चोखटे मानसीं। मी होऊनि असें क्षेत्रसंन्यासी। जयां निजेलियांतें उपासी। वैराग्य गा॥ १८८॥**

**अर्थ**—त्या महात्मे पुरुषांच्या निर्मळ अंत:करणांत मी क्षेत्रसंन्यासी होऊन राहतो. जे निजले असतां देखील वैराग्य त्यांची उपासना करीत राहते.॥ १८८॥

**गूढार्थदीपिका—जयांचिया चोखटें मानसीं**—चोखट मानस म्हणजे शुद्ध मन. येथें मन हा शब्द अंत:करण, किंवा बुद्धिवाचक आहे. बुद्धि, अंत:करण मन हे शब्द पुष्कळदां समानार्थी वापरले जातात. अंत:करण सत्वगुणाचें कार्य असल्यामुळें, मुळात तें स्वच्छच आहे; पण अविद्याजन्य कामादिदोषांनी युक्त होऊन तें अशुद्ध होतें. "मनोहि द्विविधं प्रोक्तं शुद्धं चाशुद्धमेव च। अशुद्धं कामसंकल्पं शुद्धं कामविवर्जितम्" (अमृत. उप) दोषरहित मनाला शुद्धमन म्हणतात. या शुद्धमनाला येथें "चोखटें मानस" म्हटलें आहे.

अविद्या म्हणजे आत्मस्वरूपाला विसरणें. जीव आपल्या सच्चिदानंद आत्मस्वरूपाला विसरला आहे; म्हणून त्याचें ठिकाणीं अविद्या आहे. या अविद्येपासून आवरण, विक्षेप, संशय, विपर्यय, असंभावना, विषयासक्ति, बुद्धिमांद्य असे अनेक दोष अंत:करणांत शिरले आहेत.

आवरण हें अविद्येचेच वृत्तिस्वरूप आहे—म्हणजे मूळ अविद्या अंत:करणांत ज्या वृत्तिरूपाने आहे त्या वृत्तिरूपाला आवरण म्हणतात. तें आवरण असत्वापादक व अभानापादक असें दोन प्रकारचें आहें. सच्चिदानंद ब्रह्म नाही अशी जी अंत:करणांत वृत्ति उत्पन्न होते, त्याला असत्वापादक आवरण म्हणतात व सच्चिदानंद परब्रह्म आहे, पण मला तें कळत नाही, अशा वृत्तीला अभानापादक आवरण म्हणतात.

विक्षेप म्हणजे परब्रह्मवस्तुच्या यथार्थज्ञानाला बाधक असें परब्रह्मवस्तुचेंच निराळ्या वस्तूच्या रूपाने ज्ञान होणें होय. हा विक्षेप आवरणामुळेंच उत्पन्न होतो व तो मलयुक्त विक्षेप व अमलयुक्त विक्षेप असा दोन प्रकारचा आहे. दृढ विषयासक्तीमुळें विषयसुख प्राप्त करून घेण्याकरितां, धर्मशास्त्राविरुद्ध वागण्याची जी पापप्रवृत्ति तिला मलयुक्त विक्षेप म्हणतात. ब्रह्मज्ञान झाल्यावर प्रारब्धबळाने जो जगताचा भास व विषयप्रवृत्ति राहते त्याला अमलयुक्त विक्षेप म्हणतात. हा विक्षेप सगुण भगवंताच्या भक्तीने नाहीसा होतो.

हें खरें की तें खरें अशा द्विकोटिक ज्ञानाला संशय म्हणतात. हा संशयहि वाचकगतसंशय व वाच्यागत संशय असा दोन प्रकारचा आहे. वेदाने परब्रह्माचें प्रतिपादन केले आहे की धर्माचें प्रतिपादन केलें आहे याचा निश्चय न होणें याला वाचकगतसंशय म्हणतात (वाचक म्हणजे वेद) आणि वेदान्तदर्शनाप्रमाणे जगताचे कारण ब्रह्म आहे किंवा इतर सांख्यादिकांच्या मताप्रमाणें प्रधानादिक आहेत अशी अनिश्चितवृत्ति याला वाच्यागतसंशय म्हणतात (वाच्य म्हणजे ब्रह्म).

वस्तुस्थितीच्या उलट भावना करणें याला विपर्यय किंवा विपरीत भावना म्हणतात. ही शब्दरूप विपरीतभावना व अर्थरूप विपरीतभावना अशी दोन प्रकारची आहे. आपल्या व्युत्पत्तीच्या अभिमानाने संतादिक आप्तांच्या वचनांना प्रमाण न मानणें ही शब्दरूप विपरीतभावना होय व ब्रह्म खोटें आहे आणि देहादिक विषय सत्य आहेत, असें मानून देहादिकांचें सुख भोगणें, ही अर्थरूप विपरीतभावना होय.

ब्रह्मवस्तुचें अस्तित्व सिद्ध होणार नाही अशा युक्तीने झालेल्या निश्चयास असंभावना म्हणतात. ती

प्रमाणअसंभवना व प्रमेयअसंभावना अशी दोन प्रकारची आहें न्यायसांख्यादि दर्शनांनी मानलेल्या प्रत्यक्षादि प्रमाणाने ब्रह्म कळूं शकत असल्यामुळें, ते श्रुतीवरूनच कळतें असें नाही अशी जी निश्चयवृत्ति तिला प्रमाणअसंभावना म्हणतात (प्रमाण म्हणजे वेदरूप शब्द प्रमाण) आणि ब्रह्म व जगत परस्पराहून भिन्न लक्षणाचे आहेत, म्हणून जगताचे कारण ब्रह्म नाही अशी जी निश्चयवृत्ति तिला प्रमेयअसंभावना म्हणतात (प्रमेय म्हणजे ब्रह्म).

विषयसुखाच्या प्राप्तीची इच्छा याला विषयासक्ति म्हणतात. ही सर्व इहपरलोकांतील विषयाविषयी असते. ही अनेक प्रकारची आहे.

''येन तात्पर्यतश्चापि श्रुतं बुद्धिमनारूहेत्। तज्जाड्यं हि महान्दोषः पुरुषार्थविनाशिनः'' (त्रि. र. अ. २०-९७) ज्याच्या योगाने श्रवण केलेला अर्थ संक्षेपरूपानेहि बुद्धीत शिरूं शकत नाही, हा बुद्धिमांद्यरूपी दोष होय. हा दोष मोक्षपुरुषार्थाचा सर्वस्वीं नाश करणारा असल्यामुळें, हा दोष परमेश्वर भक्तीवांचून इतर प्रयत्नांनी जिंकण्यास कठीण आहे. हें संपूर्ण दोष परमेश्वरप्राप्तीला प्रतिबंधक असल्यामुळें ते, जोपर्यंत बुद्धींत आहेत तोपर्यंत ती बुद्धि अशुद्ध किंवा परमेश्वरप्राप्तीला अयोग्य म्हटली जाते.

ही बुद्धि चोखट होण्याचे मार्ग सांगितले आहेत ते असें—

''विपरीत निश्चयेन नश्येदेतद्वयं क्रमात्''

वेदान्त, शास्त्र व गुरु यांच्या उपदेशावर विश्वास ठेवून असंभावनेच्या विरुद्ध निश्चय केला असतां क्रमाने दोन्ही प्रकारच्या असंभावना नाहीशा होतात.

अनाश्वासस्य मूलं तु विरुद्धतर्कचिंतनम्। तत्परित्यज्य सत्तर्कावर्तनस्य प्रसाधने ॥ ८७ ॥ ततः श्रद्धा समुदयादनाश्वासः प्रणश्यति ॥ ८८ ॥ बहुतेक संशय व विपर्यय अशा दोन्ही प्रकारच्या अविश्वासाचें मूळ कारण शास्त्रविरुद्ध तर्क करणें, हें आहे. म्हणून शास्त्रविरुद्ध तर्क करणे सोडून देऊन सत्तर्क म्हणजे नेहमी शास्त्रानुकूल तर्क करण्याने शास्त्रावर श्रद्धा उत्पन्न होते व त्यामुळे विपर्यय रूप व संशयरूप असा दोन्ही प्रकारचा अविश्वास दोष नाहीसा होतो, असें शास्त्र म्हणतें.

''कामादिवासनां तस्माज्जयेद्वैराग्य संपदा''॥ ६१ ॥ विषयासक्ति हा दोष वैराग्याने नाहीसा होतो. हे सर्व दोष नाहीसे झाले तरी जाड्यता जो दोष आहे तो नाहींसा करण्याकरितां ''तत्रात्मदेवतासेवामृते नान्यद्धि कारणम्'' परमेश्वर सेवेवांचून दुसरा उपायच नाही. जाड्यतादोष जोपर्यंत नाहीसा होत नाही. तोपर्यंत आत्मज्ञान होणें शक्य नाही-म्हणजे इतर दोषहि नाहीसे होत नाहीत. किंवा सर्व साधनसंपत्तिर्ममैव प्रणिधानतः। उपायाति च यो भक्त्या सर्वदा मात्रकैतवात्''॥ १००॥ (त्रि. र.) वर बुद्धींतील दोषांचें निराकारण करण्याकरितां जी सत्तर्क चिंतनादि साधनें सांगितलीं आहेत, ती सर्व साधनसंपत्ति एका भगवंताच्या दंभरहित निष्कपट नामस्मरणरूप व ध्यानरूप भक्तीने प्राप्त होते, असें त्रिपुरारहस्यांत सांगितलें आहे.

सारांश भक्तीने बुद्धींतील अविद्याजन्यदोष संपूर्ण नाहीसे होऊन जसें चित्त अत्यंत शुद्ध होते व पूर्ण परमेश्वर प्राप्ति होते. तशी कोणत्याहि साधनाने होत नाही.

''यथायथा परिमृज्यतेऽसौ मत्पुण्यगाथा श्रवणाभिधानैः तथातथा पश्यति वस्तु सूक्ष्मं चक्षुर्यथैवाञ्जनसंप्रयुक्तम्''॥ २६ ॥ (भाग. स्कं. ११-१४) ज्याप्रमाणे मातीच्या खड्यावर पाणी टाकून ती विरघळली असतां तिच्यांतील खडे आपोआप बाहेर पडतात व माती शुद्ध होते, त्याप्रमाणें भगवंताच्या नामस्मरण, कथाश्रवण, कीर्तनादिरूप भक्तीच्या योगाने, चित्त प्रेमळ होऊन आर्द्र झालें असतां, चित्तांतील संपूर्ण दोष आपोआप नाहीसे होतात आणि चित्त शुद्ध होऊन त्या चित्तांत अंजन लावलेल्या डोळ्याने जशी भूमिगत वस्तु दिसते, त्याप्रमाणे या बुद्धीलाहि सर्वान्तर्यामी परब्रह्माचा अनायासें साक्षात्कार होतो असें भागवतकारांनी म्हटलें असून नाथांनीहि ''सद्भावें करितां भगवद्भक्ति। भक्ति विरक्ति भगवत्प्राप्ति। तिन्ही एकेकाळीं होती। ऐशिया युक्ति जाणिजे राया''॥ ३१३॥ (ए. भा. अ. २) असें म्हटलें आहे. म्हणून नामस्मरणादिक भगवदुपासनेने सर्व दोषरहित झालेली बुद्धीच येथे ''चोखटें मानस'' या शब्दांनी घेतली आहे.

**क्षेत्र संन्यासी**—क्षेत्रसंन्यासी म्हणजे आमरण क्षेत्र न सोडून जाण्याचा संकल्प करणारा संन्यासी होय. भगवान म्हणतात ज्ञानभक्तीने ज्याचें चित्त अत्यंत शुद्ध झाले आहे अशा सत्पुरुषाचे चित्तांत, मी क्षेत्रसंन्यासी होऊन राहतो—म्हणजे सगुण स्वरूपाने मी त्यांच्या चित्तांत अखंड राहतो.

''मी सच्चिदानंद ब्रह्मस्वरूप आहे असा अनुभव येणे, हेंच भगवंताचें, चित्तांत क्षेत्रसंन्यासी होऊन राहणें होय असा कित्येक लोक त्याचा अर्थ करतात'' पण तो अर्थ बरोबर नाही. कारण भगवंताच्या सगुण स्वरूपाविषयींच हें सर्व प्रकरण चाललें असून ''मां'' म्हणून भगवंतांनी आपल्या सगुण स्वरूपाचा निर्देश केला आहे, म्हणून भगवान निर्गुण स्वरूपाने क्षेत्रसंन्यासी होऊन राहतो असा अर्थ करणें योग्य होत नाही.

''माया निवर्तक ज्ञान प्राप्ति। न करितां हरिभक्ति कदा नुपजे''॥ ६९॥ (ए. भा. अ. २) पुन: मी सच्चिदानंद ब्रह्मस्वरूप आहे असें दृढ जाणणे हें मायानिवर्तक ज्ञान होय, हें मायानिर्वतक ज्ञान सगुण भगवंताची भक्ति केल्याशिवाय कधीहि प्राप्त होत नाही, असें नाथ म्हणतात. ज्ञानानंतर हीच भक्ति अनन्य होऊन मी सच्चिदानंदरूप ब्रह्म आहे ही जाणीवहि नाहीशी होते व मग भक्ताच्या चित्तांत एक सगुण परमात्माच राहतो. म्हणून येथे वर सांगितल्याप्रमाणें क्षेत्रसंन्यासी हें विशेषण सगुण स्वरूपाला धरून दिलें आहे, असेंच म्हणावें लागतें.

''विसृजति हृदयं न यस्य........प्रणयरशनया धृतांघ्रिपद्म:'' (भाग. स्कं. ११-२-५५) भक्तांनी आपल्या प्रेमरज्जूनी भगवंताचे पाय धरून ठेवले असल्यामुळे भगवान भक्तांच्या हृदयांतून कधीहि जात नाही, असें भागवतकारांनी म्हटलें असून ''हें नाम प्रीतीवरी। हृदयी रिगाला श्रीहरी। तो निघो विसरे बाहेरी। भक्ता प्रीती करी कृपाळु''॥ ७७९॥ (ए. भा. अ. २) ''तेविं भक्ताचिया प्रेमप्रीती। हृदयी कोंडला श्रीपती'' नाथांनीहि असेंच म्हटलें आहे. आणि ''सगुण निर्गुण हरि पायीं'' सगुण निर्गुण हीं दोन्हीं रूपें सगुण परमेश्वराचे ठिकाणीं एकत्र असतात; म्हणून मी सगुण स्वरूपाने भक्तांच्या हृदयांत क्षेत्रसंन्यासी होऊन राहतों, असें भगवान म्हणतात असा अर्थ करणे योग्य होतें.

**जया निजेलियाते उपासी। वैराग्य गा**—भगवत्प्रेमाने त्यांना ''पांडुरंग ध्यानीं पांडुरंग मनीं। जागृतीं स्वप्नीं पांडुरंग'', ''विषयचि ज्यांचा झाला नारायण'' सर्व काळ व सर्व ठिकाणीं भगवत्स्वरूप दिसत असल्यामुळे विषयांचा विसर पडलेला असतो. त्यामुळे त्यांना कोणत्याहि अवस्थेंत वैराग्य सोडून राहत नाही असा भाव.

**जयांचिया आस्थेचिया सद्भावा। आंतु धर्म करी राणिवा। जयांचें मन ओलावा। विवेकासी॥ १८९॥**

**अर्थ**—ज्यांची भगवद्वचनावर इतकी उत्कट आस्था किंवा श्रद्धा असते की त्यांना अधर्माचरणाचा स्पर्शच होत नाही किंवा त्यांचें कोणतेंहि आचरण शास्त्रमर्यादा सोडून नसतें आणि ज्यांच्या मनांत अखंड विवेक जागृत असतो. ॥ १८९॥

**गूढार्थदीपिका—जयाचिया आस्थेचिया सद्भावा। आंतु धर्म करी राणिवा**—प्रेमाचा असा स्वभाव आहे की, तो प्रेम करणाऱ्याला ज्याच्यावर प्रेम करायचें त्याच्या सर्वस्वी स्वाधीन करतो. देहाचे प्रेमामुळे आपण सर्वस्वी देहाचे स्वाधीन होतो, असा सर्वांचा अनुभव आहे. त्याचप्रमाणे भगवद्भक्त भगवंताच्या प्रेमामुळे भगवंताच्या सर्वस्वीं स्वाधीन असतात. स्वाधीन होणें म्हणजे ज्याच्या स्वाधीन व्हावयाचें त्याची आज्ञा न मोडणें, भगवंताच्या स्वाधीन झालेले भक्त, भगवंताची आज्ञा मोडत नाहीत. भगवंताची आज्ञा हाच धर्म होय; म्हणून भक्तांचें चित्त नेहमी धर्मपरायण असतें व अधर्म त्यांच्या चित्ताला कधी शिवत नाही. ते सांगतील तें सर्व धर्मरूपच असतें.

**जयाचें मन ओलावा। विवेकासी**—भगवंताचें प्रेम सर्व विवेकाचें मूळ आहे. भगवंताचें प्रेम ज्या चित्तांत नाही, तें चित्त अविवेकसंपन्नच असतें; म्हणून भगवंताच्या प्रेमाने ओले झालेल्या भक्ताच्या मनाचा, विवेकाला ओलावा मिळतो, हें माऊलीचें म्हणणे यथार्थ आहे.

**जे ज्ञानगंगे नाहाले। पूर्णता जेऊनि धाले। जे शांतीसि झाले। पालव नवे॥ १९०॥**

**अर्थ**—ते अखंड ज्ञानगंगेमध्ये स्नान करीत असतात. पूर्ण ब्रह्मस्थितीचें भोजन करून ते तृप्त झालेले असतात

आणि असे ते महात्मे ब्रह्मशांतीला किंवा अत्यंत निर्वासन स्थितीला फुटलेली नवी कोंवळी पालवीच होय. ॥ १९० ॥

**गूढार्थदीपिका—जे ज्ञानगंगे नाहाले**—गंगेंत स्नान करणाऱ्या पुरुषाचा देह पवित्र होतो—म्हणजे त्या देहाने जीं कांही पातकें झालीं असतील, तीं नाहीशी होतात. पण देहाच्या ठिकाणचा अविद्याजन्य जडपणा व नाशिवंतपणा जात नाही आणि गंगेंत अखंड बुडी मारून राहतां येत नाही; कारण तसें केल्यास मरणाचा प्रसंग येतो.

पण भक्त हे अखंड आत्मज्ञानरूपी गंगेंतच राहत असल्यामुळे त्यांच्या पूर्वजन्मातील देहाने व मनाने केलेलीं संपूर्ण पापें भस्मसात होऊन, त्यांच्या वर्तमान देहाच्या ठिकाणचे जडविनाशी धर्म हेहि नाहिसे होतात. त्यांचा देह "यथैव मृण्मयः कुंभस्तद्वद्देहोऽपि चिन्मयः" (अपरो. ६८) पूर्ण ज्ञानगंगास्वरूपच होऊन राहतो. "उपासनया ये मुक्तिं गतास्तेषां साकारो मुक्तसाकारः। तस्याखण्डज्ञानेनाविर्भावो भवति। सोऽपि शाश्वतः॥" (त्रिमहानारायण उपनिषद्) असे ते अमर होतात.

**पूर्णता जेऊनि धाले**—पूर्णता म्हणजे परब्रह्माच्या निर्गुण व सगुण अशा दोन्ही स्वरूपाशीं ऐक्य होणे होय. ही पूर्णता भक्तांनाच प्राप्त होते. त्यांना "धाले" म्हणजे कांहीच प्राप्त करून घ्यावयाचें नसतें, असे ते पूर्ण सुखरूप असतात.

**ते शांतीसि झाले। पालव नवे**—"तरी गिळोनि ज्ञेयातें। ज्ञाता ज्ञानही माघौतें। हारपे निरुतें। ते शांति पैं गा"॥ १३७ ॥ (ज्ञाने. अ. १६) अशी श्रीज्ञानेश्वर माऊलींनी शांतीची व्याख्या केली आहे. ज्या स्थितींत ज्ञाता, ज्ञान, ज्ञेय ही त्रिपुटीच राहत नाही, त्या स्थितीला शांती म्हणतात.

येथें ज्ञाता म्हणजे ज्ञानी, ज्ञान म्हणजे ब्रह्मज्ञान व ज्ञेय म्हणजे ब्रह्म असे अर्थ, ब्रह्मज्ञानांत त्रिपुटी राहत नसल्यामुळें घेतां येत नाहीत; म्हणून येथील ज्ञाताज्ञानज्ञेयत्रिपुटी ही, ज्ञाता म्हणजे विषयाला जाणणारा, ज्ञेय म्हणजे विषय व ज्ञान म्हणजे विषयाचें ज्ञान अशीच घेतली पाहिजे. अर्थात् शांति म्हणजे चित्ताची निःशेष निर्वासन स्थिति होय. अशी चित्ताची निर्वासन स्थिति झालीं असतां "ब्रह्मरस गोडी तयासी फावली। वासना निमाली सकळ ज्याची" (तु. गा. १५२९) "तयातेंचि गिवसित। तें ज्ञान पावे निश्चित। जयामाजि अचुंबित। शांति असे", "ते ज्ञान हृदयीं प्रतिष्ठे। आणि शांतीचा अंकुर फुटे॥" (ज्ञाने. अ. ४-१८९-१९०) चित्त परब्रह्मस्वरूपाचे ठिकाणीं अखंड स्थिर राहतें व ब्रह्मानंद मिळतो. म्हणून भक्तीने ब्रह्मानंदरसभरित झालेल्या भक्ताला श्रीज्ञानेश्वर माऊलींनी चित्ताच्या निर्वासनरूप शांतस्थितीला निघालेले कोंवळे पल्लव होत, असें म्हटलें आहे.

**जे परिणामा निघाले कोंभ। जे धैर्यमंडपाचे स्तंभ। जे आनंदसमुद्रीं कुंभ। चुबकळोनि भरिले॥ १९१ ॥**

**अर्थ**—ते ब्रह्मस्थितीला निघालेले कोंभ होत, ते धैर्यमंडपाचे खांब होत व ब्रह्मानंदसमुद्रांत बुडवून भरलेले घट होत. ॥ १९१ ॥

**गूढार्थदीपिका—परिणामा निघाले कोंभ**-परिणाम म्हणजे शेवट. सर्व दृश्य वस्तूंचा निरास केला असतां शेवटीं परब्रह्मच राहतें. संत हे असे पूर्णब्रह्मस्थितीचे कोंभ आहेत—म्हणजे देहासह पूर्ण ब्रह्मस्वरूप आहेत असा भाव. "ब्रह्मभूत काया होतसे कीर्तनीं" भक्तीने त्यांचें देह ब्रह्मस्वरूप होतात.

यांत पल्लव, कोंभ, स्तंभ, कुंभ इत्यादि मर्यादाबोधक किंवा व्यक्तिबोधक शब्दांनी त्यांच्या देहाचाच उल्लेख केला आहे.

**धैर्य मंडपाचे स्तंभ**—आपल्याहून निराळ्या वस्तुपासून देहाच्या नाशाची भीति असते व असा प्रसंग आला असतां धैर्य धरावें लागतें. पण ही नाशाची भीति "द्वितीयाद्वैभयंभवति" (बृ. उ. १-४-२) आपल्याहून निराळे पदार्थ आहेत ही द्वैतभावना जोपर्यंत असते तोपर्यंत ती भीति असते व धैर्य धरावें लागतें.

आत्मज्ञानाने अद्वैतरूप झाल्यानंतरहि आत्मज्ञान प्राप्त होणाऱ्या साक्षीस्थितीचा, कशाचा विरोध नसल्यामुळे, जगताचा भास व त्यापासून होणाऱ्या भीति इत्यादि वृत्तीचा भास प्रारब्धबलाने राहूं शकतो. पण "मन्येऽकुतश्चिद्भयमच्युतस्य पादाम्बुजोपासनमत्र नित्यम्। उद्विग्नबुद्धेरसदात्मभावाद्विश्वासत्मना यत्र निवर्तते भीः" (भाग. स्कं. ११-२-३३)

भगवंताच्या चरणाचें सेवन हें संपूर्ण भयाचे नि:शेष नाश करणारें असतें व देह, इंद्रियें, मन, बुद्धि व त्यांचे व्यापार सर्व भगवंतालाच समर्पण होत असतात; म्हणून भगवद्भक्तांना केव्हाहि भीतीची शंकाच येत नाही. ते अखंड निर्भय असतात व जेथे जेथे धैर्याचा प्रसंग असेल ''त्रिविध मुख्य आघवे। उपद्रवाचे मेळावे। वरिपडिलिया नव्हे। वांकडा जो'' (ज्ञाने. अ. १३-३४४) त्या प्रसंगाला न भितां, त्या संपूर्ण धैर्यमंडपाचें स्तंभ म्हणजे आधार म्हणून राहतात. ''तुका म्हणे आम्हां भय कासयाचें। मारूं ब्रह्मयाचे तोंडावरी.''

**आनंदसमुद्रीं कुंभ चुबुकळोनि भरले**—सुखाची जाणीव होंणें याला भोक्तृत्व म्हणतात. ही जाणीव उत्पन्न होण्यापूर्वी केवळ सुखरूप स्थिति असते. या स्थितीत कांही जाणले जात नाही. यालाच ब्रह्मसुख म्हणतात. ''तें वेगळेपणें भोगिजे। जैसें पक्षियें फळ चुंबिजे। तैसें नव्हे विसरिजे। भोगितेपणहि''॥ १३१ ॥ (ज्ञाने. अ. ५) असें माऊलींनीच ब्रह्मसुखाचें लक्षण केलें आहे. असें हें ब्रह्मसुख, जीवाला निर्विकल्पसमाधींत मिळतें.

प्रेमाने जाणीव नाहीशी होते, म्हणून भक्त जाणीवरहित अशा अखंड सुखांत असतो. ''प्रेमाची जाति ऐसी। आठवो नेदी आठवणेसी'' ६८७ (ए. भा. अ. ११) म्हणून भक्त सुखाचा अनुभव घेत नाही. अखंड सुखस्वरूपच असतो.

**जयां भक्तीची येतुली प्राप्ती। जे कैवल्यातें परौतें सर म्हणती। जयांचिये लीलेमाजीं नीति। जियाली दिसे॥ १९२॥**

**अर्थ**—त्यांना सगुण भगवंताचें इतके प्रेम लागलेलें असतें. की मोक्षसुखहि त्यांना तुच्छ वाटतें. त्यांच्या प्रयोजनरहित प्रवृत्तीमध्ये देखील धर्म जीवंत राहतो—म्हणजे त्यांचें सहज वागणें देखील धर्माला सोडून नसतें. ॥ १९२ ॥

**गूढार्थदीपिका—जया भक्तीची येतुली प्राप्ती। जे कैवल्यातें परतें सर म्हणती**—पूर्ण पुरुषाला भगवंताच्या सगुणस्वरूपाचा ठिकाणीं इतकें प्रेम असतें की त्या प्रेमापुढें त्यांना निर्गुण स्वरूपाच्या ठिकाणीं ज्ञानाने प्राप्त होणारी कैवल्यस्थिति—म्हणजे माझ्या ज्ञानस्वरूपावांचून दुसरें यत्किंचित्‌हि कांही नाही, अशी अद्वैताची जाणीव-तुच्छ वाटते. ''इतर मी सांगूं काई। मोक्षसुखाच्या ठायीं। त्या सुखाची गोडी नाहीं। धन्य पाही हरिभक्त॥२०३॥ (ए. भा. अ. १४) असा त्यांचा स्वत:चा अनुभव असतो ''ज्ञान सांगतां अति सुगम। भक्तिरहस्य गुह्य परम। अकृत्रिम उपजे प्रेम। ऐसें हें वर्म लाविल्या न लगे॥२४२॥'' (ए. भा. अ. १४) ''सगुण सुरूप समर्थ भर्ता। निघोन गेलियां तत्त्वतां। त्यालागीं तळमळी जैसी कांता॥ तैशी कळवळतां जैं उठी। त्या नांव गा माझी भक्ति''॥२४८॥ (ए. भा. अ. १४) आत्मज्ञानरूप भक्तिप्रेमाच्या दृष्टीने ब्रह्मज्ञानप्राप्ति सोपी आहे. साधनचतुष्टयसंपत्तीने ज्ञान प्राप्त होऊं शकतें, पण भक्ति म्हणजे सगुणभगवंताकडे प्रेम लावण्याचा प्रयत्न नव्हे. आपल्या आत्मस्वरूपाचे ठिकाणीं सर्व जीवांना जसें साहजिक प्रेम आहे तसे साहजिक प्रेम रामकृष्णादिकांचे ठिकाणीं लागणें ही भक्ति होय. हेंच खरें भक्तीचें स्वरूप आहे. हें लावण्याने लागत नाही. असें प्रेम ''मुख्यतस्तु महत्कृपयैव'' संताच्या कृपेने किंवा भगवंताच्या कृपेनेच प्राप्त होतें.

**जयाचिये लीलेमाजि नीती। जियाली दिसे**—लीला म्हणजे क्रीडाविहारादिकांचे ठिकाणीं असलेली निष्ठायोजन किंवा सहज प्रवृत्ति होय.

ज्ञानभक्ति प्राप्त होण्याकरिता धर्मरूप भगवदाज्ञेचें जें निष्ठेने पालन केलें जातें तेंच आंगवळणी पडून ज्ञानभक्ति प्राप्त झाल्यावरहि तें भक्ताच्या ठिकाणीं निष्प्रयोजन किंवा सहजच चालूं राहतें. अशा त्यांच्या लीलाप्रवृत्तींत ''तुका म्हणे आतां। उरलो उपकारापुरता'' इतर अज्ञानी जीवांना सर्वच कल्याणाचा मार्ग सांपडतो. म्हणून त्यांची लीलाप्रवृत्ति नीतीला किंवा धर्माला जीवदान देणारी होते ''सहज बोलणें हित उपदेश। करूनि सायास शिकविती''

**जे आघवांचि करणीं। लेइले शांतीचीं लेणीं। जयांचें चित्त गवसणी। व्यापका मज॥ १९३॥**

**अर्थ**—त्यांच्या इंद्रियांच्या होणाऱ्या व्यापारांतून, विषयभोगाची इच्छा नि:शेष नाहीशी झालेली असते, म्हणूनच मी व्यापक आहे, तरी त्यांचे चित्त मला संपूर्ण सांठवूं शकते. ॥ १९३ ॥

**गूढार्थदीपिका—जे आघवाचि करणीं। लेइले शांतीचीं लेणीं**—''इंद्रियें कोंडितां न कोंडिती। विषय सांडितां

न सांडिती। पुढतपुढती बाधूं येती। यालागीं भक्ति द्योतिली वेदें''॥ २९३॥ (ए. भा. अ. २) इंद्रियांना विषयापासून कितीकहि आवरले तरी तीं आवरलीं जात नाहीत व मन विषयरहित होत नाही; पण ''भक्त भगवंतीं अर्पिती। तेणें ते होती नित्यमुक्त''॥ २९६॥ (ए. भा. अ. २) तींच सगुण भगवंतांच्या भक्तींत लांविलीं असतां ''विषयीं विसर पडिला नि:शेष। अंगीं ब्रह्मरस ठसावला'' भक्तीने अंत:करणांत ब्रह्मसुख सांठविलें जाऊन इंद्रियांना विषयांचा नि:शेष विसर पडतो. असा विषयांचा विसर पडणें हेंच इंद्रियांना शांतीचें लेणें आहे.

**जयाचें चित्त गवसणी। व्यापका मज**—सर्व नामरूपांचा संबंध घेंऊन परमेश्वराला व्यापक व विवक्षित नामरूपाचा संबंध घेऊन त्याला एकदेशीय म्हटले जाते. पण हीं दोन्हीं रूपें परस्परांहून भिन्न नसतात. सर्वनामरूपाने व्यापक असलेलें रूपच भक्ताच्या नि:सीमप्रेमाने त्याच्या हृदयांत एकदेशीय होऊन संपूर्ण सांठविलें जातें. ''दीपकळिका हातीं चढे। तैं घरभरीं प्रकाश सांपडे। माझी मूर्ति जैं ध्यानीं जडे। तैं चैतन्य आतुडे अवघेंचि''॥१४९९॥ (ए. भा. अ. ११) म्हणूनच एकदेशीय सगुणस्वरूपाच्या साक्षात्काराने सर्व व्यापक अनुभव येतो असें नाथांनी म्हटलें आहे.

**ऐसे जे महानुभाव। जे दैविये प्रकृतीचें दैव। जे जाणोनियां सर्व। स्वरूप माझें॥ १९४॥**

**अर्थ**—अशा प्रकारचे जे अनुभवी महात्मे असतात ते दैवी प्रकृतींचे साक्षात् दैवी किंवा भाग्य होय. ते माझें सर्व म्हणजे सगुण निर्गुण स्वरूप जाणून.॥ १९४॥

**मग वाढतेनि प्रेमें। मातें भजती जे महात्मे। परि दुजेपण मनोधर्में। शिवतलें नाहीं॥ १९५॥**

**अर्थ**—नंतर वाढत्या प्रेमाने माझी भक्ति करतात, पण द्वैतभावना त्यांच्या मनाला शिवत नाही.॥ १९५॥

**गूढार्थदीपिका—वाढतेनि प्रेमें**—जीव जेवढे काही करतो ते आपल्या सुखाकरिताच करतो ''**आत्मानस्तु कामाय सर्वं प्रियं भवति**'' (बृ. उ. ४-५-६) दुसऱ्यावर तो जें प्रेम करतो तें देखील आपल्या सुखाकरितांच करतो, म्हणून आपलें आपल्याला अत्यंत प्रेम आहे, असें श्रुतीने सांगितलें आहे. आत्मप्रेम करायचें म्हणून करीत नसतो व प्रेम करतांना मी प्रेम करतों अशी जाणीवहि होत नाही. असे हें आपलें आपल्याला सहज अकृत्रिम प्रेम आहे, अशा या अकृत्रिम प्रेमाला माऊलींनी ''वाढतें प्रेम'' म्हटलें आहे.

**परि दुजेपण मनोधर्में। शिवतलें नाही**—या प्रेमांत भक्त व भगवान असें द्वैत दिसत असलें, तरीं द्वैतभेदाचा चित्ताला स्पर्श होत नाही. कारण ''द्वैतदशेचे आंगण। अद्वैत ओळगे आपण। भेद तंव तंव दूण। अभेदासी'' (अमृ. प्र. ९-२८) भक्तिप्रेमांत नुसता द्वैताचा भासच असतो; पण खरोखर अद्वैतच असतें, असें माऊलींनी म्हटलें आहे.

**ऐसें मीच होऊनि पांडवा। करिती माझी सेवा। परि नवलावो तो सांगावा। असे आइक॥ १९६॥**

**अर्थ**—अर्जुना! अशा रीतीने ते माझ्याशीं ऐक्य पावून माझ्या सगुण स्वरूपाची सेवा करतात. ते सेवेंचें कौतुक सांगण्याजोगे आहे, तें ऐक.॥ १९६॥

**गूढार्थदीपिका**—समुद्रास मिळालेली नदी समुद्रांत मिळतच राहते, त्याप्रमाणे ''शिवो भूत्वा शिवं यजेत्'' भक्तहि परमेश्वराशी ज्ञानाने ऐक्य पावून सगुणपरमेश्वराची स्वाभाविक प्रेमभक्ति करीतच राहतो.

**अवतरणिका—मागें तिसऱ्या अध्यायांत परमेश्वरप्राप्तीचा मार्ग म्हणून जो मर्यादित कर्मयोग सांगितला आहे, त्याचें वर्णन केलें गेलेंच आहे. त्या कर्मयोगाचें फळ म्हणजे क्रमाने परमेश्वराशीं ऐक्य पावणें हें आहे, महाभारतांतील नारायणीय धर्मांतील ३४४ व्या अध्यायांत त्याचें वर्णन आलें आहे तें असें—**

**निष्काम चित्ताने परमेश्वरप्रीत्यर्थ केवळ देवपित्र्यकर्माचे द्वारा इंद्रादिकदेवतांचें व पितरांचें यजन करणारा कर्मयोगी, पुण्यपापरहित शुद्धचित्त असा होऊन आदित्यांत मिळतो. तेथून क्रमाने अनिरुद्ध. प्रद्युम्न यांच्यात मिळून पुढे सांख्ययोगी म्हणजे ज्ञानसंपन्न होतो व शेवटीं त्रिगुणरहित होऊन निर्गुण क्षेत्रज्ञ परमात्म्यांत मिळतो. अशारीतीने हा कर्मयोग ज्ञानप्राप्तींत समाप्त होतो, असे सांगितलें आहे. पण**

**''भक्त्या संपूजयन्त्याशु गतिं चैषां ददाति सः। ये तु तद्भाविता लोके ह्येकान्तित्वं समास्थिताः॥**

एतदभ्यधिकं तेषां यत् ते तं प्रविशन्त्युतं॥ ४४॥ ( महाभारत शां. प. अ. ३३४ )

शास्त्रांत सांगितल्याप्रमाणें रामकृष्णादिकांना कारणब्रह्म म्हणजे पूर्णब्रह्म जाणून त्यांची जे एकनिष्ठ प्रेमभक्ति करतात त्याने क्रमाने मुक्त पावणाऱ्या कर्मयोग्यापेक्षां विशेष गति प्राप्त होते, असें सांगितलें आहे. ती विशेष गति म्हणजे "चतुर्थ्यां चैव ते गत्यां गच्छन्ति पुरुषोत्तमम्। एकान्तिनस्तु पुरुषा गच्छन्ति परम पदम्॥ ३॥ ( म. भा. शां. प. अ. ३४८ )", "नूनं एकान्तधर्मोऽयं श्रेष्ठो नारायणप्रियः। अगत्वा गतयस्तिस्त्रो यद्गच्छत्यव्ययं हरिम्"॥ ४॥ या श्लोकांत सांगितल्याप्रमाणे एकान्तभक्त, क्रमाने मुक्तीला न जातां, साक्षान्मुक्तीला जातो.

म्हणूनच "सम्मितः सामवेदेन पुरैवादि युगे कृतः। धार्यते स्वयमीशेन राजन् नारायणेन च"॥ १०॥ या श्लोकांत सामवेदांतील 'तत्त्वमसि' महावाक्याच्या विचाराने जसा ज्ञानी साक्षात्मुक्तीला जातो, तसाच एकान्तभक्तहि साक्षात्मुक्तीला जातो. म्हणजे ज्ञानमार्गाच्या बरोबरीचा एकान्तधर्म आहे, असें महाभारतकारांनी म्हटलें आहे.

गीतेंतहि हेंच तत्व मान्य केलें असून भगवंतांनी अर्जुनाला या एकान्तभक्तिधर्माचाच कटाक्षाने उपदेश केला आहे.

एकान्तधर्माचे, ( १ ) भगवंताचें सतत नामस्मरण व कीर्तन करणें ( २ ) सर्वाभूतीं भगवद्भाव ठेवून नमन करणें ( ३ ) सगुण भगवंताचे ठिकाणीं समाधि लावणें व ( ४ ) सर्व लौकिक व अलौकिक कर्म भगवंताला समर्पण करणें, असे हे जे चार प्रकार कर्मयोगापेक्षा किंवा ज्ञानयोगापेक्षा विशेष आहेत ते आतां भगवान पुढील श्लोकांतून सांगत आहेत.

**सततं कीर्तयन्तो मां यतन्तश्च दृढव्रताः। नमस्यन्तश्च मां भक्त्या नित्ययुक्ता उपासते॥ १४॥**

**अर्थ**—माझे एकान्तभक्त अहोरात्र माझें नामस्मरण करतात व माझ्या लीला गातात. दृढनिश्चयपूर्वक शमदमादि साधनाने इंद्रियनिग्रह व मनोनिग्रह करतात आणि प्रेमाने सर्वत्र मला अखंड नमस्कार करतात. याप्रमाणे माझें ठिकाणीं अखंड चित्तवृत्ति ठेवून माझी उपासना करतात. ॥ १४॥

**गूढार्थदीपिका**—या एकान्तभक्तीमध्ये परमेश्वराचें सतत नामस्मरण व कीर्तन केलें जातें हा पहिला विशेष भगवान सांगत आहेत.

**तरी कीर्तनाचेनि नटनाचें। नाशिले व्यवसाय प्रायश्चित्तांचे। जे नामचि नाहीं पापाचें। ऐसें केलें॥ १९७॥**

**अर्थ**—भगवंताचें अखंड नामस्मरण, कथाश्रवण, कीर्तन व भगवंताच्या लीलांचें अनुकरण यांच्या योगाने पापांचें नांवच नाहीसे केल्यामुळे सर्व कर्मरूप प्रायश्चित्तांचे पापनाशनादि व्यापार बंद पाडले. ॥१९७॥

**गूढार्थदीपिका**—मनुष्याकडून जीं पापकर्मे होतात त्या पापकर्मांनी मनुष्याला इहपरलोकांत दुःख प्राप्त होतें व त्या पापानेच भगवत्प्राप्तींतहि प्रतिबंध वाढत जातो. पापामुळेंच मनुष्य अधिक देहात्मवादी होत जातो. विषयवासना वाढतात. मनुष्याचें मन अत्यंत चंचल होतें. तें स्थिर होत नाही व बुद्धिमांद्यहि प्राप्त होतें.

मनुष्याला मुळींच दुःख नको असतें. त्याला अखंड सुखाचीच इच्छा असते. तें अखंड सुख नाशिवंत विषयांत मिळूं शकत नाही. एक परमेश्वरच अखंड सुखस्वरूप आहे. अर्थात् सर्व दुःख नाहीसें होऊन परमेश्वर प्राप्ति व्हावी हीच प्रत्येक मनुष्याची अंतःकरणांतील इच्छा असते; पण त्या दिशेने प्रयत्न मात्र महात्मेच करितात.

मनुष्याच्या अनंत जन्मांतील अनंत पातकें असतात व त्या पापाचरणामुळें पापप्रवृत्तिहि दृढ झालेली असते. तितकीं पातकें कर्मरूप प्रायश्चित्ताने नाहीशी होत नाहीत व करतां येणेंहि शक्य नाही.

भगवन्नामस्मरणाने भगवन्नामस्मरणापूर्वीचीं सर्व पातकें नाहीशी होतात असा "नाशिले व्यवसाय प्रायश्चित्ताचें" या चरणाचा अर्थ आहे.

किंबहुना "जेवढी नामाची शक्ति। तेवढें पाप नाही त्रिजगतीं" (ए. भा. अ. २-५५१) "नाम्नोऽस्ति यावती शक्तिः पापनिर्बहरणे हरेः। तावत्कर्तुं न शक्नोति पातकं पातकीजनः" भगवन्नामस्मरणाने नाहीसें होऊं शकत नाही असें पातकच मनुष्य करूं शकत नाही, असा नामाचा महिमा सांगितला आहे. पाप हें तीन प्रकारचें आहे. भगवंताला

विसरणें हें अविद्यारूप मुख्य पाप असून त्यामुळें देहात्मवादी होणें हें दुसरें पाप आहे "बळें देह मी म्हणतां। कोटी ब्रह्महत्या माथां" (तु. गा.) व भगवंताच्या आज्ञेच्या विरुद्ध वागणें हे तिसरें पाप होय.

ज्याप्रमाणे पायांत जोडा न घालतां किंवा पाय अग्नीने भाजणार नाही अशा औषधि, मणि, मंत्र यांचा उपयोग न करतां अग्नीवर पाय पडल्याबरोबर अग्नीने पाय तात्काळ भाजला जातो, त्याप्रमाणे नामस्मरणाने मागील सर्व पापें जळून भस्म होतात, असें एक भगवन्नामच समर्थ आहे. हें नामस्मरण सारखें करीत राहिल्यास पापप्रवृत्ति नष्ट होऊन पापाचा नामधारकाला स्पर्शच होत नाही. अशा नामधारकाला कर्मरूप प्रायश्चित्ताचा उपयोग करण्याचें कामच पडत नाही. त्याच्या दृष्टीने सर्वकर्मरूप प्रायश्चित्तें निरुपयोगी होऊन पडलीं राहतात.

येथून संपूर्ण नाममाहात्म्य जें सांगितलें आहे तें अखंड नामस्मरण करणाऱ्या निरपराध नामधारकाविषयीं सांगितले आहे असें समजावें.

पाय ठेवल्याबरोबर तात्काळ पाय जाळणें हा अग्नीचा स्वभाव असला तरी ज्याप्रमाणे, जोडा, औषधि इत्यादि कांही पदार्थ असे आहेत की ते अग्नीच्या तात्काळ जाळण्याला प्रतिबंध करतात त्याप्रमाणे नाम घेतल्याबरोबर तात्काळ पाप जाळणे हा हरिनामाग्नीचा स्वभाव असला तरी कांही पापें अशीं आहेत की तीं हरिनामाने तात्काळ जळत नाहीत. तीं नाहीशी होण्यास कांही काळ लागतो. अशा पापांना नामापराध ही संज्ञा आहे.

निरपराध नामधारक व सापराध नामधारक असा दोन प्रकारचा नामधारक असतो.

नामाचें माहात्म्य समजल्यानंतर, नामाचे जे अपराध सांगितले आहेत. ते न होऊं देतां, नामस्मरण करणारा निरपराध नामधारक होय. त्या अखंड नामस्मरण करणाऱ्या निरपराध नामधारकाला या ओव्यांतून सांगितलेलें भगवन्नामस्मरणाचें पूर्ण फल शीघ्र प्राप्त होतें. नामाचे अपराध करून नामस्मरण केलें असतां नामस्मरण सापराध होतें, व जें न केलें असतां नामस्मरण निरपराध होते ते खालीलप्रमाणे आहेत.

सन्निंदाऽसति नामवैभवकथा श्रीशेषयोर्भेदधीः। अश्रद्धा श्रुतिशास्त्रदेशिकगिरां नाम्न्यर्थवादभ्रमः॥

नामास्तीति निषिद्धवृत्ति विहितत्यागो हि धर्मान्तरैः। साम्यं नाम्नि जपे शिवस्य च हरेर्नामापराधा दश॥ (पद्मपुराण)

(१) **सन्निंदा**—म्हणजे संताची निंदा. सगुण भगवंतावर व भगवन्नामस्मरणावर ज्यांची श्रद्धा किंवा प्रेम नाही असे अत्यंत धार्मिक असले, तरी त्यांची "विप्राद्द्विषड्गुणयुतादरविंदनाभपादारविंद विमुखाच्छ्वपचं वरिष्ठम्। मन्ये तदर्पितमनोवचनेहितार्थप्राण पुनाति सकुलं न तु भूरिमानः"॥ १०॥ (भाग. स्कं. ७-९) इत्यादि श्लोकांत शास्त्रांनीच निंदा केली असल्यामुळे तेथे अशा पुरुषांची निंदा म्हणजे सन्निदा मानली गेली नाही, तर भगवन्नामावर अत्यंत श्रद्धा ठेवून अखंड निरपराध नामस्मरण करणाऱ्या भक्तांची निंदा ती सन्निदा येथे अभिप्रेत आहे. अशा नामधारकाची निंदा करणें हा नामापराध होतो. "संतनिंदा ज्याचे घरीं। नव्हे घर ते यमपुरी" "संत निंदा आवडे ज्यासी। तो जिताचि नर्कवासी" (तु. गा. २७९३)

(२) **असति नामवैभवकथा**—म्हणजे दुष्ट पुरुषाला नामाचा महिमा सांगणें.

येथे दुष्ट म्हणजे निषिद्धाचरण करून भगवंताचें नामस्मरण न करणारा व सन्मार्गावर येऊं न इच्छिणारा पुरुष होय.

(३) **श्रीशेषयोर्भेदधी**—म्हणजे शिव व विष्णु यांच्यांत भेद पाहणे.

(४) **अश्रद्धाश्रुतिगिराम्**—म्हणजे वेदवचनावर अविश्वास. वेदांत नित्यनैमित्तिककर्माचे महत्व सांगितलें आहे; पण त्या सर्वापेक्षा भगवन्नामस्मरणाचें महत्व अधिक सांगितलें आहे "**मर्ता अमर्तस्य ते भूरि नाम मनामहे। विप्रासो जातवेदसः**" (ऋग्वेद मं. ८-व. ३५ अ. २-मु. ११) आम्ही मनुष्य जन्ममरणरहित अशा परमेश्वराचे नांव श्रेष्ठ मानतों असे ऋग्वेदांतहि म्हटलें आहे. नाथांनीहि "ज्याची श्रद्धा कर्मावरी। तोचि कर्माचा अधिकारी। ज्याची श्रद्धा श्रीधरीं। तो नव्हे अधिकारी कर्माचा॥"॥ १०८७॥ (ए. भा. अ. ११) या ओवींत कर्मप्रतिपादक व

नाममाहात्म्यप्रतिपादक वेदवचनाची अशी व्यवस्था लाविली आहे; म्हणून नाममाहात्म्यवेदवचनावर अविश्वास करणे हा नामाचा अपराध होतो.

(५) **अश्रद्धाशास्त्रगिराम्**—म्हणजे शास्त्रवचनावर अविश्वास करणे. शास्त्र म्हणजे स्मृति, गीता, भागवत, पुराणें, भारत इत्यादि. कर्मप्रतिपादक स्मृतींच्या आग्रहाने, नाममाहात्म्याचें प्रतिपादन करणाऱ्या गीता, स्मृति, भागवत इत्यादि शास्त्रवचनावर अविश्वास करणें हा नामापराध होतो.

(६) **अश्रद्धा देशिकगिराम्**—म्हणजे गुरुवचनावर अविश्वास हा महत् अपराध आहे. येथे गुरु या शब्दाने भगवंताच्या स्वरूपाचें पूर्ण ज्ञान असून त्याचें अत्यंत आवडीने नामस्मरण करणारा भक्त घेतला पाहिजे. "जो शब्दज्ञानें पारंगतु। ब्रह्मानंदे सदा डुल्लतु। शिष्य प्रबोधनीं समर्थु। यथोचितु निजभावे"॥ २९८॥ (ए. भा. अ. ३) असें नाथांनी श्रीगुरुचें लक्षण केलें आहे.

(७) **नाम्न्यर्थवादभ्रमः**—भगवंताचे नाममाहात्म्य अर्थवादरूप आहे म्हणजे केवळ तें स्तुतिरूप आहे, खरे नाही असा भ्रम होणें हाहि अपराध आहे. "**अर्थवादं हरेर्नाम्नि संभावयति यो नरः। स पापिष्ठो मनुष्याणां नरके पतति स्फुटम्**" (कात्यायन संहिता) नामाचें माहात्म्य अर्थवादरूप आहे असें जो म्हणणारा आहे तो सर्वांत अत्यंत पापी होय. त्याला नरकाची प्राप्ति होते, असे शास्त्रवचन आहे. "नामें तरला नाहीं कोण। ऐसा द्यावा निवडोन" "नामरूपा नाही मेळ। अवघा वाचेचा गोंधळ" अशी संतांची परस्पर विरुद्ध वचनें आहेत, म्हणून कित्येक लोक नामाचें माहात्म्य अर्थवादरूप आहे, असें म्हणतात; परंतु अशा वचनांनी सापराधनामधारकापेक्षा निरपराध नामधारकाची श्रेष्ठता सांगितली आहे, तर कोठें सगुण परमेश्वराचें भक्तिप्रेम प्रगट होण्याकरितां नामस्मरणाबरोबर परमेश्वराच्या रूपाचें ध्यान होईल अशा एकाग्र चित्ताने नामस्मरण केलें पाहिजे हे सांगितलें आहे.

(८) **नामास्तौति निषिद्धवृत्तिः**—म्हणजे नामाच्या बळावर निषिद्धाचरण करणें. हाहि एक अपराध आहे. पण "देव जोडें तरी करावा अधर्म" (तु. गा.) "ईश्वरार्थधिया पापान्यऽपि सुव्रताः। भवन्ति पूतान्यत्यन्तसत्यमेव न संशयः" (सू. सं.) अशी संतांची व शास्त्राची प्रमाणवचनें असून भगवंताप्रीत्यर्थ व संताप्रीत्यर्थ चौर्यादि निषिद्धकर्मे करून पुरुष उद्धरल्याचीं उदाहरणें असल्यामुळे, केवळ परमेश्वरासाठीच केलेलें निषिद्धाचरण नामापराध होत नाही.

अर्थात् भगवत्प्रीत्यर्थ नसलेलें व आपली स्वैर विषयवासना तृप्त करण्याकरिता केलेलें निषिद्धाचरणच नामापराध होतो.

(९) **विहितत्यागो धर्मान्तरैः**—म्हणजे दुसऱ्याच्या धर्माचें आचरण करून आपल्या धर्माचा त्याग करणें.

आपल्या विहित आचरणाने परमेश्वराचें पूजन करावें असा भागवतधर्मात विधि असल्यामुळे आपल्या विहिताचरणाचा त्याग करून दुसऱ्या धर्माचें आचरण करणें हाहि एक नामापराध आहे. पण कर्मकालीं भगवत्कथा श्रवण करीत असतां अथवा स्वतः कीर्तन करीत असतां किंवा नामस्मरण करीत असतां कर्माचा लोप झाला तर नामापराध होत नाही. कारण "मत्कर्म कुर्वतां पुंसां कर्मलोपो भवेद्यदि तत्कर्म तेषां कुर्वन्ति तिस्रः कोट्यो महर्षयः"॥ ९॥ (भाग. स्कं. ११-२०) असें भागवतांत स्पष्ट म्हटलें आहे. पण एखादे वेळीं होत असलेल्या नामस्मरणाच्या बळावर आपल्याला विहित असलेला धर्म सोडून, आपल्याला विहित नसलेल्या धर्माचें आचरण करणें हा नामापराध आहे.

(१०) **साम्यं नाम्नि शिवस्य च हरेः**—म्हणजे शिव-विष्णु यांच्या नामाशीं इतर इंद्रादि देवतांच्या नामांचें साम्य पाहणें. हा नामापराध होय; पण राधाकृष्ण, विठ्ठल-रुक्मिणी, उमाशिव, सद्गुरु-रामकृष्ण या नामांचें साम्य मानण्यांत नामापराध होत नाही, तर इंद्रादिक जीव कोटींत असल्यामुळे त्यांचीं नामें शिवाच्या नामाप्रमाणेच समान समजणें हा नामापराध होतो, असे हे नामापराध नामस्मरणाने तात्काळ नाहीसे होत नसलें तरीं ते अखंड नामस्मरणानेच नाहीसे होतात असे पुढील श्लोकावरून स्पष्ट आहे.

"नामापराधयुक्तानां नामान्येव हरंत्यघम्। अविश्रांतिप्रयुक्तानि तान्येवार्थकराणि यत्"॥ २१॥ (प. पु. ब्रं. खं. अ. २५)

म्हणून भगवत्प्रेमाने अखंड नामस्मरण करणाऱ्यांना दुसऱ्या कर्मरूप प्रायश्चित्ताची आवश्यकता नाही, असें पद्मपुराणांत सांगितलें आहे.

"कीर्तनाचेनि नटनाचें" या चरणाने अविश्रांत नामस्मरण करावें असें सांगितलें आहे व "नांवचि नाही पापाचें" या चरणाने अखंड नामस्मरण करणाऱ्याची पापप्रवृत्ति नाहीशी होते, असें सांगितलें आहे.

**यमदमा अवकळा आणिली। तीर्थें ठायावरूनि उठविलीं। यमलोकींची खुंटिली। राहाटी आघवी॥ १९८॥**

**अर्थ**—यमदमांना म्हणजे मनोनिग्रह व इंद्रियनिग्रह यांनाहि नामस्मरणाने अवकळा आणली म्हणजे यमदम या साधनांना निरुपयोगिता आणली. तीर्थरूप प्रायश्चित्तेंहि आपलें ठिकाण सोडून भटकत फिरूं लागतात यमलोकांतील सर्व राहाटीच बंद पडते—म्हणजे पाप्याचें यमलोकांत जाणें व तेथून येणें हें बंद पडते.॥ १९८॥

**गूढार्थदीपिका—यमदमा अवकळा आणिली**—यम म्हणजे मनाला विषयांच्या ध्यासापासून आवरणें. अखंड नामस्मरण होणाऱ्या भगवंताच्या ध्यानाने "पांडुरंग ध्यानीं पांडुरंग मनीं। जागृतीं स्वप्नीं पांडुरंग" (तु. गा.) मन विषयाकार होत नाही. अशा रीतीने भक्तांना यम साधतो आणि "पडले वळण इंद्रियां सकळा। भाव तो निराळा नाही दुजा" भगवंताच्या ध्यानामुळे भक्ताची इंद्रियेहि मनाबरोबर विषयाला सोडून भगवत्परायण होतात—म्हणजे सर्व इंद्रियें भगवत्सेवेंत लागतात. अशा रीतीने नामधारकाला अनायासें दम साधतो.

नाम घेतां वाचे इंद्रियां विस्मृती। या नांव बोलतो यम भक्त॥ ४६॥

नामामध्ये एक वाणीचि गुंतत। इंद्रियेंहि होत आधीन की॥ ४८॥ (श्रीगुलाबराव महाराज कृत अभंगगाथा-नामपर) असा माझ्या श्रीगुरुआईनीहि आपला अनुभव सांगितला आहे.

**तीर्थे ठायावरूनि उठविलीं**—तीर्थें हीं पापक्षालन करणारीं आहेत असें शास्त्रांतून सांगितलें आहे. परंतु भगवन्नामाचें पापक्षालनसामर्थ्य एवढें थोर आहे की अखंड नामस्मरण करणाऱ्याला तीर्थरूप प्रायश्चित्तें आचरण्याची आवश्यकताच राहत नाही. किंवा "पुण्य पर्वकाळ तीर्थे हीं सकळ। कथा सिंधुजळ न्हाऊं येती", "कथा त्रिवेणी संगम। देवभक्त आणि नाम" या तुकाराम महाराजांच्या वचनाप्रमाणे सर्व तीर्थांत त्रिवेणीसंगम जसें श्रेष्ठ तीर्थ त्याप्रमाणे भगवत्कथा हेंहि त्रिवेणीसंगमरूप तीर्थ आहे. या तीर्थांत अखंड स्नान करणाऱ्यांना सर्व तीर्थांचें स्नान होत असल्यामुळे कोठे तीर्थाला जावें लागत नाही.

**यमलोकींची खुंटिली। राहाटी आघवीं**—यमलोक म्हणजे, पापीलोक आपल्या पापाचें ज्या लोकांत फळं भोगतात तो लोक होय. पापी त्या लोकांत जाऊन पापभोग भोगतात. शेषपापाने मृत्युलोकांत येऊन दु:ख भोगतात. ही अशी राहाटी अखंड चालू असतें. पण अखंड नामस्मरणाने अनेक जन्मांतील नि:शेष पापाची धुणी होत असल्यामुळे ही राहाटी संपूर्ण बंद पडते.

**यमु म्हणे काय यमावें। दमु म्हणे कवणातें दमावें। तीर्थें म्हणती काय खावें। दोष ओखदासि नाहीं॥ १९९॥**

**अर्थ**—यम म्हणतो मी कोण्या मनाचा निग्रह करावा? दम म्हणतो मी कोण्या इंद्रियाला आवरूं? तीर्थे म्हणतात औषधाला देखील पाप मिळत नाही तेथे मी कोणतें पाप नाहिसे करूं?॥ १९९॥

**गूढार्थदीपिका**—या ओवींत नामस्मरणाने यम, दम व तीर्थे यांचा नामधारकाला आश्रय करावा लागत नाही, हें सांगितलें आहे.

**ऐसे माझेनि नामघोषें। नाहीं करिती विश्वाचीं दु:खें। अवघें जगचि महासुखें। दुमदुमित भरलें॥ २००॥**

**अर्थ**—याप्रमाणे अर्जुना! माझ्या नामाचा घोष करीत असतांना नामधारक आपलेच नाही, तर सर्व जगाला भगवंताचें नाम ऐकवून सर्व जगाचें दु:ख नाहीसे करतो व अशारीतीने संपूर्ण जग ब्रह्मसुखाने दुमदुमित करून सोडतो.॥ २००॥

**गूढार्थदीपिका**—आतापर्यंत नामधारक कसा निष्पाप होतो. हें सांगितलें. या ओवींत नामधारकाकडून भगवत्प्रेमामुळे होणाऱ्या नामघोषाने चेतन अचेतन श्रोते देखील पावन होतात. असें सांगत आहेत.

**माझेनि नामघोषें**—उपांशु व घोष असे दोन प्रकारचें नामस्मरण आहे. आपल्यालाच ऐकूं येईल असे हळू नामस्मरण करणें याला उपांशु नामस्मरण म्हणतात आणि कोणालाहि ऐकू जाईल असें मोठ्याने नामस्मरण करणें याला नामघोष म्हणतात.

**नाहींचि करिती विश्वाचीं दुःखें। अवघें जगचि महासुखे। दुमदुमित भरलें**—नामधारक नामघोष करीत असतांना तो नामघोष ज्या ज्या जडचेतन जीवांच्या कानीं पडतो. त्या त्या सर्व जीवांचें पाप नाहीसें होते असा नामाचा-महिमा आहे.

नामघोष करणारे नामधारक अशा रींतीने विश्वांतील सर्व जीवांची पापें नाहीशीं करून त्यांचीं दुःखेंहि नाहीशीं करतात व सर्वांना महासुखाचा म्हणजे परमेश्वरसुखाचा लाभ करून देतात.

"रामकृष्णनाम सर्व दोषां हरण। जडजीवा तारण हरि एक" (ज्ञाने. हरिपाठ अभंग-२१) असें श्रीज्ञानेश्वर माऊलीनी हरिपाठाचे अभंगांत म्हटलें आहे.

"**तद्भूरिभाग्यमिहजन्मकिमप्यटव्यायद्गोकुलेऽपिकतमांघ्रिरजोभिषेकम्**" (भाग, स्कं. १०-१४-३४)

वृन्दावनांतील ज्या वृक्षपाषाणांना गोपगोपीसारख्या महात्म्यांच्या रजधुळीचा लाभ घेऊन त्यांच्या संगतींत भगवन्नाम श्रवण करायला मिळतें. त्या वृक्षापाषाणादि योनींत माझा जन्म व्हावा अशी ब्रह्मदेवाने इच्छा प्रगट केली व असा जन्म प्राप्त होणे थोर भाग्य होय असे त्यांनी उद्‌गार काढले. यावरून वृक्षपाषाणादि योनींत असलेलेहि भगवन्नामश्रवणाने तरतात असा महात्म्यांचा अनुभव आहे.

**ते पाहांटेवीण पाहावित। अमृतेंवीण जीववित। योगेंवीण दावित। कैवल्य डोळां॥ २०१॥**

**अर्थ**—असे नामधारक महात्मे सूर्यप्रकाशावांचून पाहावयाला लावतात, अमृतावांचून अमर करतात आणि योगावांचून डोळ्याने देखील मोक्षस्थिति दाखवितात. ॥ २०१ ॥

**गूढार्थदीपिका—पाहाटेविण पाहावित**—नामरूपात्मक जगत् आहे अशी ज्याची कल्पना आहे, तो तें जगत् सूर्यप्रकाश व चक्षुरिंद्रियरूपदृष्टि यांच्या साहाय्याने पाहत असतो. पण ही दृष्टि परमेश्वर पाहण्याला उपयोगी पडत नाही. परमेश्वर पाहण्याकरितां ज्ञानदृष्टिच उपयोगी पडत असते. भगवंताच्या निरपराध व अखंड नामस्मरणाच्या योगाने नामधारकाला सर्व सृष्टिच भगवत्स्वरूप भासू लागते. म्हणून त्यांना भौतिकदृष्टीचा व सूर्यप्रकाशाचा उपयोगच करावा लागत नाही. अखंड त्यांची ज्ञानदृष्टिच असते आणि ते ज्यांच्यावर कृपा करतील त्यांना ते अखंड ज्ञानदृष्टिच प्राप्त करून देतात.

**अमृतेविण जीववित**—म्हणजे ज्ञानीभक्त सदेह भगवंतासारखें अमर होतात—म्हणजे नित्य असतात.

सच्चिदानंदस्वरूप आत्मा हा मूळचाच अविनाशी आहे. तसेच देहादिक पदार्थहि, आपण आपल्या कल्पनारूप मायेमुळें जडविनाशी व परब्रह्माहून निराळें आहेत, असें समजत असलो, तरी ते अन्वयदृष्टीनें पाहतां मूळात परब्रह्माहून निराळी वस्तु नसून परब्रह्म सच्चिदानंद वस्तुच आहे, असें सिद्ध होतें.

योगी किंवा ज्ञानी, यांना देहादिक अविद्याजन्य पांचभौतिक आहेत व ते नाश पावतात असा भास कायम राहत असला, तरी भक्तांना मात्र ते पूर्ण ब्रह्मस्वरूपच आहेत असा अनुभव असतो. या अनुभवामुळें भक्तांना परब्रह्माहून कांही निराळी नाश पावणारी वस्तु आहे असा अनुभवच नसतो, म्हणूनच त्यांचे देहहि त्यांना अविनाशी ब्रह्मरूपच भासतात. "कामास्तु वांछितास्तस्य गावो गोपाश्च गोपिकाः। नित्याः सर्वे विहाराद्या आप्तकामस्तु तत्वयम्" (स्कं. पु.) परमेश्वर, परमेश्वराची इच्छा, व परमेश्वराचे इच्छित गायी, गोपी, गोपाळ हे सर्व अविद्येच्या पलीकडे असल्यामुळे सच्चिदानंदस्वरूप व नित्य आहेत, असें स्कंदपुराणांत सांगितलें आहे.

ज्ञानीभक्त अशा महानुभवी श्रीज्ञानेश्वर महाराज, तुकारामादि संतांचीं शरीरें नित्य असतात, म्हणून रामकृष्णादि सगुण विग्रहाचा जसा केव्हाहि साक्षात्कार होऊं शकतो तशा प्रमाणेच त्यांचाहि साक्षात्कार भक्तांना होत असतो. "ब्रह्मभूत काया होतसे कीर्तनीं। भाग्य तरी ऋणी देवा ऐसा" (तु. गा.) भगवद्भक्तीने देहहि ब्रह्मभूत होतो असें तुकाराम महाराजांनी म्हटलें आहे.

**योगेविण दावित। कैवल्य डोळां**—नामधारक संताना भगवन्नामस्मरणानेच, योगाने येणारा अनुभव, योगावांचून येतो आणि नामस्मरणानेच त्रिगुणात्मक मायेचीं निवृत्ति होऊन सर्वनामरूपांत ब्रह्मच आहे असा योग्यांना न येणारा अनुभव देखील नामधारक आपल्या डोळ्यांनी घेतो व दुसऱ्यांना आणून देतो. या व पुढील ओवींत संत हे सदा पूर्ण अविनाशी व सर्व समर्थ असतात, असें माऊली सांगत आहे. ''ब्रह्म इंद्रियां गोचर नसे। गुण गेलिया डोळा दिसे'', ''तेव्हां अंतरीं चैतन्यघन। बाह्य चिन्मात्र परिपूर्ण'' असा नाथादि संतांनीहि आपला अनुभव सांगितला आहे.

**परि राया रंका पाड धरूं। नेणती सानेयां थोरां कडसणी करूं। एकसरें आनंदाचें आवारू । होत जगा॥ २०२॥**

**अर्थ**—हा राजा आहे की दारिद्री आहे असा योग्यायोग्यतेचा ते विचार करीत नाहीत. थोर व लहान असा भेद ते करीत नाहीत. सतत सर्व जगाला ते आनंदाचे कसूं होतात. ॥ २०२॥

**गूढार्थदीपिका—राया रंका पाड धरूं**—भगवंताच्या नामस्मरणाने भगवंताचे ठिकाणीं परमप्रेमसंपन्न झालेल्या संतांना सर्वत्र अद्वैतब्रह्माचाच अनुभव असल्यामुळे त्यांना राव-रंक, थोर-सान हा भेदच दिसत नाही व ''सकळांसी येथे आहे अधिकार'' (तु. गा. २२०९) नामस्मरणादि भक्तिमार्गाचा सर्वांनाच अधिकार असल्यामुळे त्या मार्गाचाच ते उपदेश करतात.

**एकसरें आनंदाचें आवारू। होत जगा**—ज्याप्रमाणे एखादी भाग्यवंत मुलगी एखाद्या लक्ष्मीपुत्राचे घरी दिली गेली असतां ती आपल्याला झालेली मुलगीहि आपल्याप्रमाणेच अत्यंत श्रीमंताकडे पडावी अशीच इच्छा करते, त्याप्रमाणे भगवद्भक्तीने अखंड ब्रह्मानंदात लोळत असलेल्या सत्पुरुषांनाहि संसारांत होरपळत असलेल्या इतर जीवांनाहि ती आपली स्थिति प्राप्त व्हावी अशी अत्यंत कळकळ असते व त्या कळकळीने ते प्रेरित होऊन ते सर्वांना अखंड नामस्मरणरूप ब्रह्मसुख प्राप्तीच्या भक्तिरूप मार्गाचाच उपदेश करतात; म्हणून ते सर्व जगाचे आनंदाचे कसूं होतात. अशा सत्पुरुषापासून कोणाला कधीं दु:ख प्राप्त होत नाही.

**कहीं एकाधेनि वैकुंठा जावें। तें तिहीं वैकुंठचि केलें आघवें। ऐसें नामघोषगौरवें। धवळले विश्व॥ २०३॥**

**अर्थ**—एखादा विष्णूचा उपासक असला, तर तो विष्णुलोकाला जातो, पण नामधारक महात्मे नामस्मरणाने व ध्यानाने सर्व विश्वच वैकुंठ करून टाकतात. अशा भगवन्नामाच्या गजराने सर्व जगच चिन्मात्रप्रकाशरूप करून सोडतात. ॥ २०३॥

**गूढार्थदीपिका**—वैकुंठ म्हणजे भगवान विष्णूचा जेथे वास असतो तें ठिकाण.

कृतयुगाचे ठिकाणीं ''वैकुंठ जावया तपाचे सायास'' (तु. गा. २३४३) तपादिकांचे सायास करावे लागत असत व तेवढे सायास करून मरणानंतर एखादाच वैकुंठाला जात असे. पण कलियुगांत संतांनी आपल्या उत्कट प्रेमभक्तीने भगवंताला या भूमीवर आणून तेथेच अखंड राहावयास लावून ''तुका म्हणे पेंठ। भूवरी हे वैकुंठ'' (तु. गा.) ''सर्वत्र वैकुंठ केले असे'' (ज्ञा. गा.) या भूलोकालाच वैकुंठ करून सोडलें.

**नामघोषगौरवें। धवळलें विश्व**—ज्याप्रमाणे सूर्याच्या सान्निध्यांत अंध:कार प्रकाशरूप होतो, त्याप्रमाणें सच्चिदानंदघन परमेश्वराच्या सान्निध्याने हा जडविनाशी भासणारा भूलोक नामधारकाला नामस्मरणादि भक्तीच्या योगाने चिन्मय प्रकाशरूप अनुभवाला येतो. ''ज्ञानदेव म्हणे नयनाची ज्योति'' (ज्ञा. गा.) नयनाची ज्योति जें चिन्मयरूप तेंच नामरूपाने नटलें आहे असा अनुभव येणें यालाच ''विश्वाचे धवळणें'' म्हणतात.

**तेजें सूर्य तैसे सोज्वळ। परि तोहि अस्तवे हें किडाळ। चंद्र संपूर्ण एखादे वेळ। हे सदा पुरते॥ २०४॥**

**अर्थ**—संतांना सूर्याची उपमा द्यावी तर ते सूर्यासारखे तेजस्वी असतात पण सूर्याचे ठिकाणीं मावळणे हा दोष आहे. त्यांना चंद्राची उपमा द्यावी तर चंद्र एखादे वेळी म्हणजे पौर्णिमेलाच पूर्ण असतो, पण संत हे अखंड पूर्ण असतात. ॥ २०४॥

**गूढार्थदीपिका**—या व पुढील ओवींत संत हे सदा पूर्ण अविनाशी व सर्वसमर्थ असतात, असें माऊली सांगत आहेत.

**सूर्य तैसें सोज्वळ। परि तोहि अस्तवें हें किडाळ**—ज्याप्रमाणें सूर्यप्रकाशाने बाहेरच्या वस्तु कळतात त्याप्रमाणें संतहि ज्ञानप्रकाशाने आत्मवस्तु जाणतात. म्हणून त्यांना सूर्याची उपमा द्यावी, तर सूर्य मावळतो व मग वस्तु दिसत नाहीत, हा त्या सूर्याचे ठिकाणीं दोष आहे, पण संत हे अविनाशी ज्ञानस्वरूप होऊन राहतात म्हणून त्यांचा ज्ञानप्रकाशहि नित्य असतों.

**चंद्र संपूर्ण एखादे वेळ। हे सदा पुरते**—पूर्ण चंद्राचा प्रकाश शीतल व आल्हादकारक असतो पण तो फक्त पौर्णिमेच्या दिवशींच असतो. संत हे सदा पूर्ण व प्रसन्न असतात.

**मेघ उदार परी वोसरे। म्हणऊनि उपमेसी न पुरे। हे निःशंकपणें सपांखरे। पंचानन॥ २०५॥**

**अर्थ**—मेघ उदार असतात पण ते ओसरतात. म्हणून त्यांची संतांना उपमा देतां येत नाही. संत हे निर्धास्त व कृपाळु सिंहासारखे आहेत. ॥ २०५ ॥

**गूढार्थदीपिका—मेघ उदार परी वोसरे। म्हणऊनि उपमेसि न पुरे**—उदारतेमध्ये जे मेघ, कल्पतरू इत्यादि पदार्थ प्रसिद्ध आहेत त्यांचीं संताच्या उदारतेला उपमा देणें योग्य होत नाही; कारण ते पदार्थ कितीहि थोर उदार असले तरी ते आपली स्वभावस्थिति देऊं शकत नाहीत. पण संत हे इतके थोर उदार आहेत की जसे रामकृष्णादिकांच्या प्रेमभक्तीने ते सदेह सच्चिदानंद स्वरूप होऊन सर्वज्ञ, सर्वशक्ति, औदार्यादि षड्गुणैश्वर्याने परिपूर्ण असतात तसेच ते प्रसन्न झाले असतां आपल्या शिष्याला तसेच परिपूर्ण करतात.

**निःशंकपणें**—ज्याप्रमाणे पशूंचा राजा सिंह हा सर्वांपेक्षा समर्थ असल्यामुळें त्याला कोणत्याच पशूची भीती वाटत नाही व कोणीहि पशु त्याचा घात करण्यास धजत नाही, त्याप्रमाणे ब्रह्मांडाचा स्वामी जो परमेश्वर त्याच्या भक्तीने "बळियाचे अंकित आम्ही जालो बळिवंत। करूं सर्व सत्ता सर्वांवरी" (तु. गा.) संत हे ब्रह्मांडाचे स्वामी होतात, म्हणून ते पूर्ण निर्धास्त असतात हेच "निःशंकपणें" या शब्दाने दाखविलें आहे.

**पंचानन**—परमेश्वरालां विसरून उन्मत्त होऊन उन्मार्गगामी झालेल्या व परमेश्वर सन्मुख असलेल्यांना त्रास देणाऱ्या, थोर पराक्रमी देवादिकांना देखील आपल्या सामर्थ्याने शिक्षा करतात म्हणून संतांना येथें माऊलींनी "पंचानन" असें म्हटलें आहे.

**सपांखरें**—त्याचप्रमाणे ते सर्वांवर कृपादृष्टीचा वर्षाव करणारे असल्यामुळें, त्यांचे दुष्टांना शासन करणें देखील दुष्टांच्या कल्याणाचे उद्देशानेच असतें, हें "क्रोधोऽपिऽनुग्रह एव संमतः" इत्यादि वचनाने व नारदादि संतांनी दुष्टांना दिलेल्या शापादि कथेवरून दिसून येतें. हेंच माऊलींनी येथें "सपांखरें" या शब्दाने दाखविलें आहे.

"मेणाहूनि मऊ आम्ही विष्णुदास। कठीण वज्रास भेदू ऐसे। मायबापाहून होऊं कृपावंत। करूं घातपात शत्रूहूनि" (तु. गा.) तुकाराम महाराजांनी या अभंगांतील चरणांने असाच संतांचा स्वभाव सांगितला आहे.

**जयांचे वाचेपुढां भोजें। अखंड नाम नाचत असे माझें। जें जन्मसहस्त्रीं वोळगिजे। एकवेळ यावया॥ २०६॥**

**अर्थ**—जें माझे नांव एकवेळ देखील मनुष्याच्या मुखांत येण्याकरिता, हजारों जन्मांत केलेल्या सत्कर्मांचे पुण्य पदरीं असायला पाहिजे, ते माझे नांव या सत्पुरुषांचे मुखांत अखंड आनंदाने नाचत राहतें. ॥ २०६ ॥

**गूढार्थदीपिका**—भगवंताचे नांव इतकें थोर आहे की तें एकवेळ देखील मुखांत येण्याकरिता, अनेक जन्मांत आचरण केलेल्या निष्काम धर्मानुष्ठानाचे पुण्य पदरीं असायला पाहिजे म्हणजे त्या पुण्याने भगवंताचें नाम घ्यावें अशी श्रद्धा उत्पन्न होते. "अनंत जन्माचें तप एक नाम" असे माऊलींनी हरिपाठाचे अभंगांतहि म्हटलें आहे. "अनंत जन्माचें सुकृत पदरीं। त्याचे मुखीं हरि पैठा होय" (नाथ हरिपाठ ११२७) किंवा हजारों जन्मांत केलेलें पुण्य एकवेळ मुखांत आलेल्या नामाबरोबर आहे.

**तो मी वैकुंठीं नसे। एक वेळ भानुबिंबींही न दिसें। वरी योगियांचींही मानसें। उमरडोनि जाय॥ २०७॥**

**अर्थ**—तो मी वैकुंठांत राहत नाही. एखादे वेळीं सूर्यबिंबाचे ठिकाणींहि मी दिसणार नाही. आणखी योग्यांच्या मनालाहि ओलांडून जाईन. ॥ २०७॥

**गूढार्थदीपिका**—शास्त्रांतून परमेश्वराच्या प्राप्तीचीं स्थाने सांगितलीं आहेत. भगवान सदा वैकुंठांत असतो व विष्णूच्या उपासकांना तो प्राप्त होतो.

सूर्यबिंबाच्या ठिकाणींहि भगवंताच्या सुवर्णासारख्या स्वरूपाची प्राप्ति सांगितली आहे. त्याविषयी ''**य एषोऽन्तरादित्ये हिरण्मयः पुरुषो दृश्यते**'' (छां. १-६) ही श्रुति प्रमाण आहे.

योग्यांना आपल्या हृदयांत प्रत्यक्ष परमेश्वराला पाहतां येतें, हें ''अपि च संराधने प्रत्यक्षानुमानाभ्याम्'' (ब्र. सू. ३-२-२४) या सूत्रांत सांगितलें आहे. पण हीं सर्व स्थानें मायिक आहेत व प्रेमाशिवाय या साधनांनी भगवंताची प्राप्ति होणें कठीण आहे.

**परी तयांपाशीं पांडवा। मी हारपला गिंवसावा। जेथ नामघोषु बरवा। करिती ते माझे॥ २०८॥**

**अर्थ**—पण या सर्व ठिकाणीं न सांपडणारा मी प्रेमाने माझा नामघोष करणाऱ्या नामधारकाचे ठिकाणीं अवश्य सांपडतो. ॥ २०८॥

**गूढार्थदीपिका**—परमात्मा परमप्रेमरूप आहे. तो नामरूपासह पूर्ण असल्यामुळे त्याला आपल्या नामरूपाचेंहि परम प्रेम असतें. ''तुका म्हणे त्याला गोडी कीर्तनाची। नाही आणिकांची प्रीति ऐसी'' (तु. गा. २१७१) म्हणूनच नामधारकांच्या प्रेमाला वश झालेला परमात्मा त्यांच्या चित्तांत अखंड राहतो, असा भाव.

**कैसे माझां गुणीं धाले। देशकाळातें विसरले। कीर्तनसुखें झाले। आपणपांचि॥ २०९॥**

**अर्थ**—माझे गुणानुवाद गाण्यांत ते इतके रंगून जातात की ते देशकाळ विसरतात—म्हणजे त्यांना देशकाळाचें भान राहत नाही-आणि कीर्तनाच्या सुखाने आपणच सुखस्वरूप होऊन राहतात. ॥ २०९॥

**गूढार्थदीपिका**—संतांना हरिनामाची अवीट गोडी असते ''अवीट हें क्षीर हरिकथा माउली। सेवितां सेविली वैष्णवजनी''. (तु. गा. २१५३)

**कृष्ण विष्णु हरि गोविंद। या नामाचे निखळ प्रबंध। माजीं आत्मचर्चा विशद। उदंड गाती॥ २१०॥**

**अर्थ**—कृष्ण, विष्णु, हरि, गोविंद, अशीं हीं नावें आणि तीं नांवें ज्यांत ग्रथित केलीं आहेत, असे अभंग, पदें इत्यादि कवित्व त्याच्या मुखावाटें सारखे म्हटलें जाते व नामस्मरण व गुणानुवाद गात असतां, मध्यें आत्मस्वरूपाची मोकळी चर्चाहि ते अहोरात्र करीत असतात. ॥ २१०॥

**गूढार्थदीपिका**—आत्मचर्चा म्हणजे निरुपाधिक निर्गुण स्वरूपाप्रमाणे भगवंताचें सगुणस्वरूप व त्याचें नांव, ही दोन्हीहि पूर्ण निरुपाधिक ब्रह्मस्वरूप आहेत अशी चर्चा.

**हें बहु असो यापरी। कीर्तित मातें अवधारीं। एक विचरती चराचरीं। पंडुकुमरा॥ २११॥**

**अर्थ**—अर्जुना! हा आतां विस्तार पुरे. याप्रमाणे कोणी माझें कीर्तन करीत—म्हणजे गुणानुवाद गात-विश्वांत संचार करतात. ॥ २११॥

**गूढार्थदीपिका**—आतापर्यंत माऊलींनी एकान्तभक्तीच्या नामस्मरणरूप अंगाचें विवरण केलें. आता पुढील ओवीपासून तों ओवी. २१८ पर्यंत एकान्तभक्तीच्या ध्यानरूप आंगाचें माऊली वर्णन करीत आहेत.

कित्येक भक्ताचे ठिकाणीं भक्तीचें नामस्मरणरूप अंगच प्रधान असतें, तर कित्येक भक्तांचे ठिकाणीं ध्यानरूप अंग प्रधान असतें; म्हणून येथे आतां सगुण भगवंताचें ध्यान करणारे भक्त, सगुण भगवंताचें ध्यान कशा रीतीने करतात, हें माऊली सांगत आहे.

**मग आणिक ते अर्जुना। साविया बहुवा जतना। पंचप्राणा मना। पाढाऊ घेउनी॥ २१२॥**
**बाहेरी यमनियमांची कांटी लाविली। आंतु वज्रासनाची पौळी पन्नासिली। वरी प्राणायामाचीं मांडिलीं। वाहातीं यंत्रें॥ २१३ ॥**
**तेथ उल्हाट शक्तीचेनि उजिवडें। मन पवनाचेनि सुरवाडे। सतरावियेचें पाणियाडें। बळाविलें॥ २१४॥**
**तेव्हां प्रत्याहारें ख्याति केली। विकारांचीं संपिलीं बोहली। इंद्रियें बांधोनि आणिलीं। हृदयाआंतु॥ २१५॥**
**तंव धारणावारू दाटिले। महाभूतांतें एकवटिलें। मग चतुरंग सैन्य निवटिलें। संकल्पाचें॥ २१६॥**

**अर्थ**—दुसरे कोणी आपल्या अंत:करणांत माझ्या सगुण स्वरूपाचें चांगल्या रीतीने म्हणजे अखंड जतन करण्याकरितां पंचप्राण व मन यांना वाटाड्या करतात. ॥ २१२ ॥ इंद्रियें विषयांकडे जाऊं नयेत म्हणून शरीराचे बाहेर यमनियमांचें कांटेरी कुंपण करून, शरीराचे आंत मुळबंधाचा परकोट तयार करून, त्यावर प्राणायामाच्या तोफा चालूं ठेवतात. ॥ २१३ ॥ तेथें कुंडलिनी ऊर्ध्वमुख होऊन प्रकाशित झाली असतां त्या प्रकाशाने व मनप्राणांच्या अनुकूलतेने सतराव्या कलेचे अमृतकुंड स्वाधीन करतात. ॥ २१४ ॥ तेव्हां प्रत्याहार-म्हणजे विषयांपासून इंद्रियांना आवरणें-हा पूर्ण सिद्ध होतो त्यायोगें विकाराचें नांवहि राहत नाही. इंद्रियें हृदयांतच बांधून आणलीं जातात. ॥ २१५ ॥ प्रत्याहार सिद्ध झाला की धारणारूप घोडे पुढे हांकले जातात—म्हणजे धारणेची भूमिका सिद्ध होते-व त्या योगाने सर्व पंचमहाभूतांची आटणी होते. येथें संकल्प करणाऱ्या अंत:करणाचें चतुरंग सैन्य-म्हणजे मन, बुद्धि, चित्त, अहंकार यांचे विषयांविषयीं व्यापार बंद पडतात. ॥ २१६ ॥

**गूढार्थदीपिका—चतुरंग सैन्य निवटले। संकल्पाचे**—"समीचीनत्वधी: संकल्प" एखादी गोष्ट बरी आहे असें वाटणे याला संकल्प म्हणतात. हा संकल्प जीवाच्या ठिकाणीं सदा असतो, म्हणूनच या संकल्पामुळें वस्तुविषयीं बुद्धीचा निश्चयरूप व्यापार होतो. यामुळेच वस्तूचे चिंतन हा चित्तरूप व्यापार होतो. मनहि संकल्प विकल्पात्मक—आहे नाही असा-व्यापार करतें आणि अहंकार अहंताममता धारण करतो. हे सर्व चतुरंग सैन्य धारणा सिद्ध झाल्यावर नाश पावतें.

**तयावरी जैत रे जैत। म्हणोनि ध्यानाचें निशाण वाजत। दिसे तन्मयाचें झळकत। एकछत्र॥ २१७॥**
**पाठी समाधिश्रियेचा अशेखा। आत्मानुभवराज्यसुखा। पट्टाभिषेकु देखा। समरसें जाहला॥ २१८॥**

**अर्थ**—त्याच्यापुढें मग जिंकलें रे जिंकलें म्हणून ध्यानाच्या भेरी झडूं लागतात व तन्मयतेचे एकछत्र फडकूं लागतें. ॥ २१७ ॥ नंतर समाधिलक्ष्मीचें संपूर्ण आत्मानुभवरूप जें राज्यसुख त्या राज्यावर समरसतेने त्याला राज्याभिषेक होतो. ॥ २१८ ॥

**ऐसें हें गहन। अर्जुना माझें भजन। आतां ऐकें सांगेन। जे करिती एक॥ २१९॥**

**अर्थ**—अर्जुना! अशा रीतीनें माझें अत्यंत कठीण कष्टदायक भजन कित्येक करितात. आतां दुसरे कित्येक महात्मे माझें कसें भजन करतात, तेंहि सांगतों, ऐक. ॥ २१९ ॥

**गूढार्थदीपिका**—कित्येक भक्त सर्वाभूतीं भगवद्भाव ठेवून परमेश्वराचें कसें भजन करतात हे माऊली पुढील ओवी २२०-२२८ मध्ये सांगत आहे.

**तरी दोन्ही पालववेरी। जैसा एक तंतू अंबरीं। तैसा मीवांचूनि चराचरीं। जाणती ना॥ २२०॥**
**आदि ब्रह्मा करूनी। शेवटीं मशक धरूनी। माजी समस्त हें जाणोनी। स्वरूप माझें॥ २२१॥**

**अर्थ**—ज्याप्रमाणें वस्त्राचे दोन्ही पदरापर्यंत एकच सूत असतें, त्याप्रमाणें या चराचर सृष्टींत माझ्यावांचून दुसरी वस्तूच जाणत नाहीत. (संपूर्ण नामरूपाने मीच नटलों आहे असें पाहतात असा अर्थ) ॥ २२० ॥ ब्रह्मदेवापासून तर मशकापर्यंत जेवढीं नामरूपें आहेत तीं सर्व माझीं रूपें आहेत असें ते जाणतात. ॥ २२१ ॥

**गूढार्थदीपिका**—सर्व चराचर सृष्टीचे ठिकाणीं सत्पुरुष एकसारखी समदृष्टि करितात. विवक्षित जातीपुरतीच किंवा विवक्षित समाजापुरतीच त्यांची समदृष्टि मर्यादित नसते असा भाव.

**मग वाड धाकुटें न म्हणती। सजीव निर्जीव नेणती। देखिलिये वस्तु उजू लुंटिती। मीचि म्हणोनि॥ २२२॥**
**आपुलें उत्तमत्व नाठवे। पुढील योग्यायोग्य नेणवे। एकसरें व्यक्तिमात्राचेनि नांवें। नमूंचि आवडे॥ २२३॥**

**अर्थ**—मग अमुक मोठा किंवा अमुक लहान, हा जीवंत पदार्थ किंवा हा निर्जीव पदार्थ असा कांही एक भेद न करतां दृष्टीला पडेल ती वस्तु भगवान श्रीकृष्णच आहे, असें समजून तिला सरळ लोटांगण घालतात. ॥ २२२ ॥ त्यांना आपल्या उत्तमत्वाचे किंवा श्रेष्ठपणाचें स्मरणच होत नाही. समोरचा नमस्कारास योग्य आहे की अयोग्य आहे हेंहि त्यांच्या मनांत येत नाही. व्यक्तिमात्र भगवत्स्वरूप जाणून त्यांना सरसकट नमस्कार करावा असें त्यांना वाटतें. ॥ २२३ ॥

**गूढार्थदीपिका**—"समासमाभ्यां विषमसमे पूजात:" अशी स्मृति आहे. अध्ययनादि गुणाने समान असलेल्या पुष्कळ पुरुषांचा एकाच वेळीं विषम म्हणजे कमी जास्त सत्कार करणें आणि अध्ययनादि गुणाने विषम म्हणजे कमी जास्त असणाऱ्या पुरुषांचा एकाचवेळीं समान पूजादिसन्मान करणे हा दोष आहे. असा त्या स्मृतीचा अर्थ आहे. पण हे सूत्रांतील विधान देह म्हणजे मी असें समजणाऱ्या अज्ञानी लोकांना व अज्ञानी लोकांविषयींच लागूं आहे, सर्वत्र परमेश्वर आहे, असें जाणून किंवा तशी बुद्धि ठेवून मुंगीपासून ब्रह्मदेवापर्यंत जेवढे जीव आहेत, तेवढ्यांनाहि परमेश्वरभावनेने नमस्कार केला असतां तो दोष होत नाही, हे आचार्यांनी पांचव्या अध्यायांत (श्लो. १९) मान्य केलें आहे व श्रीज्ञानेश्वर माउलींनीहि तेंच येथे सांगितलें आहे.

**जैसें उंचीं उदक पडिलें। तें तळवटवरी ये उगेलें। तैसें नमिजे भूतजात देखिलें। ऐसा स्वभावोचि तयांचा॥ २२४॥**
**कां फळलिया तरूची शाखा। सहजें भूमीसी उतरे देखा। तैसें जीवमात्रां अशेखां। खालावती ते॥ २२५॥**
**अखंड अगर्वता होऊनि असती। तयांची विनय हेचि संपत्ती। जे जयजयमंत्रें अर्पिती। माझांचि ठायीं॥ २२६॥**

**अर्थ**—ज्याप्रमाणे उंच ठिकाणावर पाणी पडलें असतां ते स्वभावत: खालीं येते. त्याप्रमाणे दृष्टीला पडेल त्या जीवाला भगवद्भावनेने नमस्कार करावा असा त्या महात्म्यांचा स्वभावच बनून जातो.॥ २२४॥ फळाने अगदीं बहरलेल्या झाडाची फांदी ज्याप्रमाणे वांकून जमिनीला टेंकते, त्याप्रमाणे महात्मे संपूर्ण जीवमात्रांचे ठिकाणीं लीन होऊन राहतात.॥ २२५॥ ते अखंड निरहंकार असतात व नम्रता हेंच त्यांचें वैभव असतें आणि वस्तु दृष्टीला पडल्याबरोबर भगवंताचें दर्शन झालें. असें समजून माझा जयजयकार करितात व अशा रीतीने माझे ठिकाणीं ते आपल्याला अर्पण करतात.॥ २२६॥

**गूढार्थदीपिका**—जीव हा परमेश्वरस्वरूपच आहे, पण तो मी म्हणून आपल्या निराळेपणाचा अभिमान धारण करतो, म्हणून परमेश्वराहून निराळा झाला. त्यांनी आपल्या निराळेपणाचा अभिमान सोडला किंवा निराळेपणाचा त्याचा अभिमान सुटला की त्याचे परमेश्वराशीं असलेलें मूळचें ऐक्य प्रगट होतें, हें मागें माऊलींनी सांगितलेंच आहे.

सर्व भूतांचे ठिकाणीं परमेश्वरभावनेने लीन झालेला पुरुष अत्यंत निरभिमानी होतो. त्याला देहादिकांचा अभिमान उत्पन्न होत नाही आणि सर्व भूतांचे ठिकाणीं एक सम परमात्माच आहे अशी अखंड दृष्टि ठेवणाऱ्या पुरुषाचे ठिकाणीं, श्रेष्ठ-कनिष्ठ हे विषमभाव उत्पन्नच होत नाहीत. म्हणून सर्वाभूतीं परमेश्वर भावनेने अखंड लीन झालेला पुरुष सहज परमेश्वरालाच अर्पण होतो म्हणजे सहज परमेश्वराशीं ऐक्य पावतो.

**नमितां मानाभिमान गळाले। म्हणोनि अवचिता ते मीचि जहाले। ऐसे निरंतर मिसळले। उपासिती॥ २२७॥**
**अर्जुना हे गुरुवी भक्ती। सांगितली तुजप्रती। आतां ज्ञानयज्ञें यजिती। ते भक्त आइकें॥ २२८॥**

**अर्थ**—सर्व भूतांचे ठिकाणीं परमेश्वर भावनेने लीन झाले असतां मान अपमानाची भावना नाहीशी होते; म्हणून अकस्मात् ते माझ्याशीं ऐक्य पावतात. अशा रीतीने अखंड ऐक्य पावून माझी उपासना करतात.॥ २२७॥ अर्जुना! ही चौथी श्रेष्ठभक्ति तुला सांगितली. आतां ज्ञानाने भजन करणारे जे भक्त आहेत ते भजन कसे करितात, हें सांगतो ऐक.॥ २२८॥

**गूढार्थदीपिका**—आता पुढील ओव्यांतून ज्ञानाने भजन करणाऱ्याच्या मार्गाचें माउली वर्णन करीत आहे. या सर्व भजनांत सगुणाचेंच भजन आहे हे लक्षांत ठेविलें पाहिजे.

**परि भजन करिती हातवटी। तूं जाणत आहासि किरीटी। जे मागां इया गोष्टी। केलिया आम्हीं॥ २२९॥**
**तंव आथि जी अर्जुन म्हणे। ते दैविकिया प्रसादाचें करणें। तरि काय अमृताचें आरोगणें। पुरे म्हणवे॥ २३०॥**

**अर्थ**—पण अर्जुना! ज्ञानाने भजन करण्याची पद्धति तुला मागें सांगितलीच असल्यामुळे तूं ती जाणतोस.॥ २२९॥ तेंव्हा अर्जुन म्हणतो देवा! ज्ञानयज्ञाने तुझें यजन करण्याची हातवटी मी जाणतो, हें तुज देवाच्या कृपेचेंच फळ होय आणि मी जाणतों तरी अमृताचें भोजनाला पुरे म्हणवेल काय?॥ २३०॥

**गूढार्थदीपिका**—अनंत जन्मांतील अभ्यासाने—म्हणजे वारंवार सेवनाने-संसार जसा दृढ झाला आहे, तसाच

परमार्थ दृढ होण्याकरितां परमार्थ श्रवणाचा कंटाळा न येतां, वारंवार नव्या प्रेमाने श्रवण केलें गेलें पाहिजें हेंच येथें ''तरि काय अमृताचे आरोगणे। पुरे म्हणवेल'' या चरणांनी माऊलींनी सुचविले आहे.

श्रीशुकाचार्यांनीहि ''यन्नूतनयशीयस्य शृण्वन् अपि कथां मुहुः'' असें म्हणून राजा परीक्षिताच्या कथाश्रवणाच्या प्रेमाची प्रशंसा केली आहे.

**या बोला श्रीअनंतें। लागट देखिलें तयातें। कीं सुखावलेनि चित्तें। डोल्तु असे॥ २३१॥**

**अर्थ**—अर्जुनाचें भाषण ऐकून अर्जुनाला या निरूपण ऐकण्याची गोडी आहे, असें देवाला वाटलें व भगवंताच्या चित्ताला अत्यंत सुख झालें व त्या सुखांत भगवान डोलूं लागले. ॥ २३१ ॥

**गूढार्थदीपिका**—शिष्याला परमार्थाची जितकी अधिक गोडी लागेल, तितकें अधिक सुख श्रीगुरुला होतें संसाराच्या गोडीने जसा संसार दृढ होतो तसा परमार्थाच्या गोडीने परमार्थ चित्तांत दृढ होतो.

**म्हणे भलें केलें पार्था। एऱ्हवीं हा अनवसरु सर्वथा। परि बोलवीतसे आस्था। तुझी मातें॥ २३२॥**
**तंव अर्जुन म्हणे हें कायी। चकोरेंवीण चांदिणेंचि नाहीं। जग निवविजे हा तयाचां ठायीं। स्वभावो कीं जी॥ २३३॥**
**येरें चकोरें तियें आपुलिये चाडे। चांचू करिती चंद्राकडे। तेविं आम्ही विनवूं तें थोकडें। देवो कृपासिंधु॥ २३४॥**
**जो मेघ आपुलिये प्रौढी। जगाची आर्ती दवडी। वांचूनि चातकाची ताहान केवढी। तो वर्षावो पाहुनी॥ २३५॥**
**परि चुळा एकाचिया चाडे। जेविं गंगेतेंचि ठाकावें पडे। तेविं आर्त बहु कां थोडें। तरि सांगावें देवा॥ २३६॥**

**अर्थ**—भगवान म्हणतात, अर्जुना! वाहवा! फार सुंदर बोललास! वास्तविक पाहतां पुन: पुन: तींच ती गोष्ट सांगावी असा प्रस्तुतचा प्रसंग नाही, परंतु श्रवणाचें ठिकाणीं असलेली तुझी गोडीच मला बोलायला लावते. ॥ २३२ ॥ हें भगवंताचें बोलणें ऐकून, अर्जुन म्हणतो देवा! असें कां बरें म्हणतां! चकोरावांचून चंद्रप्रकाश नसतोच का? चकोराकरितांच प्रकाश असतो, असें नव्हे. जगताचा ताप नाहीसा करावा हा चंद्राचा स्वभाव आहे. त्या स्वभावानुसार चंद्र प्रकाशतो. ॥ २३३ ॥ आणि अनायासें चकोर स्वाभाविकपणे चंद्रप्रकाशांतील अमृतकण वेंचण्याच्या इच्छेने ज्याप्रमाणे चंद्राकडे चोंच करीत असतात, त्याप्रमाणे आपण कृपासिंधु आहां, पण आमची विनंति केवळ निमित्तमात्र आहे. ॥ २३४ ॥ मेघ आपल्या औदार्याने सर्व जगाचें दु:ख नाहीसें करितो. येऱ्हवीं वर्षावाच्या मानाने चातकाची तहान कितीतरी अल्प असते. ॥ २३५ ॥ पण त्या चातकांना चूळभर पाण्याची इच्छा असली तरी ज्याप्रमाणे मेघरूपाने वर्षाव करण्याकरिता गंगेलाच यावें लागतें, त्याप्रमाणे आमची ऐकण्याची इच्छा बहु किंवा थोडी असली तरी देवांनी बोलावेंच. ॥ २३६ ॥

**गूढार्थदीपिका**—''**जेविं गंगेतेंचि ठाकावें पडे**''—आयुर्वेदांत ''धाराजलं च द्विविधं गांगसामुद्रभेदत:'' (भा. प्र. स्व. १-वारिवर्ग श्लो. ८) वर्षावाने पडणारे पाणी गांग व सामुद्र असे दोन प्रकारचें सांगितलें आहे.

गंगेच्या पाण्यापासून तयार झालेल्या मेघांतून जो वर्षाव होतो त्याला गांगजल म्हणतात व समुद्राच्या पाण्यापासून तयार झालेल्या मेघांतून होणाऱ्या वर्षावाला सामुद्रजल म्हणतात. चातकपक्षी गंगेच्या पाण्यापासून तयार झालेल्या मेघांतून होणाऱ्या गांगवर्षावाचेंच पाणी पीत असतात; म्हणून त्यांच्याकरिता गंगेलाच वर्षावरूपाने यावें लागतें व हेंच ''गंगेतेचि ठाकावें पडे'' या चरणाने माऊलीनी सांगितलें आहे.

**तेथें देवें म्हणितलें राहें। जो संतोषु आम्हां जाहाला आहे। तयावरी स्तुति साहे। ऐसें उरलें नाहीं॥ २३७॥**
**पैं परिसतु आहासि निकियापरी। तेंचि वक्तृत्वा व्हाडीक करी। ऐसें पुरस्करोनि श्रीहरी। आदरिलें बोल्लें॥ २३८॥**

**अर्थ**—त्यावर देव म्हणतात अर्जुना! हें आतां पुरे कर. तुझी श्रवणाची आस्था पाहून आम्हाला जो आनंद झाला आहे त्यावर आता स्तुतीने संतोष होईल असें मुळींच उरलें नाही. ॥ २३७ ॥ परंतु ज्या अत्यंत आवडीने तूं श्रवण करीत आहेस ती तुझी आवडीच माझ्या वक्तृत्वाशीं सोयरीक करते, असा प्रस्ताव करून भगवंतांनी बोलण्याला सुरुवात केली. ॥ २३८ ॥

**ज्ञानयज्ञेन चाप्यन्ये यजन्तो मामुपासते। एकत्वेन पृथक्त्वेन बहुधा विश्वतोमुखम्॥ १५॥**

**अर्थ**—दुसरे ज्ञानयज्ञाने यजन करणारे कोणी एकत्वाने, कोणी नानारूपाने व कोणी विश्वरूपाने माझी उपासना करतात. ॥ १५ ॥

**तरि ज्ञानयज्ञु तो एवंरूपु। तेथ आदिसंकल्पु हा यूपु। महाभूतें मंडपु। भेदु तो पशु॥ २३९ ॥**

**अर्थ**—तर आतां तो अद्वैतज्ञानयज्ञ असा आहे. या यज्ञांत प्रथम संकल्प हा यूप-म्हणजें मारला जाणारा पशु, बांधून ठेवितात तो खांब-आहे, पंचमहाभूतें हा मंडप आहे व भेद हा पशु आहे. ॥२३९ ॥

**गूढार्थदीपिका—ज्ञानयज्ञु**—सगुण परमात्माहि पूर्ण ब्रह्मस्वरूप आहे, असें जें भगवंताच्या स्वरूपाचें ज्ञान, त्याच ज्ञानाने (म्हणजे हें जाणून व इतर देवतांची उपासना सोडून) एका भगवंताचीच उपासना करणें याला ज्ञानयज्ञ म्हणतात.

**आदिसंकल्प हा यूपु**—''सोऽकामयत बहु स्यां प्रजायेय'' सृष्टीच्या आरंभी मी बहुरूप व्हावें असा जो परमेश्वर संकल्प करतो त्याला ''आदिसंकल्प'' म्हणतात. या संकल्पाचा अर्थ मी सच्चिदानंद बहुरूप व्हावें असा असतो; पण जीव त्याचा अनेक भिन्न भिन्न रूप व्हावें असा सृष्टिविषयक अर्थ करतो, हे मागें सांगितलेंच आहे. अर्थात् यज्ञांतील यूपाशीं जसा पशु बांधला जातो त्याप्रमाणेंच जीवाने मानलेला भेदरूप पशुहि आदिसंकल्पाशीं संबद्ध असल्यामुळे येथें आदिसंकल्पाला ''यूप'' म्हटलें आहे.

**भेद तो पशु**—ज्याप्रमाणे कर्मरूप यज्ञांत पशु मारला जातो, त्याप्रमाणे या ज्ञानयज्ञांत मारला जाणारा पशु भेद किंवा द्वैत होय. जीव ईश्वर यांचा परस्पर भेद. जीवजीव यांचा परस्पर भेद, जीवजड यांचा परस्पर भेद, जडजड यांचा परस्पर भेद व जडईश्वर यांचा परस्पर भेद, असा हा पांच प्रकारचा भेद जीवाला दिसतो. मूळांत एक अद्वैत परब्रह्म वस्तु असतांना तिचे ठिकाणीं हा जो पांच प्रकारचा भेद दिसतो, त्या भेदामुळें परब्रह्माचें अद्वैत ज्ञान होत नाही आणि हा भेदच जीवाच्या दु:खाचें कारण आहे असें ''द्वितायाद्वै भयं भवति'' या श्रुतीने सांगितलें आहे. ब्रह्मज्ञानाने तोच नाहीसा करावयाचा असतो; म्हणून त्या भेदाला येथे यज्ञांतील वध्य पशूची उपमा दिली आहे.

**महाभूतें मंडपु**—यज्ञ, बाहेर मंडप घालून केला जातो. ज्या अद्वैत ज्ञानदृष्टीने यज्ञ होतो ती अद्वैतज्ञानदृष्टि बुद्धीचें ठिकाणीं उत्पन्न होते आणि बुद्धि किंवा अंत:करण पंचमहाभूताचें कार्य असल्यामुळें पंचमहाभूतें उत्पन्न झाल्याशिवाय बुद्धि व्यक्त होऊं शकत नाही. अर्थात् असा हा ज्ञानयज्ञ पंचमहाभूतांचें कार्य मिळून घातलेल्या जगतरूप मंडपांतच होत असतो. म्हणून पंचमहाभूतांवर मंडपाचें येथें माऊलींनी रूपक केलें आहे.

**मग पांचांचे जे विशेष गुण। अथवा इंद्रियें आणि प्राण। हेचि यज्ञोपचारभरण। अज्ञान घृत॥ २४० ॥**

**अर्थ**—पुढें पंचमहाभूतांचे विशेष गुण अथवा इंद्रियें प्राण वगैरे त्या ज्ञानयज्ञांतील हवनीय पदार्थ होत व अज्ञान हें तूप होय. ॥ २४० ॥

**गूढार्थदीपिका**—पंचमहाभूतांचे विशेष गुण जे शब्द, स्पर्श, रूप, रस, गंध अथवा दहा इंद्रियें आणि पंचप्राण हे यज्ञोपचारभरण-म्हणजे यज्ञसाहित्य होय.

**अज्ञानघृत**—आत्मवस्तूचें विस्मरण हेंच अज्ञान होय. याच अज्ञानाने ब्रह्मव्यतिरिक्त पंचमहाभूतादिक पदार्थाची कल्पना केली गेली आहे. अर्थात् हे सर्व पदार्थ अज्ञानासहच असतात आणि ज्याप्रमाणें प्रत्येक हवनीय पदार्थ घृतासह हवन केला जातो त्याप्रमाणें या ज्ञानयज्ञांतील शब्दस्पर्शादि सर्व पदार्थाचे हवन अज्ञानासहच केलें. जातें, म्हणून येथे अज्ञानावर घृताचें रुपक केलें आहे.

**तेथ मनबुद्धीचिया कुंडा-। आंतु ज्ञानाग्नि धडफुडा। साम्य तेचि सुहाडा। वेदि जाणें॥ २४१ ॥**

**अर्थ**—त्यांत मन बुद्धि हीं दोन कुंडे आहेत, त्यांत ज्ञानाग्नि प्रज्वलित होतो व समता हा कुंडावरील, हे अर्जुना! ओटा आहे. ॥ २४१ ॥

**गूढार्थदीपिका-मनबुद्धीचिया कुंडा**—यज्ञामध्यें ज्या अग्नींत हविर्भाग टाकले जातात तो अग्नि कुंडांत असतो. ज्ञानरूपी अग्नि मनोबुद्धीत प्रज्वलित होतो म्हणून मनबुद्धीवर येथें कुंडाचें रूपक केलें आहे. बुद्धिरूपी कुंडात निर्गुण ज्ञानाग्नि पेटतो व मनरूपी कुंडात सगुणज्ञानाग्नि पेटविला जातो.

**साम्य तेचि-वेदिका जाणे**—दोन्ही कुंडाला समतारूपी ओटा असतो. निर्गुणब्रह्मप्रत्ययांत सर्व एक पूर्ण ब्रह्मच आहे असा जसा समभावाचा प्रत्यय असतो, तसाच सगुणब्रह्मप्रत्ययांतहि एक सर्वत्र सगुण परब्रह्मच आहे, न्यूनपूर्ण असा विषमभाव नाही, असाच समभावाचा प्रत्यय असतो.

**सविवेकमतिपाटव। तेचि मंत्र विद्यागौरव। शांति स्रुक्स्रुव। जीवु यज्वा॥ २४२॥**

**अर्थ**—आत्मानात्मविचार करण्याचें बुद्धीचें चातुर्य हेंच ज्ञानयज्ञांतील मंत्र होत. ब्रह्मज्ञानाची दृढता हे स्रुक् असून मनाची निर्वासन किंवा विषयरहित स्थिति ही स्रुवा होय. जीव यज्ञ करणारा यजमान होय.॥ २४२॥

**तो प्रतीतीचेनि पात्रें। विवेकमहामंत्रें। ज्ञानाग्निहोत्रें। भेदु नाशी॥ २४३॥**

**अर्थ**—अशा रीतीने जीवरूपी यजमान अनुभवरूपी यज्ञपात्र घेऊन आत्मानात्मविवेकरूपी मंत्राने ब्रह्म ज्ञानरूपी अग्निहोत्राचे अनुष्ठान करून संपूर्ण भेदाचा नाश करतो.॥ २४३॥

**गूढार्थदीपिका—ज्ञानाग्निहोत्रें भेदु नाशी**-बुद्धिरूपी कुंडांत ब्रह्म हें अद्वैतस्वरूप आहे, त्यावांचून दुसरी सत्ताच नाही असा अद्वैतज्ञानाग्नी पेटलेला असतो. त्यांत जीवजगत् इत्यादिकांच्या भिन्न सत्तेचा नाश होतो आणि सर्व नामरूपासह एक परब्रह्मच आविष्कृत झालें आहे, परब्रह्मावांचून दुसऱ्या जीवजगत् इत्यादिक कांही एक वस्तु नाहीत, असा मनोरूपी कुंडांत सगुणज्ञानाग्नी पेटला जातो. त्यांत जीव जगत् यांच्या वस्तुत्वांचें हवन केलें जाऊन त्यांच्या वस्तुभेदाचा नाश होतो.

**तेथ अज्ञान सरोनि जाये। आणि यजिता यजन हें ठाये। आत्मसमरसीं न्हायें। अवभृथीं जेव्हां॥ २४४॥**
**तेव्हां भूतें विषय करणें। हें वेगळालें कांहीं न म्हणे। आघवें एकचि ऐसें जाणे। आत्मबुद्धि॥ २४५॥**
**जैसा चेइला तो अर्जुना। म्हणे स्वप्नींची हे विचित्र सेना। मीचि जाहालों होतों ना। निद्रावशें॥ २४६॥**
**आतां सेना ते सेना नव्हे। हें मीच एक आघवें। ऐसें एकत्वें मानवें। विश्व तया॥ २४७॥**

**अर्थ**—हें अग्निहोत्राचें अनुष्ठान पूर्ण झालें असतां, अज्ञान निःशेष नाश पावतें. यजन व यजन करणारा हा भेदहि राहत नाही. एक समरस आत्मस्वरूपाच्या ठिकाणीं जीवरूप यजमान जेव्हा अवभृथ स्नान करितो म्हणजे अद्वैत आत्म्याशीं ऐक्य पावतो.॥ २४४॥ तेव्हां पंचमहाभूतें, विषय, इंद्रियें यांचें वेगळे अस्तित्व व वस्तुत्वच अनुभवाला येत नाही. एक आत्माकार बुद्धि राहते व त्या बुद्धीने तो सर्व आत्मस्वरूपच पाहतो.॥ २४५॥ ज्याप्रमाणे जागा झालेला पुरुष मीच निद्रावश होऊन स्वप्नांतील नाना प्रकारचें सेनारूप झालों होतो, असें म्हणतो.॥ २४६॥ आतां माझ्याहून जी सेना वस्तु निराळी वाटत होती ती सेनावस्तु निराळी नाही, सर्व मीच एक होतो, असें जागा झालेल्या पुरुषाला जसें वाटतें, त्याप्रमाणे ज्ञानी पुरुषाला सर्व विश्व मीच आहे असें अद्वैतज्ञान होते.॥ २४७॥

**गूढार्थदीपिका**—आत्मज्ञानाने नामरूपांचा नाश न होतां, नामरूपें ह्या भिन्न वस्तु आहेत अशी भ्रमाने जी कल्पना होती तिचाच नाश होतो व नामरूपाचे आत्म्याशीं ऐक्य होतें— म्हणजे नामरूपासह मी एक सच्चिदानंद आत्मस्वरूप आहे असा ज्ञान्याला अनुभव येतो. हा या वरील ओव्यांचा भाव आहें. याचें विवेचन मागें सातव्या अध्यायांत आलें आहे व तेच माऊलीनी येथे पुनः सांगितलें आहे.

**मग तो जीवु हे भाष सरे। आब्रह्म परमात्मबोधें भरे। ऐसे भजती ज्ञानाध्वरें। एकत्वें येणें॥ २४८॥**

**अर्थ**—मग जीव हें नांवच राहत नाही. तृणापासून तर ब्रह्मदेवापर्यंत सर्व सृष्टि त्याला सगुण परमेश्वर स्वरूप भासते. याप्रमाणे सर्व नामरूपाने एक परमात्माच आहे अशा ज्ञानयज्ञाने ते माझें भजन करतात.॥ २४८॥

**गूढार्थदीपिका**—वरील श्लोकांत एकत्वाने, पृथकत्वाने व विश्वतोमुखाने असे ज्ञानयज्ञाने भगवंताची उपासना करण्याचे तीन प्रकार सांगितले आहेत. त्यापैकी एकत्वाने उपासना करण्याचा पहिला प्रकार श्रीमाऊलींनी ओवी २३९-२४८ पर्यंत सांगितला आहे.

एकत्वाने म्हणजे आपल्यासह सर्व नामरूपाने एक परमात्मा किंवा मीच नटलों आहे असें जाणून व नामरूपाचें अनेकत्व सोडून केवळ एका परमेश्वराचे किंवा आत्मस्वरूपाचें ध्यान ठेविलें जातें.

**अथवा अनादि हें अनेक। जें आनासारिखें एका एक। आणि नामरूपादिक। तेंही विषम॥ २४९॥**
**म्हणोनि विश्व भिन्न भिन्न। परि न भेदे तयांचें ज्ञान। जैसे अवयव तरी आन आन। परि एकेचि देहींचें॥ २५०॥**
**कां शाखा सानिया थोरा। परि आहाति एकाचिये तरुवरा। बहु रश्मि परि दिनकरा। एकाचे जेवीं॥ २५१॥**
**तेविं नानाविधा व्यक्ती। आनानें नामें आनानी वृत्ती। ऐसें जाणती भेदलां भूतीं। अभेदा मातें॥ २५२॥**
**येणें वेगळालेपणें पांडवा। करिती ज्ञानयज्ञु बरवा। जे न भेदती जाणिवा। जाणते म्हणउनी॥ २५३॥**

**अर्थ**—किंवा जे हे पदार्थ एकमेकाला दुसऱ्या पदार्थासारखे आहेत, तें त्यांचें अनेकत्व अनादि आहे व त्यांचें नामरूपादिक हेहि निरनिराळे आहेत. ॥ २४९ ॥ म्हणून जगांत भिन्नता दिसून येते, पण त्यांचें ज्ञान भिन्न होत नाही (म्हणजे निरनिराळ्या पदार्थाचें निरनिराळे स्वतंत्र अस्तित्व व वस्तुत्व आहे असे त्यांना ज्ञान होत नाही). ज्याप्रमाणे निरनिराळे अवयव भासत असले तरी ते एका शरीराचेच असतात त्याप्रमाणे एकाच मज परब्रह्माचे ठिकाणीं नामरूपामुळे नानात्वाचा भास होतो, पण त्यासह ते एकच परब्रह्म समजतात. ॥ २५० ॥ किंवा लहान मोठ्या डाहाळ्या असल्या तरी त्या एकाच झाडाच्या असतात किंवा अनेक किरणें असलीं, तरी तीं एका सूर्याचींच असतात. ॥ २५१ ॥ त्याप्रमाणे नानाप्रकारच्या व्यक्ती त्यांचीं निरनिराळीं नावें व निरनिराळे स्वभाव असले तरी त्या सर्वांचे ठिकाणीं एक परमात्माच भरला आहे असे ते पाहत असतात. ॥ २५२ ॥ अर्जुना! अशा या वेगवेगळेपणाने ते ज्ञानयज्ञ करीत असले, तरी ते माझें एकपण जाणत असल्यामुळे ते ज्ञानांत भेद करीत नाहीत. ॥ २५३ ॥

**गूढार्थदीपिका**—येणे वेगळेपणें-म्हणजे अशा वेगवेगळ्या रूपाने, जाणते म्हणऊनि-म्हणजे माझें एकपण जाणत असल्यामुळें, जे न भेदती जाणिवा-म्हणजे पदार्थाचे अस्तित्व ग्रहण करीत नाहीत.

येथे ओवी २४९ ते २५३ पर्यंत श्रीमाऊली ज्ञानयज्ञाचा दुसरा (म्हणजे पृथकत्वाने यजन करण्याचा) यजन प्रकार सांगत आहेत.

या प्रकारांत इंद्र, सोम, सूर्य इत्यादि ज्या उपास्य देवता सांगितल्या आहेत, त्या त्या स्वरूपाने एक परमात्माच अवस्थित आहे किंवा त्या स्वरूपांत एक परमात्माच प्रगट झाला आहे, असें ध्यान ठेवून त्या देवतांची उपासना केली जाते.

**ना तरी जेधवां जिये ठायीं। देखती कां जें जें कांहीं। तें मीवांचूनि नाहीं। ऐसाचि बोधु॥ २५४॥**

**अर्थ**—किंवा जेव्हा जेव्हा व जेथे जेथे जे कांही ते पाहतात ते सर्व परमात्माच आहे असेच त्यांचें ज्ञान असतें. ॥ २५४ ॥

**पाहें पां बुडबुडा जेउता जाये। तेउतें जळचि एक तया आहे। मग विरे अथवा राहे। तऱ्ही जळाचिमाजीं॥ २५५॥**
**कां पवनें परमाणु उचलले। ते पृथ्वीपणावेगळे नाहीं गेले। आणि माघौतें जरी पडले। तरी पृथ्वीचिवरी॥ २५६॥**
**तैसें भलतेथ भलतेणें भावें। भलतेंही न हो अथवा होआवें। परि तें मी ऐसें आघवें। होऊनि ठेलें॥ २५७॥**
**अगा हे जेव्हडी माझी व्याप्ती। तेव्हडीचि तयांचि प्रतीती। ऐसें बहुधाकारीं वर्तती। बहुचि होउनि॥ २५८॥**

**अर्थ**—हे पहा अर्जुना! पाण्यावर उठलेला बुडबुडा जेथे जातो तेथे त्याला एक पाणीच असते. तो राहिला किंवा नाहीसा झाला तरी पाण्यांतच राहतो. ॥ २५५ ॥ किंवा वाऱ्याने मातीचे कण उडले तरी ते मातीहून अलग होत नाहीत ते मातीरूपच असतात आणि खालीं पडले तरी मातीवरच पडतात. ॥ २५६ ॥ त्याप्रमाणें कोठेहि, कोणत्याहि भावानें व कोणत्याहि रूपाने असोत किंवा नसोत पण ते सर्व मीच (परमेश्वरच) आहें असे पाहतात. ॥ २५७ ॥ बा अर्जुना! मी जितका व्यापक आहे तितकाच त्यांचा अनुभवहि व्यापक असतो आणि तसें ते सर्वरूपाने सर्व होऊन राहतात. ॥ २५८ ॥

**गूढार्थदीपिका**—हा तिसरा यजनप्रकार (म्हणजे विश्वतोमुखाने यजन करण्याचा प्रकार) माऊलींनी ओवी २५३ ते २५८ मध्यें वर्णन केला आहे. या यजनप्रकारांत सर्व नामरूपासह एक सच्चिदानंद परमात्माच सर्वत्र सर्वभावाने प्रगट झाला आहे, असें समजलें जात असल्यामुळें अशा प्रत्ययांत ग्राह्य किंवा त्याज्य असें कांही उरत नाही; म्हणून यांत भजन न करतांहि भजन होतें.

**हें भानुबिंब आवडे तया। सन्मुख जैसें धनंजया। तैसे ते विश्वा या। समोर सदा॥ २५९॥**

**अर्थ**—अर्जुना! हें सूर्यबिंब ज्याप्रमाणें वाटेल त्याच्यासमोर असते, त्याप्रमाणे भगवंताच्या सर्व व्यापक स्वरूपाहून ते निराळे राहत नसल्यामुळे भगवंताप्रमाणे सदा सर्वदा ते या विश्वांतील सर्व जीवाच्या दृष्टीसमोर आहेच. ॥ २५९ ॥

**गूढार्थदीपिका**—सगुण परमात्मा एकदेशीय दिसत असला तरी सर्वत्र अणुरेणूंतहि व्यापून असल्यामुळे तो सर्व जीवाच्या समोरच असतो, म्हणून समोरच्या पदार्थावर भगवद्भावना दृढ झाली असतां तेथे तो तात्काळ प्रगट होऊं शकतो. (उदा. खांबात नरसिंहरूपाने भगवान् प्रगट झाले) त्याचप्रमाणे संतहि एकदेशीय दिसत असले तरी सर्वत्र व्यापक असल्यामुळे जो जेथे त्यांची दृढ भावना करील तेथे ते प्रगट होऊं शकतात.

**अगा तयांचिया ज्ञाना। पाठी पोट नाहीं अर्जुना। वायु जैसा गगना। सर्वांगीं असे॥ २६०॥**
**तैसा मी जेतुला आघवा। तेंचि तुक तयांचिया सद्भावा। तरी न करितां पांडवा। भजन जहालें॥ २६१॥**
**एऱ्हवीं तरी सकळ मीचि आहें। तरी कवणी कें उपासिला नोहें। एथ एके जाणणेवीण ठाये। अप्राप्तासी॥ २६२॥**
**परि तें असो येणें उचितें। ज्ञानयज्ञें यजितसांते। उपासिती मातें। तें सांगितले॥ २६३॥**
**अखंड सकळ हें सकळां मुखीं। सहज अर्पत असे मज एकीं। कीं नेणणेयासाठीं मूर्खीं। न पविजेचि मातें॥ २६४॥**

**अर्थ**—बा अर्जुना! त्या महात्म्यांच्या ज्ञानाला पाठ व पोट किंवा वरची बाजू व खालची बाजू असा भेद नसतो. ज्याप्रमाणे वायु हा आकाशाच्या सर्व आंगाचे ठिकाणीं राहतो. ॥ २६० ॥ त्याप्रमाणे मी जेवढा व्यापक आहे तेच व्यापकतेचे प्रमाण त्यांच्या झालेल्या ब्रह्मभावाचें असतें; म्हणून भजन न करितांहि तें माझें भजन होतें. ॥ २६१ ॥ नाही तरी सर्व मीच असल्यामुळे कोणाकडून माझी उपासना होत नाही? अशा स्थितीत माझ्या व्यापक स्वरूपाची एक जाणीव नसल्यामुळे त्यांना (अज्ञान्यांना) माझें भजन घडत नाही. ॥ २६२ ॥ परंतु तें असो. या योग्य अशा ज्ञानयज्ञाने यजन करीत जे माझी उपासना करतात त्यांचें वर्णन मी केलें॥ २६३ ॥ अखंड सर्वांच्या द्वारा जेवढें कांही कर्म होतें, तें सर्व एका मलाच अर्पण होत असतें, पण मूर्ख लोक हें जाणत नसल्यामुळें, ते माझें यजन करीत असूनहि मला प्राप्त होत नाहीत. ॥ २६४ ॥

**गूढार्थदीपिका**—यच्चयावत् नामरूपाने एक भगवानच व्यक्त झाला आहे. हें न जाणतां जीव त्याचें ठिकाणीं सृष्टीची दृढ कल्पना करतो या केवळ कल्पनेमुळेंच त्याला भगवंतांची प्राप्ती होत नाही हें माऊलींनी वरील ओव्यांतून सांगितलें आहे.

**अवतरणिका—एक परमात्माच सर्व वस्तुमात्र कसा नटला आहे याचें वर्णन भगवान स्वमुखाने करतात.**

**अहं क्रतुरहं यज्ञः स्वधाहमहमौषधम्। मन्त्रोऽहमहमेवाज्यमहमग्निरहं हुतम्॥ १६॥**

**अर्थ**—मीच श्रौतयज्ञ होय. मीच स्मार्तयज्ञहि आहे. मीच स्वधा म्हणजे पितरांना दिलें जाणारें अन्न असून, मीच औषधि म्हणजे सर्व प्राण्यांचें भक्ष्यस्थान आहे. मीच मंत्र असून, मीच घृत आहे. मीच अग्नि मीच हवन केलें जाणारें द्रव्य आहे. ॥ १६ ॥

**तोचि जाणिवेचा जरी उदयो होये। तरी मुदल वेदु मीचि आहे। आणि तो विधानातें जया विये। तो क्रतुही मीचि॥ २६५ ॥**
**मग तया कर्मापासूनि बरवा। जो सांगोपांगु आघवा। यज्ञु प्रगटे पांडवा। तोहि मी गा॥ २६६॥**
**स्वाहा मी स्वधा। सोमादि औषधी विविधा। आज्य मी समिधा। मंत्रु मी हवि॥ २६७॥**
**होता मी हवन कीजे। तेथ अग्नी तो स्वरूप माझें। आणि हुत वस्तु जें जें। तेंही मीचि॥ २६८॥**

**अर्थ**—अर्जुना! तोच जर पूर्ण ब्रह्मज्ञानाचा अंत:करणांत प्रकाश पडला तर असें कळून येतें की वेद मूळात मीच आहे आणि त्या वेदाने जे श्रौतयज्ञाचें विधान म्हणजे कर्मानुष्ठान सांगितलें तो श्रौतयज्ञहि मीच आहे. ॥ २६५ ॥ मग त्या कर्मानुष्ठानापासून जो अंगउपांगासह यज्ञ सिद्ध होतो तो यज्ञहि मीच आहे. ॥ २६६ ॥ (देवांना स्वाहा शब्द म्हणून हवि दिला जातो) तो स्वाहा मीच आहे. (पितरांना अर्पण करावयाचें तें स्वधा

या शब्दाने अर्पण केलें जातें) तो स्वधा मी आहे. सोमादि नानाप्रकारच्या हवनीय वनस्पती, घृत, समिधा, मंत्र, हवनीय द्रव्य, हें सर्व मीच आहे. ॥ २६७ ॥ हवन करणारा व हवन जेथे केलें जातें तो अग्नि माझेंच स्वरूप होय आणि सर्व हवनीय वस्तु मीच आहे. ॥ २६८ ॥

**गूढार्थदीपिका**—अज्ञानी सर्व नामरूपाला भिन्न भिन्न जडविनाशी वस्तुरूपाने पाहतो व ज्ञानी सर्व नामरूपाला ब्रह्मदृष्टीने पाहतो असा या ओव्यांचा आशय आहे.

**पिताहमस्य जगतो माता धाता पितामहः। वेद्यं पवित्रमोङ्कार ऋक्साम यजुरेव च॥ १७॥**

**अर्थ**—मीच या जगाचा पिता असून माता, धाता म्हणजे जगांचें धारण करून पोषण करणारा व पित्याचाहि पिता मींच आहे. वेद्य जें कांही आहे तें मीच असून पवित्रहि मीच आहे. ॐकार मीच असून ऋग्वेद, सामवेद, यजुर्वेद मीच आहे. ॥ १७ ॥

**पैं जयाचेनि अंगसंगे। इये प्रकृतीस्तव अष्टांगें। जन्म पाविजत असे जगें। तो पिता मी गा॥ २६९॥**

**अर्थ**—तसेंच ज्याचा अंगसंग झाला असतां प्रकृती पासून अष्टविध अपरा कार्यप्रकृति व जगत उत्पन्न होते तो जगाचा पिता मीच आहे. ॥ २६९ ॥

**गूढार्थदीपिका—पिता मी गा**—म्हणजे पित्याप्रमाणे जग उत्पन्न करणारा. एकजीववादाप्रमाणे किंवा दृष्टिसृष्टिवादाप्रमाणे जीवच जगाची कल्पना करणारा पिता आहे, पण "अनेन जीवेन आत्मनानुप्रविश्य नामरूपे व्याकरवाणि" इत्यादि श्रुतीवर जीव वस्तु रूपाने प्रतीत होतो, म्हणून भगवंतांनी मी जीवरूपाने जगताचा पिता आहे, असें सांगितलें आहे.

**अर्धनारीनटेश्वरीं। जो पुरुष तोचि नारी। तेविं मी चराचरीं। माताही होय॥ २७०॥**

**अर्थ**—अर्धनारी नटेश्वराच्या ठिकाणीं ज्याप्रमाणे जो पुरुष असतो तोच स्त्री झालेला असतो, त्याप्रमाणे या चराचर विश्वाची माताहि मींच आहे. ॥ २७० ॥

**गूढार्थदीपिका**—माता म्हणजे मातेप्रमाणे जग प्रसवणारी प्रकृति. परमात्मा स्फुरण पावला असतां अज्ञान्याला तें भगवंताचे स्फुरण प्रकृतिरूप भासतें, म्हणून भगवंतांनी जगताची मी माता आहे, असें म्हटलें आहे.

**आणि जाहालें जग जेथ राहे। जेणें जीवित वाढत आहे। तें मीवांचूनि नोहे। आन निरुतें॥ २७१॥**

**अर्थ**—त्याप्रमाणे जन्माला आलेलें जग ज्याचें ठिकाणी राहतें व ज्याच्या योगाने त्या जगाचें आयुष्य वाढत जातें, तेंहि माझ्यायावांचून दुसरें नाही, हें अगदीं सत्य आहे. ॥ २७१ ॥

**गूढार्थदीपिका—जाहालें जगत् जेथ राहे**—म्हणजे जगताला तें परब्रह्म आधार आहे.

**जेणे जीवीत वाढत आहे**—म्हणजे ज्या परब्रह्मावर जगत् भासतें ते परब्रह्म. परब्रह्म नित्य असल्यामुळे अज्ञान्याला जगत्हि नित्य वाटतें असा अर्थ.

**इयें प्रकृतिपुरुषें दोन्ही। उपजलीं जयाचिया अमनमनीं। तो पितामह त्रिभुवनीं। विश्वाचा मी॥ २७२॥**

**अर्थ**—जीव व प्रकृति हीं दोन्ही ज्याच्या अमनमनांत म्हणजे मनरहित मनांत स्फुरली, तो सर्व जगाचा पितामह मीच आहे. ॥ २७२ ॥

**गूढार्थदीपिका—जयाचिया अमनमनीं**—परब्रह्माहून निराळ्या पदार्थाची कल्पना होणें याला मन म्हणतात. नित्य अज्ञानरहित अशा परमेश्वराचे ठिकाणीं त्याच्याहून निराळ्या वस्तुची कल्पना करणारें मन नसते; "बहु स्यां प्रजायेय" हा त्याचा संकल्प स्वरूपभूतच असतो; म्हणून त्याला अमनमनोरूप म्हटले जातें.

**पितामह त्रिभुवनीं। विश्वाचा मी**—याच संकल्पाचे ठिकाणीं अज्ञानरूप भ्रांति व भ्रांतियुक्त जग हे दोन्ही भासत असतात, म्हणून त्याला आधार असलेला परमात्मा पितामह होतो.

**आणि आघवेया जाणणेयाचिया वाटा। जया गांवा येती गा सुभटा। जे वेदांचिया चोहटां। वेद्य जें म्हणिजे॥ २७३॥**

**जेथ नानामतां बुझावणी जाहाली। एकमेकां शास्त्रांची अनोळखी फिटली। चुकलीं ज्ञानें जेथ मिळों आलीं। जें पवित्र म्हणिजे॥ २७४॥**

**अर्थ**—आणि संपूर्ण जाणण्याचे जे अनेक मार्ग शास्त्राने प्रगट केले आहेत, ते सर्व मार्ग ज्या गांवाला येऊन

पोहचतात व चारी वेदांत वेद्य म्हणजे जाणावयाचे म्हणून जें कांही सांगितलें आहे, तें मीच आहे. ॥ २७३ ॥ ज्या ठिकाणी निरनिराळ्या सर्व मताचा विरोध नाहीसा होतो, एका शास्त्रांतील प्रतिपाद्य विषयाची दुसऱ्या शास्त्रांतील प्रतिपाद्य विषयाशीं दिसून येणारी विसंगति जेथें नाहीशी होते, चुकलेलीं मते देखील जेथें मिळून जातात—म्हणजे त्यांचीहि एकवाक्यता करतां येते—आणि जे अत्यंत पवित्र म्हटलें जाते ते मीच आहें. ॥ २७४ ॥

**गूढार्थदीपिका**—''सर्वेषां च प्रस्थानकर्तृणां मुनीनां.......अद्वितीये परमेश्वरे एव तात्पर्यम्। नहि ते मुनयो भ्रांताः सर्वज्ञात्वात्तेषाम्'' (महिम्नस्तोत्र श्लो. ७ मधुसूदनीं टीका) सर्व शास्त्रकारांनी व सर्व मतप्रवर्तकांनी एका परब्रह्माचेच वर्णन केलें आहे किंवा परब्रह्माच्या प्राप्तीचा मार्ग सांगितला आहे. फरक इतकाच की, ज्याप्रमाणे एकाच गांवाला जाणाऱ्या दोन मार्गांपैकीं एक मार्ग सरळ थेट त्या गांवालाच जाणारा असतो व दुसरा मार्ग दुसऱ्या गांवावरून जाणारा असतो. त्याप्रमाणे कांही शास्त्रकारांनी साक्षात् परब्रह्मप्राप्तीचा मार्ग सांगितला आहें व कांही शास्त्रकारांनी क्रमाक्रमाने किंवा परंपरेने भगवत्प्राप्तीचा मार्ग सांगितला आहे, शास्त्रकार कांही मूर्ख नव्हते. भगवंताच्या उपासनेने भगवंताच्या कृपेला पात्र असल्यामुळें भगवंतांनी त्यांना तें तें शास्त्र निर्माण करण्याचा अधिकार दिलेला असतो.

**पैं ब्रह्मबीजा जाहला अंकुरु। घोषध्वनीनादाकारु। तयांचें गा भुवन जो ॐकारु। तोही मी गा॥ २७५॥**
**जया ॐकाराचिये कुशी। अक्षरें होती अउमकारेंसीं। जियें उपजत वेदेंसीं। उठलीं तीन्ही॥ २७६॥**
**म्हणोनि ऋग् यजुः सामु। हे तीन्ही म्हणें मी आत्मारामु। एवं मीचि कुळक्रमु। शब्दब्रह्माचा॥ २७७॥**

**अर्थ**—तसेच ब्रह्मरूपी बीजाला घोष, ध्वनि, नाद व आकार या रूपाने किंवा परा, पश्यंति, मध्यमा, वैखरी या वाणीरूपाने जो अंकुर फुटला त्याचे राहण्याचें वसतिस्थान जो ॐकार तोहि मीच आहे. ॥ २७५ ॥ ज्या ॐकाराचे पोटांत अ, उ, म अशीं अक्षरें होतीं व जीं अ, उ, म अक्षरें उपजत असतांच वेदाला घेऊन उत्पन्न झालीं॥ २७६ ॥ म्हणून ऋग्वेद, यजुर्वेद व सामवेद हे तिन्ही वेद मी आत्मारामच आहे. याप्रमाणे सर्व वैदिकवाङ्मयाची वंशपरंपरा मीच आहे. ॥ २७७ ॥

**गतिर्भर्ता प्रभुः साक्षी निवासः शरणं सुहृत्। प्रभवः प्रलयः स्थानं निधानं बीजमव्ययम्॥ १८॥**

**अर्थ**—गति म्हणजे प्रकृतीचा शेवट, भर्ता म्हणजे सर्व सृष्टीचें पोषण करणारा, प्रभु म्हणजे सर्व सृष्टीचा स्वामी, साक्षी म्हणजे अकर्ता, निवास म्हणजे सर्व सृष्टींत आंतबाहेर व्यापून असणारा, शरण म्हणजे सर्व भूतांना शरण जाण्यास योग्य, सुहृद म्हणजे सर्व भूतांचा निरपेक्ष हितकर्ता व सृष्टीची उत्पत्ति, नाश व स्थान यांचें नित्य असें बीज जेथे राहतें तें निधान, हें सर्व मीच आहे. ॥ १८ ॥

**हें चराचर आघवें। जियें प्रकृतीआंत सांठवें। ते शिणली जेथ विसवे। ते परमगती मी॥ २७८॥**
**आणि जयाचेनि प्रकृती जिये। जेणें अधिष्ठिली विश्व विये। जो येऊनि प्रकृती इये। गुणातें भोगी॥ २७९॥**
**तो विश्वश्रियेचा भर्ता। मीचि गा पंडुसुता। मी गोसावी समस्ता। त्रैलोक्याचा॥ २८०॥**
**आकाशें सर्वत्र वसावें। वायूनें नांवभरी उगें नसावें। पावकें दहावें। वर्षावें जळें॥ २८१॥**
**पर्वतीं बैसका न संडावी। समुद्रीं रेखा नोलांडावी। पृथ्वीया भूतें वाहावीं। हे आज्ञा माझी॥ २८२॥**
**म्यां बोलविल्या वेदु बोले। म्यां चालविल्या सूर्यु चाले। म्यां हालविल्या प्राणु हाले। जो जगातें चाळिता॥ २८३॥**
**मियांचि नियमिलासांता। काळु ग्रासितसे भूतां। इयें म्हणियागतें पंडुसुता। सकळें जयाचीं॥ २८४॥**
**ऐसा जो समर्थु। तो मी जगाचा नाथु। आणि गगनाऐसा साक्षिभूतु। तोही मीचि॥ २८५॥**

**अर्थ**—ही सर्व भूतसृष्टि ज्या प्रकृतींत सांठविली जाते, ती शिणलेली प्रकृति जेथे विश्रांति पावते, ती शेवटली गति मी आहे. ॥ २७८ ॥ आणि ज्याच्यामुळें प्रकृति चेतनाप्रमाणे भासते व ज्याची सत्ता मिळाली असतां जी जगाला प्रसवते व जो या प्रकृतींत येऊन त्रिगुणाचा भोग घेतो. ॥ २७९ ॥ तो या सृष्टिवैभवाचा पोषण करणारा, अर्जुना! मीच आहे. मी सर्व ब्रह्मांडाचा स्वामीं व नियंता आहे. ॥ २८० ॥ आकाशाने सर्व सृष्टीला व्यापून असावे, वायूने क्षणभरहि स्वस्थ नसावें, अग्नीने प्रकाश द्यावा व पाण्याने वर्षाव करावा. ॥ २८१ ॥ पर्वताने आपली एका ठिकाणची बैठक

सोडू नये. समुद्राने आपल्या मर्यादेचे उल्लंघन करूं नये. पृथ्वीने भूतसृष्टीचें ओझें वहावें, ही माझीच आज्ञा आहे. ॥ २८२ ॥ मी बोलवितो म्हणून वेद बोलतो, मी चालवितो म्हणून सूर्य चालतो व सर्व जगाला कार्यक्षम करणारा जो प्राण, तो मी गति देतो म्हणून वाहतो. ॥ २८३ ॥ माझ्या आज्ञेनुसारच मृत्यु प्राण्यांना खातो; हे सर्व माझ्या म्हणण्याप्रमाणे वागणारे आहेत. ॥ २८४ ॥ असा जो सर्व समर्थ, तो मी जगाचा स्वामी आहे आणि कांही न करतां किंवा करवितां असा साक्षी होऊन राहणाराहि मीच आहे. ॥ २८५ ॥

**गूढार्थदीपिका**—हे सर्व धर्म भगवंताचे ठिकाणीं आरोपित आहेत असा वेदान्तसिद्धान्त आहे.

**इहीं नामरूपीं आघवा। जो भरला असे पांडवा। आणि नामरूपांही वोल्हावा। आपणचि जो॥ २८६ ॥**
**जैसें जळाचे कल्लोळ। आणि कल्लोळीं आथी जळ। ऐसेनि वसवीतसे सकळ। तो निवासु मी॥ २८७॥**
**जो मज होय अनन्य शरण। त्याचें निवारीं मी जन्ममरण। यालागीं शरणागता शरण्य। मीचि एकु॥ २८८ ॥**
**मीचि एक अनेकपणें। वेगळालेनि प्रकृतिगुणें। जीत जगाचेनि प्राणें। वर्तत असें॥ २८९ ॥**
**जैसा समुद्र थिल्लर न म्हणतां। भलतेथ बिंबे सविता। तैसा ब्रह्मादि सर्वां भूतां। सुहृद तो मी॥ २९० ॥**
**मीचि गा पांडवा। या त्रिभुवनासि वोलावा। सृष्टिक्षयप्रभवा। मूळ तें मी॥ २९१ ॥**
**बीज शाखांतें प्रसवे। मग तें रूखपण बीजीं सामावे। तैसें संकल्पें होय आघवें। पाठीं संकल्पीं मिळे॥ २९२ ॥**
**ऐसें जगाचें बीज जो संकल्पु। अव्यक्त वासनारूपु। तया कल्पांतीं जेथ निक्षेपु। होय तें मी॥ २९३ ॥**
**इयें नामरूपें लोटती। वर्णव्यक्ती आटती। जातीचे भेद फिटती। जैं आकारु नाहीं॥ २९४ ॥**
**तैं संकल्पुवासनासंस्कार। माघौतें रचावया आकार। जेथ राहोनि असती अमर। तें निधान मी॥ २९५ ॥**

**अर्थ**—अर्जुना! या संपूर्ण नामरूपांत जो भरला आहे व जो आपण नामरूपाचा जिव्हाळाहि आहे—म्हणजे नामरूपाला जें अस्तित्व आहे तें त्याचीच सत्ता होय. ॥ २८६ ॥ ज्याप्रमाणें पाण्याचेच तरंग होतात आणि तरंगांत पाणीच असतें, अशाप्रमाणें सर्व सृष्टि आपल्या ठिकाणीं जो धारण करतो, तो निवास मीच आहे. ॥ २८७ ॥ जो सर्वांचा आश्रय सोडून मला शरण आला, त्याचे जन्ममृत्यु मी नाहीसे करतो; म्हणून शरण जाणाऱ्यांना मीच एक शरण जाण्याला योग्य आहे. ॥ २८८ ॥ अर्जुना! प्रकृतीच्या वेगवेगळ्या गुणामुळें अनेकपणाने मीच भासतो व जगाचा प्राण जो मी त्या माझ्यामुळें जिवंत असे राहतात. ॥ २८९ ॥ ज्याप्रमाणे हा समुद्र आहे की डबकें आहे याचा विचार न करितां कोठेहि पाण्यात प्रतिबिंब पडतें, त्याप्रमाणें ब्रह्मादि सर्व भूतांचा अनादि निरपेक्ष हितकर्ता मीच आहे. ॥ २९० ॥ अर्जुना! या सर्व ब्रह्मांडाचा जिव्हाळा मीच असून सृष्टीच्या उत्पत्तिस्थितिलयाचें मूळहि मीच आहे. ॥ २९१ ॥ ज्याप्रमाणें बीजापासून फांद्या उत्पन्न होऊन वृक्ष होतो व पुन: तो वृक्ष बीजांत लीन होतो, त्याप्रमाणें संकल्पापासून सृष्टी होते व पुन: ती सृष्टी संकल्पांतच लीन होते. ॥ २९२ ॥ याप्रमाणें अव्यक्त वासनारूप जो जगाचा बीजभूत संकल्प आहे, तो सृष्टिप्रळयाचे वेळीं जेथें ठेविला जातो तें ठिकाण मीच आहे. ॥ २९३ ॥ हीं सर्व नामरूपें नाहीशीं होतात, वर्णव्यक्तिहि राहत नाहीत, जातीचे जे भेद तेहि नाहीसे होतात व जेंव्हा आकार संपूर्ण लुप्त होतो. ॥ २९४ ॥ तेव्हा पुन: सृष्टीची उत्पत्ति करण्याकरितां सृष्टीचें कारणरूप संकल्प, वासना, संस्कार जेथे नाश न पावतां राहतात, तें निधान मी आहे. ॥ २९५ ॥

**गूढार्थदीपिका**—सच्चिदानंद परब्रह्माचे ठिकाणीं त्रिगुणात्मक मायेने भ्रांत झालेल्या जीवाच्या कल्पनेनुसार सृष्टि उत्पन्न होते हें माऊलींनी मागें सांगितलेंच आहे. पण त्या सृष्टीला कारण असणारी अविद्या, संस्कार इत्यादि कारणसामुग्रीहि ब्रह्मज्ञान होईपर्यंत नाश पावत नाही, हा आम्ही मागें सांगितलेला विचार माऊलींनीं येथे स्पष्ट केला आहे.

**तपाम्यहमहं वर्षं निगृह्णाम्युत्सृजामि च। अमृतं चैव मृत्युश्च सदसच्चाहमर्जुन॥ १९ ॥**

अर्थ—अर्जुना! मीच सूर्य होऊन तापतो, त्यामुळे उष्णता किरणाचे रूपाने उत्पन्न होते, त्या उष्णतेमुळे मी पाणी शोषून घेतो व पुन: पाण्याचा वर्षाव करितो, अमरत्व, मृत्यु, सत्, असत्, कार्य, कारण या रूपानेहि मीच असतो. ॥ १९ ॥

**मी सूर्याचेनि वेषें। तपें तैं हें शोषे। पाठीं इंद्र होऊनि वर्षे। तैं पुढती भरे॥ २९६॥**
**अग्नि काष्ठें खाये। तें काष्ठचि अग्नि होये। तैसें मरतें मारितें पाहें। स्वरूप माझें॥ २९७॥**
**यालागीं मृत्यूच्या भागीं जें जें। ते तेंही पैं रूप माझें। आणि न मरतें तंव सहजें। अविनाश मी॥ २९८॥**
**आतां बहु बोलोनि सांगावें। तें एकिहेळां घे पां आघवें। तरी सतासतही जाणावें। मीचि पैं गा॥ २९९॥**

**अर्थ—**मी सूर्याच्या रूपानें जेव्हा तपतो जेव्हा हें सर्व शोषून घेतो आणि पुन: इंद्र या रूपाने वर्षाव करितो तेव्हा सर्व पुन: भरून जातें. ॥ २९६ ॥ ज्याप्रमाणे अग्नीने लांकूड जाळलें की लाकूडच अग्नि होतें, त्याप्रमाणे मरणारा मारणारा ही दोन्ही माझींच रूपें आहेत. ॥ २९७ ॥ म्हणून जें जें मृत्यूने ग्रासिलें आहे तें मीच आहे आणि न मरणारे म्हणजे अविनाशी जें आहे ते तर स्वभावत: मीच आहे. ॥ २९८ ॥ आतां विस्ताराने जें सांगायचें ते एकदाच सांगतो. जेवढे कांही सत्-असत् म्हणजे आहे-नाही म्हटलें जातें किंवा व्यक्त-अव्यक्त आहे अथवा अविनाशी व विनाशी आहे तें सर्व मीच आहे. ॥ २९९ ॥

**गूढार्थदीपिका—**या ओव्यांचा आशय हा आहे की भगवान नित्य सच्चिदानंद स्वरूपच आहे. देवता मनुष्य इत्यादिक व त्यांचीं कार्य हे सर्व जीवाने भगवंताचे ठिकाणीं कल्पिले आहेत; म्हणून एक भगवानच सर्व स्वरूपाने भासतो.

**म्हणोनि अर्जुना मी नसें। ऐसा कवणु ठाव असे। परि प्राणियांचें दैव कैसें। जे न देखती मातें॥ ३००॥**
**तरंग पाणियेवीण सुकती। रश्मि वातीवीण न देखती। तैसे मीचि ते मी नव्हती। विस्मो देखें॥ ३०१॥**
**हें आंत बाहेर मियां कोंदलें। जग निखिल माझेंचि वोतिलें। कीं कैसें कर्म तयां आले। जे मीचि नाहीं म्हणती॥ ३०२॥**
**परि अमृतकुहां पडिजे। कां आपणयातें कडिये काढिजे। ऐसें आथी काय कीजे। अप्राप्तासी॥ ३०३॥**
**ग्रासा एका अन्नासाठीं। अंधु धांवताहे किरीटी। आडळला चिंतामणि पायें लोटी। आंधळेपणें॥ ३०४॥**
**तैसें ज्ञान जैं सांडूनि जाये। तैं ऐसी हे दशा आहे। म्हणोनि कीजे तें केलें नोहे। ज्ञानेंवीण॥ ३०५॥**
**आंधळेया गरुडाचे पांख आहाती। ते कवणा उपेगा जाती। तैसें सत्कर्माचे उपखे ठाती। ज्ञानेंवीण॥ ३०६॥**

**अर्थ—**म्हणून अर्जुना! मी नाही असें कोणतें ठिकाण आहे सांग पाहूं. पण प्राण्यांचें दुर्दैव पहा कसें आहे, सर्वत्र मीच असून ते मला पाहत नाहीत. ॥ ३०० ॥ पाण्यावांचून तरंग आटावे किंवा सूर्याच्या किरणाला वातीच्या प्रकाशावांचून दिसूं नये, त्याप्रमाणे सर्व जीव मद्रूपच आहेत, पण त्यांना तसे वाटत नाही, कसें आश्चर्य आहे पहा. ॥ ३०१ ॥ या जगाच्या आंतबाहेर मींच व्यापून आहे. एवढेंच नाही, तर संपूर्ण जग माझीच ओतलेली मूर्ति आहे, पण असें असून सुद्धा प्राण्यांचे दुर्दैव आड आल्यामुळे मीच नाहीं, असें ते म्हणतात. ॥ ३०२ ॥ सुदैवाने एखाद्याने अकस्मात अमृताच्या विहिरींत पडावें व आपल्यालाच बाहेर काढावें. अमृताची प्राप्ति व्हावयाची नसते म्हणून असें होत असतें त्याला काय करणार ?॥ ३०३ ॥ हे अर्जुना! आंधळा भिकारी एका घांसभर अन्नाकरितां दारोदार धांवतो आणि समोर पडलेला चिंतामणि आंधळेपणाने न दिसल्यामुळे पायाने लाटतो. ॥ ३०४ ॥ त्याप्रमाणे ज्यांना यथार्थ ज्ञान नाही, त्यांची अशीच दशा होते. म्हणून जीवाकडून ज्ञान नसतांना जें केलें जातें तें योग्य केलें जात नाही. ॥ ३०५ ॥ आंधळ्या गरुडाला पंख असले तरी त्याला त्याचा काय उपयोग होणार ? त्याप्रमाणे ज्ञानावाचून सत्कर्माचे श्रम व्यर्थ जातात. ॥ ३०६ ॥

**गूढार्थदीपिका—**वास्तविक पाहतां भगवानच सर्व नामरूपाने नटला आहे. त्यावांचून दुसरी वस्तुच नाही. जीवाला हें ज्ञान नसल्यामुळें तो प्रत्येक नामरूपाचे ठिकाणीं परमेश्वराहून भिन्न वस्तूची कल्पना करतो, या नुसत्या कल्पनेमुळेच अत्यंत प्राप्त असलेला परमात्मा जीवाला अप्राप्त झाला आहे, हेंच माउलींनी या ओव्यांतून सांगितलें आहे.

**त्रैविद्या मां सोमपा: पूतपापा यज्ञैरिष्ट्वा स्वर्गतिं प्रार्थयन्ते। ते पुण्यमासाद्य सुरेन्द्रलोकमश्नन्ति दिव्यान्दिवि देवभोगान्॥ २०॥**

**अर्थ—**ज्यांनी ऋग्वेदादि तिन्ही वेदांचें अध्ययन केलें आहे व सोमपान करून निष्पाप झाले आहेत, असे

पुरुष यज्ञानी माझें यजन करून स्वर्गप्राप्ति व्हावी म्हणून माझी प्रार्थना करतात. ते पुण्यकारक अशा इंद्रलोकांस प्राप्त होऊन तेथे (स्वर्गांत) देवांचे अलौकिक भोग भोगतात. ॥ २० ॥

**देख पां गा किरीटी। आश्रमधर्मांचिया राहाटी। विधिमार्गा कसवटी। जे आपणचि होती॥ ३०७॥**
**यजन करितां कौतुकें। तिहीं वेदांचा माथा तुके। क्रिया फळेंसि उभी ठाके। पुढां जयां॥ ३०८॥**
**ऐसे दीक्षित जे सोमप। जे आपणचि यज्ञाचें स्वरूप। तिहीं तया पुण्याचेनि नांवें पाप। जोडिलें देखें॥ ३०९॥**
**जे श्रुतित्रयातें जाणोनि। शतवरी यज्ञ करूनि। यजिलिया मातें चुकोनि। स्वर्गु वरिती॥ ३१०॥**
**जैसें कल्पतरुतळवटीं। बैसोनि झोळिये देतसे गांठी। मग निदैव निघे किरीटी। दैन्यचि करूं॥ ३११॥**
**तैसे शतक्रतूं यजिलें मातें। कीं ईप्सिताति स्वर्गसुखांतें। आतां पुण्य कीं हें निरुतें। पाप नोहे॥ ३१२॥**
**म्हणोनि मजवीण पाविजे स्वर्गु। तो अज्ञानाचा पुण्यमार्गु। ज्ञानिये तयातें उपसर्गु। हानि म्हणती॥ ३१३॥**
**एऱ्हवीं तरी नरकींचें दुःख। पावोनि स्वर्गा नाम कीं सुख। वांचूनि नित्यानंद गा निर्दोष। तें स्वरूप माझें॥ ३१४॥**
**मज येतां पैं सुभटा। या द्विविधा गा अव्हांटा। स्वर्गु नरकु या वाटा। चोरांचिया॥ ३१५॥**

**अर्थ**—बा अर्जुना! पहा, आश्रमधर्माचें अनुष्ठान करीत असतांना जें आपणच प्रत्यक्ष विधिमार्गाची कसोटी बनतात—(म्हणजें ज्यांच्या आश्रमधर्माप्रमाणे वागण्यावरून यथार्थ विधिमार्गाचें आचरण कसें करावें हें कळतें) ॥ ३०७॥ ते यजन करीत असतांना तिन्ही वेद कौतुकाने डोलूं लागतात. ज्याची झालेली यज्ञक्रिया फळासह साक्षात् त्यांच्यापुढे उभी राहते. ॥ ३०८॥ याप्रमाणे यज्ञाकरितां दीक्षा घेऊन सोमपान करणारे जे आपण साक्षात् यज्ञाचें स्वरूपच आहेत. पण त्यांनी, अर्जुना! पुण्याचे नांवाने पापाचीच जोडी केली असें समज. ॥ ३०९॥ कारण ते ऋग्वेदादि तीन वेदांचें अध्ययन करून असे शेकडों यज्ञ करून माझें यजन करतात, पण मला सोडून स्वर्गाला जातात. ॥ ३१०॥ ज्याप्रमाणे कल्पतरूच्याखाली एखाद्याने बसून झोळीला गांठ द्यावी, मग त्या झोळींत कांहीच न पडल्यामुळें त्या दुर्दैवी प्राण्याने भीक मागायला निघावें. ॥ ३११॥ त्याप्रमाणे शंभर यज्ञ करून माझें यजन केलें व स्वर्गप्राप्तीची इच्छा मनांत धरिली, अर्जुना! सांग हे आतां पुण्य म्हणावें काय? खरोखर पाप नव्हे काय!॥ ३१२॥ म्हणून मला सोडून स्वर्गाची प्राप्ति होणे हा अज्ञानी मूर्खाचा पुण्यमार्ग होय. ज्ञानी किंवा जाणते जे आहेत ते मात्र स्वर्गप्राप्तीला, भगवत्प्राप्तीची हानी करणारीं म्हणजे भगवत्प्राप्तीला प्रतिबंध करणारी समजतात. ॥ ३१३॥ खरोखर पाहतां नरकातील दुःखाचे अपेक्षेने स्वर्गाला सुख हें नांव आहे. नरकांतील दुःख व स्वर्गातील क्षणिक सुख हे दोन्ही सोडून निर्दोष दुःखरहित असा जो नित्यानंद तें माझें स्वरूप आहे. ॥ ३१४॥ हें उत्तम योद्ध्या अर्जुना? माझ्याकडे येण्याच्या वाटेला लागलें असतां हे दोन आड मार्ग आहेत. स्वर्ग नरक या वाटा चोरांच्या म्हणजे आत्मचोरांच्या आहेत. ॥ ३१५॥

**गूढार्थदीपिका**—चोरी म्हणजे अपल्या मालकीची वस्तु आपल्यापासून न कळत दूर करणें. आत्मा हा जीवाचीच मूळ वस्तु आहे. स्वर्गप्राप्तीचीं पुण्यकर्मे व नरकप्राप्तीची पापकर्मे करून जीव हा आपल्या आत्मरूप मूळ स्वरूपाला विसरला-म्हणजे आपल्या मूळ स्वरूपाला दूर केलें म्हणून जीवाने आपल्या मूळ स्वरूपाची चोरी केली यास्तव तो आत्मचोर आहे.

**स्वर्गा पुण्यात्मकें पापें येइजे। पापात्मकें पापें नरका जाइजे। मग मातें जेणें पाविजे। तें शुद्ध पुण्य॥ ३१६॥**

**अर्थ**—ज्याला अज्ञानी लोक पुण्य म्हणतात, पण ज्याच्या योगाने परमेश्वर प्राप्ति होत नाही, म्हणून जें खरोखर पाप होय, त्या पुण्यरूप पापाने स्वर्गालां येतात व ज्याला अज्ञानी लोक पाप म्हणतात व ज्यायोगे परमेश्वर प्राप्ति होत नाही व पुनः नरकाला जावें लागतें म्हणून जें पापरूप पाप आहे, त्या पापरूप पापाने नरकाला जातात, पण अर्जुना! ज्याच्या योगाने माझी प्राप्ति होते तेंच शुद्ध पुण्य होय. ॥ ३१६॥

**गूढार्थदीपिका**—''प्रतिकूलवेदनीयं दुःखम्'' मनाच्या प्रतिकूल जें असतें त्याच्या योगाने दुःख होतें, नरकांतील यातना मनाला प्रतिकूल असतात म्हणून दुःखरूप आहेतच, पण ज्या पुण्याने स्वर्गांतील सुख प्राप्ति होतें तें सुखहि अल्पकाळ टिकणारें असल्यामुळें ''दुःखमल्पसुखं स्मृतम्'' तेंहि मनाच्या प्रतिकूल असल्यामुळें दुःखरूपच

आहे. दु:ख हें पापाचें फळ आहे. म्हणून येथें स्वर्गांतील सुखाला पुण्यरूप पाप व नरकांतील दु:खाला पापरूप पाप म्हटलें आहे. अर्थात् भगवंताची प्राप्ति अखंड सुखरूप असल्यामुळें ज्या कर्माने ती प्राप्ति होते तें शुद्ध पुण्य होय असें माऊलीचें म्हणणें आहे.

**आणि मजचिमाजीं असतां। जेणें मी दूरी होय पंडुसुता। तें पुण्य ऐसें म्हणतां। जीभ न तुटे काई॥ ३१७॥**

**अर्थ**—आणि खरें पाहू गेलें असतां अर्जुना! जीव हा माझ्यांतच व मद्रूपच असतांना, ज्याच्या योगें माझी प्राप्ति दुरावते किंवा अंतरली जाते, त्याला पुण्य हें नांव देतांना जीभ झडणार नाही काय?॥ ३१७॥

**परि हें असो आतां प्रस्तुत। ऐकें यापरी तें दीक्षित। यजूनि मातें याचित। स्वर्गभोगु॥ ३१८॥**
**मग मी न पविजे ऐसें। जें पापरूप पुण्य असे। तेणें लाधलेनि सौरसें। स्वर्गा येती॥ ३१९॥**
**जेथ अमरत्व हेंचि सिंहासन। ऐरावतासारिखें वाहन। राजधानी भुवन। अमरावती॥ ३२०॥**
**जेथ महासिद्धींचीं भांडारें। अमृताचीं कोठारें। जिये गांवीं खिल्लारें। कामधेनूंची॥ ३२१॥**
**जेथ वोळगे देव पाइका। सैंघ चिंतामणीचिया भूमिका। विनोदवनवाटिका सुरतरूंचिया॥ ३२२॥**
**गंधर्व गात गाणीं। जेथ रंभे ऐशिया नाचणी। उर्वशी मुख्य विलासिनी। अंतौरिया॥ ३२३॥**
**मदन वोळगे शेजारें। जेथ चंद्र शिंपे सांबरें। पवना ऐसें म्हणियारें। धांवणें जेथ॥ ३२४॥**
**पैं बृहस्पति मुख्य आपण। ऐसे स्वस्तीश्रियेचे ब्राह्मण। भाटिवेचे सुरगण। बहुवस जेथें॥ ३२५॥**
**लोकपाळ रांगेचे। राउत जिये पदवीचे। उच्चै:श्रवा खांचे। खोलणिये॥ ३२६॥**
**हें असो बहु ऐसें। भोग इंद्रसुखासरिसे। ते भोगिजती जंव असे। पुण्यलेशु॥ ३२७॥**

**अर्थ**—पण अर्जुना हें आतां असूं दे. आता प्रस्तुत ऐक. याप्रमाणें ते दीक्षित माझेंच यजन करून माझ्या प्राप्तीची इच्छा न करितां स्वर्गसुखाची इच्छा करितात. ॥ ३१८॥ मग ज्या पुण्याने माझी प्राप्ती होत नाही त्या पुण्यरूप पापाने प्राप्त झालेल्या थोरपणामुळें स्वर्गाला येतात. ॥ ३१९॥ अर्जुना! ज्या स्वर्गामध्ये अमरत्व हें सिंहासन आहे. ऐरावत हत्तीसारखे वाहन मिळतें व अमरावतीसारख्या राजधानींत रहायला मिळतें. ॥ ३२०॥ जेथे अणिमादि सिद्धींचीं भांडारें म्हणजे खजीने आहेत अमृताचीं मोठमोठीं कोठारें आहेत आणि कामधेनूचे कळप आहेत. ॥ ३२१॥ ज्या स्वर्गांत देवसमुदाय चाकर होऊन राबतांत. जेथील सर्व जमीन चिंतामणी मण्यांची केलेली आहे व जेथें विहार करण्याकरितां कल्पतरूचे बाग उपवनें आहेत. ॥ ३२२॥ स्वर्गवासी लोकांच्या करमणुकीकरितां गंधर्व गाणीं गातात. रंभेसारख्या अप्सरा नर्तकी असतात व कामविलास करण्याकरितां मुख्य उर्वशीसारख्या स्त्रिया असतात. ॥ ३२३॥ शयनगृहांत प्रत्यक्ष मदनच सेवा करितो आणि चंद्र आपल्या अमृतकिरणांनी सडासंमार्जन करीत असतो. तोंडांतून शब्द निघाल्याबरोबर एकदम धांवून काम करणारें वायूसारखे चाकर आहेत. ॥ ३२४॥ बृहस्पति ज्यांत मुख्य आहे असे ब्राह्मण आशीर्वाद देऊन आपलें कल्याण इच्छिणारे असतात आणि भाटासारखे आपल्या गुणांचे वर्णन करून स्तुतिपाठ करणारे अनेक देव आहेत. ॥ ३२५॥ जेथे लोकपाळांच्या योग्यतेचे देव घोडेस्वारांच्या स्थानीं असतात आणि इंद्राचा उच्चै:श्रवा घोडा पुढे चालणारा असतो. ॥ ३२६॥ अर्जुना! हें आतां पुरें. सांगायचें तें हे की जोपर्यंत पुण्य आहे तोपर्यंत इंद्राच्या सुखभोगासारखा भोग भोगायला मिळतो. ॥ ३२७॥

**ते तं भुक्त्वा स्वर्गलोकं विशालं क्षीणे पुण्ये मर्त्यलोकं विशन्ति।**
**एवं त्रयीधर्ममनुप्रपन्ना गतागतं कामकामा लभन्ते॥ २१॥**

**अर्थ**—अशा विस्तीर्ण स्वर्गलोकांतील भोग भोगून पुण्य क्षीण झाल्याबरोबर ते मृत्युलोकांत परत येतात. याप्रमाणे तीन वेदांनी सांगितलेल्या वैदिकधर्माचें अनुष्ठान करणारे विषयसुखाचीच इच्छा करतात आणि जाणें—येणें करीत असतात. ॥ २१॥

**मग तया पुण्याची पाउटी सरे। सवेंचि इंद्रपणाची उटी उतरे। आणि येऊं लागती माघारे। मृत्युलोका॥ ३२८॥**
**जैसा वेश्याभोगी कवडा वेंचे। मग दारही चेपूं न ये तियेचें। तैसें लाजिरवाणें दीक्षितांचें। काय सांगों॥ ३२९॥**

**एवं थितिया मातें चुकले। जिहीं पुण्यें स्वर्ग कामिले। तया अमरपण तें वावो जालें। आतां मृत्युलोक ॥ ३३० ॥**
**मातेचिया उदरकुहरीं। पचूनि विष्ठेचां दाथरीं। उकडूनि नवमासवरी। जन्मजन्मोनि मरती॥ ३३१ ॥**
**अगा स्वप्नी निधान फावे। परि चेइलिया हारपे आघवें। तैसें स्वर्गसुख जाणावें। वेदज्ञाचें॥ ३३२ ॥**
**अर्जुना वेदविद जऱ्ही जाहला। तरि मातें नेणतां वायां गेला। कणु सांडूनि उपणिला। कोंडा जैसा॥ ३३३ ॥**
**म्हणऊनि मज एकेविण। हे त्रयीधर्म अकारण। आतां मातें जाणोनि कांहीं नेण। तूं सुखिया होसी॥ ३३४ ॥**

**अर्थ**—मग ज्या पुण्यरूप पायरीने स्वर्गाला गेलें त्या पुण्याची पायरी नाहीशी झाली म्हणजे तत्क्षणी प्राप्त झालेले तें इंद्रपणाचें वैभव नाहीसें होतें आणि परत मृत्यु लोकांत ते येऊं लागतात. ॥ ३२८ ॥ ज्याप्रमाणे वेश्येच्या समागमांत संपूर्ण द्रव्य नाहीसें झालें असता मग तिच्यां दाराला देखील हात लावतां येत नाही, त्याप्रमाणे, अर्जुना! काय सांगू! या दीक्षितांची लाजिरवाणी स्थिति होत असते. ॥ ३२९ ॥ याप्रमाणे जे पुण्य करून स्वर्गाची इच्छा करितात, हे त्यांच्याच ठिकाणीं असलेल्या मला विसरतात व त्यांचें अमरत्वहि व्यर्थ होऊन शेवटीं मृत्युलोकांत येतात. ॥ ३३० ॥ आईच्या पोटांतील गर्भाशयरूपी गुहेंत विष्ठेच्या संचयाने उत्पन्न झालेल्या उष्ण घाणींत नव महिनेपर्यंत शिजत राहून ते जन्माला येत असतात व मरत असतात. ॥ ३३१ ॥ बा अर्जुना! ज्याप्रमाणे स्वप्नामध्ये धन सांपडते व जाग आल्यावर सर्व नाहीसें होतें, त्याप्रमाणेच (स्वर्गाकरितां कर्म करावें अशी वेदाची आज्ञा आहे असा वेदाचा अर्थ करणारे) जे वेदज्ञ आहेत त्यांनी मिळविलेलें स्वर्गसुख असे असतें. ॥ ३३२ ॥ ज्याप्रमाणे धान्यरहित नुसता कोंडा वाऱ्यावेंर उडविणें व्यर्थ आहे, त्याप्रमाणे अर्जुना! असा वेदज्ञ जरी असला तरी माझ्या प्राप्तीवांचून त्याचें जिणें व्यर्थ आहे. ॥ ३३३ ॥ म्हणून एका माझ्या प्राप्तीवांचून स्वर्गाकरितां केलेले वेदोक्त कर्म व्यर्थ आहे. आतां कांही एक दुसरे न जाणतां मला एकाला जाणलें तर तूं सुखी होशील. ॥ ३३४ ॥

**गूढार्थदीपिका**—प्रवृत्तिरूप वैदिक धर्म देखील खरोखर भगवत्प्राप्ति करून घेण्याकरितांच निर्माण झाला आहे. म्हणून त्यांत सांगिलेल्या स्वर्गादि फळांची इच्छा सोडून निष्कामचित्ताने भगवत्प्रीत्यर्थ त्याचें अनुष्ठान करावें असा भाव.

आतां पुढील श्लोकांत सर्व देवतांचा आश्रय सोडून एका भगवंताचीच अनन्यभावाने उपासना करणें या एकान्तभक्तींतील विशेषाचें भगवान वर्णन करतात.

**अनन्याश्चिन्तयन्तो मां ये जनाः पर्युपासते। तेषां नित्याभियुक्तानां योगक्षेमं वहाम्यहम्॥ २२ ॥**

**अर्थ**—सर्वांचा आश्रय सोडून व माझ्याशीं अनन्य होऊन जे लोक माझें चिंतन करीत माझी सर्वभावाने उपासना करितात, त्या एकनिष्ठ उपासकांचा योगक्षेम मी चालवितों. ॥ २२ ॥

**पैं सर्वभावेंसीं उखितें। जे वोपिले मज चित्तें। जैसा गर्भगोळु उद्यमातें। कोण्याही नेणे॥ ३३५ ॥**

**अर्थ**—ज्याप्रमाणे गर्भांतील पिंड आपल्याकरिता कोणताहि प्रयत्न करीत नाही, त्याप्रमाणे सर्व भाव मला समर्पण करून जे चित्ताने मला समर्पण झाले. ॥ ३३५ ॥

**गूढार्थदीपिका—सर्व भावेसीं उखितें। वोपिले मज चित्तें**—उखिते म्हणजे निःशेष. अज्ञानी पुरुष बुद्धि, मन, अहंकार, इंद्रियें, देह, प्राण वगैरे यांचें सर्व व्यापार किंवा सर्व राहाटी एका आपल्याकरिताच करीत असतो, म्हणून जीवाचे निराळें अस्तित्व कायम राहते; पण हेच सर्वभाव भगवंताकरिता झाले असतां तो भगवंताला समर्पण होतो म्हणजे भगवत्स्वरूप होतो.

जीवाचे ठिकाणीं अहंता किंवा मीपण व ममता किंवा माझेपण असे दोन भाव आहेत. हे दोन्ही भाव तो देहाचे ठिकाणीं वागवितो. या दोन भावाने देहाचें संपूर्ण प्रेम केलें जातें व देहभावना दृढ होते. अहंताभावाने देहाशीं ऐक्य होतें व ममताभावाने देहाचें प्रेम केलें जातें. देहाचे ठिकाणीं जीव माझेपण वागवितो, म्हणून त्याला त्याचें सर्वांपेक्षा अत्यंत प्रेम असतें व देहाच्या सुखाला कारणीभूत होणाऱ्या घर, दार, मुलें, धन इत्यादि पदार्थांवरहि तो माझें माझें म्हणून ममताप्रेम करीत असतो. या देहाच्या ममताप्रेमामुळे त्याची देहावर अहंताहि बसली आहे किंवा देहाशी ऐक्यहि झालें आहे.

देहाप्रमाणेच, सगुण भगवंताला, तोच एक माझा समजून प्रेम केल्यास, जेवढ्या पदार्थांना माझें माझें म्हणून म्हणतो व निरनिराळ्या रीतीने त्याचे प्रेमसंबंध जोडतो, तेवढे सर्व पदार्थ व त्यांचे संबंध, सगुण भगवंताकडे जोडले जातात.

अशा रीतीने सर्व माझेपण किंवा ममताप्रेम भगवंतावर करणें यालाच भक्ति म्हणतात. ''हेचि थोर भक्ति आवडते देवा। संकल्पावी माया संसाराची'' असें तुकाराम महाराजांचेहि म्हणणे आहे. ''यद्धामार्थसुहृत्प्रियात्मत-नयप्राणाशयास्त्वत्कृते'' (भाग. स्कं. १० अ. १४-३५) गोपिकांनीहि आपले मित्र, प्रियपदार्थ, देह, पुत्र, प्राण व मन इत्यादि सर्व भगवंताला समर्पण केले होते, असें श्रीशुकाचार्यांनी त्यांच्या भक्तीचें वर्णन केलें आहे. हेंच 'उखितें' सर्वं भावाने भगवंताला समर्पण करणें होय. या सर्वभावसमर्पणाने शेवटीं भक्ताचें मीपणहि माझेपणाबरोबर न कळत भगवंतावर बसतें-म्हणजे त्याचें भगवंताशीं जाणीवरहित ऐक्य होतें. याप्रमाणे मीपण व माझेपण किंवा अहंताममता भगवंतावर बसली की त्याला देहाचा विसर पडून त्याचें संपूर्ण प्रेम भगवंतावर बसतें यालाच माऊलींनी ''वोपिलें मज चित्तें'' म्हटलें आहे.

**की गर्भगोळ उद्यमातें। कोण्याहि नेणें**—अशा रीतीने अहंता-ममता समर्पण झाल्यावर भक्ताकडून आपल्या देहाच्या सुखाचा किंवा संसाराचा कोणताहि प्रयत्न होत नाही, हेंच माऊलींनी गर्भगोळाचा दृष्टान्त देऊन सुचविलें आहे.

**तैसा मीवांचूनि कांहीं। आणीक गोमटेंचि नाहीं। मजचि नाम पाहीं। जिणेया ठेविलें॥ ३३६ ॥**

**अर्थ**—त्याप्रमाणे माझ्यावांचून ज्यांना कांहीच गोड वाटत नाही व जगणें हें नांव ज्यांनी मलाच ठेविलें-म्हणजे माझे प्रेमाकरिताच जे जिवंत राहतात. ॥ ३३६ ॥

**गूढार्थदीपिका—तैसा मीवांचूनि कांहीं। आणीक गोमटेंचि नाहीं**—या चरणाने भक्ताचा संपूर्ण मनोभाव भगवंताला समर्पण होतो हें दाखविलें आहे.

''आत्मनस्तु कामाय सर्वं प्रिय भवति'' या श्रुतीने निर्गुण प्रत्यगात्मस्वरूप हें परमप्रिय आहे असें सांगितलें आहे, पण भक्तांना ''प्रत्यगात्मयातें मीपण। तेहि मानोनियां गौण'' (ए. भा. अ. २-६४२) प्रत्यगात्मस्वरूपहि त्याच्या मनाला, भगवंताच्या सगुणस्वरूपा इतकें गोड वाटत नाही. तेथे देह व विषय हें गोड वाटणें दूरच राहिलें.

''अद्वैतीं तो नाहीं माझें समाधान। गोड हे चरण सेवा तुझी'' ''नको ब्रह्मज्ञान आत्मस्थितिभाव। मी भक्त तूं देव ऐसे करी'' इत्यादि तुकाराम महाराजांचीं वचनें आहेत. भगवंताचें षड्गुणैश्वर्यसंपन्न सगुणस्वरूप भक्ताच्या मनाला व इंद्रियांना इतके मोहून घेणारें होतें की त्यांचीं मन, इंद्रियें सर्व भगवंताच्या सगुणस्वरूपाचे ठिकाणीं गुंतून राहतात.

**मजचि नाम पाही। जिणेया ठेविलें**—मनाला जें गोड वाटतें त्याचेंच बुद्धींत ध्यान होतें. भगवंताचे सगुणस्वरूप मनाला गोड वाटून मन भगवंताला समर्पण झालें की त्यामुळें बुद्धीलाहि भगवंताचेंच ध्यान होतें व त्या ध्यानाने ती भगवत्अर्पण होते.

''यज्जीवितं तु निखिलं भगवान्मुकुंदः'' भक्ताचें सर्व जीवन—म्हणजे देह, दहा इंद्रियें, पंचप्राण, मन, बुद्धि या सर्वांचे व्यापार एक भगवंताकरितांच होऊन त्यांचें सर्व जीवन भगवन्मय होतें व भगवत्प्रेमाकरिताच भक्त जिवंत राहतात.

**ऐसें अनन्यगतिकें चित्तें। चिंतितसांते मातें। जे उपासिती तयांतें। मीचि सेवीं॥ ३३७॥**
**ते एकवटूनि जिये क्षणीं। अनुसरले गा माझिये वाहणीं। तेव्हांचि तयांची चिंतवणी। मजचि पडली॥ ३३८ ॥**
**मग तिहीं जें जें करावें। तें मजचि पडिलें आघवें। जैसी अजातपक्षांचेनि जीवें। पक्षिणी जिये॥ ३३९ ॥**

**अर्थ**—असे जे अनन्यचित्ताने माझें चिंतन करीत माझी उपासना करितात, त्यांची मी सेवा करितो. ॥ ३३७॥ माझ्याशीं ऐक्य पांवून व सर्व इंद्रियें, मन, बुद्धि या सर्वांचे व्यापार माझे ठिकाणीं लावून अनन्यचित्ताने ज्याक्षणीं माझ्या सेवेंत लागले, त्याक्षणींच त्यांची सर्व काळजी मला लागली. ॥ ३३८ ॥ ज्याप्रमाणें ज्यांना पंख फुटले नाहीत,

त्या पिलांच्या जीवनाच्या रूपाने पक्षीण जगते किंवा पिलांचें जीवनच पक्षिणीचें जीवन होऊन राहतें, त्याप्रमाणे भक्तांनी आपल्याकरिता जें जें करायला पाहिजे तें तें सर्व मीच करतों. ॥ ३३९ ॥

**गूढार्थदीपिका—जैसी अजातपक्षाचेनि जीवें। पक्षिणी जिये—** भक्त जसा भगवंताचें नि:सीम प्रेम करतो, तसा भगवंतहि भक्ताचे नि:सीम प्रेम करतो, असे ''म्हणाल भक्त केवळ वेडीं। तुझिया भजनीं धरिती गोडी। परि तुज तयांची आवडी। नसेल गाढी अणि प्रीति॥ १३५॥ भजनीं भक्तांचा शुद्ध भावो। तेथ मजही पहाहो। अति प्रीती॥ १३९॥ (ए. भा. अ. १४) नाथ म्हणतात. सगुण भगवानहि समस्वरूप आहे, म्हणूनच तो भावनेप्रमाणें अनुभवास येतो. ज्यांना भगवंताचें प्रेम नाही त्यांना भगवंताच्या प्रेमाचा अनुभव येत नाही. भक्ताचें भगवंतावर नि:सीम प्रेम असतें; म्हणून त्यांना भगवंताच्या नि:सीम प्रेमाचा अनुभव येतो. भक्त भगवत्प्रेमाकरिता जगतो, तर भगवानहि भक्तिप्रेमामुळेच सगुण होतो.

**आपुली तहानभूक नेणे। तान्हया निकें तें माउलीसीचि करणें। तैसे अनुसरले जे मज प्राणें। तयांचे सर्व मी करी॥ ३४०॥**

**अर्थ—**लहान मूल आपली तहान भूक कांही जाणत नाही, त्याची सर्व चिंता आईलाच करावी लागते, त्याप्रमाणे सर्व जीव-प्राण मला अर्पण करून जे माझी उपासना करतात त्यांचे सर्व मीहि तितक्याच प्रेमाने करीत असतो. ॥ ३४० ॥

**गूढार्थदीपिका—सर्व मी करी—**

**किमलभ्यं भगवति प्रसन्ने श्रीनिकेतने। तथापि तत्परा राजन्न हि वांछन्ति किंचन॥** (भाग. स्कं. १० अ. ३९-२)

लक्ष्मीपति प्रसन्न झाला असतां अलभ्य असें कांही नसतें, हें भक्त जाणून असतात, पण आपल्या सुखाकरिता प्रिय परमात्म्याला शिणविणें हें प्रेमाचें लक्षण नव्हे; म्हणून भक्त भगवंताला आपल्याकरिता यत्किंचित्‌हि श्रम देऊं इच्छित नाही व भगवंतापासून कांही मागतहि नाही; पण भक्ताची इच्छा नसली, तरी त्याचें निष्काम परम प्रेम ''ते ऋणवैपण देखोनि आंगीं'' हें आपल्यावर ऋण आहे असें समजून भगवानच ''उत्तीर्णत्वालागीं। परिचर्या करी'' आपण होऊन त्याचें कांही उणें पडूं देत नाही.

**तया माझिया सायुज्याची चाड। तरि तेंचि पुरवीं कोड। कां सेवा म्हणती तरी आड। प्रेम सुयें॥ ३४१॥**
**ऐसा मनीं जो जो धरिती भावो। तो तो पुढां पुढां लागें तयां देवों। आणि दिधलियाचा निर्वाहो। तोही मीचि करीं॥ ३४२॥**
**हा योगक्षेमु आघवा। तयांचा मजचि पडिला पांडवा। जयांचिया सर्वभावा। आश्रयो मी॥ ३४३॥**

**अर्थ—**माझ्या परम भक्तांना माझ्या ऐक्याची इच्छा असली, तर तीच त्यांची इच्छा मी पुरवितों आणि माझ्या सगुण स्वरूपाची प्रेमभक्तिसेवा करावी अशी इच्छा असल्यास त्याच्या अंत:करणांत परम प्रेम प्रगट करतों. ॥ ३४१ ॥ याप्रमाणे जो जो भाव धरून ते माझी उपासना करितात, तो तो भाव मी पूर्ण करतो व दिलेल्या भावाचें रक्षणहि मीच करतों. ॥ ३४२ ॥ अर्जुना! ज्यांच्या सर्व प्रेमभावाला मीच आश्रय झालों त्यांचा योगक्षेम मलाच चालवावा लागतों. ॥ ३४३ ॥

**गूढार्थदीपिका—**सायुज्यता म्हणजे सगुण भगवंताशीं जिवंतपणीं व मेल्यावरहि अखंड ऐक्य राहणें.

योग म्हणजे अप्राप्तीची प्राप्ति आणि क्षेम म्हणजे त्या प्राप्तीचें रक्षण, असे माऊलींनीच अर्थ केले आहेत. भक्तांना भगवंताची अप्राप्ति असते व त्याची प्राप्ति व्हावी असें वाटतें आणि ती प्राप्ति झाल्यावर ती तशी अखंड राहावी असेंहि वाटतें. ''आतां दृष्टीपुढें ऐसाचि तूं राही। जों मी तुज पाही पांडुरंगा'' असें तुकाराम महाराज म्हणतात. पण हे दोन्ही भगवंतच करूं शकतो. तरंग जसा सर्वस्वीं व्यापक समुद्राचे स्वाधीन असतो तसा जीवहि परमेश्वराच्या परतंत्र आहे. ''परात्तु तत्श्रुते:'' (ब्र. सू. २-३-४१) जीवाचें जसें बरें वाईट पूर्वकर्म व वासना असेल तसें तो परमात्मा ''एष ह्येव साधुकर्मं कारयति'' त्या जीवाकडून कर्म करवितो व त्याचे फल देतो असा वेदान्त सिद्धान्त आहे. त्या त्या कर्माचा भगवंताशीं कांही एक संबंध नाही जीवाकडून ते कर्म करविणें व त्याचे फळ देणें हे दोन्ही जर भगवंताच्या स्वाधीन आहे, तर स्वत: भगवान सगुणरूप व प्रेमरूप असल्यामुळे त्याचे भक्ताचे हृदयांत

सगुणरूपाने व प्रेमरूपाने प्रगट होणें सर्वस्वीं भगवंताचे स्वाधीन आहे, हे काय सांगायचे? भक्तांनी मागावे व भगवंतांनी ते पूर्ण करावें हाच सिद्धांत आहे.

"मुख्यतस्तु भगवत्कृपालेशाद्वा" भगवत्प्रेम भगवंतच देऊं शकतो असें भक्तिसूत्र असून "माझे हातीं आहे करावें चिंतन। तुम्ही कृपादान प्रेम द्यावे" असें तुकाराम महाराजहि म्हणतात.

**येऽप्यन्यदेवता भक्ता यजन्ते श्रद्धयान्विताः। तेऽपि मामेव कौन्तेय यजन्त्यविधिपूर्वकम्॥ २३॥**

**अर्थ**—दुसऱ्या देवतांची अत्यंत श्रद्धेने उपासना करणारे जे भक्त आहेत ते देखील अविधिपूर्वक माझेंच यजन करितात. ॥ २३ ॥

**आतां आणीकही संप्रदायें। परि मातें नेणती समवायें। जें अग्निइंद्रसूर्यसोमां ये। म्हणऊनि यजिती॥ ३४४॥**
**तेही कीर मातेंचि होये। कां जे हें आघवें मीचि आहें। परि ते भजती उजरी नव्हे। विषम पडे॥ ३४५॥**

**अर्थ**—अर्जुना! (आणिकहि दुसऱ्या देवतांच्या यजनाचा संप्रदाय आहे) त्यांत अग्नि, इंद्र, सूर्य, सोम इत्यादि देवतांचें यजन केलें जातें, पण त्या दैवतांतहि मीच एक भरून आहे, हें तें सांप्रदायिक जाणत नाहीत. ॥ ३४४ ॥ मीच सर्व नामरूपांत भरून असल्यामुळे अग्नि इंद्र, सूर्य, सोमादि देवतांचें जें यजन केलें जातें तें सर्व यजन खरोखर माझेंच होतें यांत शंका नाही. पण तें भजन मला सोडून साक्षात् देवतांच्या भावनेने होत असल्यामुळे, तें माझें सरळ भजन न होतां वांकडें भजन होतें. ॥ ३४५ ॥

**गूढार्थदीपिका—"एकं सद्विप्रा बहुधा वदन्त्यग्नि यमं मातरिश्वानमाहुः"** (ऋग्वेद)

एकाच सद्ब्रह्मवस्तूला ऋषीनी अग्नि, इंद्र, सोम, सूर्य इत्यादि नावें दिलीं आहेत अशी ऋग्वेदांत ऋचा असून इंद्रादि देवता परमेश्वराहून भिन्न नाहीत. एक परमेश्वरच त्या त्या नांवाने संबोधिला गेला आहे, असा त्या ऋचेचा अर्थ आहे; म्हणून इंद्रादिकदेवतांचें यजन म्हणजे परमेश्वराचेंच यजन होत असलें, तरी परमेश्वर विसरून व परमेश्वराहून इंद्रादि देवतांना निराळें मानून त्यांचें यजन करणें हें परमेश्वराचें अविधि यजन होतें, विधिपूर्वक यजन होत नाही.

इंद्रादि देवतांत परमेश्वराची भावना ठेवून व परमेश्वराकडेच चित्त ठेवून इंद्रादि देवतांचे यजन करणें हें विधिपूर्वक परमेश्वराचें यजन होते असा अर्थ.

**पाहें पां शाखा पल्लव वृक्षाचे। हे काय नव्हती एकाचि बीजाचे। परि पाणी घेणें मुळाचें। तें मुळींचि घापे॥ ३४६॥**
**कां दहाही इंद्रियें आहाती। इयें जरी एकेचि देहींचीं होती। आणि इहीं सेविले विषयो जाती। एकाचि ठायां॥ ३४७॥**
**तरि करोनि रससोय बरवी। कानीं केविं भरावी। फुलें आणोनि बांधावीं। डोळां केविं॥ ३४८॥**
**तेथ रसु तो मुखेंचि सेवावा। परिमळु तो घ्राणेंचि घ्यावा। तैसा मी तो यजावा। मीचि म्हणोनि॥ ३४९॥**
**येर मातें नेणोनि भजन। तें वायांचि गा आनेंआन। म्हणोनि कर्माचे डोळे ज्ञान। तें निर्दोष होआवें॥ ३५०॥**

**अर्थ**—हें पहा अर्जुना! झाडाला फांद्या, पानें वगैरे असतात. ते सर्व एकाच बीजाचे नव्हेत काय? पण पाणी घेण्याचें काम मुळाचें असल्यामुळे, मुळाशींच पाणी घातलें पाहिजे. ॥ ३४६ ॥ किंवा दहा इंद्रियें आहेत व तीं एकाच देहाचीं असतात आणि त्यांच्याद्वारा जे विषय भोगले जातात तेहि एकाच ठिकाणीं जातात. ॥ ३४७ ॥ म्हणून उत्तम पंचपक्वान्न तयार करून, तें पंचपक्वान्न कानांत घालावें काय? फुलें आणून डोळ्यानी त्यांचा वास घ्यावा काय? ॥ ३४८ ॥ असें नाही तर रसविषयाचें सेवन मुखानेच केलें पाहिजे. सुवास नाकाने घ्यावयाचां असतो त्याप्रमाणे माझें भजन करावयाचें तर माझ्याच भावनेने केलें पाहिजे. ॥ ३४९ ॥ यावांचून मला विसरून दुसऱ्याच्या भावनेने जें माझें भजन केलें जातें तें व्यर्थ होतें, म्हणून कर्म करावें. हे ज्ञानरूपी कर्माचे डोळे निर्दोष स्वच्छ असायला पाहिजेत. ॥ ३५० ॥

**गूढार्थदीपिका**—निष्काम कर्माने श्रेय प्राप्ति होते हें मागें दुसऱ्या अध्यायांत सांगितलें आहे. देव व पितर यांचें निष्काम यजन, त्याचें ध्यान ठेवून करायचें असतें व त्या यजनाने त्यांच्या प्राप्तीद्वारा मोक्षप्राप्ति होते.

निष्कामकर्मद्वारा सगुण भगवंताची प्राप्ति व्हावी अशी इच्छा असल्यास, सगुण भगवंताचें ध्यान ठेवून तत्प्रीत्यर्थच कर्म केलें पाहिजे. हेंच ज्ञान, कर्म करणाऱ्याला असायला पाहिजे.

**अवतरणिका—इंद्रादि देवतांनाच मुख्य समजून यज्ञाचरण करणें, हें योग्य कसें आहे, हें आतां भगवान सांगतात.**

**अहं हि सर्वयज्ञानां भोक्ता च प्रभुरेव च । न तु मामभिजानन्ति तत्त्वेनातश्च्यवन्ति ते॥ २४॥**

**अर्थ**—अर्जुना! मीच सर्व यज्ञांचा भोक्ता असून स्वामी आहे, पण मला या तात्त्विकदृष्टीने कोणी जाणत नाहीत म्हणून त्यांना माझी प्राप्ति होत नाही. ॥ २४ ॥

**गूढार्थदीपिका**—प्रभू म्हणजे स्वामी जीवाच्या कर्माप्रमाणे एक भगवानच निग्रह व अनुग्रहरूप फळ देणारा आहे असा "फलमत उपपत्तेः" (वे. सू. ३-२-३८) या सूत्रांत सिद्धान्त केला आहे व यज्ञादि कर्माचें फळ देणारा मीच आहे, असें "प्रभू" या शब्दाने भगवंतांनी येथें स्पष्ट केलें आहे.

त्याचप्रमाणे भगवान म्हणतात मीच भोक्ता आहे, 'भोक्ता' या शब्दाचा भोग घेणारा किंवा सुख मानणारा असा अर्थ असला तरी आप्तकाम भगवान भोक्ता होत नसल्यामुळे, तो अर्थ येथे घेतां येत नाही. येथें 'भोक्ता या शब्दाचा अर्थ समर्पण केलेले उपचार ग्रहण करणारा किंवा स्वीकारणारा असा आहे. जो कर्मफल देणारा असतो त्यालाच कर्म समर्पण केलें जातें व तोच कर्माचा अंगीकार करतो.

एक परमात्माच वरीलप्रमाणे कर्माचें फळ देणारा असल्यामुळें तोच भोक्ताहि आहे आणि कर्मअंतीं सर्व कर्म भगवंताला अर्पण केलेंहि जातें.

**एऱ्हवीं पाहें पां पंडुसुता। या यज्ञोपहारां समस्तां। मीवांचूनि भोक्ता। कवणु आहे॥ ३५१ ॥**
**मी सकळां यज्ञांचा आदि। आणि यजना या मीचि अवधि। कीं मातें चुकोनि दुर्बुद्धि। देवां भजले॥ ३५२ ॥**

**अर्थ**—हे पहा अर्जुना! या यज्ञांत जेवढें कांही समर्पण केलें जातें, त्याचा भोक्ता माझ्यावांचून कोण आहे?॥ ३५१ ॥ मी सर्व यज्ञांचें मूळ आहे. सर्व यज्ञ माझ्यापासून प्रगट झाले आणि या सर्व यज्ञक्रिया माझ्याच ठिकाणीं समाप्त होतात, असें असून माझी भावना न ठेवतां हे दुर्बुद्धि याज्ञिक देवतांची भावना ठेवतात व देवतांचें यजन करतात. ॥ ३५२ ॥

**गूढार्थदीपिका—माते चुकोनि दुर्बुद्धि। देवा भजले**—सर्व भावाने परमात्माच प्रगट आहे आणि ही बुद्धि ठेवून यजन केलें असतां, अनायासें परमात्मा प्राप्त होतो, पण सर्वव्यापी परमेश्वराला विसरून, त्याच्याहून निराळ्या इंद्रादिक देवतांची कल्पना करून व त्यांना मुख्य मानून त्यांचेंच यजन केलें असतां, परमेश्वर प्राप्ति होत नसल्यामुळें अशी बुद्धि दुर्बुद्धिच ठरते.

**गंगेचें उदक गंगे जैसें। अर्पिजे देवपितरोद्देशें। माझें मज देती तैसें। परि आनानीं भावीं॥ ३५३ ॥**
**म्हणऊनि ते पार्था। मातें न पवतीचि सर्वथा। मग मनीं वाहिली जे आस्था। तेथ आले॥ ३५४ ॥**

**अर्थ**—ज्याप्रमाणे गंगेवर बसून गंगेच्या पाण्याने तर्पण करणारा गंगेचें पाणी गंगेलाच अर्पण करितो, पण देव-पितर यांची भावना ठेऊन अर्पण करितो, त्याप्रमाणे मीच सर्व आहे, मीच सर्व कर्माचा भोक्ता व स्वामी आहे, म्हणून माझेंच मला दिलें जातें, हें खरें, पण भावना मात्र निरनिराळी असते. ॥ ३५३ ॥ म्हणूनच अर्जुना! ते मला प्राप्त होत नाहीत, त्यांच्या मनांत ज्या देवतेची श्रद्धा असते त्या देवतेलाच ते प्राप्त होतात. ॥ ३५४ ॥

**यान्ति देवव्रता देवान्पितॄन्यान्ति पितृव्रताः । भूतानि यान्ति भूतेज्या यान्ति मद्याजिनोऽपि माम्॥ २५ ॥**

**अर्थ**—देवाची भक्ति करणारे देवाला प्राप्त होतात, पितरांची भक्ति करणारे पितरांना प्राप्त होतात, भूतादिकांचें यजन करणारे भूतादिकांना प्राप्त होतात आणि तसेंच माझी भक्ति करणारे मला प्राप्त होतात. ॥ २५ ॥

**मनें वाचा करणीं। जयांची भजनें देवांचिया वाहणीं। ते शरीर जातियेक्षणीं। देवचि जाले॥ ३५५ ॥**
**अथवा पितरांचीं व्रतें। वाहती जयांचीं चित्तें। जीवित सरलिया तयांतें। पितृत्व वरी॥ ३५६ ॥**
**कां क्षुद्रदेवतादि भूतें। तियेंचि जयांचीं परमदैवतें। जिहीं अभिचारिकीं तयांतें। उपासिलें॥ ३५७ ॥**

**तयां देहाची जवनिका फिटली। आणि भूतत्वाची प्राप्ति जाहली। एवं संकल्पवशें फळलीं। कर्में तयां॥ ३५८॥**
**मग मीचि डोळां देखिला। जिहीं कानीं मीचि ऐकिला। मनीं मी भाविला। वानिला वाचा॥ ३५९॥**
**सर्वांगीं सर्वाठायीं। मीचि नमस्कारिला जिहीं। दानपुण्यादिकें जें कांहीं। तें माझियाचि मोहरां॥ ३६०॥**
**जिहीं मातेंचि अध्ययन केलें। जे आंतबाहेरि मियांचि धाले। जयांचें जीवित्व जोडलें। मजचिलागीं॥ ३६१॥**
**जे अहंकारु वाहत आंगीं। आम्ही हरीचे भूषावयालागीं। जे लोभिये एकचि जगीं। माझेनि लोभें॥ ३६२॥**
**जे माझेनि कामें सकाम। जे माझेनि प्रेमें सप्रेम। जे माझिया भुली सभ्रम। नेणती लोक॥ ३६३॥**
**जयांची जाणती मजचि शास्त्रें। मी जोडें जयांचेनि मंत्रे। ऐसे जे चेष्टामात्रें। भजले मज॥ ३६४॥**

**अर्थ**—ज्यांची मन, वाणी इंद्रियें देवांच्याच भजनांत लागलीं ते मेल्यानंतर देवत्वाला प्राप्त होतात. ॥ ३५५ ॥ किंवा ज्यांच्या चित्तांत पितरांचेच व्रतनियम करण्याची प्रवृत्ति असते, ते मेल्यानंतर पितर होतात. ॥ ३५६ ॥ किंवा भूतपिशाचादिक क्षुद्रदेवताच ज्याना परम दैवत वाटते व जारणमारणादि अभिचारविधीनें त्यांचें पूजन करतात. ॥ ३५७ ॥ त्यांना हा स्थूल देहाचा पडदा दूर झाला की भूतप्रेत यांची प्राप्ति होते. याप्रमाणे संकल्प म्हणजे ध्यान जसें असेल तसें त्यांचे यजन फलद्रूप होतें. ॥ ३५८ ॥ मग जें कोणी डोळ्यांनी माझेंच रूप पाहतात, कानाने माझेच गुण ऐकतात, मनाने माझेंच ध्यान करतात आणि वाणीने माझेच गुण गातात. ॥ ३५९ ॥ जे सर्वत्र मला जाणून सर्वांगीं—म्हणजे साष्टांग—नमस्कार करतात व जीं कांही दानादिक पुण्यादि कर्में आहेत तींहि माझ्याचकरिता करतात. ॥ ३६० ॥ ज्यांचें अध्ययन किंवा अखंड नामस्मरण हेंच ज्यांचें अध्ययन असतें, आंत बाहेर जे माझ्याच प्रेमाने तृप्त असतात, जे माझ्या करितांच जिवंत राहतात. ॥ ३६१ ॥ श्रीहरीचे गुण वर्णन करून व कीर्ति वाढवून भगवंताला शोभिवंत करणारे आम्ही हरीचे भूषण आहों असा जे अहंकार बाळगतात आणि माझ्या लोभानेच जे लोभी असतात. ॥ ३६२ ॥ जे एक माझ्या प्राप्तीचीच इच्छा धरतात व एक माझेंच प्रेम करतात आणि जें माझ्या आवडीने इतके वेडे झालेले असतात की ज्यांना जगाचाच विसर पडतो. ॥ ३६३ ॥ ज्यांच्यां शास्त्राचे सार म्हणजे एक परमात्माच आहे असे जें जाणतात, ज्यांच्या मंत्रजपाने केवळ माझीच प्राप्ति होते, अशारीतीने ज्यांचे जेवढे कांही व्यापार आहेत, ते सर्व माझ्याकरितांच होतात. ॥ ३६४ ॥

**गूढार्थदीपिका—ऐसे जे चेष्टामात्रे। भजले मज**—"मनीषितं च प्राप्नोति चिन्तयन् पुरुषोत्तमम्। एकान्तभक्तिः सततं नारायणपरायणः"॥ ७८॥ (शां. प. अ. ३४८)

अखंड नारायणपरायण असणे म्हणजे भगवत्प्रीत्यर्थ देह, इंद्रियें, मन, बुद्धि, अहंकार यांचे व्यापार करणें हें एकान्तभक्तीचें लक्षण महाभारतान्तर्गत शान्तिपर्वात सांगितलें आहे. तेच श्रीज्ञानेश्वर माऊलींनी "ऐसे जे चेष्टामात्रें। भजले मज" या चरणांनी व्यक्त केलें असून त्याचेच ३५९ ते ३६४ या ओव्यांतून संकलन केले आहे.

मनाचे विचारात्मक व विकारात्मक असे दोन भाग आहेत. खरें काय याचा विचार करणें हा विचारात्मक भाग होय आणि देहाच्या प्रेमाने उठणारे काम, क्रोध, अहंकारादि विकार हा मनाचा विकारात्मक भाग होय. ज्ञानमार्गात "ज्ञानं सम्यगवेक्षणम्" योग्य विचार करणें हेच मुख्य साधन असल्यामुळे ज्ञान्याच्या मनाचा विचारात्मक भाग निर्गुण आत्मस्वरूपाच्या विचारात लावला जातो. पण विकारात्मक भाग निर्गुण आत्मस्वरूपांच्या ठिकाणीं लागूं शकत नाही.

अतएव प्रारब्धाने उठणाऱ्या कामक्रोधादि विचारांचे वेग सहन करून त्यांना दाबण्याचा प्रयत्न करण्यासच ज्ञानमार्गांत सांगितलें आहे, पण विकार दाबण्यांचा प्रयत्न करण्यात कर्तृत्व उत्पन्न होत असल्यामुळे ज्ञान्याला आपले अकर्तृस्वरूप-साक्षित्व सांभाळतां येत नाही आणि विकार उत्पन्न होऊं दिल्यास देहाच्या प्रेमाने विकार उत्पन्न होत असल्यामुळे वृत्ति देहाकार झाल्याशिवाय राहत नाही. अशी देहाकार वृत्ति झाली की आत्माकारता नाहीशी होते. या अडचणीमुळे ज्ञान्यांच्या ठिकाणी विकार दिसून पडतात व त्यांना जीवन्मुक्ति साधणें दुष्कर होते.

पण भक्ताच्या मनाचा विचारात्मक भाग भगवंताचे सगुणस्वरूपहि पूर्ण ब्रह्मच आहे याची मीमांसा करण्यात

जसा लावला जातो, तसा काम-क्रोधादि विकारात्मक भागहि, भगवदर्पण करून भगवत्प्रेम व भगवद्ध्यान वाढविण्याकरिता लावला जातो. म्हणून विकारकाली देखील भक्ताचे चित्त देहाकार न होता भगवदाकारच राहते व ते भक्त दृढ ध्यानाने अखंड भगवद्रूप होऊन राहतात.

हाच आशय नाथांनी ''योगी इंद्रिये कोंडिती। ते कोंडितांचि कष्टी होती। भक्त भगवंतीं अर्पिती। तेणे ते होती नित्यमुक्त''॥ २९०॥ (ए. भा. अ. २) या ओविने सांगितला आहे.

भगवंताचे ठिकाणी नि:सीम प्रेम होण्याकरिता व ध्यान दृढ होण्याकरिता मनाचा विकारात्मक भागहि भगवत् अर्पण झाला पाहिजे असें भगवान नारदांनीहि ''तदर्पिताखिलाचार: सन् कामक्रोधाभिमानादिकं तस्मिन्नेव करणीयम्'' या भक्तीसूत्रांत सांगितले आहे.

वरील ओव्यांत देखील सर्व मनोवृत्ती भगवदर्पण कशा करावयाच्या याचेच वर्णन माऊलीनी केले आहे.

**ते मरणाऐलीचकडे। मज मिळोनि गेले फुडे। मग मरणीं आणिकीकडे। जातील केविं॥ ३६५॥**

**अर्थ**—अर्जुना! असे भक्त मरणाच्या पूर्वीच माझ्याशी ऐक्य पावतात, मग मेल्यावर दुसरीकडे कसे जातील?॥ ३६५॥

**गूढार्थदीपिका**—वर सांगितल्याप्रमाणे संपूर्ण ममताप्रेम अर्पण केल्यामुळेच देहाची अहंता नाहीशी होते व भगवत्स्वरूपाचे ठिकाणीं जाणीवरहित मीपण बसून भगवंताशीं ऐक्य होतें, हे माऊलींनीच या ओवीत स्पष्ट केले आहे.

**म्हणोनि मद्याजी जे जाहाले। ते माझिया सायुज्या आले। जिहीं उपचारमिषें दिधलें। आपणपें मज॥ ३६६॥**
**पैं अर्जुना माझे ठायीं। आपणपेवीण सौरसु नाहीं। मी उपचारीं कवणाही। नाकळें गा॥ ३६७॥**

**अर्थ**—म्हणून ज्यांनी आपल्यालाच उपचाररूपाने माझे ठिकाणीं समर्पण करून दिलें, अशा रीतीने जे माझें यजन करणारे झाले ते माझ्याशीं ऐक्य पावले॥ ३६६॥ अर्जुना! आपणच मी होऊन जाणें—म्हणजे संपूर्ण अहंताममता समर्पण करून मी होऊन जाणें—या वांचून माझ्या प्राप्तीचा दुसरा उत्तम मार्ग नाही. कारण उपचारांदिकानी मी प्राप्त होऊ शकत नाही.॥ ३६७॥

**गूढार्थदीपिका**—समर्पण केलेल्या उपराचादिकांनी संतुष्ट होण्यासारखे षड्गुणैश्वर्य परमेश्वराच्या ठिकाणीं कांहीच उणें नसतें असा भाव.

**एथ जाणीव करी तोचि नेणे। आथिलेपण मिरवी तेंचि उणें। आम्ही जाहलों ऐसें जो म्हणे। तो कांहींचि नव्हे॥ ३६८॥**

**अर्थ**—माझी जाणीव मिरवणें हीच माझी अप्राप्ति होय. आपली संपन्नता मिरवणें हाच माझ्या प्राप्तींतील उणेपणा होय व आम्ही कृतार्थ झालों, असें म्हणणें कांहीच न होणें होय.॥ ३६८॥

**गूढार्थदीपिका**—जीव मुळांत ब्रह्मस्वरूपच आहे. तो परब्रह्माहून मूळींच निराळा नाही असा वेदांतसिद्धांत आहे. पण तो आपलें स्वरूप विसरला असल्यामुळें, त्याला आपल्या स्वरूपाची जाणीव होणें प्रथम आवश्यक असतें. परमात्म्याचे ठिकांणीं स्वरूपाची विस्मृती किंवा अज्ञान मुळींच नसतें; म्हणून त्याला स्व-स्वरूपाची जाणीव करून घेण्याची आवश्यकता नसते. ''जाणीव नेणीव भगवंतीं नाही'' (हरिपाठ), असा हा परमात्मा जाणीवनेणीवरहित आहे. त्या परमेश्वराशीं जीवाचें मूळचे ऐक्य प्राप्त होण्याकरिता तोहि (जीवहि) जाणीवनेणीवरहितच झाला पाहिजे. आपल्या स्वरूपाहून भिन्न असलेल्या देहादि पदार्थाशीं मनुष्य जेव्हा भ्रांतीने आपले ऐक्य करतो तेव्हा ते ऐक्य अहंकाराचे द्वाराच केले जात असते. पण भगवान आपला आत्माच असल्यामुळें (अहंकाराचे द्वारा) जोपर्यंत आपण जाणीवेच्या वगैरे अहंकाराने त्याच्याशीं ऐक्य करतो किंवा ऐक्याच्या जाणीवेचा वगैरे जीव अहंकार वागवितो, तोपर्यंत तो भगवंताला आपल्याहून निराळाच ठेवित असल्यामुळें भगवंताशीं त्याचें मूळचें जाणीवनेणीवरहित असें समरस ऐक्य होत नाही असा अर्थ.

मी ब्रह्म म्हणणे स्वगत भेद होय असें नाथानी म्हटलें आहे तें मागें सांगितलेंच आहे.

**अथवा यज्ञदानादि किरीटी। कां तपे हन जे हुटहुटी। ते तृणा एकासाठीं। न सरे एथ॥ ३६९॥**
**पाहें पां जाणिवेचेनि बळें। कोण्ही वेदापासूनि असे आगळें। कीं शेषाहूनि तोंडागळें। बोल्कें आथी॥ ३७०॥**
**तोही आंथरुणातळवटीं दडे। येरु नेति नेति म्हणोनि बहुडे। एथ सनकादिक वेडे। पिसे जाहाले॥ ३७१॥**

**अर्थ**—अथवा यज्ञदानादि तपें व कर्में हीं परमेश्वरप्राप्तीचे ठिकाणीं गवताच्या काडी इतकीहि प्रतिष्ठा मिरवूं शकत नाहीत. ॥ ३६९ ॥ अर्जुना! वेदापेक्षा ज्ञानाचें अधिक बळ कोणापाशीं आहे किंवा शेषाहून अधिक बोलका कोण आहे?॥ ३७० ॥ पण तो शेषहि भगवंताचें अंथरूण झाला आहे आणि वेदहि हें नव्हें, हें नव्हे, असें म्हणून मागें सरला. माझ्या ठिकाणीं सनकादिकहि वेडे पिसे झाले. ॥ ३७१ ॥

**गूढार्थदीपिका**—परब्रह्म सत्स्वरूप असलें व त्याचे सत्, चित्, आनंद हे धर्म परस्परांहून निराळे होत नसले तरी परब्रह्म सदंश-प्रधान, चिदंश-प्रधान व आनंदांश-प्रधान असें अनुभविलें जातें. सदंशप्रधानामध्ये चित् आणि आनंद हे अंश सामान्य असतात. अशा या सदंशप्रधान परब्रह्माला निर्गुण परब्रह्म म्हणतात व तें निरूपिलें जातें व जाणले जातें हें "ज्ञेयं यत्तत्प्रवक्ष्यामि" या भगवंताचे गीतावचनावरून सिद्ध आहे.

सगुणपरमात्मा आनंदांशप्रधान असतो हें "आनंदपदीं जया म्हणती हरि" या नाथ महाराजांच्या वचनावरून सिद्ध आहे. पण चिदंश प्रधान असतो तेव्हाच जाणीव होत असते, आनंदांश प्रधान झाला असतां ज्ञानांश त्याच्यांत सामान्यपणाने असतो, विशेषपणाने नसतो. म्हणून आनंदांशप्रधान अशा सगुण परमेश्वराच्या स्वरूपाचें किंवा गुणाचें वर्णन कोणालाच करतां येत नाही. असें माऊलीचें म्हणणें आहे.

इदानीं यद्यप्युभयोरविशेषेण दुर्ज्ञेयत्वमुक्तं तथापि गुणातीतस्य ज्ञानं कथचिद्भवेन्न तु सगुणस्य तवाचिन्त्यानन्तगुणत्वादिति" (श्रीधरी टीका भाग. स्कं. १०-अ. १४ श्लो. ६) भगवंताची सगुण निर्गुण अशीं दोन्ही रूपें दुर्ज्ञेय असली तरी निर्गुण स्वरूपाचे कसे तरी एकदाचें ज्ञान होऊं शकतें, परंतु सगुणाचें ज्ञान होणें दुरापास्त आहे असे श्रीधरस्वामींनीहि भागवतावरील टीकेंत म्हटलें आहे. "अनंताचे गुण अनंत अपार। न कळेचि पार श्रुतिशास्त्रां" असा श्रीनाथांनीहि आपला अनुभव सांगितला आहे.

**करितां तापसांची कडसणी। कवणु जवळां ठेविजैल शूळपाणी। तोहि अभिमानु सांडूनि पायवणी। माथां वाहे॥ ३७२ ॥**
**नातरि आथिलेपणें सरिसी। कवणी आहे लक्ष्मियेऐसी। श्रियेसारिखिया दासी। घरीं जियेतें॥ ३७३॥**
**तिया खेळतां करिती घरकुलीं। तयां नामें अमरपुरें जरि ठेविलीं। तरि न होती काय बाहुलीं। इंद्रादिक तयांचीं॥ ३७४ ॥**
**तिया नावडोनि जेव्हां मोडती। तेव्हां महेंद्राचे रंक होती। तिया झाडां जेउते जयां पाहती। ते कल्पवृक्ष॥ ३७५ ॥**
**ऐसिया जियेचिया जवळिका। सामर्थ्य घरींचिया पाइका। ते लक्ष्मी मुख्यनायका। न मनेचि एथ॥ ३७६॥**
**मग सर्वस्वें करूनि सेवा। अभिमानु सांडूनि पांडवा। तें पाय धुवावयाचिया दैवा। पात्र जाहाली॥ ३७७॥**
**म्हणोनि थोरपण पऱ्हांचि सांडिजे। व्युत्पत्ति आघवी विसरिजे। जैं जगा धाकुटें होइजे। तैं जवळीक माझी॥ ३७८ ॥**

**अर्थ**—तपस्व्यांत श्रेष्ठ कोण, हें पाहूं गेल्यास शंकराचे बरोबरीने कोणाला बसवितां येईल? पण ते शंकरहि सर्व अभिमान सोडून माझें चरणतीर्थ जी गंगा ती मस्तकावर धारण करितात. ॥ ३७२ ॥ नाही तर त्या लक्ष्मीसारखी संपन्नपणाने दुसरी कोण दाखवितां येईल? श्रियेसारख्या दासी ज्या लक्ष्मीच्या घरीं राबतात. ॥ ३७३ ॥ त्या दासींनी खेळतांना खोपटें केलें व त्याला अमरावती हें नांव दिलें तर इंद्रादिक त्यांतील बाहुल्या होणार नाहीत काय?॥ ३७४॥ त्यांना वाटेल हें खोपटें मोडून टाकावें तेव्हा इंद्राचे रंक बनतील, त्या दासी ज्या झाडाकडे पाहतील ते कल्पवृक्ष होतील. ॥ ३७५ ॥ अशारीतीने ज्या लक्ष्मीच्या घरीं असलेल्या दासींचे सामर्थ्य आहे, त्या लक्ष्मीची देखील भगवंताचे ठिकाणीं किंमत नाही. ॥ ३७६ ॥ मग अर्जुना! जेव्हा ती सर्व अभिमान टाकून देऊन सर्व भावाने माझी सेवा करायला लागली, तेव्हा ती माझे पाय धुण्याकरितां पात्र झाली. ॥ ३७७॥ म्हणून थोरपण बाजूला ठेवावें, सर्व शहाणपणा विसरावा व सर्व जगापेक्षा लहान व्हावें, तेव्हाच माझी प्राप्ति होते. ॥ ३७८ ॥

**गूढार्थदीपिका**—परमेश्वर व्यापक आहे. तो इतका व्यापक आहे की, त्याच्यावांचून दुसरी वस्तूच मानतां येत

नाही. किंवा त्याच्यावांचून दुसरी वस्तूच नसल्यामुळे त्याला व्यापक देखील म्हणतां येत नाही. व्यापकत्व हें सूक्ष्मतेवर अवलंबून असतें. पर्वत स्थूल आहे म्हणून तो घटांत शिरूं शकत नाही, पण आकाश सूक्ष्म असल्यामुळें कोठेंहि शिरूं शकतें.

जीवहि वेदान्तसिद्धान्ताप्रमाणे व्यापकच आहे. पण तो आपल्याला देहापुरता मर्यादित मानतो, म्हणून तो मर्यादित एकदेशी झाला आहे. परमात्मा निर्गुण स्वरूपाने जसा व्यापक आहे तसा तो सगुणरूपानेहि व्यापकच आहे; कारण मूळची जी व्यापकता आहे, तिचा अनुभव न येणें, हें मी व्यापक नाही, देहापुरता मर्यादित आहे, अशी विपरीत कल्पना झाल्याशिवाय घडूं शकत नाही. सगुण परमात्माहि जरी इतरांना एकदेशीय मर्यादित दिसत असला तरी आपल्याला तो मर्यादित एकदेशी समजत नाही, म्हणून तो व्यापकच राहतो—म्हणजे अत्यंत सूक्ष्मच असतो.

परमेश्वराशी ऐक्य व्हावयाचे म्हणजे त्याच्यासारखे सूक्ष्म झालें पाहिजे. जीव हा देहादिकांचा अहंकार धरल्यामुळे स्थूल झाला आहे; म्हणून जीवाने सर्व अहंकार सोडून माझ्यासारखें व्हावें असें भगवंताचें म्हणणें माऊलींनी या ओव्यांतून स्पष्ट केलें आहे.

अमृतानुभवांतहि माऊली म्हणतात ''लघुत्वाचेनि मुद्दलें। बैसला गुरुत्वाचे सेले'' परमात्मा अत्यन्त अहंकाररहित आहे म्हणूनच तो अत्यंत सूक्ष्म आहे व अत्यंत थोर आहे. अशा परमेश्वराशी ऐक्य पावण्याकरिता जीवानेहि आपला नि:शेष अहंकार सोडून अत्यंत लघुत्व म्हणजे नि:साधन दीनभाव घेतला पाहिजे.

**जगा धाकुटें होईजे**—म्हणजे मीपण सोडून सर्व जगाला परमेश्वर समजून सर्व जीवाचे ठिकाणी लीन व्हावें.

**थोरपण**—म्हणजे मी पूर्ण किंवा कृतार्थ झालों, मी धन्य आहे असा अभिमान. यालाच रसास्वाद म्हणतात.

या धन्यताभिमानाने ब्रह्मसुखाचें भोक्तृत्व उत्पन्न होतें, जीवाची तादात्म्य ऐक्यस्थिति जाऊन तो ब्रह्माहून निराळा पडतो; सगुण परमेश्वराचे ठिकाणी नि:सीम प्रेम राहत नाही व परमेश्वराचें सगुणस्वरूप अंतर्धान पावतें.

**अगा सहस्रकिरणाचिये दिठी-। पुढां चंद्रुही लोपे किरीटी। तेथ खद्योत कां हुटहुटी। आपुलेनि तेजें॥ ३७९॥**
**तैसें लक्ष्मियेचें थोरपण न सरे। जेथ शंभूचेंही तप न पुरे। तेथ येर प्राकृत हेंदरें। केविं जाणों लाहे॥ ३८०॥**
**यालागीं शरीर सांडोवा कीजे। सकळगुणांचें लोण उतरिजे। संपत्तिमदु सांडिजे। कुरवंडी करुनी॥ ३८१॥**

**अर्थ**—अर्जुना! जेथे सूर्याच्या प्रकाशापुढे चंद्राचें तेज लोपलें जातें तेथे काजवा आपल्या तेजाची काय टिमकी मिरविणार?॥ ३७९॥ त्याप्रमाणें ज्याच्या प्राप्तीकरितां लक्ष्मीचे मोठेपण चालत नाही, शंकराचें तपहि अपुरेंच होतें, तेथें सामान्य गावंढळ माणूस मला काय जाणूं शकणार!॥ ३८०॥ म्हणून शरीराची नि:शेष ममता सोडून, आपल्या सर्व गुणांचें निंबलोण करून व सर्व संपत्ति भगवंतावरून ओवाळून टाकून त्यांचा मद टाकावा.॥ ३८१॥

**गूढार्थदीपिका**—जीवाने कोणत्याहि साधनांचा व अपल्या ठिकाणच्या गुणांचा यत्किंचित्‌हि अभिमान न बाळगतां अति हीन-दीन होऊन मला शरण यावें असा अर्थ.

''तुझी निष्ठा पंढरीराया। सारभूत माझी काया'' या अभंगांत श्रीतुकाराम महाराजांनी हीनदीनतेची कल्पना दिली आहे.

**पत्रं पुष्पं फलं तोयं यो मे भक्त्या प्रयच्छति। तदहं भक्त्युपहृतमश्नामि प्रयतात्मन:॥ २६॥**

**अर्थ**—पान असो, फूल असो, फळ असो, की केवळ पाणी असो, अत्यंत प्रेमाने व दीन होऊन जो मला अर्पण करतो, त्याचें तें मी, भक्तिभावाने व अत्यंत शुद्ध चित्ताने अर्पण केलेलें असल्यामुळे सेवन करितों.॥ २६॥

**मग निस्सीमभावउल्हासें। मज अर्पावयाचेनि मिसें। फळ एक आवडे तैसें। भक्तयाचें हो॥ ३८२॥**
**भक्तु माझियाकडे दावी। आणि मी दोन्ही हात वोडवीं। मग देंठु न फेडितां सेवीं। आदरेंशीं॥ ३८३॥**
**पैं गा भक्तीचेनि नांवें। फूल एक मज द्यावें। तें लेखें तरि म्यां तुरंबावें। परि मुखींचि घालीं॥ ३८४॥**

**अर्थ**—अत्यंत प्रेमोल्हासाने व मलाच द्यावें, या इच्छेने कशाचेंहि वाटेल तें फळ असलें तरी.॥ ३८२॥ भक्त मला तें दाखवितो व तें घेण्याकरिता मी दोन्ही हात पुढे करितों. मग देंठ न काढता प्रेमानें तें मी भक्षण

करितों. ॥ ३८३ ॥ परंतु भक्तिप्रेमाने कोणी एखाद्याने मला फूल जर दिलें, तर खरे पाहतां तें हुंगायला पाहिजे, पण मी तें मुखांतच घालतो. ॥ ३८४ ॥

**गूढार्थदीपिका**—भक्तिप्रेमामध्ये तल्लीन झालेल्या भक्ताला देहाचें भान न राहिल्यामुळे त्याचे व्यवहार असंबद्ध होतात.

**हें असो कायसीं फुलें। पानचि एक आवडते जाहलें। तें साजुकही न हो सुकलें। भलतैसें॥ ३८५॥**
**परि सर्वभावें भरलें देखें। आणि भुकेला अमृतें तोखे। तैसें पत्रचि परि तेणें सुखें। आरोगूं लागें॥ ३८६॥**
**अथवा ऐसेंही एक घडे। जे पालाही परि न जोडे। तरि उदकाचें तंव सांकडें। नव्हेल कीं॥ ३८७॥**
**तें भलतेथ निमोलें। न जोडितां आहे जोडलें। तेंचि सर्वस्व करूनि अर्पिलें। जेणें मज॥ ३८८॥**

**अर्थ**—अर्जुना! हे असूं दे. फुलंच काय, पण प्रेमाने दिलेलें पानही मला प्रिय असतें, मग तें कसेंहि ताजे असो वा शिळें, सुकलेलें असो. ॥ ३८५ ॥ भुकेलेल्या माणसाला अमृत मिळाल्यास जसा आनंद होतो, तसा मलाहि तें सर्वस्वीं प्रेमाने अर्पण केलेलें पानच पाहून अत्यंत सुख होतें व त्या सुखाने मी तें पान खाऊं लागतों. ॥ ३८६ ॥ किंवा पालाहि मिळणार नाही, असें होऊं शकतें, पण पाण्याचा तर कोठें दुष्काळ पडत नाही ना ? ॥ ३८७ ॥ तें वाटेल तेथे विना मोल मिळूं शकतें. मोल देऊन प्राप्त करून घ्यावें लागत नाही. तेंच देवा! माझ्यापाशी इतकें पाणीच आहे असें म्हणून ज्याने अर्पण केलें. ॥ ३८८ ॥

**गूढार्थदीपिका**—अत्यंत दरिद्री पण अत्यंत प्रेमळ अशा भक्ताच्या अर्पणाविषयीं, हें म्हटलेलें आहे. सर्व संपत्ति प्राप्त असून कृपणतेने भगवंताला जल अर्पण करणाराविषयीं हें म्हटलेलें नाही. अशा कृपण पुरुषाचें प्रेम संपत्तीवर असतें, भगवंतावर नसतें.

**तेणें वैकुंठापासोनि विशाळें। मजलागीं केलीं राउळें। कौस्तुभाहोनि निर्मळें। लेणीं दिधलीं॥ ३८९॥**
**दुधाचीं शेजारें। क्षीराब्धीऐसीं मनोहरें। मजलागीं अपारें। सृजिलीं तेणें॥ ३९०॥**
**कर्पूर चंदन अगरु। ऐसेया सुगंधाचा महामेरु। मज हातीं लाविला दिनकरु। दीपमाळे॥ ३९१॥**
**गरुडासारिखीं वाहनें। मज सुरतरूंचीं उद्यानें। कामधेनुंचीं गोधनें। अर्पिलीं तेणें॥ ३९२॥**
**मज अमृताहूनि सुरसें। बोनीं वोगरिलीं बहुवसें। ऐसा भक्तांचेनि उदकलेशें। परितोषें गा॥ ३९३॥**

**अर्थ**—त्याने वैकुंठाहून विशाल असें माझ्याकरिता मंदीर बांधून दिलें. कौस्तुभमण्याहून तेजस्वी मण्याचे अलंकार मला त्याने समर्पण केले. ॥ ३८९ ॥ क्षीरसमुद्रासारखीं अनेक, सुंदर दुधाची शय्यास्थानें त्याने निर्माण केली. ॥ ३९० ॥ कापूर, चंदन, अगरु अशा सुगंधित द्रव्यांचा मेरूपर्वत मला त्याने दिला. त्याने माझ्या दीपमाळेवर सूर्याची काडवात आपल्या हाताने लाविली. ॥ ३९१ ॥ गरुडासारखी वाहनें, कल्पतरूचे बगीचे व कामधेनूंचे कळप मला त्याने समर्पण केलेत. ॥ ३९२ ॥ अमृतापेक्षांहि सुरस पंचपक्वान्नांचीं ताटें भरून वाढलीं, अशा भक्ताने अर्पिलेल्या थोड्याशा पाण्याने देखील मी संतुष्ट होतो. ॥ ३९३ ॥

**गूढार्थदीपिका**—परमात्मा नित्यतृप्त व षड्गुणैश्वर्यसंपन्न आहे, पण तो त्याच्या अत्यंत दरिद्री भक्तानेहि अर्पण केलेले हीनभोग भोगतांना आपली स्थिति विसरून भक्ताच्या अर्पण केलेल्या भोगाने सुखी होतो, असें हे भगवत्प्रेमाचें कौतुक आहे.

**हें सांगावें काय किरीटी। तुम्हीचि देखिलें आपुलिया दिठी। मी सुदामयाचिया सोडीं गांठी। पव्हयालागीं॥ ३९४॥**
**पैं भक्ति एकी मी जाणें। तेथ सानें थोर न म्हणें। आम्ही भावाचे पाहुणे। भलतेया॥ ३९५॥**

**अर्थ**—अर्जुना! हें काय सांगायला पाहिजे! मी पोह्यासाठी सुदाम्याची पोटली सोडली हें तूं आपल्या दृष्टीनेच पाहिलें आहेस. ॥ ३९४( परंतु मी एक प्रेम पाहतों. तें पाहतांना लहान थोर याचा विचार करीत नाही. वाटेल त्याच्या प्रेमाचा पाहुणा होतो. ॥ ३९५ ॥

**गूढार्थदीपिका**—''भावबळें आकळे येऱ्हवी नाकळे। करतळीं आवळे तैसा हरि'' (ज्ञा. म. हरिपाठ).

''आम्हापाशीं सरे एक शुद्धभाव। चतुराई जाणीव न लगे कळा (तु. गा. ३२९०), ''देखोन भोळिया भक्तासी। मीचि सामोरा धांवें त्यासी। त्यापाशीं मी अहर्निशीं। भुललो भावासी सर्वथा'' (ए. भा. अ. ११-११७४) असें सर्व संताचें म्हणणें आहे.

**येर पत्र पुष्प फळ। हें भजावया मिस केवळ। वांचूनि आमुचा लाग निष्कळ। भक्तितत्त्व॥ ३९६॥**
**म्हणोनि अर्जुना अवधारीं। तूं बुद्धि एकी सोपारीं करीं। तरी सहजें आपुलिया मनोमंदिरीं। न विसंबें मातें॥ ३९७॥**

**अर्थ**—बाकी पान, फूल, फळ, हीं केवळ प्रेमाचें निमित्त आहेत. यावांचून माझ्या प्राप्तीकरिता निःसीम प्रेमभक्तिच उपयोगी आहे.॥ ३९६॥ म्हणून अर्जुना! हें ऐक, तुला आपल्या एक बुद्धींत माझी सुलभ प्राप्ति व्हावीं असे वाटत असेल, तर चुकून देखील आपल्या मनोरूपी मंदिरांत मला विसरू नकोस.॥ ३९७॥

**अवतरणिका—लौकिक अलौकिक सर्व कर्म भगवंताचे प्राप्तीकरिता भगवंताला अर्पण करणें हाहि एक एकान्तभक्तींतील विशेष आहे. तो पुढील श्लोकाने भगवान सांगत आहेत.**

**यत्करोषि यदश्नासि यज्जुहोषि ददासि यत्। यत्तपस्यसि कौन्तेय तत्कुरुष्व मदर्पणम्॥ २७॥**

**अर्थ**—अर्जुना! तूं जें जें करशील, जें जें भोगशील, जें जें अग्नींत हवन करशील, जें जें दुसऱ्यांला देशील व जें जें तप करशील, तें सर्व मला अर्पण कर.॥ २७॥

**जे जे कांहीं व्यापार करिसी। कां भोग हन भोगिसी। अथवा यज्ञीं यजिसी। नानाविधीं॥ ३९८॥**
**ना तरी पात्रविशेषें दानें। कां सेवकां देसी जीवनें। तपादि हन साधनें। व्रतें करिसी॥ ३९९॥**
**तें क्रियाजात आघवें। जें जैसें निपजेल स्वभावें। तें भावना करोनि करावें। माझिया मोहरा॥ ४००॥**
**परि सर्वथा आपुले जीवीं। केलियाची से कांहींचि नुरवीं। ऐसीं धुवोनि कर्में द्यावीं। माझिया हातीं॥ ४०१॥**

**अर्थ**—अर्जुना! तूं जे जे कांही व्यापार करशील किंवा जे कांही भोग भोगशील अथवा नाना प्रकारचे यज्ञ करशील.॥ ३९८॥ किंवा पात्र पाहून जें दान देशील किंवा सेवकजनांना जें कांही त्यांच्या सेवेबद्दल मोबदला म्हणून वेतन देशील, नाना प्रकारचीं तपादिव्रतें, साधनें करशील.॥ ३९९॥ त्या सर्व क्रिया, ज्या रीतीने जशा होतील तशा माझ्या प्रीत्यर्थ, माझें ध्यान ठेवून करीत जा.॥ ४००॥ पण आपल्या अंतःकरणांत मी अमुक केलें अशी कर्तृत्वाची यत्किंचित् देखील आठवण होणार नाही, अशी धुतल्याप्रमाणे सर्व कर्में मला अर्पण कर.॥ ४०१॥

**गूढार्थदीपिका**—कर्मकर्तृत्व व भोक्तृत्व हीच जीवाची उपाधि आहे व तीच जीवाला जन्ममरण परंपरेंत टाकणारी आहे.

कर्माचें कर्तृत्व आपले ठिकाणीं ठेवून कर्म भगवंताला अर्पण केल्यास कर्मफळभोक्तृत्व चुकत नाही; म्हणून माऊलींनी कर्माचें कर्तृत्व म्हणजे मी कर्म केलें याची अंतःकरणांत आठवण होऊं देऊं नये असे सांगितलें आहे. कर्मकर्तृत्व सुटलें की पुढे भोक्तृत्वाचा प्रसंगच येत नाही, हें माऊलींनी पुढील ओव्यांत सांगितलें आहें.

**शुभाशुभफलैरेवं मोक्ष्यसे कर्मबन्धनैः। सन्न्यासयोगयुक्तात्मा विमुक्तो मामुपैष्यसि॥ २८॥**

**अर्थ**—पुण्यपापरूप कर्माचीं सुखदुःखरूप जीं फळें तींच कर्माचीं बंधनें आहेत, त्या बंधनापासून अर्जुना! तूं मुक्त होशील व अशा रीतीने तुझें अंतःकरण योगयुक्त झाल्यामुळे तूं मुक्त होऊन मला प्राप्त होशील.॥ २८॥

**मग अग्निकुंडीं बीजें घातलीं। तियें अंकुरदशे जेविं मुकलीं। तेविं न फळतीचि मज अर्पिलीं। शुभाशुभें॥ ४०२॥**
**अगा कर्में जैं उरावें। तैं तिहीं सुखदुःखीं फळावें। आणि तयातें भोगावया यावें। देहा एका॥ ४०३॥**
**तें उगाणिलें मज कर्म। तेव्हांचि पुसिलें मरण जन्म। जन्मासवें श्रम। वरचिलही गेले॥ ४०४॥**
**म्हणऊनि अर्जुना यापरी। पाहेचा वेळु नव्हेल भारी। हे संन्यासयुक्ति सोपारी। दिधली तुज॥ ४०५॥**
**या देहाचिया बांदोडीं न पडिजे। सुखदुःखाचिया सागरीं न बुडिजे। सुखें सुखरूपा घडिजे। माझियाचि अंगा॥ ४०६॥**

**अर्थ**—मग अग्निकुंडांत घातलेले बीं जसे अंकुरदशेला येत नाही, त्याप्रमाणे मला अर्पण केलेले पुण्यपापरूप कर्महीं सुखदुःखरूप फळ देत नाही.॥ ४०२॥ अर्जुना कर्म जर राहील तर त्याचें सुख किंवा दुःख फळ होईल

आणि तें कर्मफळ भोगण्याकरिता देह घ्यावा लागणार म्हणजे जन्माला यावें लागणार. ॥ ४०३ ॥ तें कर्मच जर कर्तृत्वासह मला अर्पण केलें, तर कर्माच्या अर्पणाबरोबरच जन्ममरण पुसलें जातें आणि जन्म नाहीसा झाल्याबरोबर जन्मान्तरी मिळणारें दुःखहि नाहीसें होतें. ॥ ४०४ ॥ म्हणून अर्जुना! कर्मकर्तृत्व व भोक्तृत्वरहित होऊन मद्रूप होण्याची ही सोपी युक्ति तुला सांगितली आहे आणि याप्रमाणे याचा अनुभव घेण्याला तुला फार वेळ लागणार नाही. ॥ ४०५ ॥ या संन्यासयुक्तीने देहाच्या बंदीवासांत पडावे लागत नाही. सुखदुःखाच्या समुद्रांत बुडावें लागत नाही व सुखाने माझ्या सुखस्वरूप अशा अंगाशीं तूं मिळून जाशील किंवा मद्रूप होशील. ॥ ४०६ ॥

**गूढार्थदीपिका**—भगवंताला कर्तृत्वासह सर्व कर्मे अर्पण करतां करतां मनुष्य आपल्याला सर्वकर्मकर्तृत्व व भोक्तृत्व यारहित पाहतों व भगवान हा कर्मकर्तृत्व-भोक्तृत्वरहितच असल्यामुळें जीव सहजच परमेश्वरस्वरूप होतो.

**समोऽहं सर्वभूतेषु न मे द्वेष्योऽस्ति न प्रियः । ये भजन्ति तु मां भक्त्या मयि ते तेषु चाप्यहम् ॥ २९ ॥**

**अर्थ**—मी सर्व भूतांचे ठिकाणीं सारखा आहे व मला कोणी प्रिय नाही व माझा कोणी शत्रु नाही, पण जे कोणी माझें प्रेम करतात त्यांचे ठिकाणीं मी आहे व माझे ठिकाणीं ते आहेत. ॥ २९ ॥

**तो मी पुससी कैसा। तरि जो सर्वभूतीं सदा सरिसा। जेथ आपपरु ऐसा। भागु नाहीं॥ ४०७॥**

**अर्थ**—तो मी कसा आहे, असें जर तूं विचारशील, अर्जुना! तर तो मी सर्व भूतांचे ठिकाणी सारखाच आहे म्हणजे संपूर्ण विषमभावरहित आहे. माझें ठिकाणीं आपपर असा भेद नाहीं. ॥ ४०७ ॥

**गूढार्थदीपिका**—"समोऽहं सर्व भूतेषु" या श्लोकांत व या ओवींत निर्गुण अशा सन्मात्रस्वरूपाने मी सर्वत्र सारखा व्यापक आहे, हें सांगितलें गेलें आहे. भगवंताचें सन्मात्रस्वरूप कोठे असणें-नसणें किंवा कमी-जास्त होणें अशा विषमभावाला प्राप्त होत नाही.

**जे ऐसिया मातें जाणोनि। अहंकाराचा कुरुठा मोडोनि। जे जीवें कर्मे करूनि। भजती मातें॥ ४०८॥**

**अर्थ**—सर्वत्र भगवान सम आहे, असें माझें स्वरूप जाणून व अहंकाराचें घर मोडून, जे जीवभावाने व कर्माचे द्वारा माझी भक्ति करितात. ॥ ४०८ ॥

**गूढार्थदीपिका—ऐसिया मातें जाणोनि**-पाण्यावरच लहरी उठते, त्याप्रमाणे सन्मात्र अशा निर्गुण स्वरूपावरच आनंद किंवा प्रेमवृत्तींत प्रगट होणारा सगुण परमात्मा द्वैतरूपाने अनुभवाला येत असल्यामुळे, त्याचें निर्गुणत्व नष्ट होत नसतें. हेंच माऊलींनी "ऐसिया मातें जाणोनि" या चरणाने दाखविलें आहे.

**अहंकाराचा कुरुठा मोडोनि। जे जीवें कर्मे करूनि। मातें भजले**—सर्वकर्मसमर्पणरूप व प्रेमरूप भक्ति सगुणस्वरूपाचे ठिकाणींच होत असल्यामुळें येथें या चरणांनी माऊलींनी सन्मात्र निर्गुणस्वरूपाचे ठिकाणीं अनध्यस्तविवर्तस्वरूपाने अनुभवाला येणाऱ्या सगुण स्वरूपाचा उल्लेख केला आहे.

**ते वर्तत दिसती देहीं। परि ते देहीं ना माझां ठायीं। आणि मी तयांचां हृदयीं। समग्र असें॥ ४०९॥**

**अर्थ**—ते आपल्या देहाचे ठिकाणीं आहेत, असे दिसत असले, तरी ते आपल्या देहाचे ठिकाणीं नसतात. माझे ठिकाणीं असतात आणि मी त्यांच्या हृदयांत संपूर्ण असतो. ॥ ४०९ ॥

**गूढार्थदीपिका—मी तयांचां हृदयीं। समग्र असे**—ज्ञान्याच्या हृदयांत परमात्मा सत्‌चित् अशा निर्गुण स्वरूपानेच अनुभवाला येतो. संपूर्ण सत्‌चित्‌आनंदांशरूपाने म्हणजे सगुण स्वरूपाने अनुभवाला येत नाही. पण भक्ताचे हृदयांत "भगवान् परमानंदस्वरूपः स्वयमेवहि" प्रगट असणारा सगुण परमात्मा आनंदस्वरूपच असल्यामुळें आणि त्या आनंदांशांत सत्‌चित् हे दोन्ही अंश मिळून जातात, असें "येऱ्हवीं सच्चिदानंदभेदे। चालिली तीन्ही पदे। परि तिन्ही उणी आनंदें। केली येणें" (अमृ. प्र. ५-६) माऊलींनी सांगितलें असल्यामुळें भक्तांच्या हृदयांत प्रगट असणारा परमात्मा, "समोऽहं" इत्यादि निर्गुणाचे धर्म व षड्गुणैश्वर्यादि सगुणाचे धर्म या दोन्ही धर्मानी युक्त असतो, म्हणून माऊलींनी येथे मी भक्ताचे हृदयांत समग्र असतो, असें म्हटलें आहे.

**सविस्तर वटत्व जैसें। बीजकणिकेमाजीं असें। आणि बीजकणु वसे। वटीं जेवीं॥ ४१०॥**

**तेवीं आम्हां तयां परस्परें। बाहेरी नामाचींचि अंतरें। वांचुनि आंतुवट वस्तुविचारें। मी तेचि ते॥ ४११॥**
**आतां जायांचें जैसें लेणें। आंगावरी आहाचवाणें। तैसें देह धरणें। उदास तयाचें॥ ४१२॥**
**परिमळु निघालिया पवनापाठीं। मागें वोस फूल राहे देठीं। तैसें आयुष्याचिये मुठीं। केवळ देह॥ ४१३॥**
**येर अवष्टंभु जो आघवा। तो आरूढोनि मद्भावा। मजचि आंतु पांडवा। पैठा जाहाला॥ ४१४॥**

**अर्थ**—वडाच्या वृक्षाचा संपूर्ण विस्तार असा त्याच्या छोट्याशा बीजांत असतो आणि तें छोटेसें बीं वडाच्या वृक्षांत असतें. ॥ ४१० ॥ त्याप्रमाणे मी व माझे भक्त यांचा परस्परांत बाहेर नांवाचाच भेद असतो. आंत असलेल्या आत्मवस्तूचा विचार करून पाहतां ते आणि मी एकच आहोत. ॥ ४११ ॥ उसने आणलेले दागिने जसे परत द्यावे लागत असल्यामुळें नुसते आंगावर घातले जातात त्याप्रमाणें माझें भक्त उदास राहून देह धारण करतात. ॥ ४१२ ॥ फुलाचा सुगंध वाऱ्याबरोबर जाऊं लागला की मागें नुसतें फूल देठाला धरून राहतें, त्याप्रमाणें माझ्या भक्ताचे देह केवळ प्रारब्धाच्या मुठींत असतात. ॥ ४१३ ॥ बाकीचा जो अहंकारादिकांचा खटाटोप भक्ताचे ठिकाणीं दिसतो तो, माझ्याशीं झालेल्या ऐक्यभावाला धरूनच असल्यामुळे, माझ्याठिकाणी असतो किंवा तो खटाटोप माझाच असतो. ॥ ४१४ ॥

**गूढार्थदीपिका**—भक्ताचें मन व बुद्धि भगवदर्पण झाल्यामुळें बुद्धींतील सर्व विचार व मनांत उठणारे अहंकारादि विकार हे सर्व भगवदर्पणच झालेले असतात व तो पूर्ण भगवद्रूप झालेला असतो. म्हणून त्याच्या प्रारब्धानुसार उठणारे सर्व अहंकारादि विकार व सर्व सुखादि भोग भगवंताकरितांच असतात व भगवंतालाच समर्पण होतात. ''तदर्पिताखिलाचारःसन् कामक्रोधादिमानादिकं तस्मिन्नेव करणीयम्''॥६५॥ सर्व कर्मे भगवंताला अर्पण झालीं असतां काम, क्रोध, अभिमान सर्व त्याचे ठिकाणीच करावयाचे असतात, असें नारदभक्तिसूत्रांत सांगितलें असून ''देवासी अवतार भक्तासी संसार। दोहींचा विचार एकपणें'', देव त्याच्या संगें सुख भोगी. देवाच्या अवतारलीला भक्ताकरितांच असतात व भक्त देवाकरितांच संसार करतो, असें तुकाराम महाराजांनीहि म्हटलें आहे.

**अपि चेत्सुदुराचारो भजते मामनन्यभाक् । साधुरेव स मन्तव्यः सम्यग्व्यवसितो हि सः॥ ३०॥**

**अर्थ**—अर्जुना! जरी पुरुष प्रथम अत्यंत दुराचारी असला, तरी अनन्यभावाने जर माझें भजन करीत असेल तर त्याने आतां सन्मार्गाने वागण्याचा निश्चय केला असल्यामुळे त्याला सत्पुरुष समजलें पाहिजे. ॥ ३० ॥

**ऐसें भजतेनि प्रेमभावें। जयां शरीरही पाठीं न पवे। तेणें भलतया व्हावें। जातीचिया॥ ४१५॥**
**आणि आचरण पाहातां सुभटा। तो दुष्कृताचा कीर सेल वांटा। परि जीवित वेंचिलें चोहटां। भक्तीचिया कीं॥ ४१६॥**

**अर्थ**—याप्रमाणे अनन्यप्रेमाने जो माझें भजन करितो, तो कोणत्या ही भलत्या जातीचा असला तरी त्याला पुन्हा जन्मच प्राप्त होत नाही. ॥ ४१५ ॥ आणि हे उत्तम योद्ध्या अर्जुना! ज्याचे आचरण पाहूं गेल्यास, तें पापाचरणाचें अंतिम टोक आहे. चारहि बाजूने येणारे रस्ते ज्याप्रमाणे एखाद्या चौकांत मिळतात, त्याप्रमाणे चतुर्विध पुरुषार्थ ज्या भक्तींत एकीभूत होतात, त्या माझ्या भक्तीला ज्याने आपलें जीवित अर्पण केलें आहे. ॥ ४१६ ॥

**गूढार्थदीपिका—चोहटा**-धर्म, अर्थ, काम, मोक्ष हे चार पुरुषार्थ साधण्याचे जे चार साधनमार्ग आहेत, त्या चारहि साधनामार्गांमध्ये निरनिराळ्या रीतीने भगवंताची भक्ति सांगितलीच आहे. भगवंताच्या भक्तिवांचून हे पुरुषार्थ प्राप्त होत नाहीत. अशारीतीने या चारी पुरुषार्थांचे साधनमार्ग भक्तींतच येऊन मिळत असल्यामुळे आणि ''या वै साधनसंपत्तिः पुरुषार्थचतुष्टये। तयाविना तदाप्नोति नरो नारायणाश्रयाः'' या चारी पुरुषार्थाच्या चार निरनिराळ्या साधनमार्गाचा आश्रय न करतांहि केवळ एका सगुण भगवंताचा आश्रय करणाऱ्याला हे चारी पुरुषार्थ प्राप्त होऊं शकतात असें सांगितलें असल्यामुळे, येथे भक्तीला ''चोहटा'' म्हटलें आहे.

**अगा अंतींचिया मती। साचपण पुढिले गती। म्हणोनि जीवित जेणें भक्ती। दिधलें शेखीं॥ ४१७॥**
**तो आधीं जरी दुराचारी। तरी सर्वोत्तमुचि अवधारीं। जैसा बुडाला महापूरीं। न मरतु निघाला॥ ४१८॥**

**अर्थ**—बा अर्जुना! शेवटीं मरणाचे वेळीं जशी बुद्धि राहील त्याप्रमाणेच पुढे निश्चित गति होत असल्यामुळें,

ज्याने आपलें जीवित माझ्या भक्तीला समर्पण केलें. ॥ ४१७ ॥ तो प्रथम जरी अत्यंत पापाचरण करणारा असला तरी ज्याप्रमाणे एखादा महापुरांत बुडालेला न मरतां जीवंत निघावा त्याप्रमाणे तो सर्वांपेक्षा श्रेष्ठ पुण्यवान होतो. ॥ ४१८ ॥

**गूढार्थदीपिका**—भगवंताच्या भक्तीमार्गाचा आश्रय केल्यानंतर दुराचारी पुरुषाचें निःशेष दुराचरण सुटतें व भक्तीने मागींल सर्व पापांची निष्कृति होते; म्हणून तो सर्वोत्तम होतो. भगवंताचें भक्ति प्रेम लागलें म्हणजे भगवंताच्या आज्ञेविरुद्ध वागणें शक्य नसल्यामुळें पुढे पापाचरण होऊं शकत नाही, असा भाव.

**तयाचें जीवित ऐलथडिये आलें। म्हणोनि बुडालेपण जेवीं वायां गेलें। तेवीं नुरेचि पाप केलें। शेवटलिये भक्ती॥ ४१९ ॥**
**यालागीं दुष्कृती जऱ्ही जाहाला। तरि अनुतापतीर्थी न्हाला। न्हाऊनि मजआंतु आला। सर्वभावें॥ ४२० ॥**
**तरि आतां पवित्र तयाचेंचि कुळ। अभिजात्य तेंचि निर्मळ। जन्मलेया फळ। तयासीच जोडलें॥ ४२१ ॥**
**तो सकळही पढिन्नला। तपें तोचि तपिन्नला। अष्टांग अभ्यासिला। योगु तेणें॥ ४२२ ॥**

**अर्थ**—महापुरांत बुडालेला न मरतां महापुरांतून ऐलथडीवर जीवंत आला म्हणून, ज्याप्रमाणे त्याचें बुडणें व्यर्थ गेलें, त्याप्रमाणें दुराचारानंतर शेवटीं अनन्यभक्ति केल्यामुळें, त्याचें संपूर्ण मागील पाप नाहीसें झालें व त्याची पाप करण्याची प्रवृत्तिहि नाहीशी झाली. ॥ ४१९ ॥ म्हणून प्रथम दुराचारी होता तरी जर त्याने अनुतापतीर्थांत स्नान करून (म्हणजे कृतकर्माचा अत्यंत पश्चात्ताप होऊन) सर्व प्रेमभावाने माझे ठिकाणीं प्रेम करूं लागला. ॥ ४२० ॥ तर आतां त्याचें सर्व कुळ अत्यंत पवित्र झालें, त्याचेच कुळ कुलीन होय आणि त्यानेच आपल्या जन्माचें सार्थक केलें. ॥ ४२१ ॥ त्याने सर्व शास्त्राचें अध्ययन केलें त्याने सर्व तपें केलीं व त्यानें अष्टांगयोग केला. ॥ ४२२ ॥

**गूढार्थदीपिका**—केलेल्या साधनाचें फळ ज्याला मिळालें त्याचें साधनानुष्ठान सार्थक झालें किंवा त्यानेच खरोखर साधनानुष्ठान केलें, असें म्हटलें पाहिजे आणि फळप्राप्ति झाली नाही तर साधनानुष्ठान व्यर्थ किंवा करून न केल्यासारखेंच होय. परमात्म्यावांचून इतर फळांची सर्व संतांनी निंदा केली असल्यामुळे सर्व साधनांचें फळ एक परमात्माच आहे; म्हणून "योगाचें तें भाग्य क्षमा। आधीं दमा इंद्रियें॥ अवघीं भाग्यें येती घरां। देव सोयरा जालिया॥" (तु. गा.) भक्तिभावाने ज्यांनी परमात्मा स्वाधीन करून घेतला त्यांनीच खरोखर परमात्मप्राप्तीच्या सर्व साधनांचें अनुष्ठान केलें, असें म्हटलें पाहिजे.

**हें असो बहुत पार्था। तो उतरला कर्मे सर्वथा। जयाची अखंड गा आस्था। मजचिलागीं॥ ४२३ ॥**

**अर्थ**—अर्जुना! हें पुष्कळ बोलणें असूं दे. ज्याला माझें अखंड प्रेम लागलें तोच सर्व कर्मांतून सुटला. ॥ ४२३ ॥

**गूढार्थदीपिका**—"प्रारब्ध क्रियमाण। भक्तां संचित नाही जाण" (३०८१ तु. गा.) संपूर्ण संचित, क्रियमाण, प्रारब्ध, हें तिन्ही प्रकारचें कर्म भगवद्भक्तांना लागत नाही. भगवन्नामस्मरणाने संचित नाहीसें होतें. कर्मरहित असा सच्चिदानंद परमात्मा हृदयांत सांठविला असल्यामुळे, मी कर्माचा कर्ता आहे असें कर्तृत्वहि त्याचे ठिकाणीं उत्पन्न होत नाही, म्हणून क्रियमाण कर्महि त्यांना स्पर्श करूं शकत नाही व अखंड भगवत्प्रेमांत रंगून गेल्यामुळे प्रारब्धकर्माचाहि त्याना भोग होत नाही, असें श्रीतुकाराम महाराजांनी म्हटलें आहे. अशारीतीने भगवद्भक्त संपूर्ण कर्मांपासून अलिप्त असतात.

**अवघिया मनोबुद्धीचिया राहटी। भरोनि एकनिष्ठेचिया पेटीं। जेणें मजमाजीं किरीटी। निक्षेपिली॥ ४२४ ॥**

**अर्थ**—जेवढे कांही मनबुद्धीचे व्यापार आहेत ते सर्व एकनिष्ठेच्या पेटींत भरून माझ्याठिकाणीं ती एकनिष्ठेची पेटीं ज्यांनी ठेवून दिली (तो सर्व कर्मांहून सुटला) ॥ ४२४ ॥

**गूढार्थदीपिका**—एक निष्ठेची पेटी—"आम्हां विष्णुदासा। एकविधभाव। न म्हणों या देव। आणिकांसी" (तु. गा. ४१५) भगवद्भक्त आपल्या उपास्याचे ठिकाणीं एकनिष्ठ असल्यामुळे, त्यांच्या सर्व मनबुद्धिइंद्रियांदिकांचे व्यापार "एकान्तभक्तिः सततं नारायणपरायणः" भगवत्परायणच होतात. यालाच एकान्तभक्ति म्हणतात.

**क्षिप्रं भवति धर्मात्मा शश्वच्छान्तिं निगच्छति। कौन्तेय प्रतिजानीहि न मे भक्तः प्रणश्यति॥ ३१ ॥**

**अर्थ**—माझ्या भक्तीच्या योगाने पुरुष धर्मात्मा म्हणजे केवळ भगवदाज्ञेप्रमाणे वागणारा होतो व त्याला अखंड शांति प्राप्त होते. हे कुंतिसुता अर्जुना! माझा भक्त कधीं नाश पावत नाही असें निश्चित जाण. ॥ ३१ ॥

**तो आतां अवसरें मजसारिखा होईल। ऐसाही हन भाव तुज जाईल। हां गा अमृताआंत राहील। तया मरण कैचें॥ ४२५ ॥**

**अर्थ**—अर्जुना! असें तुला कदाचित् वाटेल की माझा भक्त कांही काळाने माझ्यासारखाच होईल, पण बाबा! अमृतामध्यें राहणाऱ्याला कसें मरण येईल. ॥ ४२५ ॥

**गूढार्थदीपिका—तो आतां अवसरें मजसारिखा होईल**—वस्तुत: जडविनाशी पांचभौतिक असें कांही एक नाही, नामरूपासह संपूर्ण परब्रह्मच आहे, असा वेदान्ताचा सिद्धान्त आहे. जीवाला पूर्ण अशा परब्रह्माचा, जडविनाशी पांचभौतिकरूपानें जो अनुभव येतो तो केवळ त्याच्या अविद्यारूप भ्रांतकल्पनेचा परिणाम आहे.

भगवद्भक्ताला अखंड भगवत्प्रेमामुळे देहादिकांचा विसर पडून देहादिकांच्या जडविनाशी पांचभौतिकधर्माचा प्रत्ययच नसतो; म्हणूनच त्याची भगवंताचे ठिकाणीं नि:सीम प्रेमरूप भक्ति झाल्याबरोबर भगवंताप्रमाणेच तो सदेह सच्चिदानंदरूप होतो, असा भाव.

**पैं सूर्य जो वेळु नुदैजे। तया वेळा कीं रात्रि म्हणिजे। तेवीं माझिये भक्तीविण जें कीजे। तें महापाप नोहे॥ ४२६ ॥**
**म्हणोनि तयाचिया चित्ता। माझी जवळिक पांडुसुता। तेव्हांचि तो तत्त्वता। स्वरूप माझें॥ ४२७ ॥**
**जैसा दीपें दीपु लाविजे। तेथ आदील कोण हें नोळखिजे। तैसा सर्वस्वें जो मज भजे। तो मी होऊनि ठाके॥ ४२८ ॥**
**मग माझी नित्य शांती। तया दशा तेचि कांती। किंबहुना जिती। माझेनि जीवें॥ ४२९ ॥**
**एथ पार्था पुढतपुढती। तेंचि तें सांगों किती। जरी मियां चाड तरी भक्ती। न विसंबिजे गा॥ ४३० ॥**
**अगा कुळाचिया चोखटपणा नलगा। आभिजात्य झणीं श्लाघा। व्युत्पत्तीचा वाउगा। सोसु कां वाहावा॥ ४३१ ॥**

**अर्थ**—जोपर्यंत सूर्य उगवत नाही तोपर्यंत रात्र म्हटली जाते. तसें माझ्या भक्तीवांचून जें केलें ते महापाप नव्हे काय? (माझी भक्ति हाच खरा धर्म होय व माझा भक्तच खरा धर्मात्मा होय असा भाव) ॥ ४२६ ॥ म्हणूनच माझ्या भक्तीने जेव्हा त्यांनी आपल्या हृदयांत मला जवळ केलें तेव्हाच तो माझें स्वरूप झाला. ॥ ४२७ ॥ ज्याप्रमाणे एका दिव्याने दुसरा दिवा लावला असतां पहिला दिवा कोणता, हें ओळखतां येत नाही, त्याप्रमाणे सर्वभावाने माझें भजन करणारा, मीच होऊन जातो. ॥ ४२८ ॥ मग माझी जी नित्य आत्मशांति तीच त्याची दशा असते व तेंच तेजहि असतें. किंबहुना माझें जगणे हेंच त्याचें जगणे होय—म्हणजे माझ्याहून माझा भक्त यत्किंचित् निराळा नसतो असा अर्थ. ॥ ४२९ ॥ अर्जुना! आतां वारंवार तेंच ते काय सांगायचे! माझी प्राप्ति व्हावी अशी इच्छा असेल तर माझी प्रेमभक्ति टाकू नकोस. ॥ ४३० ॥ मला प्राप्त होण्याला उत्तम कुळात जन्मण्याची गरज नाही. कुळाच्या कुलीनत्वाची प्रशंसा करावी लागत नाही, मी ब्रह्म आहें अशा ज्ञानाहंतेचा हव्यास कशाला करावा? ॥ ४३१ ॥

**गूढार्थदीपिका**—परब्रह्माचे सत् चित्, आनंद हे तिन्ही अंश एकवटून झालेलें भगवंताचें जे सगुण स्वरूप तें अंत:करणांत सांठविणे हीच परब्रह्माची पूर्ण प्राप्ति आहे आणि ती प्रेमभक्तीनेच होते. सगुणाच्या भक्तिप्रेमावांचून ज्ञानादिकांनी होणारी परमेश्वरप्राप्ति अंशभूत असते असा अर्थ.

कर्म, ज्ञान, योग इत्यादि मार्गाने जी सांश भगवत्प्राप्ति होते ती देखील त्या मार्गांत भक्तीचे साह्य घेतल्यावांचून सिद्ध होत नाही आणि इतर मार्गाचा आश्रय न करतां देखील केवळ भक्तीने भगवंताची पूर्ण प्राप्ति होते, म्हणूनहि येथे भक्तिची महति वाखाणिलेली आहे.

**कां रूपें वयसा माजा। आथिलेपणें कां गाजा। एक भाव नाहीं माझा। तरी पाल्हाळ तें॥ ४३२ ॥**
**कणेंविण सोपटें। कणसें लागलीं आथी घनदाटे। काय करावें गोमटें। वोस नगर॥ ४३३ ॥**
**नातरी सरोवर आटलें। रानी दु:खिया दु:खी भेटलें। कां वांझ फुलीं फुललें। झाड जैसें॥ ४३४ ॥**
**तैसें सकळ तें वैभव। अथवा कुळजातिगौरव। जैसें शरीर आहे सावेव। परि जीवचि नाहीं॥ ४३५ ॥**

**अर्थ**—रूप व वय यांचा मान किंवा अभिमान व संपत्तीचा डौल मिरविण्याची आवश्यकता नाही; एक माझें

अनन्य प्रेम नसेल तर हें सर्व व्यर्थ आहे. ॥ ४३२ ॥ दाण्यावाचून घनदाट फोल कणसें जरी लागलीं असलीं तरी काय उपयोग? नगर सुंदर आहे, पण माणसांवांचून ओस आहे तर काय उपयोग? ॥ ४३३ ॥ सरोवर आटलें असावें, अरण्यांत एका दु:खिताला दुसरा दु:खी मनुष्य भेटावा किंवा फळावांचून नुसतें फुललेलें झाड असावें, त्याप्रमाणे. ॥ ४३४ ॥ माझ्या भक्तीवांचून उत्तम जन्म, उत्तम कुळ, उत्तम संपत्ति इत्यादि सर्व मोठेपण, जीवावांचून शरीर असावें तसें आहे. ॥ ४३५ ॥

**तैसें माझिये भक्तीविण। जळो तें जियालेपण। अगा पृथ्वीवरी पाषाण। नसती काई॥ ४३६ ॥**
**पैं हिंवराची दाट साउली। सज्जनीं जैसी वाळिली। तैसीं पुण्यें डावलूनि गेलीं। अभक्तांतें॥ ४३७॥**
**निंब निंबोळियां मोडोनि आला। तरी तो काउळियांसीचि सुकाळु जाहला। तैसा भक्तिहीनु वाढिन्नला। दोषांचिलागीं॥ ४३८ ॥**
**कां षड्रस खापरीं वाढिलें। वाढूनि चोहटां ठेविलें। ते सुणियांचे उपेगा गेले। जियापरी॥ ४३९ ॥**
**तैसें भक्तिहीनाचें जिणें। जो स्वप्नीहि परि सुकृत नेणे। तेणें संसारदु:खासि भाणें। वोगरिलें गा॥ ४४० ॥**
**म्हणोनि कुळ उत्तम नोहावें। जाती अंत्यजही व्हावें। वरि देहाचेनि नांवें। पशूचेंही लाभो॥ ४४१ ॥**
**पाहें पां सावजें हातिरू धरिलें। तेणें तया काकुळती मातें स्मरलें। कीं तयाचें पशुत्व वावो जाहलें। पावलिया मातें॥ ४४२ ॥**

**अर्थ**—त्या प्रमाणेच माझ्या भक्तीवांचून जें जीवंतपण त्याला आग लागो. असें जर मनुष्याचेहि जिणें असेल तर पृथ्वीवर थोडे का दगड आहेत! ॥ ४३६ ॥ हिवराच्या झाडाची दाट सावली असली तरी सज्जन पुरुष ज्याप्रमाणे तिचा त्याग करितात त्याप्रमाणे अभक्त पुरुषाच्या वाऱ्याला देखील पुण्य राहत नाही. ॥ ४३७ ॥ कडुनिंबाच्या वृक्षाच्या फांद्या भूमीला टेकतील इतक्या निंबोळ्या आल्या तरी त्या कावळ्यांनाच सुकाळ होतात. त्याप्रमाणे माझी भक्ति न करणारा पापाची जोडी करण्याकरितांच जगतो. ॥ ४३८ ॥ षड्रसयुक्त पक्वान्नांचें ताट वाढून चौरस्त्यावर ठेविलें तर त्याप्रमाणे ज्या पुण्याने माझी प्राप्ति होते असें पुण्य स्वप्नांत देखील ज्याच्याकडून घडत नाही, अशा भक्तिहीनाचें जीवित तें अन्न जसे कुत्र्यांना घालण्याच्या उपयोगी असतें. ॥ ४३९ ॥ म्हणजे संसारदु:खापुढे वाढलेलें ताटच होय. ॥ ४४० ॥ म्हणून उत्तम कुळांतील जन्म नसो, जातीने अंत्यज असला तरी चालेल, आणखी देह पशूचा आला तरी हरकत नाही, एक माझी भक्ति असली की पुरे. ॥ ४४१ ॥ अर्जुना! पहा. नक्राने गजेंद्राला धरलें तेव्हा त्या गजेंद्राने अत्यंत काकुळतीने माझा धांवा केला व माझी प्राप्ति झाल्यामुळे त्याचें पशुत्व व्यर्थच ठरलें—म्हणजे माझ्या प्राप्तीला प्रतिबंधक झालें नाही. ॥ ४४२ ॥

**मां हि पार्थ व्यपाश्रित्य येऽपि स्यु: पापयोनय:। स्त्रियो वैश्यास्तथा शूद्रास्तेऽपि यान्ति परां गतिम्॥ ३२ ॥**

**अर्थ**—स्त्री, वैश्य, शूद्र इत्यादि पापयोनींत जन्मलेले जे लोक आहेत ते देखील माझा आश्रय करून भक्तीच्या योगाने परमगतीला प्राप्त होतात. ॥ ३२ ॥

**अगा नांवें घेतां वोखटीं। जे आघवेया अधमांचिये शेवटीं। तिये पापयोनींही किरीटी। जन्मले जे॥ ४४३ ॥**
**ते पापयोनि मूढ। मूर्ख जैसे कां दगड। परि माझ्या ठायीं दृढ। सर्वभावें॥ ४४४॥**
**जयांचिये वाचे माझे आलाप। दृष्टि भोगी माझेंचि रूप। जयांचें मन संकल्प। माझाचि वाहे॥ ४४५ ॥**
**माझिया कीर्तीविण। जयांचे रिते नाहीं श्रवण। जयां सर्वांगीं भूषण। माझी सेवा॥ ४४६ ॥**
**जयांचें ज्ञान विषो नेणे। जाणीव मजचि एकातें जाणे। जयां ऐसें लाभे तरी जिणें। एऱ्हवीं मरण॥ ४४७ ॥**

**अर्थ**—बा अर्जुना! ज्यांचें नाव घेण्यातहि पाप लागतें व जे अत्यंत अधमांतल्या अधम अशा पापयोनींत जन्माला आलें. ॥ ४४३ ॥ ते पापयोनींत जन्मले व पापकर्मानेच अत्यंत दगडाप्रमाणे मतिमंद असले तरी सर्वभावाने माझ्या ठिकाणीं दृढचित्त झाले आहेत. ॥ ४४४ ॥ ज्यांचे वाणीचे ठिकाणी अखंड माझ्या नामाचा व गुणांचा उच्चार होत राहतो, ज्यांच्या दृष्टीला माझें रूप पाहण्यांतच सुख वाटतें, ज्यांचें मन माझेंच अखंड ध्यान करीतें. ॥ ४४५ ॥ ज्यांचे कान माझी कीर्ति ऐकल्यावांचून कधीं रिकामे राहत नाहीत. सर्व भावाने सेवा हेच ज्यांच्या अंगावरील दागिने होत. ॥ ४४६ ॥ ज्यांचे ज्ञान शब्दादिक विषयांना न जाणतां मला एकालाच जाणतें. अशा रीतीने सर्व इंद्रियें, मन,

बुद्धि माझ्याकडे लागली असलीं तरच ते जगूं इच्छितात, नाही तर ज्यांचे प्राण माझ्या विरहाने देहाला सोडून जाऊं पाहतात. ॥ ४४७ ॥

**गूढार्थदीपिका**—परब्रह्माहून निराळ्या अशा जडविनाशी जगाचा जीवाला अनुभव आणून देणारी मन बुद्धी इंद्रियें हीं सर्व परमात्मपरायण झालीं असतां, जीव पूर्ण ब्रह्मस्वरूप होतो, निर्गुण परमात्मस्वरूपाच्या ठिकाणीं वाचा व्यापार संभवत नाही; पण रामकृष्णादि सगुणस्वरूपाचे ठिकाणीं मात्र इंद्रियांचा व्यापार संभवतो. हें रामकृष्णादी सगुणस्वरूप पूर्ण ब्रह्मच असल्यामुळें त्यांच्या भजनाने जीव पूर्ण ब्रह्मस्वरूप होतो; म्हणून हीं मनबुद्ध्यादिकांची सगुणपरायणता कशी साधायची हेंच माऊलींनी या ओव्यांनी सांगितले आहे.

**ऐसा आघवाचि परी पांडवा। जिहीं आपुलिया सर्वभावा। जियावयालागीं वोलावा। मींचि केला॥ ४४८ ॥**

**ते पापयोनीही होतु कां। ते श्रुताधीतही न होतु कां। परि मजसीं तुकितां तुका। तुटी नाहीं॥ ४४९ ॥**

**अर्थ**—याप्रमाणे अर्जुना! जीवंत राहण्याकरिता ज्यांनी आपल्या सर्व प्रेमभावाचा जिव्हाळा, मलाच मानून घेतलें. ॥ ४४८ ॥ ते पापयोनींत जन्मले असोत की त्यांनी कांही अध्ययन केलेलें नसो किंवा श्रवण केलेंलें नसो, पण माझ्याशीं त्यांची तुलना केली असतां, माझ्याहून ते यत्किंचित् कमी ठरणार नाहीत. ॥ ४४९ ॥

**गूढार्थदीपिका—ते श्रुताधीतही न होतु कां**—परमात्माविषयक पराविद्या व धर्माधर्मविषयक अपराविद्या या दोन विद्या आहेत हें मागें सांगितलेंच आहे. तत्त्वमस्यादि निर्गुण विद्या व सगुण परब्रह्माची प्रेमभक्ति ह्या पराविद्येंत मोडतात व श्रुताधीत म्हणजे शास्त्रांचे श्रवण, अध्ययन इत्यादि अपराविद्येंत मोडतात. ब्रह्मविद्या हीच खरी विद्या असून इतर सर्व विद्या भ्रांतिरूप अविद्येचेंच कार्य आहे. त्या नाहीशाच करावयाच्या असतात. अभक्ताला निर्गुणस्वरूपाचें ज्ञान प्राप्त करून घेण्याकरितां लागणाऱ्या चित्तशुद्धीसाठीं निष्कामचित्ताने अपराविद्येच्या अनुष्ठानाची आवश्यकता असते; पण ज्यांना भगवत्प्रेम प्राप्त झालें आहे, त्यांची त्या प्रेमानेच चित्तशुद्धि होऊन पूर्ण सगुणनिर्गुण भगवत्प्राप्ति होत असल्यामुळे, त्यांना अपराविद्येच्या अनुष्ठानाची आवश्यकता नसते. हेंच माऊलींनी "श्रुताधीतही न होतु कां" या चरणाने प्रतिपादिलें आहे.

**पाहें पां भक्तीचेनि आथिलेपणें। दैत्यीं देवां आणिलें उणें। माझें नृसिंहत्व लेणें। जयाचिये महिमें॥ ४५० ॥**

**तो प्रल्हादु गा मजसाठीं। घेतां बहुतें सदा किरीटी। कां जें मियां द्यावें ते गोष्टी। तयाचिया जोडे॥ ४५१ ॥**

**एऱ्हवीं दैत्यकुळ साचोकारें। परि इंद्रही सरि न लहे उपरें। म्हणोनि भक्ति गा एथ सरे। जाति अप्रमाण॥ ४५२ ॥**

**अर्थ**—पहा बरें अर्जुना! माझ्या भक्तीने संपन्न झालेल्या दैत्यांनी देवांना देखील आपल्यापेक्षा कनिष्ठ ठरविलें. ज्याच्या थोर भक्तीमुळे मला नृसिंहाचा अलंकार घालावा लागला. ॥ ४५० ॥ त्या प्रल्हादाची व माझी तुलना करून पाहतां तो माझ्यासारखाच सदा थोर ठरेल, कारण मी जें देऊं शकेन तेंच त्याच्यानेहि प्राप्त होऊं शकतें. ॥ ४५१ ॥ साधारणपणे पाहतां प्रल्हादाचे खरोखर दैत्यकुळ होय; पण त्याची इंद्रालाहि बरोबरी करतां येत नाही मग अधिकपणा तर दूरच राहिला, म्हणून माझ्या प्राप्तीकरिता एक भक्तींच समर्थ आहे येथे जातीला महत्व नाही. ॥ ४५२ ॥

**गूढार्थदीपिका—भक्ति गा एथ सरे**—भक्ति म्हणजे सगुण भगवंताचें प्रेम लागणें होय. "भक्त म्हणवितां गोड वाटे। परि मजलागी जै कां हृदय फुटे। अकृत्रिम भक्ति तैं उमटे। तैं मी भेटे उद्धवा"॥ ११२३ ॥ "जीवाहिहूनि वरौती। माझ्या ठायीं अत्यंत प्रीती। तिये नांव गा माझी भक्ति। जाण निश्चिती उद्धवा"॥ १३१६ ॥ (ए. भा. अ. ११) हें परमप्रेमच भगवंताचें स्वरूप आहे. हें परमप्रेम अंत:करणांत उमटलें की सगुणसायुज्यता—म्हणजे सगुण परमेश्वराशीं ऐक्य—होतें.

**जाति अप्रमाण**—अशा प्रकारें अखंड भगवद्ध्यानाने भगवद्रूप झालेला संत कोणत्याहि जातीचा असो, केवळ जातीमुळे त्याचा अवमान करणें हें भगवंताला आवडत नाही. तो भगवंताप्रमाणेच पूज्य मानला पाहिजे, असा भाव.

**राजाज्ञेचीं अक्षरें आहाती। तियें चामा एका जया पडती। तया चामासाठीं जोडती। सकळ वस्तु॥ ४५३ ॥**

**वांचूनि सोनें रुपें प्रमाण नोहे। एथ राजाज्ञाचि समर्थ आहे। तेंचि चाम एक जैं लहे। तेणें विकती आघवीं॥ ४५४ ॥**

**तैसें उत्तमत्व तैंचि तरे। तैंचि सर्वज्ञता सरे। जैं मनोबुद्धि भरे। माझेनि प्रेमें॥ ४५५॥**
**म्हणोनि कुळ जाति वर्ण। हें आघवेंचि गा अकारण। एथ अर्जुना माझेपण। सार्थक एक॥ ४५६॥**
**तेंचि भलतेणें भावें। मन मजआंतु येतें होआवें। आलें तरी आघवें। मागील वावो॥ ४५७॥**

**अर्थ**—राजाच्या आज्ञेचीं जी अक्षरें असतात तीं ज्या चामड्याच्या तुकड्यावर पडतील, त्या चामड्याच्या तुकड्याने सर्व वस्तु प्राप्त होऊं शकतात. ॥ ४५३ ॥ त्या चामड्यावांचून सोनें, रुपें यांनाहि मान्यता मिळत नाही. कारण येथे राजाचा हुकूम हाच समर्थ असतो. तोच राजाच्या हुकुमाचीं अक्षरें असलेला चामड्याचा तुकडा प्राप्त झाल्यास त्याने सर्व वस्तु विकत मिळतात. ॥ ४५४ ॥ त्याप्रमाणे माझ्या प्रेमाने अंत:करण, मन, बुद्धि भरून जाईल तरच जाति, कुळ, संपन्नता या सर्वांची थोरवी व सर्व शास्त्रांचें ज्ञान यांची सार्थकता आहे. ॥ ४५५ ॥ म्हणून कुळ, जाति, वर्ण हे कांही एक माझ्या प्राप्तीचें साधन होऊं शकत नाहीत. माझ्या प्राप्तीचें साधन, माझे होऊन जाणें, हेंच एक उपयोगाचें आहे. ॥ ४५६ ॥ तें माझेपण किंवा माझें होऊन जाणें कोणत्याहि भावाने असो. मन माझ्या ठिकाणी जडले पाहिजे मन माझ्या ठिकाणी जडलें कीं पूर्वीचें सर्व व्यर्थ होतें. ॥ ४५७ ॥

**गूढार्थदीपिका—आलें तरी आघवें। मागील वावो**—भगवत्प्रेमाने एकदां चित्त भरून गेलें की ते भगवद्रूपच होतें. म्हणून भगवान जसा सर्व जात्यादिदोषापासून निर्लेप असतो तसाच भक्तहि मागील सर्व पापें नाहीशी होऊन जात्यादि दोषापासून निर्लेप होतो व भगवत्प्रेमाने चित्त अत्यंत सात्विक झाल्यामुळे पापप्रवृत्ति नाहीशी होऊन, पुढे त्याच्याकडून दोषच घडत नाही, असा भाव.

"**भक्तिः पुनाति मन्निष्ठा श्वपाकानपि संभवात्**" (भाग. स्कं. ११—१४—२१)

या श्लोकावर टीका करतांना श्रीधराचार्यांनीहि "संभवाज्जोतिदोषादपि" अत्यंत प्रेमाने माझी एकनिष्ठ भक्ति करणारा अंत्यज देखील जातिदोषापासून मुक्त होतो असें म्हटलें आहे.

**जैसे तंवचि वहाळ वोहळ। जंव न पवती गंगाजळ। मग होऊनि ठाकती केवळ। गंगारूप॥ ४५८॥**
**कां खैर चंदन काष्ठें। हे विवंचना तंवचि घटे। जंव न घापती एकवटे। अग्नीमाजीं॥ ४५९॥**
**तैसें क्षत्री वैश्य स्त्रिया। कां शूद्र अंत्यजादि इया। जाती तंवचि वेगळालिया। जंव न पवती मातें॥ ४६०॥**

**अर्थ**—गंगेंत मिळत नाही तोपर्यंत वाहणाऱ्या पाण्याला ओघ म्हणतां येते. मिळाल्यावर ते गंगारूप होऊन जातात. ॥ ४५८ ॥ किंवा जोपर्यंत अग्नीत पडत नाहीत तोपर्यंत हें चंदनाचे लांकूड व खैराचें लांकूड हा भेद असतो. ॥ ४५९ ॥ त्याप्रमाणे क्षत्रिय, वैश्य, स्त्रिया किंवा शूद्र, अंत्यज ह्या जाती मला प्राप्त होत नाहीत तोपर्यंत वेगळ्या मानल्या जातात. ॥ ४६० ॥

**गूढार्थदीपिका**—भगवंताला पावणें म्हणजे आपणच भगवान होणें होय आणि आपण भगवान होणें म्हणजें "जैं कृष्ण होईजे आपण। तैं कृष्ण होईजे आपुलें अंत:करण" या ओवींत सांगितल्याप्रमाणे आपलें अंत:करण भगवद्रूप होणें होय. म्हणून माऊली म्हणतात की भगवंताच्या परमप्रेमाने अंत:करण भगवद्रूप होऊन जाई पर्यंत जातिनिर्बंध राहतात.

**मग जाती व्यक्ती पडे बिंदुलें। जेव्हां भावे होती मज मीनले। जैसे लवणकण घातले। सागरामाजीं॥ ४६१॥**
**तंववरी नदानदींचीं नांवें। तंवचि पूर्वपश्चिमेचे यावे। जंव न येती आघवे। समुद्रामाजीं॥ ४६२॥**
**हेंचि कवणें एके मिसें। चित्त माझे ठायीं प्रवेशे। येतुलें हो मग आपैसें। मी होणें असे॥ ४६३॥**
**अगा वरी फोडावयाचि लागीं। लोहो मिळो कां परिसाचां आंगीं। कां जे मिळतिये प्रसंगीं। सोनेंचि होईल॥ ४६४॥**
**पाहें पां वालभाचेनि व्याजें। तिया व्रजांगनांचीं निजें। मज मीनलिया काय माझें। स्वरूप नव्हती॥ ४६५॥**
**नातरी भयाचेनि मिसें। मातें न पविजेचि काय कंसें। कीं अखंड वैरवशें। चैद्यादिकीं॥ ४६६॥**
**अगा सोयरेपणेंचि पांडवा। माझें सायुज्य यादवां। कीं ममत्वें वसुदेवा-। दिकां सकळां॥ ४६७॥**
**नारदा ध्रुवा अक्रूरा। शुका हन सनत्कुमारा। यां भक्ती मी धनुर्धरा। प्राप्यु जैसा॥ ४६८॥**

**तैसाचि गोपिकांसि कामें। तया कंसा भयसंभ्रमें। येरां घातकेयां मनोधर्मे। शिशुपालादिकां॥ ४६९॥**
**अगा मी एकलाणीचें खागें। मज येवों ये भलतेनि मार्गे। भक्ती कां विषयें विरागें। अथवा वैरें॥ ४७०॥**
**म्हणोनि पार्था पाहीं। प्रवेशावया माझां ठायीं। उपायांची नाहीं। वाणी एथ॥ ४७१॥**

**अर्थ**—ज्याप्रमाणे समुद्रांत मिठाचा खडा मिळाला असतां त्याचें अस्तीत्व राहत नाही, त्याप्रमाणे जेव्हा पुरुष अनन्यभावाने माझ्यांत मिळतो तेव्हा मग त्याचेंहि व्यक्तिजातीवर शून्य पडतें—म्हणजे जातिव्यक्ति राहत नाही. ॥ ४६१ ॥ तसेंच तोपर्यंत नद्या समुद्रांत मिळत नाहीत तोपर्यंतच ही अमुक नदी पूर्वेकडून आली, ही अमुक नदी पश्चिमेकडून आली, असा निराळेपणा राहतो. ॥ ४६२ ॥ त्याप्रमाणे हें चित्तच कोणत्याहि निमित्ताने माझ्या ठिकाणीं जडलें की मग सहजच तो पुरुष मद्रूप होतो. ॥ ४६३ ॥ बा अर्जुना! परिसाला फोडण्यासाठी जरी लोखंड व परीस यांचा संबंध झाला तरी संबंध झाल्याबरोबर लोखंड सोनेंच होईल. ॥ ४६४ ॥ माझ्या ठिकाणीं पतिबुद्धीच्या मिषाने मला आपला देह समर्पण करून त्या व्रजांतील गोपस्त्रिया मत्स्वरूप झाल्या नाहीत काय? ॥ ४६५ ॥ किंवा माझ्यापासून मृत्यु आहे, हें कळून आल्यावर मृत्यूच्या भयाच्या निमित्ताने कंस माझ्यांत मिळाला नाही काय? किंवा अखंड माझे वैर करून त्या मिषाने शिशुपालादिक मला मिळाले नाहीत? ॥ ४६६ ॥ बा अर्जुना! सोयरेपणाचा संबंध ठेवून माझे ठिकाणी चित्त लागल्यामुळें यादवांना माझ्यांत मिळतां आले किंवा माझ्या ठिकाणीं पुत्र प्रेम ठेवून वसुदेवादिकांना माझी प्राप्ति झाली. ॥ ४६७ ॥ नारद, ध्रुव, अक्रुर, शुकाचार्य, सनत्कुमार यांना जसा भक्तीने मी प्राप्त झालों ॥ ४६८ ॥ तसाच गोपिकांना, माझे ठिकाणीं पतिभावनेने कामवासना ठेवून, माझी प्राप्ती झाली. त्या कंसाला भीतीनेच माझी प्राप्ती झाली, माझा घात करूं पाहणाऱ्या शिशुपालादिकांना त्या द्वेषरूप मनोधर्माने माझी प्राप्ती झाली. ॥ ४६९ ॥ बा अर्जुना! मी एक सर्व मार्ग जेथें मिळतात असे एक स्थान आहे. म्हणून भक्ति असो, विषयवासना असो, विरक्ति असो, भय, वैर असो, कोणत्याहि मार्गाने मजकडे येतां येते. ॥ ४७० ॥ म्हणून माझ्या ठिकाणीं प्राप्त होण्याकरिता उपायाची कमतरता मुळीच नाही. ॥ ४७१ ॥

**गूढार्थदीपिका**—जसें निर्गुण परब्रह्माच्या प्राप्तीकरिता ज्ञान मुख्य आहे तसेंच सगुण परब्रह्माच्या प्राप्तीकरिता सगुणाचें ध्यान मुख्य आहे. हें ध्यान विकाराने होवो किंवा प्रेमाने होवो, कोणत्याहि निमित्ताने झालें तरी चालतें; पण चित्त अखंड भगवदाकार राहील इतकें तें ध्यान दृढ असले पाहिजे.

**आणि भलतिया जातीं जन्मावें। मग भजिजे कां विरोधावें। परि भक्त कां वैरिया व्हावें। माझियाचि॥ ४७२॥**
**अगा कवणे एके बोलें। माझेपण जऱ्ही जाहालें। तरी मी होणें आलें। हाता निरुतें॥ ४७३॥**
**यांपरी पापयोनीही अर्जुना। कां वैश्य शूद्र अंगना। मातें भजतां सदना। माझिया येती॥ ४७४॥**

**अर्थ**—भलत्या जातींत जन्मावें व मग माझी भक्ति करावी किंवा माझा द्वेष करावा, पण भक्त व्हावयाचें असेल तरी माझाच भक्त व्हावें, किंवा वैर करावयाचें असेल तरी तें माझेच करावें. ॥ ४७२ ॥ अर्जुना! कोणत्या कां निमित्ताने होईना, माझा संबंध जुळला व माझें ध्यान लागलें की खात्रीने तुझ्या हाती माझी प्राप्ति आलीच समज. ॥ ४७३ ॥ म्हणून अर्जुना! पापयोनि अंत्यजादि असो किंवा वैश्य, शूद्र, स्त्रिया ह्या असोत; कोणीहि माझी भक्ति केली असतां मला प्राप्त होतात. ॥ ४७४ ॥

**किं पुनर्ब्राह्मणाः पुण्या भक्ता राजर्षयस्तथा। अनित्यमसुखं लोकमिमं प्राप्य भजस्व माम्॥ ३३॥**

**अर्थ**—मग पुण्यशील ब्राह्मण व राजर्षि जर माझें भक्त असले तर ते मला पावतात हे काय सांगायचें! म्हणून अर्जुना! या नाशिवंत व दुःखदायक मृत्युलोकांत तूं जन्मला आहेस, म्हणून माझें भजन कर. ॥ ३३ ॥

**मग वर्णांमाजीं छत्रचामर। स्वर्ग जयांचें अग्रहार। मंत्रविद्येसि माहेर। ब्राह्मण जे॥ ४७५॥**
**जे पृथ्वीतळींचे देव। जे तपोवतार सावयव। सकळ तीर्थांसि दैव। उदयलें जें॥ ४७६॥**
**जेथ अखंड वसिजे यागीं। जे वेदांची वज्रांगी। जयांचिये दिठीचिया उत्संगीं। मंगळ वाढे॥ ४७७॥**
**जयांचिये आस्थेचिनि वोलें। सत्कर्म पाल्हाळीं गेलें। संकल्पें सत्य जियालें। जयांचेनि॥ ४७८॥**

**जयांचेनि गा बोलें। अग्नीसि आयुष्य जाहलें। म्हणोनि समुद्रें पाणी आपुलें। दिधलें यांचिया प्रीती॥ ४७९॥**
**मियां लक्ष्मी डावलोनि केली परौती। फेडोनि कौस्तुभ घेतला हातीं। मग वोढविली वक्षस्थळाची वाखती। चरणरजां॥ ४८०॥**
**आझूनि पाउलाची मुद्रा। मी हृदयीं वाहें गा सुभद्रा। जे आपुलिया दैवसमुद्रा। जतनेलागीं॥ ४८१॥**
**जयांचा कोप सुभटा। काळाग्निरुद्राचा वसौटा। जयांचां प्रसादीं फुकटा। जोडती सिद्धी॥ ४८२॥**

**अर्थ**—राजाचें चिन्हांत जसें छत्रचामर हें चिन्ह श्रेष्ठ त्याप्रमाणे सर्व वर्णांमध्ये जे ब्राह्मण श्रेष्ठ मानिले जातात, स्वर्ग म्हणजे ज्यांचा इनामगांव होय व जे मंत्रविद्येचे माहेरघर होत. ॥ ४७५ ॥ जे भूमीवरील देव होत, जे मूर्तिमंत तपच अवतीर्ण झाले व जे सर्व तीर्थाचे उदयाला आलेलें भाग्यच होय. ॥ ४७६ ॥ ज्यांचे ठिकाणीं यज्ञ हा नित्य वास करितो, जे वेदांचें कवच आहेत. ज्यांच्या कृपादृष्टीच्या मांडीवर बसले असतां सर्व कल्याण होते. ॥ ४७७ ॥ ज्यांच्या धर्मश्रद्धेच्या ओलाव्याने पुण्यकर्माचा विस्तार झाला व ज्यांच्या सत्य संकल्पाच्या सामर्थ्यानेच जगांत सत्य जिवंत राहतें. ॥ ४७८ ॥ ज्यांच्या वचनाने अग्नीला आयुष्य प्राप्त झालें म्हणून ज्यांच्या प्रेमाकरिता समुद्राने आपल्या पाण्यांत अग्नीला राहण्यास मान्यता दिली. ॥ ४७९ ॥ अर्जुना माझ्या वक्षस्थलाचे ठिकाणीं असलेल्या लक्ष्मीला मी तेथून दूर केलें व वक्षस्थळावर असणारा कौस्तुभमणीही तेथून काढून हातीं घेतला व मग ज्यांच्या चरणाचें रज:कण धारण करण्याकरिता मीं आपल्या वक्षस्थळाची खळगी ज्यांच्यासमोर केली. ॥ ४८० ॥ माझ्या ठिकाणीं असलेल्या दैवी संपत्तीचें संरक्षण करण्याकरिता मी अजूनपर्यंत आपल्या हृदयाचें ठिकाणीं ज्यांच्या पावलाचा ठसा वागवित आहे. ॥ ४८१ ॥ हे उत्तम योद्ध्या अर्जुना! ज्यांचा क्रोध हा प्रलयांतील अग्नीचें राहण्याचें ठिकाण होय आणि ज्यांच्या प्रसन्नतेमुळे सर्व सिद्धींची अनायासें प्राप्ति होते. ॥ ४८२ ॥

**गूढार्थदीपिका—जयांचे प्रसादी फुकटा। जोडतीं सिद्धी**—पुण्यकर्मानेच ब्राह्मणयोनि प्राप्त होते असें श्रुतींत सांगितलें असल्यामुळें "गायत्रीरहितो विप्रः शूद्रात्प्रत्यवरो भवेत्" स्वधर्म सोडून वागणारा ब्राह्मण स्वधर्माने वागणाऱ्या शूद्रापेक्षा कनिष्ठ होय अशी स्मृति आहे. त्यामुळे येथे ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र या चार वर्णांमध्ये ब्राह्मणाचें जें श्रेष्ठत्व सांगितलें आहे तें त्यांच्या पूर्वजन्मांतील पुण्यकर्माने प्राप्त झालेल्या जातीला आणि वर्तमान जन्मांतील शास्त्रानुसार असलेल्या आचरणाला धरून सांगितलें आहे. आणि हें श्रेष्ठत्व कर्ममार्गापुरतेच मर्यादित आहे.

**ऐसे पुण्यपूज्य जे ब्राह्मण। आणि माझां ठायीं अतिनिपुण। आतां मातें पावती हें कवण। समर्थणें॥ ४८३॥**
**पाहें पां चंदनाचेनि अंगानिळें। शिवतिले निंब होते जे जवळें। तिहीं निर्जीवींही देवांचीं निडळें। बैसणीं केलीं॥ ४८४॥**
**मग तो चंदनु तेथ न पवे। ऐसें मनीं कैसेनि धरावें। अथवा पातला हें समर्थावें। तेव्हां कायि साच॥ ४८५॥**
**तेथ निववील ऐसिया आशा। हरें चंद्रमा आधा ऐसा। वाहिजत असे शिरसा। निरंतर॥ ४८६॥**
**तेथ निवविता आणि सगळा। परिमळें चंद्राहून आगळा। तो चंदनु केविं अवलीळा। सर्वांगीं न बैसे॥ ४८७॥**
**कां रथ्योदकें जियेचियेकासे। लागलिया समुद्र जालीं अनायासें। तिये गंगेसि काय अनारिसें। गत्यंतर असे॥ ४८८॥**
**म्हणोनि राजर्षि कां ब्राह्मण। जयां गती मती मीचि शरण। तयां त्रिशुद्धी मीचि निर्वाण। स्थितिही मीचि॥ ४८९॥**
**यालागीं शतजर्जर नावे। रिगोनि केविं निश्चिंत होआवें। कैसेनि उघडिया असावें। शस्त्रवर्षी॥ ४९०॥**
**अंगावरी पडतां पाषाण। न सुवावें केविं वोडण। रोगें दाटला आणि उदासपण। वोखदेंसी॥ ४९१॥**
**जेथ चहूंकडे जळत वणवा। तेथूनि न निगिजे केविं पांडवा। तेविं लोका येऊनिया सोपद्रवा। केविं न भजिजे मातें॥ ४९२॥**

**अर्थ**—असे ते पुण्यवान व सर्वांना पूज्य असलेले व माझ्या ठिकाणीं प्रेमाने आसक्त झालेले ब्राह्मण मला प्राप्त होतात हें काय प्रतिपादन करावयास हवें?॥ ४८३ ॥ हे पहा अर्जुना! चंदनाच्या झाडावरून वाहणाऱ्या वाऱ्याच्या स्पर्शाने जर जवळ असलेलीं निर्जीव निबांचीं झाडें सुगंधित होऊन गंधाचे द्वारा देवाचे मस्तकावर धारण करण्याला योग्य होतात. ॥ ४८४ ॥ तर तो चंदनच देवाचे मस्तकावर गंधाचे द्वारा धारण केला जात नाही असे कसें म्हणतां येईल? किंवा धारण केला जातो असें सांगितल्यावर तें खरें मानायचें नाही तर काय खोटें मानायचें?॥ ४८५ ॥ हालाहल विषप्राशनाने झालेला अंगाचा दाह नाहीसा होईल या आशेने भगवान शंकर अर्धा चंद्र मस्तकावर सदा

सर्वदा धारण करीत आहेत. ॥ ४८६ ॥ त्यांत चंदन हा दाह शांत करणारा असून पूर्ण आहे. चंद्रापेक्षा सुवास हा एक त्याचे ठिकाणीं अधिक गुण आहे. असा तो चंदन शंकराचे सर्वांगावर सहज कां बसूं शकणार नाही ? ॥ ४८७ ॥ किंवा ज्या गंगेच्या आश्रयाने रस्त्यावरील पाण्याचे ओघ देखील समुद्र होऊन जातात, त्या गंगेला समुद्राला मिळण्यावांचून दुसरी कोणती गति आहे ? ॥ ४८८ ॥ म्हणून राजर्षि असोत की ब्राह्मण असोत, जे गति म्हणजे मलाच एक प्राप्त होण्याची इच्छा धरून व अंत:करण एक माझें ठिकाणींच आसक्त होऊन मला शरण आले, ते माझ्या ठिकाणीच राहतात व शेवटी मलाच मिळतात हें त्रिवार सत्य आहे. ॥ ४८९ ॥ म्हणून शेंकडो ठिकाणी खिळखिळ्या झालेल्या नावेंत बसून स्वस्थ कसें राहतां येईल ? शस्त्रांचा भडिमार जेथे होतो तेथें उघड्यां अंगाने तो कसा सहन करतां येईल ? ॥ ४९० ॥ अंगावर दगड पडत असतांना संरक्षणाला मध्ये कांही आच्छादन कसें घेऊं नये ? रोगाने अत्यंत पीडित होऊनहि औषधाविषयी उदासीन असणें कसें योग्य होईल ? ॥ ४९१ ॥ जेथें चोहोबाजूंनी वणवा पेटला, अर्जुना ! तेथून निघून जाऊं नये काय ? त्याप्रमाणें अनेक प्रकारच्या दु:खांनी भरलेल्या या मृत्युलोकांत येऊन माझी भक्ति कशी करूं नये किंवा माझ्या भक्तीवांचून काय सुख मिळेल ? ॥ ४९२ ॥

**गूढार्थदीपिका—केविं न भजिजे मातें**—परमात्मा सर्वज्ञ, सर्वशक्तिमान व स्वतंत्र (केवळ कर्मपरतंत्र होऊन फळ देणारा नसल्यामुळे) असल्यामुळे तोच एक शरण आलेल्यांच्या दु:खाचा परिहार करूं शकतो. ''प्रारब्ध नियतिर्वापि महेशविमुखे भवेत्'' (त्रि. र. ७-६०) प्रारब्ध म्हणजे व्यक्तीचें फलद्रूप झालेलें कर्म व नियति म्हणजे समष्टीचें फलद्रूप झालेलें कर्म. ही कर्मे भगवद्विमुखांना मुळींच टाळतां येत नाहीत. भगवदेकशरणांना मात्र भगवंताचें साह्य असल्यामुळे तीं कर्मे दु:खदायक होत नाहीत. निष्काम भक्ताला भगवान सर्वतोपरि सांभाळतो आणि सकाम भक्ताचे दु:ख त्याच्या भक्तीनुसार कमी करतो असें त्रिपुररहस्यांतील सातव्या अध्यायांत सांगितलें आहे. म्हणून संसारासक्त पुरुषांनी देखील दु:ख होऊ नये म्हणून भगवंताची भक्ति करावी असा माऊलींनी अज्ञान्यांना कळवळून उपदेश केला आहे.

**अगा मातें न भजावयालागीं। कवण बळ पां आपुलां आंगीं। काइ घरीं कीं भोगीं। निश्चिंती केली ॥ ४९३ ॥**
**नातरी विद्या कीं वयसा। यां प्राणियांसि हा ऐसा। मज न भजतां भरंवसा। सुखाचा कोण ॥ ४९४ ॥**

**अर्थ**—अर्जुना ! माझे भजन न करतां जीवाचे ठिकाणीं असे कोणते सामर्थ्य आहे की ज्या सामर्थ्याचे बळावर संसाराविषयी किंवा भोगविषयी त्याला काळजी करण्याचें कारणच राहणार नाही. ॥ ४९३ ॥ माझे भजन न करण्याजोग्या प्राण्यांना सुखाचा भरंवसा कोणाविषयी असतो ? विद्या की वय ? ॥ ४९४ ॥

**गूढार्थदीपिका—मज न भजतां भरंवसा। सुखाचा कोण**—प्रारब्धाने प्राप्त होणाऱ्या दु:खाच्या परिहाराकरिता मणि मंत्र, औषधि, योग इत्यादि उपाय शास्त्रांतून सांगितले असले, तरी भगवत्कृपेवांचून त्यांच्या योगने दु:खाची आत्यंतिक निवृत्ति होत नाही, हेंच माउली आतां स्पष्ट करीत आहे.

**तरी भोग्यजात जेतुलें। तें एका देहाचिया निकिया लागलें। आणि येथ देह तंव असे पडिलें। काळाचां तोंडी ॥ ४९५ ॥**
**बाप दु:खाचें केणें सुटलें। जेथ मरणाचें भरे लोटले। तिये मृत्युलोकींचिये शेवटिलें। येणें जाहालें हाटवेळे ॥ ४९६ ॥**

**अर्थ**—जेवढे भोग्य विषय आहेत ते तर एका देहाच्या सुखाकरिता आहेत आणि देहाचा विचार केला तर तो काळाच्या तोंडांत पडला आहे. ॥ ४९५ ॥ अशा या मृत्युलोकीच्या बाजारांत, सर्व दु:खरूपी मालाच्या गाठी सुटल्या आहेत व तो सर्व माल मोजून देण्याकरिता सर्व दूर मरणाचें माप लागलें आहे आणि शेवटीं किंवा बाजार उठण्याचे वेळीं आपले येणे झाले आहे. ॥ ४९६ ॥

**गूढार्थदीपिका—मृत्युलोकींचिये शेवटिलें। येणें जाहालें हाटवेळे**—स्वर्ग प्राप्त करून देणरें पुण्याचें आधिक्य व पश्वादी योनि प्राप्त करून देणारें पापांचें आधिक्य नसणे यालाच पापपुण्याची समता म्हणतात. अशी समता असतांना मनुष्यदेहांची प्राप्ति होते. या देहांतूनच पुन: कर्मानुसार खाली वर येणे सुरूं होतें; पण तो मनुष्यदेहहि केव्हा उठून जाईल व जीवाला कोणत्या योनींत जावें लागेल याचा नेम नाही; म्हणून मनुष्यदेहांला ''शेवटली

हाटवेळ'' म्हणजे बाजार उठण्याची वेळ म्हटले आहे.

कोणत्याहि आर्षग्रथांत किंवा संतांच्या ग्रंथांत आधुनिक उत्क्रांतिवादासारखे निर्बुद्ध विचार कोठें सांपडत नाहीत. त्यांत गुणकर्मानुसार उत्क्रांति किंवा अपक्रांति होत जाते असेच मानिलें आहे.

**आतां सुखेंसि जीविता। कैंची ग्राहिकी कीजेल पंडुसुता। काय राखोंडी फुंकिता। दीपु लागे॥ ४९७॥**
**अगा विषाचे कांदे वाटुनी। जो रसु घेइजे पिळुनी। तया नाम अमृत ठेउनी। जैसें अमर होणें॥ ४९८॥**
**तेविं विषयांचे जे सुख। तें केवळ परम दुःख। परि काय कीजे मूर्ख। न सेवितां न सरे॥ ४९९॥**
**कां शीस खांडुनि आपुलें। पायींचां खतीं बांधिलें। तैसें मृत्युलोकीचें भलें। आहे आघवें॥ ५००॥**

**अर्थ**—आतां अर्जुना! अशा बाजारांत सुखाचे जीवित हा माल घेण्यास गेलों तर तो कोठें मिळणार? राखोंडी फुंकून काय दिवा लागणार आहे?॥ ४९७॥ ज्याप्रमाणे विषाचे कांदे वाटून त्याचा रस काढावा व त्याला अमृत हें नांव देऊन तो प्यावा आणि अमर होण्याची इच्छा करावी.॥ ४९८॥ त्याप्रमाणे विषयापासून होणारें जें सुख आहे तें सुख नव्हे परमदुःख होय; पण काय करावें, मूर्ख लोक विषयसुख भोगल्यावाचून राहत नाहीत.॥ ४९९॥ किंवा आपलें मस्तक तोडून ते जसे पायाला झालेल्या क्षतावर बांधावे, त्या प्रमाणे या मृत्युलोकांतील सर्व विषयसुख आहे.॥ ५००॥

**गूढार्थदीपिका—तैसें मृत्युलोकीचें भलें। आहे आघवें**—दुःखानेच दुःखाचा परिहार करून नाहीसे झालेल्या दुःखाचें मनुष्य सुख मानतो; परंतु त्याबरोबर दुसरें दुःख ओढवून घेतलें हें तो लक्षांत घेत नाही. जसें ज्वर जाण्याकरितां कडु औषध पिण्याचें दुःख सहन करावें लागतें. गळूंपासून होणारें दुःख नाहीसे करण्याकरिता शस्त्राने कापण्याचें दुःख सहन करावे लागतें.

**म्हणोनि मृत्युलोकीं सुखाची कहाणी। ऐकिजेल कवणाचां श्रवणीं। कैंची सुखनिद्रा आंथरुणीं। इंगळांच्या॥ ५०१॥**
**जिये लोकींचा चंद्र क्षयरोगी। जेथ उदयो होय अस्तालागीं। दुःख लेऊनि सुखाची आंगी। सळित जगातें॥ ५०२॥**
**जेथ मंगळाचां अंकुरीं। सवेंचि अमंगळाची पडे पारी। मृत्यु उदराचां परिवरीं। गर्भु गिंवसी॥ ५०३॥**
**जे नाहीं तयातें चिंतवी। तंव तेंचि नेइजे गंधर्वी। गेलियाची कवणें गांवीं। शुद्धि न लभे॥ ५०४॥**

**अर्थ**—म्हणून मृत्युलोकांत सुखाची वार्ता कोणाला ऐकायला सांपडत नाही. विंचवांच्या आंथरूणावर निजल्यास सुखाने झोप कशी लागणार.॥ ५०१॥ ज्या मृत्युलोकांतील चंद्र क्षयरोगाने (कृष्णपक्षांत एक एक त्याची कला क्षीण होते) पछाडला आहे, जेथे सूर्य मावळण्याकरितांच उगवतो आणि जेथे दुःख हें सुखाचा आंगरखा घालून लोकांना छळतें (विषयसुख वरून गोड वाटलें तरी परिणामी दुःखच असते)॥ ५०२॥ ज्या मृत्युलोकात मंगलाचा उदय होतो न होतो तोच त्यावर अमंगलाची झडप पडते व उदरांतील गर्भाशयांत असलेल्या गर्भालादेखील मरण येते.॥ ५०३॥ मृत्युलोकांत जें होणें शक्य नाही ते जीवाला असावेसे वाटतें पण असे मनोरथ करीत असतांच ते सर्व अदृश्य होते व कोठे गेले याचा पत्ताहि लागत नाही.॥ ५०४॥

**अगा गिंवसितां आघविया वाटीं। परतलें पाउलचि नाहीं किरीटी। सैंघ निमालियांच्या गोष्टी। तियें पुराणें जेथिंची॥ ५०५॥**
**जेथींचिये अनित्यतेची थोरी। करितया ब्रह्मयाचे आयुष्यवेरी। कैसें नाही होणें अवधारीं। निपटूनियां॥ ५०६॥**
**ऐसी लोकींची जिये नांदणूक। तेथ जन्मले आथि जे लोक। तयांचिये निश्चिंतीचें कौतुक। दिसत असे॥ ५०७॥**
**पैं दृष्टादृष्टींचिये जोडी-। लागीं भांडवल न सुटे कवडी। जेथ सर्वस्वे हानि तेथ कोडी। वेंचिती गा॥ ५०८॥**
**जो बहुवें विषयविलासें गुंफे। तो म्हणती उवायें पडिला सापें। जो अभिलाषभारें दडपे। तयातें सज्ञान म्हणती॥ ५०९॥**
**जयाचें आयुष्य धाकुटें होय। बळ प्रज्ञा जिरौनि जाय। तयाचे नमस्कारिती पाय। वडिल म्हणुनि॥ ५१०॥**
**जंव जंव बाळ बळिया वाढे। तंव तंव भोजें नाचती कोडें। आयुष्य निमालें आंतुलियेकडे। ते ग्लानीचि नाहीं॥ ५११॥**
**जन्मलिया दिवसदिवसें। हों लागे काळाचियाचि ऐसें। कीं वाढती करिती उल्हासें। उभविती गुढिया॥ ५१२॥**
**अगा मर हा बोलु न साहती। आणि मेलिया तरी रडती। परि असतें जात न गणिती। गहिंसपणें॥ ५१३॥**
**दर्दुर सापें गिळिजतु आहे उभा। कीं तो मासिया वेटाळी जिभा। तैसें प्राणिये कवणा लोभा। वाढविती तृष्णा॥ ५१४॥**

**अहा कटकटा हें वोखटें। मृत्युलोकींचें उफराटें। एथ अर्जुना जरी अवचटें। जन्मलासी तूं॥ ५१५॥**
**तरी झडझडोनि वाहिला निघ। इये भक्तीचिये वाटे लाग। जिया पावसी अव्यंग। निजधाम माझें॥ ५१६॥**

**अर्थ**—बा अर्जुना! सर्व मार्गांनी शोध केला तरी परत आलेल्या माणसाचीं पाउले दिसत नाहीत व ज्या मृत्युलोकांतील पुराणें म्हणजे मेलेल्या माणसांच्या कथा होत॥ ५०५॥ हा संसार इतका अनित्य आहे की सृष्टि उत्पन्न करणाऱ्या ब्रह्मदेवाच्या आयुष्यापर्यंत ती अनित्यता गेली आहे—म्हणजे तोहि अनित्यच आहे येथील पदार्थ इतका अनित्य आहे की तो नाहीसा होतो तो निःशेष नाहीसा होतो—म्हणजें सर्व काल्पनिक आहे, असा अर्थ॥ ५०६॥ अशी या मृत्युलोकांतील जीवांची स्थिती आहे. त्या मृत्युलोकांत जन्मून जे नित्य अशा परमेश्वरप्राप्तीविषयीं निश्चित राहतात, त्यांच्या निश्चितपणाचें आश्चर्य वाटतें.॥ ५०७॥ ऐहिक व पारलौकिक सुखाची प्राप्ति जेणेकरून होईल अशाकरिता आपल्या भांडवलांतून एक कवडीहि खर्चण्यास तयार होत नाहीत, पण जें केल्याने पुढें सर्वस्वीं अहित होणार अशा कामाकरिता मात्र कोट्यावधि द्रव्य खर्च करतात.॥ ५०८॥ जो अत्यंत भोगासक्त असतो त्याला सध्या सुखांत आहे असें म्हणतात. विषयसुखाचा अत्यन्त हव्यास धरून नाना प्रकारचे प्रयत्न करणाऱ्याला अत्यंत व्यवहारकुशल म्हणतात.॥ ५०९॥ ज्यांचें आयुष्य कमी होत आहे व इंद्रिये, देह, वाणी यांचें सामर्थ्य नाहीसें होत आहे, त्याला वडील म्हणून त्याच्या पायावर डोकें ठेवतात.॥ ५१०॥ मूल जों जों मोठें होत जातें तों तों आनंदाने नाचतात; पण एक एक दिवस त्याचें आयुष्य कमी होत जात आहे याची त्यांना खंती वाटत नाही.॥ ५११॥ जन्मल्यापासून जसे जसे दिवस जातात तसा तसा प्राणी काळाच्या अधिकाधिक स्वाधीन होत जातो, पण गुढ्या वगैरे उभारून, त्याचा वाढदिवस साजरा करितात.॥ ५१२॥ बा अर्जुना! काय सांगावें! कोणी मर म्हटलें तर तें सहन होत नाही आणि मेल्याबरोबर तर रडतातच, पण असलेलें आयुष्य निघून जात आहे, हे मूर्खपणामुळे जाणत नाहीत.॥ ५१३॥ ज्याप्रमाणे साप बेडकाला धरितो, तरीपण तो माशांना जिभेने पकडून खात असतो, त्याप्रमाणे काळाच्या जबड्यांत असलेले मनुष्यप्राणी कोणत्या लाभाकरिता विषयवासना वाढवितात हें कांही समजत नाही.॥ ५१४॥ अरेरे! मृत्युलोकांतील मनुष्य प्राण्याची ही उलटी रीत अत्यंत घातक आहे. अर्जुना येथे दैववशात् जरी तूं जन्मला असलास.॥ ५१५॥ तरी या संसारचक्रांतून आंग झाडून बाहेर निघ व माझ्या भक्तिमार्गाला लाग. या भक्तींमार्गाने माझ्या दुःखादि दोषरहित अशा शुद्धस्वरूपाला प्राप्त होशील.॥ ५१६॥

**गूढार्थदीपिका—जिया पावसी अव्यंग। निजधाम माझें**—सर्वोपाधिरहित, पूर्ण, निर्विकल्प असे जे भगवंताचें जाणीवरहित केवळ सच्चिदानंदमात्र सगुणस्वरूप तेंच अव्यंग निजधाम होय. एका भक्तीनेच या स्वरूपाची प्राप्ति होते.

**मन्मना भव मद्भक्तो मद्याजी मां नमस्कुरु। मामेवैष्यसि युक्त्वैवमात्मानं मत्परायणः॥ ३४॥**

*ॐतत्सदिति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे राजविद्याराजगुह्ययोगो नाम नवमोऽध्यायः॥ ९॥*

**अर्थ**—अर्जुना! आपलें मन मद्रूप कर म्हणजे विषयाचें ध्यान मनांत न ठेवतां माझेंच ध्यान असूं दे. माझेंच प्रेम कर व सर्व कर्मे मत्प्रीत्यर्थ करून, तीं मलाच अर्पण कर. सर्वत्र मलाच नमस्कार कर. अशाप्रमाणे माझ्या परायण होऊन माझे ठिकाणीं तुझें मन स्थिर झालें असतां सर्वभूताचा आत्मा जो मी त्या मला प्राप्त होशील.॥ ३४॥

**गूढार्थदीपिका**—प्रत्येक मार्गांत कांही तरी गुह्य असतेंच व तें त्या मार्गांतील निष्णात लोकांकडून, त्या मार्गांतील अधिकाऱ्यालाच सांगितलें जातें. वेदान्तशास्त्रांतहि परब्रह्म अत्यंत गुह्य वस्तु आहे. तिचें परोक्षज्ञान शास्त्राद्वारे सर्वांनाच करून दिलें जातें, पण अपरोक्षज्ञान मात्र शमादिसाधनसंपन्न अधिकाऱ्यालाच करून दिलें जातें; म्हणून तें गुह्यच म्हटलें जातें. त्यांतहि आत्मा परमप्रेमास्पद असल्यामुळे परमप्रेमास्पद आत्म्याचें प्रेम, हें सर्व गुह्यांतील गुह्य आहे. ''ब्रूहयुः स्निग्धस्य शिष्यस्य गुरवो गुह्यमप्युत'' हें भक्तिरूप गुह्य, भक्तिप्रेमसंपन्न श्रीगुरु, भगवत्प्राप्तीची आवडी असलेल्या शिष्यालाच सांगतात, येथे भगवान श्रीकृष्ण आपली परमप्रेमरूप भक्ति संपादन करण्याचें-म्हणजे एकान्तधर्माचें-गुह्य आपल्या प्रेमळभक्त अर्जुनाला सांगत आहेत.

**तूं मन हें मीचि करीं। माझां भजनीं प्रेम धरीं। सर्वत्र नमस्कारीं। मज एकातें॥ ५१७॥**

**अर्थ**—तूं आपलें मन मीच कर, माझ्या भजनांत प्रेमाने तुझें चित्त रंगू दे. माझा प्रेमळ भक्त हो. पदार्थमात्राला मी समजून नमस्कार कर.॥ ५१७॥

**गूढार्थदीपिका—तूं मन हें मीचि करीं**—''ज्याचें जया ध्यान। तेंचि होय त्याचें मन'' या तुकाराम महाराजांच्या वचनाप्रमाणे तूं आपलें मन मीच कर असें जें भगवंतांनी अर्जुनाला सांगितलें आहे त्याचा अर्थ माझेंच ध्यान कर, माझ्याहून इतर वस्तूंची कधी कल्पनाच करूं नकोस, असा होतो. सगुणभगवंताच्या प्राप्तीला ध्यान हेंच मुख्य कारण आहे.

**माझिया भजनीं प्रेम धरीं**—ध्यानरूपक्रियेने भगवंताच्या स्वरूपाचें ध्यान केलें असतां ''मी भगवंताचें ध्यान करतों'' अशी भावना त्या ध्यानांत राहते, त्यामुळे भगवंताच्या मूर्तीचा सचेतन अनुभव येणें कठीण असते; पण प्रेमाने भजन करण्यांत ध्यानक्रियेचा विसर पडत असल्यामुळे सप्रेम भजनाने भगवंताच्या सचेतन मूर्तीचा सुलभ अनुभव येतो. तें ध्यान दृढ होण्याकरिता भगवंताने 'आपलें नामसंकीर्तन व गुणलीलासंकीर्तन अत्यंत प्रेमाने केलें पाहिजे' हें गुह्य सांगितलें आहे.

**सर्वत्र नमस्कारीं। मत एकातें**—भगवंताचें ध्यान दृढ होण्याकरिता मनांत दुसऱ्या पदार्थांची कल्पनाच येतां कामा नये. ती येऊं नये म्हणूनच भगवंतांनी ''सर्वत्र नमस्कारीं। मज एकातें'' म्हणजे सर्व वस्तूंच्या ठिकाणीं माझी भावना करून व तेथे अत्यंत नम्रता धारण करून नमस्कार कर असा अत्यंत नम्रभाव धारण करण्यास सांगितलें आहे. नम्रभावाने जीव देहाहंकारावर आरूढ होत नसल्यामुळे भगवंताचें ध्यान नाहीसे होत नाही व भगवत्प्रेमहि वाढतें. देहाहंकारावर आरूढ झाल्यामुळेच भगवंताचा विसर पडतो.

**माझेनि अनुसंधानें देख। संकल्पु जाळणें निःशेख। मद्याजी चोख। याचि नांव॥ ५१८॥**

**अर्थ**—माझे ठिकाणीं चित्त ठेवून व माझी प्राप्ति व्हावी असा संकल्प करून विषयप्राप्तीचा संकल्प निःशेष जाळून टाक हेंच माझे यजन होय.॥ ५१८॥

**गूढार्थदीपिका**—मागील ओवींत सांगितलेली भगवद्भावना पदार्थमात्रावर होण्याकरिता परमेश्वरावांचून कोणत्याहि लोकांतील विषयसुखाच्या प्राप्तीच्या इच्छेने कर्म करतां कामा नये. हें गुह्यच भगवंतांनी या ओवींत प्रगट केलें आहे.

**ऐसा मियां आथिला होसी। तेथ माझियाचि स्वरूपा पावसी। हें अंतःकरणींचे तुजपासीं। बोलिजत असें॥ ५१९॥**
**अगा अवघिया चोरिया आपुलें। जें सर्वस्व आम्हीं असे ठेविलें। तें पावोनि सुख संचलें। होऊनि ठासी॥ ५२०॥**
**ऐसें सांवळेनि परब्रह्में। भक्तकामकल्पद्रुमें। बोल्लिलें आत्मारामें। संजयो म्हणे॥ ५२१॥**

**अर्थ**—याप्रमाणे तुझें अंतःकरण माझ्या प्राप्तीने संपन्न होईल व त्यामुळे माझ्या स्वरूपाला पावशील. अर्जुना! हें मी आपल्या मनांतील गुह्य तुझ्यापाशी सांगत आहे.॥ ५१९॥ बा अर्जुना! तुम्हां भक्ताकरिताच म्हणून कर्मी, योगी, ज्ञानी या सर्वांपासून चोरून ठेविलेलें किंवा कोणालाहि कधीं न सांगितलेलें हें गुपित तुला प्राप्त होऊन तूं अखंड सुखाकार होऊन राहशील.॥ ५२०॥ संजय म्हणतो राजा! भक्तांचा कल्पतरु, स्वरूपीं रमणारा आणि सांवळा असा जो पूर्णब्रह्म भगवान श्रीकृष्ण तो याप्रमाणे अर्जुनाला बोलला.॥ ५२१॥

**गूढार्थदीपिका—सांवळेनि परब्रह्में**—उपनिषदादि वेदान्तग्रंथांतून सर्वत्र ''ब्रह्म'' हा शब्द ब्रह्मरूप नसलेल्या, पण ब्रह्मभावना करायला सांगितलेल्या पदार्थाचे ठिकाणीं योजिलेला असून ''परब्रह्म'' हा शब्द मात्र मुख्य अशा पूर्ण ब्रह्माचें ठिकाणींच योजिलेला आहे.

येथे माऊलींनी ''सावळेनि परब्रह्में'' या शब्दांनी श्रीकृष्ण स्वरूपाचें पूर्णब्रह्मत्व आणि ''आत्मारामें'' या शब्दाने त्याचे निर्गुण आत्मस्वरूपाशीं अत्यंत ऐक्य दाखविलें आहे.

**अहो ऐकिजत असे कीं अवधारा। तंव इया बोला निवांत म्हातारा। जैसा म्हैसा नुठी कां पुरा। तैसा उगाचि असे॥ ५२२॥**
**तेथ संजयें माथा तुकिला। अहा अमृताचा पाऊस वर्षला। कीं हा एथ असतुचि गेला। सेजिया गांवा॥ ५२३॥**
**तऱ्ही दातारु हा आमुचा। म्हणोनि हें बोलतां मैळेल वाचा। काय कीजे ययाचा। स्वभावोचि ऐसा॥ ५२४॥**
**परि बाप भाग्य माझें। जें वृत्तांतु सांगावयाचेनि व्याजें। कैसा रक्षिलों मुनिराजें। श्रीव्यासदेवें॥ ५२५॥**
**येतुलें हें वाडें सायासें। जंव बोलत असे दृढें मानसें। तंव न धरवेचि आपुलिया ऐसें। सात्त्विकें केलें॥ ५२६॥**

**चित्त चाकाटलें आटु घेत। वाचा पांगुळली जेथिंची तेथ। आपादकंचुकित। रोमांच आले॥ ५२७॥**
**अर्धोन्मीलित डोळे। वर्षताति आनंदजळें। आंतुलिया सुखोर्मीचेनि बळें। बाहेरि कांपे॥ ५२८॥**
**पैं आघवांचि रोममूळीं। आली स्वेदकणिका निर्मळीं। लेइला मोतियांची कडियाळीं। आवडे तैसा॥ ५२९॥**
**ऐसा महासुखाचेनि अतिरसें। जेथ आटणी हों पाहे जीवदशे। तेथ निरोपिलें व्यासें। तें नेदीच हों॥ ५३०॥**
**आणि श्रीकृष्णाचे बोलणें। घोंकरी आलें श्रवणें। कीं देहस्मृतीचा तेणें। वापसा केला॥ ५३१॥**
**तेव्हां नेत्रींचे जळ विसर्जी। सर्वांगींचा स्वेद परिमार्जी। तेवींचि अवधारा म्हणे हो जी। धृतराष्ट्रातें॥ ५३२॥**
**आतां श्रीकृष्णवाक्यबीजा निवाडु। आणि संजय सात्त्विकाचा बिवडु। म्हणोनि श्रोतयां होईल सुरवाडु। प्रमेयपिकाचा॥ ५३३ ॥**
**अहो अळुमाळ अवधान देयावें। येतुलेनि आनंदाचे राशीवरी बैसावें। बाप श्रवणेंद्रिया दैवें। घातली माळ॥ ५३४॥**
**म्हणोनि विभूतींचा ठावो। अर्जुना दावील सिद्धांचा रावो। तो ऐका म्हणे ज्ञानदेवो। निवृत्तीचा॥ ५३५॥**

**इति श्रीज्ञानदेवविरचितायां भावार्थदीपिकायां नवमोऽध्यायः॥ ९॥**

**अर्थ**—राजा धृतराष्ट्रा! ऐकत आहेस ना! असें संजय म्हणाला, पण धृतराष्ट्र मात्र स्वस्थच दिसला. त्याच्या मनाला या प्रेमळ निरूपणामुळे आनंद झालेला दिसला नाही. ज्याप्रमाणे म्हैस पुरामधून उठत नाही तसा धृतराष्ट्रहि पुत्रांच्या मोहांत गुंतून स्तब्धच राहिला. ॥ ५२२ ॥ तें पाहून संजयाने मान हालविली. संजय मनांत म्हणतो, "अहो काय सांगावें पहा! आज येथे अमृताचा पाऊस पडला; परंतु हा म्हातारा येथें असून जवळच्या दुसऱ्या गांवाला गेलेल्या माणसाप्रमाणे याच्या आंगाला या अमृताच्या पावसाचा एक थेंबहि लागला नाही" ॥ ५२३ ॥ पण हा आपला स्वामी आहे म्हणून असें आपण त्याला म्हणणें हा वाचेला दोष होईल. काय करावें याचा स्वभावच असा आहे. ॥ ५२४ ॥ पण माझें मात्र थोर भाग्य खरें. धृतराष्ट्राला युद्धांतील वर्तमान सांगण्याची आज्ञा करून त्या निमित्ताने सर्व मुनिश्रेष्ठ अशा श्रीगुरु भगवान व्यासांनी मला संवाद ऐकण्याचा प्रसंग आणून दिला व जन्ममरणापासून माझें रक्षण केलें. ॥ ५२५ ॥ मनाला दृढ सांवरून धरून इतके मोठें भाषण संजय करीत आहे, तितक्यांत प्रेमाने त्याचा अष्टसात्विकभाव दाटून येऊन त्याला आपलें मन सांवरून धरितां आलें नाही. ॥ ५२६ ॥ चित्त आश्चर्याने थक्क होऊन त्याची आटणी होऊं लागली. जागच्या जागीं वाणीला मौन पडलें. पायापासून मस्तकापर्यंत सर्व आंगाला धाम आला. ॥ ५२७ ॥ डोळे अर्धवट उघडे व अर्धत्रट लागलेले असे झाले व डोळ्यांतून आनंदाश्रु वाहूं लागले. आंतल्या सुखाने बाहेर आंग कापूं लागलें. ॥ ५२८ ॥ सर्व आंगावरील रोमरंध्राचे ठिकाणीं घामाचें कण उमटले व संजय मोत्याची माळ घातल्याप्रमाणे दिसूं लागला. ॥ ५२९ ॥ याप्रमाणे अंत:करणांत झालेल्या अत्यंत सुखानें त्याच्या जीवदशेची आटणी होऊं पाहत होती—म्हणजे त्याला समाधिच लागायची-पण भगवान व्यासांनी त्या संजयाकडे जी कामगिरी सोंपविली होती, तिने त्याला समाधि लागूं दिली नाही. ॥ ५३० ॥ आणि वर श्रीकृष्णाचें बोलणें घों घों करीत कानावर आल्यामुळे संजयाला परत देहस्मृति होऊन तो देहावर आला. ॥ ५३१ ॥ तेव्हा त्याने डोळे पुसले. सर्वांगाला आलेला घाम पुसला व धृतराष्ट्राला, राजा! ऐक असें म्हणूं लागला. ॥ ५३२ ॥ आतां भगवान श्रीकृष्णाचें वचन हेंच कोणी शुद्ध निवडलेलें बी आणि हा सत्वगुणरूप खताने खतविलेली जमीन होय; म्हणून श्रोत्यांना वेदान्तांतील सिद्धान्तरूपी प्रमेयाचे पिकाचा उत्तम लाभ होईल. ॥ ५३३ ॥ अहो श्रोतेजन! सहज थोडे निरूपणाकडे लक्ष द्याल तर आनंदाचे राशीवर बसाल, असें निरूपण श्रवणेंद्रियाला मिळणार, तेव्हा भाग्यानेच या श्रवणेंद्रियाला माळ घालून वरिलें आहे. ॥ ५३४ ॥ सर्व सिद्धांचा राजा भगवान श्रीकृष्ण आता अर्जुनाला आपल्या विभूती जाणण्याचीं स्थानें सांगणार आहे, म्हणून श्रीनिवृत्तिनाथांचे ज्ञानदेव श्रोत्यांना ऐकण्याची विनंति करतात. ॥ ५३५ ॥

**श्रीमद्सद्गुरू श्रीज्ञानेश्वरमहाराजविरचित श्रीज्ञानेश्वरींतील नवव्या अध्यायाचा अनुवाद पुरा झाला**
**तो श्रीगुरुचरणीं समर्पण असो!**



## समारोप

भगवान श्रीकृष्णांनी मुख्यत: ज्या एकान्तधर्माचा किंवा भक्तिमार्गाचा आपल्या प्रेमळ भक्त अर्जुनाला उपदेश केला, त्याचेच या अध्यायांत सविस्तर निरूपण आलेलें आहे. ज्या रामकृष्णादि सगुण विग्रहाची भक्ति केली जाते ते रामकृष्णादि सगुणविग्रह पूर्ण ब्रह्मस्वरूप आहेत, हेंच भगवंतांनी अर्जुनाला येथे समजावून दिलें.

मागें सातव्या अध्यायांत, नामरूपात्मक प्रपंच, मायेने म्हणजे भ्रमाने भासतो असें सांगितलें आहे. तो नामरूपात्मक प्रपंचाचा भ्रम, ज्याप्रमाणे दोरीवर सर्प भासतो त्याप्रमाणे निरुपाधिक स्थितींतच स्वभावशक्तीने, नामरूपाने प्रगट झालेल्या परब्रह्मावर भासतो; म्हणून प्रपंच सत्य नाही व अज्ञानी जीव त्याच्या उत्पत्त्यादि कर्मांचें कर्तृत्व मजकडे देत असला तरी मी त्या कर्माचा कर्ता होत नाही. प्रपंच सत्य आहे, परमेश्वर त्याची उत्पत्ति, स्थिति, लय करतो हे सर्व देखील अज्ञानभ्रमामुळे वाटते. भ्रमाने भासलेल्या कार्यवस्तूचा मूळच्या यथार्थ वस्तूशीं कांहीहि संबंध नसतो. ही अज्ञानभ्रांति आहे तोपर्यंतच प्रपंचाचे उत्पत्तिनाश भासत राहतात आणि त्या प्रपंचाला अधिष्ठानभूत असलेला मी उदासीनाप्रमाणे साक्षी स्वरूप असतो. हें माझें साक्षीपण जीवाच्या कल्पनेनुसार त्याला प्रपंच भासविण्याला निमित्तमात्र होतें. एवढ्यानेच माझ्या अधिष्ठानावर भासणाऱ्या भ्रमरूप प्रपंचाचें उपादान व निमित्त कारण मी आहे असे जीव समजतो. वास्तविक हा सर्व अज्ञानभ्रांतीचा परिणाम आहे. या भ्रांतीने मोहित होऊन मला प्रपंचाप्रमाणे पांचभौतिक समजून जीव माझा अनादर करतात.

माझा हा सगुणविग्रह, प्रपंचाला अधिष्ठानभूत असणाऱ्या व्यापक अशा सर्वनामरूपात्मक विग्रहाप्रमाणे निरुपाधिकच आहे, हे अज्ञानभ्रांतीमुळे जीव जाणत नाही. मला प्रपंचाप्रमाणे भौतिक समजून माझा अनादर करतो व माझें प्रेमभजन करीत नाही. पण माझ्या सगुणस्वरूपाचा अनादर करणारे हे जीव राक्षसी किंवा आसुरी प्रकृतीचे असतात. त्यांचे ज्ञान, कर्म वगैरे सर्व कांही परमार्थदृष्टीने निरर्थक असतात.

महात्मे पुरुष मात्र माझ्या सगुणस्वरूपाचें पूर्ण ब्रह्मत्व जाणून माझें अत्यंत प्रेमाने व सर्वभावाने भजन करतात. ते माझें अखंड नामस्मरण करून माझे गुण व लीला गातात. माझ्या प्राप्तीकरितां इंद्रियें व मन यांचा निरोध करून माझ्या ध्यानाने मद्रूप होतात आणि या नामरूपात्मक प्रपंचांत माझ्यावांचून दुसरी वस्तुच नाही, सर्व नामरूपाने मीच नटलों आहे, असे समजून वस्तुमात्राला नमन करितात. असे हे अत्यंत निरभिमान होऊन मद्रूप झालेले महात्मे माझ्या भजनाने आपण तरून जाऊन दुसऱ्यालाही तारतात.

दुसरे कित्येक पुरुष माझें ज्ञानाने यजन करतात. मीच एक सत्य असून बाकी सर्व खोटें आहें अशा ज्ञानाने भजन करणें किंवा एक परमात्मा असून तोच देवतारूपाने नटला आहे अशी भावना ठेऊन देवतांचें यजन करणें, अथवा सर्व भगवंतच आहे अशा ज्ञानाने सर्वत्र ब्रह्मभावना करणें असे ज्ञानाने यजन करण्याचे तीन प्रकार आहेत. सर्वत्र सर्वरूपाने मीच असल्यामुळे खरोखर माझी प्राप्ति अत्यंत सुकर आहे, पण हे ज्ञान नसल्यामुळे माझी प्राप्ति जीवाना दुष्कर झाली आहे. ते माझ्या प्राप्तीची इच्छा न करतां स्वर्गांतील विषयभोगाच्या इच्छेने नाना प्रकारचे यज्ञ करतात व जन्ममरणाची परंपरा भोगतात.

माझें अनन्यचित्ताने भजन करणाऱ्या पुरुषांच्या योगक्षेमाची सर्व काळजी मीच वाहतो. दुसऱ्या देवतांचें यजन करणें हेहि माझेंच यजन होत असलें तरी माझ्या प्राप्तीकरितां जसे यजन व्हायला पाहिजे तसे यजन तें होत नाही, म्हणून ते मला प्राप्त होत नाहीत. देवतादिकांचे यजन करणारे देवतादिकांनाच प्राप्त होतात व माझें साक्षात् यजन करणारे मला प्राप्त होतात.

माझें यजन करणें अत्यंत सोपें आहे. मी एका प्रेमाशिवाय इतर उपचारांनी संतुष्ट होत नाही. म्हणून अर्जुना!

तूं जे करशील, जे भोगशील, जे हवन करशील किंवा जे तप करशील ते सर्व साक्षात् मला प्रेमाने समर्पण करीत जा. असे मला समर्पण केल्याने, पापपुण्यरूपकर्माने तूं बद्ध होणार नाहीस. सर्व कर्मापासून मुक्त राहशील व मला प्राप्त होशील. अंतर्यामीरूपाने सर्व भूतांचे ठिकाणीं मी व्याप्त असल्यामुळे मला कोणी प्रिय नाही किंवा द्वेष्यहि नाही. पण माझी प्रेमभक्ति करणारे माझ्या ठिकाणीं असतात व मी त्यांचे ठिकाणीं असतो.

कर्मपतित म्हणजे शास्त्रनिषिद्ध आचरणाने पतित झालेल्या दुराचारी पुरुषांनीहि माझी अनन्यभावाने भक्ति केल्यास त्या प्रेमभक्तीने शीघ्र सन्मार्गाला लागतात व सन्मार्गाला लागून साधु होतात. म्हणून अर्जुना परम दुराचारी असला तरी माझा भक्त जन्ममरणरूपी संसारांत न सांपडतां मलाच प्राप्त होतो.

तसेंच जातिपतित .म्हणजे निकृष्ट जातींत जन्मलेले अत्यंजादि देखील माझ्या भक्तीने मुक्त होतात. मग सत्कर्म निरत व सर्व जातींत पूज्य असलेले ब्राह्मण आणि राजर्षि माझ्या भक्तीने परमपदाला प्राप्त होतात हे काय सांगायला हवे ?

अर्जुना! तूं अपल्या पूर्वकर्माने नाशिवंत व दु:खदायी संसारांत जन्माला आला आहेस, तेव्हा त्यांतून सुटण्याकरितां माझे प्रेमानें भजन कर. चित्तांत अखंड माझें ध्यान असूं दे. सर्वत्र माझी भावना करून मला सर्वत्र नमस्कार करीत जा. अशारीतीने तुझीं इंद्रियें, मन, बुद्ध्यादिक माझ्या ठिकाणीं लागून तूं मत्परायण झाला असतां मला प्राप्त होशील.

अशा रीतीने नवव्या अध्यायांत सर्व गुह्यांत श्रेष्ठ असलेले सगुणभगवंताचे पूर्णब्रह्मत्व आणि भगवद्भक्तीचा अगाध महिमा या दोन गोष्टी भगवंतांनी अर्जुनाला सांगितल्या आहेत.

**॥ श्रीमद्सद्गुरु श्रीज्ञानेश्वरमहाराजार्पणमस्तु ॥**



॥ श्रीज्ञानेश्वर माउली समर्थ ॥

# अध्याय दहावा

अवतरणिका—मागील अध्यायांत "इये भक्तिचिये वाटे लाग। जिया पावसी अव्यंग। निजधाम माझें" माझ्या सगुणस्वरूपाची प्रेमभक्ति केली असतां, माझें निजधाम जें पूर्ण ब्रह्मस्वरूप, त्याला तूं तात्काळ प्राप्त होशील म्हणजे मुक्त होशील, असे भगवंतांनी शेवटीं नवव्या अध्यायांत सांगितलें; पण मुक्ति ही नित्य, बुद्ध, शुद्ध, मुक्त, सर्वज्ञ, सर्वशक्तिमान, जगत्उत्पत्तिस्थितिलय करणारे असे जे कारणब्रह्म याच्याशीं ऐक्य पावलें असतांच होते, असा ब्रह्मसूत्रांत सिद्धान्त केला असतांना; नामरूपाने व्यक्त झालेल्या कार्यरूप अशा सगुणस्वरूपाच्या भक्तीने, परब्रह्माची साक्षात्प्राप्ती होऊन जीव तात्काळ मुक्त होणें कसें शक्य आहे, अशी अर्जुनाचे मनांत शंका आली. ती जाणून, माझें सगुण श्रीकृष्णस्वरूपहि कारणब्रह्म किंवा पूर्ण परब्रह्मच आहे-कार्य ब्रह्म नाही-म्हणून माझ्या भक्तीने माझ्याशीं ऐक्य पावून जीव तात्काळ मुक्त होतो हेच या अध्यायांत भगवंतांनी सांगितलें आहे.

महाभारताचे टीकाकार श्री नीळकंठाचार्य यांनीहि, "न कार्यत्वादनित्योऽयं नंदनंदनविग्रहः। औपचाराद्धि कार्मत्वं तत्र पौराणिका जगुः" भगवंताचे श्रीकृष्णस्वरूप नामरूपाने व्यक्त झाल्यामुळे कार्यब्रह्मरूप आहे व तें अनित्य आहे असे नाही-म्हणजे तें नित्य कारणब्रह्मस्वरूपच आहे—पुराणांनी औपचारिकरीत्याच श्रीकृष्णविग्रहाला कार्यरूप म्हटलें आहे, वास्तविक नाही, असे महाभारतावरील टीकेच्या उपोद्घातांत म्हटलें आहे.

**नमो विशदबोधविदग्धा। विद्यारविंदप्रबोधा। पराप्रमेयप्रमदा-। विलासिया॥ १ ॥**

**अर्थ**—स्पष्ट ब्रह्मबोध करून देण्यांत निपुण असणारे, ब्रह्मविद्यारूपी कमलाला विकसित करणारे, पराविद्येचे प्रमेय जें परब्रह्म-तीच कोणी स्त्री-तिच्याशीं विलास करणारे, अशा तुम्हांला, हे श्रीगुरो! माझा नमस्कार असो॥ १ ॥

**गूढार्थदीपिका—विशदबोधविदग्धा**—'बोध' या शब्दाने, येथे परब्रह्माचा बोध विवक्षित आहे. तो परोक्ष व अपरोक्ष असा दोन प्रकारचा आहे. परोक्षबोध म्हणजे सर्वसंशयनिवृत्तिपूर्वक ब्रह्मस्वरूपाचे ज्ञान होणे आणि अपरोक्षबोध म्हणजे आपल्या ठिकाणीच तें स्वरूप मी आहे, असा अनुभव येणे. हा दोन्ही प्रकारचा ब्रह्मबोध श्रीगुरुच्या साहाय्यावांचून केवळ स्वतंत्र बुद्धीने होऊं शकत नाही.

परोक्षज्ञानहि श्रीगुरुपासूनच प्राप्त होते असे सुंदरदासांनीहि "शब्द सुनाय संदेह मिटावत। सुंदर वा गुरुकी बलिहारी" (सुंदरविलास) या पंक्तीने दाखविलें असून "शास्त्रज्ञोऽपि स्वातंत्र्येण ब्रह्मज्ञानान्वेषणं न कुर्यात्" असे आचार्यहि म्हणतात हे मागें सांगितलेच आहे. म्हणून परोक्ष व अपरोक्ष असे दोन्ही प्रकारचे ज्ञान करून देण्यांत श्रीगुरुच निपुण असतात. असे येथे "विशदबोधविदग्धा" या पदाने माऊलींनी श्रीगुरुचें वर्णन केलें आहे.

**विद्यारविंद प्रबोधा**—त्याचप्रमाणे श्रीगुरुच्या कृपेनेच आत्मबोध सदा तेजस्वी राहतो. शिष्याच्या अविनीतत्त्वादिदुर्गुणामुळे श्रीगुरु त्याविषयीं उदास झाल्यास, शिष्याचा अपरोक्ष बोधहि नाहीसा होऊन त्याच्या हातीं नुसता अभिमानच शिल्लक राहतो, असे "जयाचेनि सावाये जीव ब्रह्मउपरो लाहे। ब्रह्महि हातातळील जाये। उदासे जेणें" (अमृ. प्र. २-१६) या ओवींत माऊलींनी सांगितलें आहे. म्हणून श्रीगुरुला "विद्यारविंदप्रबोधा" हें विशेषण दिलें आहे.

**पराप्रमेय प्रमदा विलासिया—"परा यया तदक्षरमधिगम्यते"** (मुं. उ. १-१-५). परा म्हणजे पराविद्या. (त्याचें वर्णन मागें आलेंच आहे).

प्रमेय म्हणजे तिच्या योगाने कळणारें ब्रह्मतत्त्व-हीच कोणी प्रमदा म्हणजे स्त्री-तिच्या ठिकाणीं रममाण होणारा. संत, सर्व अवस्थेंत परब्रह्मस्वरूपाचें ठिकाणींच स्थित असतात असा भाव.

**नमो संसारतमसूर्या। अप्रतिमपरमवीर्या। तरुणतरतूर्या-। लालनलीला॥ २॥**

**अर्थ—**जे अज्ञानरूपी अंध:काराचा नाश करणारे सूर्य आहेत, उपमा देतां येणार नाही असे जे अगाध सामर्थ्यवान आहेत, तरुण म्हणजे उत्पत्तिनाशरहित व तरुणतर म्हणजे प्रयत्नावांचून अखंड कायम राहणाऱ्या अशा तूर्यावस्थेचें जे पालन करण्याची लीला करणारे आहेत, अशा श्रीगुरो! तुम्हाला नमस्कार असो.॥ २॥

**गूढार्थदीपिका—संसारतमसूर्या—**ज्याप्रमाणे सूर्याचे ठिकाणीं अंध:कार कधीच राहत नाही, तसेंच त्याच्या सर्वत्र असलेल्या प्रकाशामुळे दुसऱ्यालाही कोठे अंध:कार दिसत नाही, त्याप्रमाणे ज्याच्या ठिकाणीं संसाररूपी अंध:कार मुळीच नसून, जो दुसऱ्याचा संसाररूपी अंध:कारही समूळ नाहीसा करून, त्याला प्रकाशरूप करून सोडतात.

**अप्रतिम—"न तस्य प्रतिमा विद्यते"** (श्वे. उ. अ. ४-१९) या श्रुतीचा अर्थ, आचार्यांनी "याचासारखा दुसरा पदार्थ नसल्यामुळे त्याला प्रतिमा म्हणजे उपमा देता येत नाही" असा केला आहे, म्हणून "अप्रतिम" याचा अर्थ अनुपमेय असा आहे.

**परमवीर्या—**भगवंताचे जें अगाध सामर्थ्य असतें, तेच भगवदैक्यामुळे संतांचेंहि असतें; म्हणून सद्‌गुरुला "परमवीर्या" असें म्हटलें आहे.

**तरुणतरतूर्या—**"जाणे ब्रह्म जाणे माया जाणें अनुभवाचे ठाया। ती एक जाणावी तूर्या। "सर्वसाक्षिणी" (दास. द. ७ स. ४) ज्या अवस्थेंत, ब्रह्म, माया, अनुभव हे तिन्ही जाणले जातात, तिला 'तूर्या' अवस्था म्हणतात. हिलाच 'साक्षी' अवस्थाहि म्हणतात.

प्रत्येक वस्तूच्या, प्रथमावस्था, मध्यमावस्था व उत्तरावस्था अशा तीन अवस्था आपण अनुभवित असतो.

प्रथमावस्थेंत त्या वस्तूच्या शक्तीचा अल्प प्रादुर्भाव असतो, मध्यमावस्थेंत शक्तीची पूर्णता अनुभवात येते व उत्तरावस्थेंत शक्तीचा ऱ्हास होतो.

सूर्य उगवतो, तेव्हा त्याच्या प्रकाशाने संपूर्ण अंध:कार नाहीसा होत नाही, त्याचप्रमाणे तो जेव्हा मावळूं लागतो तेव्हाहि अंध:कार सुरूं होतो. पण मध्यमावस्थेंत म्हणजे माध्यान्हकाळीं कोठेहि अंध:कार राहत नाही. त्याकाळीं सूर्याची, अंध:कार नाश करण्याची शक्ति पूर्णपणे प्रगट असते.

तूर्यारूपसाक्षी अवस्था किंवा ज्ञानावस्था हीहि तरुण म्हणजे पूर्ण झाली असतां, अज्ञान अंध:कार कोठेंहि उरूं देत नाही. एवढेच नाही, तर ती तरुणतर असते-म्हणजे सूर्याच्या माध्यान्ह अवस्थेपेक्षा तूर्येची तरुणावस्था विशेष आहे. तो विशेष म्हणजे सूर्याची माध्यान्हकाळाची पूर्ण प्रकाशावस्था पुढे क्षीण होतांना आपण पाहतो; पण तूर्येची तरुणावस्था "इयं ज्ञानकला राजन् सकृज्जाताभिवर्धते" (योगवासिष्ठ) तशीच वाढत जाते व मावळत नाही किंवा क्षीण होत नाही. ज्याप्रमाणे सूर्यप्रकाशाचे ठिकाणीं दिसणारें मृगजळ, हा नुसता पाण्याचा भास आहे, खरोखर तें सूर्यप्रकाशाचें कंपन आहे असेंच मनुष्याला वाटतें. त्याप्रमाणें दृढज्ञानीपुरुषालाहि, ज्या नामरूपाला आपण माया म्हणतो, तीं नामरूपेंहि परब्रह्माचा विसर पाडणारी अशी मायारूप नव्हेत असा अनुभव येतो. ती तूर्यावस्था "अहं ब्रह्मास्मि" मी ब्रह्म आहे अशी व्यक्तिपुरती मर्यादित न राहतां "सर्व खल्विदं ब्रह्म" अशी व्यापकस्वरूप होते. श्रीज्ञानेंश्वर माऊलींनी अमृतानुभव प्रकरण चार मध्ये "तैंसे अज्ञान आटोनियां। ज्ञान येते उवाया। ज्ञानाज्ञान गिळोनियां। ज्ञानचि होय॥ १५॥ असेच सांगितलें आहे. म्हणूनच येथे निदिध्यासनादि प्रयत्न सुटून स्थिर होणाऱ्या तूर्यावस्थेला "तरुणतर" म्हटलें आहे.

**लालनलीला—**"अनाविष्कुर्वन्नन्वयात्" (ब्र. सू. ३-४-५०) या सूत्रामध्ये ज्ञान्यांनी प्राप्त झालेली आपली ज्ञानावस्था, तिच्या संरक्षणाचा प्रयत्न सुटून ती अखंड राहावी म्हणून, लहान मूल जसें अहंकारदंभदर्परहित राहते, त्याप्रमाणे ज्ञानाहंकार व दंभदर्परहित राहावें असे सांगितले आहे; तसे राहिले असतां तूर्यावस्थेचें, प्रयत्न न करतांच संगोपन होते "लालनलीला" या शब्दाने माऊलींनी सुचविलें आहे.

**नमो जगदखिलपालना। मंगळमणिनिधाना। स्वजनवनचंदना। आराध्यलिंगा॥ ३॥**

**अर्थ**—जें संपूर्ण जगाचें पालन करणारे आहेत, जे संपूर्ण कल्याणरूपी रत्नांचा सांठा आहेत किंवा सर्व कल्याणांत श्रेष्ठ असे जे आत्मकल्याणाचा सांठा आहेत, जे सज्जनरूपी वनास चंदनासारखे सुगंधित करून सोडणारे आहेत, ब्रह्मादिकांना सेव्य हेच ज्यांचें चिन्ह आहे, हे श्रीगुरो! अशा तुम्हाला माझा नमस्कार असो. ॥ ३ ॥

**गूढार्थदीपिका—जगदखिलपालना**—''तस्मिंस्तज्जने भेदाभावात्'' या सूत्रांत सांगितल्याप्रमाणे भगवान व त्यांचे भक्तजन, यांच्यांत कांहीहि भेद नसल्यामुळे, ज्या विशेषणांनी भगवंताची स्तुति केली जाते, त्या विशेषणांनीच सद्गुरुरूपी संतांचीहि स्तुति होऊ शकते; म्हणून माऊलींनी येथे भगवंताला लागू होणाऱ्या ''जगदखिलपालना'' इत्यादि विशेषणांनी श्रीगुरुची स्तुति केली आहे.

विष्णु जीवाचे पालन करतो, पण त्यांच्या कर्मानुसारच सुख देतो आणि श्रीगुरु सर्व संसारदु:खातून सोडवून जीवांना सुखच देतात.

**मंगळमणिनिधाना**—परब्रह्माचा अपरोक्ष साक्षात्कार सर्वांना एकाच प्रक्रियेने होत नसतो; म्हणून शिष्याच्या अधिकारानुसार श्रीगुरु निरनिराळ्या शिष्यांना निरनिराळ्या प्रक्रिया सांगतात. या तत्वाला धरून सुरेश्वराचार्यांनी ''यया यया भवेत्पुंसांव्युत्पत्तिः प्रत्यगात्मनि। सा सैव प्रक्रियेह स्यात् साध्वी साचानवस्थिता''॥ ४०२॥ (सुरे. बृहदारण्यकोपनिषद्भाष्य वार्तिक अ. १-४) ज्याला ज्या प्रक्रियेने आत्मसाक्षात्कार होईल, त्याला तीच प्रक्रिया योग्य होय असे म्हटलें आहे. अर्थात् आत्मसाक्षात्कार करून देण्यास समर्थ असलेले श्रीगुरु, आत्मसाक्षात्काराच्या अनेक प्रक्रियारूपी रत्नांची ठेव असतात, हे सिद्ध आहे व माऊलींनी या सिद्धान्ताला धरून येथे श्रीगुरुला ''मंगळमणिनिधाना'' हें विशेषण लाविलें आहे.

**''ब्रह्मनिष्ठसाक्षात्कृत। तद्रचित जे ग्रंथ। ते नाना प्रक्रियासमन्वित। शिष्यबोधार्थ प्रगटती''॥ ४८॥**

(श्रीगुलाबरावमहाराजकृत श्रीभगवद्गीतासंगति)

**सज्जनवनचंदना**—अरण्यांत असलेलें चंदनाचें झाड जसें आपल्या सभोंवार असलेल्या झाडांना चंदनरूप करून सोडतें, त्याप्रमाणे सज्जन म्हणजे संसारदु:खाने तप्त होऊन परमेश्वरप्राप्तिकरितां तळमळणारे जे जीव त्यांच्या वनाला म्हणजे समुदायाला, श्रीगुरु आपल्यासारखेच पूर्ण परब्रह्मस्वरूप व निर्वासन असे शांत करून सोडणारे होतात.

**आराध्यलिंगा**—जीवाला परमपदाची प्राप्ति करून देण्याचें सामर्थ्य, एका गुरुरूपावांचून ईश्वररूपांतहि नसल्यामुळें श्रीगुरुच, मनुष्यापासून ब्रह्मदेवापर्यंत सर्व जीवांना आराध्य आहेत असा अर्थ.

**नमो चतुरचित्तचकोरचंद्रा। आत्मानुभवनरेंद्रा। श्रुतिसारसमुद्रा। मन्मथमन्मथा॥ ४॥**

**अर्थ**—जे चतुरांच्या चित्तरूपी चकोराला चंद्राप्रमाणे आल्हादकारक आहेत, जे आत्मानुभवाचे राजे आहेत, श्रुतीचे सार जें ब्रह्मज्ञान, त्याचा जे समुद्र आहेत व जे कामालाहि मोहून घेणारे किंवा जिंकणारे आहेत, अशा श्रीगुरुराया! तुम्हांला माझा नमस्कार असो. ॥ ४॥

**गूढार्थदीपिका—चतुरचित्तचकोरचंद्रा**—असार अशा संसाराला सत्य समजून त्याचे ठिकाणी आसक्त होणारा मूर्ख होय. संसार असार आहे व एक परब्रह्मच अविनाशी सुखरूप आहे; म्हणून त्याच्याच प्राप्तीचा प्रयत्न करणें योग्य, हें जो जाणतो, तोच चतुर होय.

सारभूत परमात्म्याची प्राप्ति श्रीगुरुशिवाय कल्पान्तींहि होत नाही ''असो जयास मोक्ष व्हावा। तेणें सद्गुरु करावा। सद्गुरुविणे मोक्ष व्हावा। हें कल्पांती न घडे''॥ ४४॥ (दास. द. ५ स. १) म्हणूनच, चकोराला पूर्ण चंद्रापासून जसा अत्यानंद होतो, तसेंच चतुरपुरुषाच्या चित्तालाहि श्रीगुरुची प्राप्ति, ब्रह्मानंद देणारी असते.

ज्याप्रमाणे चंद्राच्या प्रकाशांतील अमृतकण वेंचण्याचें शहाणपण चकोरालाच असतें, त्याप्रमाणे चतुर पुरुषाच्या चित्तालाच श्रीगुरुच्या प्राप्तीचा लाभ घेतां येतो. शिष्य जर चतुर नसला, तर खऱ्या श्रीगुरुची प्राप्ति व त्या प्राप्तीचा लाभ होत नाही, असा अर्थ.

**आत्मानुभवनरेंद्रा**—आत्मानुभवाचा राजा म्हणजे, राजाचे सेवक जसे राजाचा हुकूम पाळतात, त्याप्रमाणे

आत्मानुभवहि श्रीगुरुंचा हुकूम पाळतो. जेथे श्रीगुरु त्याला पाठवितील, तेथे तो जातो, श्रीज्ञानेश्वरमाऊली म्हणतात "मोक्ष दुराराध्य कीर होय। परि तोहि आराधी तुझे पाय। म्हणोनि धाडिसी तेथ जाय। पाईक जैसा" (ज्ञा. अ. ११-९९).

भगवान श्रीकृष्णच अर्जुनाचे गुरु असल्यामुळे, अर्जुनाने श्रीकृष्णाला उद्देशून जें म्हटले तें, श्रीकृष्णाच्या ईश्वररूपाकडे लक्ष देऊन म्हटलें नाही, तर श्रीकृष्णाला गुरु समजून म्हटलें आहे. आत्मानुभवाचा नियामक गुरु आहे, असा अर्थ.

अथवा

जसा राजा वैभवाने युक्त असतो, तसे श्रीगुरु आत्मानुभवसूचक लक्षणाने संपन्न असतात.

**मन्मथमन्मथा**—मन्मथ म्हणजे मदन. हा सर्व जगाला मोह पाडून आपल्या वश करून घेतो, पण श्रीगुरु, अशा मदनालाहि आपल्या स्वाधीन ठेवणारे आहेत. जो काम कशानेहि वश होत नाहीं किंवा जिंकला जात नाही, त्या कामाला श्रीगुरु आत्मानुभव दाखवून व आत्मप्रेम लावून जिंकतात. बुद्धीच्या पलिकडे असलेल्या आत्म्याचा अद्वैत अनुभव आला की, काम जिंकला जातो, हें मागें तिसऱ्या अध्यायांत सांगितले आहे (श्लोक ४३).

**नमो सुभावभजनभाजना। भवेभकुंभभंजना। विश्वोद्भवभुवना। श्रीगुरुराया॥ ५॥**

**अर्थ**—जे निष्काम प्रेमाने भजन करण्यास योग्य आहेत, जे संसाररूपी हत्तीचे गंडस्थल फोडणारे आहेत, जे सर्व जगताच्या उत्पत्तीला किंवा भासाला अधिष्ठानभूत आहेत, अशा श्रीगुरुनाथा! तुम्हांला नमस्कार असो.॥ ५॥

**गूढार्थदीपिका—सुभावभजनभाजना**—सुभाव म्हणजे निष्काम प्रेम किंवा शुद्ध प्रेम.

ज्यावर प्रेम करावयाचें, त्याच्यापासून कोणत्याहि सुखाच्या प्राप्तीची इच्छा न करतां, केवळ त्याचें प्रेम करणे याला शुद्ध प्रेम म्हणतात. प्रत्येक पुरुषाला आपल्या आत्मस्वरूपाचें असे स्वाभाविक शुद्ध प्रेम आहे आणि आत्मा, परमात्मा व श्रीगुरु हे तिन्ही एकरूपच असल्यामुळे, श्रीगुरुहि शुद्ध प्रेमाच्या भजनास योग्य आहेत असे माऊलींनी येथे म्हटलें आहे.

**भवेभकुंभभंजना**—अशा शुद्ध प्रेमभावाने श्रीगुरुचें भजन केलें असतां, श्रीगुरुकृपेने संसाररूपी गजाचें गंडस्थळ फुटून संसार नाहीसा होतो-म्हणजे पुरुष पूर्ण मुक्त होतो.

**विश्वोद्भवभुवना**—कारण ज्याप्रमाणे दोरीवर भासणाऱ्या सर्पाच्या भासाला दोरीच आधार असते व म्हणूनच दोरी कळून, दोरीच्या आकाराचें भान झालें, की सर्प नि:शेष नाहीसा होतो, त्याप्रमाणे श्रीगुरुहि, विश्वाच्या भासाला अधिष्ठान असल्यामुळेंच, त्यांच्या भजनाने विश्वाचा भास नाहीसा होतो.

**तुमचा अनुग्रहो गणेशु। जैं दे आपुला सौरसु। तैं सारस्वतीं प्रवेशु। बाळकाही आथी॥ ६॥**

**अर्थ**—श्रीगुरुनाथा! तुमची कृपा हीच गणेश देवता होय. तिने आपला प्रसाद केला असतां, अज्ञ नेणता बालक देखील सर्वविद्यापारंगत होतो.॥ ६॥

**गूढार्थदीपिका**—हे कांही केवळ श्रीगुरुची केवळ स्तुति करावी म्हणून म्हटलें नाही. भगवंताचें जें सामर्थ्य असते, तेच ज्ञानभक्तिसंपन्न श्रीगुरुचेहि असते. भगवंतांनी ध्रुवाच्या कपोलाला आपल्या शंखाचा स्पर्श केल्याबरोबर ध्रुवांनी, वेदांत सांगितलेल्या सर्व अर्थांनी भरलेली अशी भगवंताची स्तुति केली; तसेंच श्रीगुरुकृपेनेहि शिष्य, सर्व शास्त्रांत प्रवीण होऊं शकतो, पण शिष्याने एवढाच एक प्रयत्न केला पाहिजे की, आपल्या प्रेमळ, निष्कपट अंत:करणाने त्यांची सेवा करून, समभाव असलेल्या श्रीगुरुचा कृपाप्रवाह आपल्याकडे ओढून घेतला पाहिजे. मग श्रीगुरुची कृपा होऊन, माऊलींनी वर्णन केल्याप्रमाणे, श्रीगुरुकृपेचा अनुभव येतो.

**जी दैविकी उदार वाचा। जैं उद्देशु दे नाभिकाराचा। तैं नवरसदीपांचा। थावो लाभे॥ ७॥**

**जी आपुलिया स्नेहाची वागीश्वरी। जरी मुकेयातें अंगीकारी। तो वाचस्पतीशीं करी। प्रबंधु होडा॥ ८॥**

**हें असो दिठी जयावरी झळके। कीं हा पद्मकरु माथां पारुखे। तो जीवचि परि तुके। महेशेंशीं॥ ९॥**

**एवढें जिये महिमेचें करणें। ते वाचा बळें वानूं मी कवणें। का सूर्याचिया आंगा उटणें। लागत असे॥ १०॥**
**केउता कल्पतरुवरी फुलैरा। कायसेनि पाहुणेरु क्षीरसागरा। ऐसा कवणें वासीं कापुरा। सुवासु देवों॥ ११॥**
**चंदनातें कायसेनि चर्चावें। अमृतातें केउतें रांधावें। गगनावरी उभवावें। घडे केवीं॥ १२॥**
**तैसें श्रीगुरुचें महिमान। आकळितें कें असे साधन। हें जाणोनि मियां नमन। निवांत केलें॥ १३॥**

**अर्थ**—अहो जी श्रीगुरुनाथा! तुम्हा देवाच्या थोर औदार्याने संपन्न असलेल्या वाणीकडून, ''भिऊं नकोस'' असें अभयवचन मिळाले असतां, शृंगारादि नवरसरूपी अमृताच्या समुद्राचाहि थांग घेतां येतो. ॥ ७ ॥ श्रीगुरुनाथा! आपले प्रेम हीच कोणी सरस्वती होय. हिने जर मुक्याचा अंगीकार केला, तर तो बृहस्पतीशीं देखील ग्रंथरचनेत प्रतिज्ञेने पैज लावूं शकेल. ॥ ८ ॥ हें असो, श्रीगुरुराया! तुमची कृपादृष्टि ज्याच्यावर आपला ज्ञानप्रकाश पाडील किंवा हें तुमचें हस्तकमल ज्याच्या डोक्यावर ठेविलें जाईल, तो जीव जरी असला. तरी तो शंकरासमान होतो. ॥ ९ ॥ श्रीगुरुच्या महिमेचें असें अगाध सामर्थ्य मी कोणत्या वाणीच्या बळाने वर्णन करूं! सूर्याच्या अंगाला उटणें लावून स्वच्छ करावें लागतें काय? ॥ १० ॥ कामनापूर्तीकरितां कल्पतरुवर नवरसाचा फुलवरा (नवसाप्रित्यर्थ देवतेवर पात्या, करंज्या लावून फुलवरा बांधतात तो प्रकार) बांधायला पाहिजे काय? क्षीरसागराला कशाचा पाहुणचार करतां येईल? कापुराला कोणत्या सुवासाने सुवासित करतां येईल? चंदनाला कशाची उटी लावावी? अमृताला शिजविण्याचें काय प्रयोजन आहे? आकाशांपेक्षा उंच होणे कसें घडणार? ॥ ११-१२ ॥ त्याप्रमाणे श्रीगुरुचे माहात्म्य आंकलन करतां येण्याजोगें कोणतें साधन आहे? (कोणतेंच नाहीं) हें जाणून मी मुकाट्याने तुमच्या पायावर डोकें ठेविलें आहे. ॥ १३ ॥

**गूढार्थदीपिका—श्रीगुरुचे महिमान। आकळतें कें असे साधन**—मर्यादित वस्तूचे गुण मर्यादित असतात, तसेंच अमर्याद वस्तूचे गुणहि समव्याप्तिमुळे अमर्यादच असतात. परब्रह्माचीं सगुण व निर्गुण अशीं दोन्हीं स्वरूपें असून तीं दोन्हीं रूपें अनाकलनीय आहेत. निर्गुणस्वरूप, विषयकोटींतील नसल्यामुळे, अनाकलनीय असून सगुणस्वरूपाचे षड्गुणैश्वर्यादि गुण अनंत व अपार असल्यामुहे तेहि अनाकलनीय आहे. या दोन्ही स्वरूपाचे ठिकाणीं ज्ञानभक्तीने ऐक्य पावलेल्या सद्गुरुचें स्वरूपहि अर्थात् अनाकलनीयच असतें.

जीव अल्पज्ञ, अल्पशक्ति आहे. अशा जीवाकडून श्रीगुरुचें यथार्थ म्हणजे अनंत व अपार वर्णन होणें शक्यच नसतें.

ज्याप्रमाणे समुद्राचें वर्णन, एखाद्या मोठ्या सरोवराची उपमा देऊन केलें असतां, ती समुद्राची निंदाच होते, त्याप्रमाणे जगांतील कोणत्याहि परिमित वस्तूची किंवा वस्तुधर्माची उपमा देऊन श्रीगुरुचें वर्णन करणें ही निंदाच होते; म्हणून त्यांची स्तुति करण्याचा अहंकार न बाळगतां, ''मज पामराकडून त्या अनंत अपाराचे गुण काय वर्णन केलें जाऊं शकतील'' अशा लीन व दीन भावनेने त्यांच्या चरणावर मस्तक ठेवणें, हीच त्यांची खरी स्तुति होय, असा भाव श्रीमाऊलींनी दाखविला आहे.

**जरी प्रज्ञेचेनि आथिलेपणें। श्रीगुरुसामर्थ्या रूप करूं म्हणे। तरि मोतियांसी भिंग देणें। तैसें होईल॥ १४॥**
**कां साडेपंधरया रजतवणी। तैशीं स्तुतीचीं बोलणीं। उगियाचि माथा ठेविजे चरणीं। हेंचि भलें॥ १५॥**
**मग म्हणितलें जी स्वामी। भलेंनि ममत्वें देखिलें तुम्हीं। म्हणोनि कृष्णार्जुनसंगमीं। प्रयागवटु जाहलों॥ १६॥**

**अर्थ**—जर बुद्धीच्या व्युत्पत्त्यादि सामर्थ्याने श्रीगुरुच्या सामर्थ्याचें वर्णन करीन, असे कोणी म्हणेल, तर तें त्याचें करणें, पाणीदार मोत्याला अभ्रकाचें पुट लावण्यासारखें होईल. ॥ १४ ॥ किंवा श्रीगुरुची शब्दाने स्तुति करणें, हें शुद्ध सोन्याला रुप्याचें पाणी देण्यासारखे होणार आहे; म्हणून मुकाट्याने त्यांच्या चरणावर मस्तक ठेवणें हेंच मी उत्तम समजतों. ॥ १५ ॥ नंतर श्रीज्ञानेश्वर महाराज श्रीगुरुनिवृत्तिनाथांना म्हणतात, अहो जी श्रीगुरुनाथा! माझ्यावर तुम्ही अत्यंत ममता करीत आहां, म्हणूनच श्रीकृष्ण व अर्जुन यांच्या संवादरूपी संगमाचे ठिकाणीं मी, प्रयागांतील (त्रिवेणी संसमावरील) वटवृक्षाप्रमाणे झालों. ॥ १६ ॥

**गूढार्थदीपिका—प्रयागवट जाहलों**—प्रयाग येथील वटाला अक्षय किंवा अविनाशी वट म्हणतात. तो, प्रयाग क्षेत्राच्या व गंगेच्या थोर माहात्म्यामुळे व शंकरादि देव त्याचें रक्षण करीत असल्यामुळे अक्षय झाला आहे. तसेच श्रीगुरुहि शिष्याचें प्रेम व लीनत्वादि गुणाला पाहून जेव्हा शिष्यावर अत्यंत प्रेम करतात, तेव्हाच त्याला अध्यात्मचर्चेची गोडी लागून, त्याचा ज्ञानचर्चेतच अक्षय काल जातो व त्यामुळे तो अक्षय ब्रह्मस्वरूप होतो असा भाव.

**मागां दूध दे म्हणतलियासाठीं। आघविया क्षीराब्धीची करूनि वाटी। उपमन्यूपुढें धूर्जटी। ठेविली जैसी ॥ १७॥**
**ना तरी वैकुंठपीठनायकें। रुसला ध्रुव कवतिकें। बुझाविला देऊनि भातुकें। ध्रुवपदाचें॥ १८॥**

**अर्थ**—मागें उपमन्यूने दूध मागितलें असतां क्षीरसमुद्राचीच वाटी करून ज्याप्रमाणे शंकराने त्याच्या पुढें ठेविली. ॥ १७॥ किंवा वैकुंठलोकाचा स्वामी जो भगवान विष्णु, त्याने रुसलेल्या ध्रुवाला ध्रुवपदाचे भातुकें देऊन त्याचें सहज सांत्वन केलें. ॥ १८॥

**गूढार्थदीपिका**—भक्त किंवा शिष्य अज्ञानी असल्यामुळें ते जरी अल्प मागत असलें, तरी भगवंत व श्रीगुरु पूर्ण असल्यामुळे ते पूर्णच देतात.

**तैसी जै ब्रह्मविद्यारावो। सकळ शास्त्रांचा विसंवता ठावो। ते भगवद्गीता वोविया गावों। ऐसें केलें॥ १९॥**

**अर्थ**—त्याप्रमाणे ब्रह्मविद्येचा राजा आणि सर्व शास्त्रांचें विश्रांतिस्थान अशी जी भगवद्‌गीता, ती माझ्याकडून ओवीरूप छंदात तुम्ही गाववून दाखविली. ॥ १९॥

**गूढार्थदीपिका—ब्रह्मविद्यारावो। सकळ शास्त्रांचा विसंवता ठावो**—ब्रह्म-प्राप्तीची जी विद्या ती ब्रह्मविद्या होय. ती ब्रह्मविद्या, निर्गुणब्रह्मप्रतिपादक व सगुणब्रह्मप्रतिपादक अशी दोन प्रकारची आहे. पुन: सगुणब्रह्मविद्या हीहि कार्यब्रह्मप्रतिपादक व कारणब्रह्मप्रतिपादक अशी दोन प्रकारची आहे. उपनिषदांतून बहुश: निर्गुणब्रह्मविद्याच सांगितली आहे. तिला ब्रह्मज्ञान म्हणतात. कार्य ब्रह्मप्रतिपादकब्रह्मविद्या छांदोग्यादि उपनिषदांतून सांगितली आहे आणि रामकृष्णादि सगुण कारणब्रह्माचें प्रतिपादन करणारी ब्रह्मविद्या श्वेताश्वतरोपनिषत्, त्रिपादमहानारायणोपनिषत्, वगैरे उपनिषदांतून व भागवतादि पुराणांतून सांगितली आहे. याला भक्ति असेहि म्हणतात.

या भक्तिरूप ब्रह्मविद्येचाच भगवंतांनी अर्जुनाला मुख्यत: गीतेंत उपदेश केला असून, ही भक्तिरूप ब्रह्मविद्या नि:सीम प्रेमरूप सहजस्थितीची प्राप्ति करून देणारी असल्यामुळे, आत्मज्ञानरूप ब्रह्मविद्येने प्राप्त होणाऱ्या, जीवब्रह्मैक्याच्या जाणीवेसहित असणाऱ्या, ब्रह्मस्थितिपेक्षा श्रेष्ठ आहे; म्हणून श्रीज्ञानेश्वर माऊलींनी गीतेंतील ब्रह्मविद्येला ''ब्रह्मविद्यारावो'' असें म्हटलें आहे.

**ते भगवद्‌गीता वोवियें गावों। ऐसे केलें**—भक्ति म्हणजे प्रेम. ज्याप्रमाणे, साखर, आंबे, द्राक्षें यांची रुचि घेतली असतां, त्यांच्या रुचींतील भिन्नपणा सांगतां येत नाही, त्याप्रमाणे ''अनिर्वचनीयं प्रेमस्वरूपम्'' प्रेमहि शब्दाने बोलून दाखवितां येत नाही; पण श्रीगुरुच्या कृपेने चित्त प्रेमसंपन्न झाल्यांस भगवद्भक्ताला मात्र, मी प्रेम बोलून दाखवित आहे अशी जाणीव न स्फुरता प्रेमाचें वर्णन करतां येते, असा भाव.

**जे बोलणियाचे रानीं हिंडतां। नायकिजे फळलिया अक्षरांची वार्ता। परि ते वाचाचि केली कल्पलता। विवेकाची॥ २०॥**

**अर्थ**—येथे वाणीने बोलल्या जाणाऱ्या शब्दांच्या जंगलांत हिंडत असतां, आत्मज्ञानरूप अर्थफळाने फळणाऱ्या अक्षराची वार्ता देखील ऐकायला येत नाही; पण आपण माझी वाणी विवेक-ज्ञानरूप अर्थफळाने फळणारी कल्पलताच केली. ॥ २०॥

**गूढार्थदीपिका**—अज्ञानी लोकांच्या मुखांतून वायफळ शब्दच निघतात, पण श्रीगुरुकृपा झालेल्या पुरुषांच्या मुखांतून निघणारे शब्द विवेकज्ञानाने भरलेले असतात. ''सहज बोलणें हितगुज मात'' असें तुकाराम महाराजांनी म्हटलें असून, माऊलींनीहि पुढे अठराव्या अध्यायांत ''तयाचे बिसाट शब्द। सुखे म्हणो येती वेद'' (ज्ञा. अ. १८-१६४६) या ओवीने हाच अभिप्राय दाखविला आहे.

**होती देहबुद्धि एकसरी। ते आनंदभांडारा केली वोवरी। मन गीतार्थसागरीं। जळशयन जालें॥ २१॥**

**अर्थ**—माझ्या ठिकाणी एकसारखी जी देहबुद्धी-म्हणजे मी देह आहे अशी बुद्धी-होती, ती आपण आज ब्रह्मानंदाचे भांडार सांठविलेली खोली केली आणि म्हणूनच निरनिराळ्या पदार्थांचा संकल्पविकल्प करणाऱ्या मनाचे-गीतेचा अर्थ जो ब्रह्मानंद, हाच कोणी सागर-त्या सागराच्या जलामध्ये निजणें झालें म्हणजे तें निमग्न झालें. ॥ २१ ॥

**गूढार्थदीपिका—आनंद भांडार**—मनुष्यानंदापासून ब्रह्मदेवाच्या आनंदापर्यंत जेवढे आनंद आहेत, ते सर्व ब्रह्मानंदाचे लेशरूप आनंद आहेत, असे तैत्तिरीयउपनिषदांत सांगितले असल्यामुळे ''आनंद भांडार'' म्हणजे संपूर्ण आनंदाचें भांडार असणारा ब्रह्मानंद होय. अज्ञानदशेतील देहबुद्धि नाहीशी होऊन त्या बुद्धींत एक ब्रह्मानंदच प्रगट झाला म्हणजे मनाचा बाह्यविषयाविषयींचा संकल्पविकल्पात्मक व्यापार नाहीसा होऊन त्या मनोवृत्तींत ब्रह्मानंद खेळूं लागतो.

**ऐसें एकेक देवांचें करणें। ते अपार बोलों केवि मी जाणें। तऱ्ही अनुवादलों धीटपणें। तें उपसाहिजो जी॥ २२ ॥**
**आतां आपुलेनि कृपाप्रसादें। मियां भगवद्‌गीता वोवीप्रबंधें। पूर्वखंड विनोदें। वाखाणिलें॥ २३ ॥**
**प्रथमीं अर्जुनाचा विषादु। दुजीं बोलिला योगु विशदु। परि सांख्यबुद्धीसि भेदु। दाऊनियां॥ २४॥**
**तिजीं केवळ कर्म प्रतिष्ठिलें। तेंचि चतुर्थी ज्ञानेंशीं प्रगटिलें। पंचमीं गव्हरिलें। योगतत्त्व॥ २५ ॥**
**तेंचि षष्ठामाजीं प्रगट। आसनालागोनि स्पष्ट। जीवात्मभाव एकवट। होती जेणें॥ २६ ॥**
**तैसीचि जे योगस्थिति। आणि योगभ्रष्टां जे गति। ते आघवीचि उपपत्ती। सांगितली॥ २७॥**
**तयावरी सप्तमीं। प्रकृतिपरिहार उपक्रमीं। भजति जे पुरुषोत्तमीं। ते बोलिले चाऱ्ही॥ २८ ॥**
**पाठीं सप्तमींची प्रश्नसिद्धी। बोलोनि प्रयाणसमयशुद्धि। एवं ते सकळ वाक्यावधी। अष्टमाध्यायीं॥ २९ ॥**
**आतां शब्दब्रह्मीं असंख्याकें। जेतुला कांहीं अभिप्राय पिकें। तेतुला महाभारतें एकें। लक्षें जोडे॥ ३० ॥**
**तिये आघवांचि जे महाभारतीं। तें लाभे कृष्णार्जुन वाचोक्तीं। आणि जो अभिप्रावो गीते सातेंशतीं। तो एकलाचि नवमीं॥ ३१ ॥**

**अर्थ**—ही आपली एक एक कृति अगाध सामर्थ्यानें भरलेली आहे, ती मी शब्दानें कशी वर्णन करूं? असे असूनहि धीट होऊन, मी तिचा अनुवाद केला, तो माझा अपराध सहन करा. ॥ २२ ॥ आतां आपल्या कृपाप्रसादाने मी ओवीबद्धछंदांत गीतेच्या पूर्वखंडाचे सहज स्पष्टीकरण केलें आहे. ॥ २३ ॥ पहिल्या अध्यायांत अर्जुनाला झालेल्या विषादाचें वर्णन केलें असून, दुसऱ्या अध्यायांत सांख्यबुद्धि व योगबुद्धि यांत काय भेद आहे हें दाखवून कर्मयोगाचें स्वरूप स्पष्ट केलें आहे. ॥ २४ ॥ तिसऱ्या अध्यांयात केवळ कर्ममार्गाचेंच वर्णन केलें असून, चवथ्या अध्यायात तेंच कर्म ज्ञानपूर्वक कसें करावें हें सांगितलें. पांचव्या अध्यायांत योगतत्वाचें (म्हणजे परमेश्वराचे ठिकाणी बुद्धि स्थिर करण्याचें जें तत्त्व त्याचें) गूढपणानें निरूपण केलें. ॥ २५ ॥ ज्या योगाने जीवात्मभावाचें ऐक्य होतें, तेंच योगतत्व सहाव्या अध्यायांत, आसनादि अंगासह स्पष्ट करून सांगितले. ॥ २६ ॥ त्याचप्रमाणे योग्यांना प्राप्त होणारी स्थिति व योगभ्रष्टांना प्राप्त होणारी गति, हे संपूर्ण वर्णन सहाव्या अध्यायांत सांगितलें आहे. ॥ २७ ॥ त्यानंतर सातव्या अध्यायांत प्रकृतिनाश कसा करावयाचा, याचा उपक्रम करतांना, भगवंताचें भजन करणाऱ्या चार भक्तांचें वर्णन केलें. ॥ २८ ॥ नंतर सात प्रश्नांची उत्तरें देऊन, मरणकाळी जी काळशुद्धि पाहिजें, तिचें वर्णन केलें. याप्रमाणे आठव्या अध्यायांतील भगवद्वाक्यांची समाप्ति झाली. ॥ २९ ॥ जेवढें असंख्यात शब्दब्रह्म म्हणजे वैदिक वाङ्मय आहे, त्यांतून जो कांही निष्कर्ष निघतो, तितका सर्व एक लक्ष श्लोकसंख्या असलेल्या महाभारतांतून मांडलेला आहे. ॥ ३० ॥ आणि संपूर्ण महाभारतात जे सांगितले आहे, ते सर्व कृष्णार्जुन संवादभूत गीतेंत सांगितले असून, या सातशें श्लोकरूपी गीतेचा जो मथितार्थ आहे, तो एकट्या नवव्या अध्यायांत आहे. ॥ ३१ ॥

**गूढार्थदीपिका**—या नवव्या अध्यायांत सगुण भगवंताच्या पूर्णब्रह्मत्वाचे व त्याच्या भक्तीचे प्रतिपादन केले असल्यामुळें संपूर्णगीतेचा मथितार्थ म्हणजे हा नववा अध्याय होय, असे जे माऊलींनी म्हटलें आहे त्याचा, भगवद्‌गीतेचा प्रतिपाद्य विषय भगवद्भक्ति आहे असाच अर्थ होतो.

**म्हणोनि नवमींचिया अभिप्राया। सहसा मुद्रा लावावया। बिहाला वेद मग वायां। गर्व कां करूं॥ ३२ ॥**

**अहो गुळा साखरे मालेयाचे। हे बांधे तरि एकाचि रसाचे। परि स्वाद गोडियेचे। आन आन जैसें॥ ३३॥**
**एक जाणोनियां बोलती। एक ठायें ठावो जाणविती। एक जाणों जातां हारपती। जाणते गुणेंशीं॥ ३४॥**

**अर्थ**—म्हणून नवव्या अध्यायांतील अभिप्रायावर एकदम मत देण्याचे जेथे वेदाला देखील भय वाटतें, तेथे मी व्यर्थच अभिमान कशाला वागवूं॥ ३२॥ गुळ, साखर, राब हे एका उसाच्या रसाचेंच घनीभूत प्रकार असले तरी त्याच्या गोडीची रुचि जशी निरनिराळी असते (त्याप्रमाणे येथील अध्याय एका ब्रह्माचेच प्रतिपादन करीत असले तरी त्यांच्या प्रतिपादनाची गोडी निरनिराळी आहे)॥ ३३॥ कांही अध्याय ब्रह्म जाणून त्याविषयीं बोलतात, तर कांही अध्याय तेथल्या तेथें दुसऱ्याला परब्रह्मवस्तूची जाणीव करून देतात. कांही अध्याय परब्रह्माला जाणण्याकरितां गेले असतां जाणिवेसहित लय पावतात.॥ ३४॥

**गूढार्थदीपिका—जाणोनियां बोलती**—म्हणजे आपण जाणलेल्या परब्रह्माच्या स्वरूपाचें दुसऱ्याला परोक्षज्ञान करून देतात.

**ठायें ठावो जाणविली**—म्हणजे तेथल्या तेथेंच "तूं परब्रह्म स्वरूप आहेस" असें जीवाला अपरोक्षज्ञान करून देतात.

**"जाणों जातां हारपती। जाणते गुणेंशी"**—म्हणजे कांही अध्याय जीवाचें अंत:करणात सगुण भगवंताचें भक्तिप्रेम उत्पन्न करून देऊन त्याचे ठिकाणी "अहं ब्रह्मास्मि" या ऐक्याची जाणीवहि उरूं देत नाहीत व त्या अध्यायांतील विषय प्रतिपादन करणारे शब्द स्वत:च लय पावतात.

**हे ऐसे अध्याय गीतेचे। परि अनिर्वाच्य नवमाचें। तो अनुवादलों हें तुमचें। सामर्थ्य प्रभू॥ ३५॥**

**अर्थ**—असे हे गीतेचे अध्याय आहेत. पण हा नववा अध्याय अनिर्वाच्य आहे. त्याचें वर्णनच करवत नाही, पण त्याचाहि अनुवाद केला गेला हे, महाराज श्रीगुरुनाथा! तुमचेंच सामर्थ्य होय.॥ ३५॥

**गूढार्थदीपिका—अनिर्वाच्यपण नवमाचें**—अनिर्वाच्य भगवद्भक्ति प्रेमाचा अनुवाद करणारा अध्याय म्हणून नववा अध्याय अनिर्वाच्य म्हटला आहें.

**अहो एकाची शाटि तपिन्नली। एकी सृष्टीवरी सृष्टी केली। एकीं पाषाण वाऊनि उतरलीं। समुद्रीं कटकें॥ ३६॥**
**एकीं आकाशीं सूर्यातें धरिलें। एकीं समुद्र चुळी भरिलें। तैसें मज नेणतयाकरवीं बोलविलें। अनिर्वाच्य तुम्ही॥ ३७॥**
**परि हें असो एथ ऐसें। राम रावण झुंजिन्नले कैसें। राम रावण जैसे। मीनले समरीं॥ ३८॥**
**तैसें नवमीं कृष्णाचें बोलणें। तें नवमींचियाचि ऐसें मी म्हणें। या निवाडा तत्त्वज्ञु जाणे। जया गीतार्थु हातीं॥ ३९॥**
**एवं नवही अध्याय पहिले। मियां मतीसारिखे वाखाणिले। आतां उत्तरखंड उपाइलें। ग्रंथाचें ऐका॥ ४०॥**
**येथ विभूती प्रति विभूती। प्रस्तुत अर्जुना सांगिजेती। ते विदग्धा रसवृत्ती। म्हणिपैल कथा॥ ४१॥**
**देशियेचेनि नागरपणें। शांतु श्रृंगारातें जिणें। तरि ओंविया होती लेणें। साहित्यासी॥ ४२॥**
**मूळग्रंथींचिया संस्कृता। वरि मऱ्हाटी नीट पाहातां। अभिप्राय मानलिया चित्ता। कवण भूमी हें न चोजवे॥ ४३॥**
**जैसें अंगाचेनि सुंदरपणें। लेणियासी आंगचि होय लेणें। तेथ अळंकारिलें कवण कवणें। हें निर्वचेना॥ ४४॥**
**तैसी देशी आणि संस्कृत वाणी। एका भावार्थाच्या सुखासनीं। शोभती आयणी। चोखट आइका॥ ४५॥**

**अर्थ**—अहो श्रीगुरुराया! एकाच्या (वसिष्ठाच्या) छाटीने प्रकाश देण्याची कामगिरी केली. एकाने (विश्वामित्राने) सृष्टिसारखी प्रतिसृष्टि उत्पन्न करून दाखविली. एकाने (नीलवानराने) समुद्रांत दगड तरवून त्यावरून सैन्य उतरविले.॥ ३६॥ एकाने (मारुतींने) आकाशांतील सूर्याला धरले. एकाने (अगस्ति ऋषीने) संपूर्ण समुद्र एकाच चुळीने पोटांत सांठविला; त्याप्रमाणे मज मुक्याकडून तुम्ही ह्या अनिर्वाच्य अशा नवव्या अध्यायांतील विषय प्रगट करविला.॥ ३७॥ पण हे असो. ज्याप्रमाणे श्रीराम व रावण यांचे युद्ध कसे झाले असे विचारल्यास श्रीराम-रावणासारखे झाले असे म्हणावें लागते (त्याला त्याचाच दृष्टान्त द्यावा लागतो. दुसरा दृष्टान्तच नाही असा भाव)॥ ३८॥ त्याप्रमाणे येथे नवव्या अध्यायांतील भगवान श्रीकृष्णाचे बोलणे नवव्या अध्यायांतील बोलण्यासारखेच

आहे. त्याला दुसऱ्या अध्यायाचा दृष्टान्त देतां येत नाही, असे मी म्हणतो. व हा माझा निर्णय बरोबर आहे किंवा नाही हे, ज्याच्या दृष्टीसमोर गीतार्थ आहे ते तत्वज्ञ पुरुष जाणतात. ॥ ३९ ॥ याप्रमाणे पहिल्या नऊ अध्यायांचे यथामति व्याख्यान मी केलें आहे. येथून ग्रंथाच्या उत्तरखंडाचे क्रमप्राप्त व्याख्यान श्रवण करा. ॥ ४० ॥ जेथें या अध्यायांत भगवान अर्जुनाला अपल्या प्रधान व गौण विभूती आतां सांगणार आहेत, ती कथा अत्यंत रसभरीत शब्दाने मी तुम्हाला निरूपण करणार आहे. ॥ ४१ ॥ (ज्या देशी मराठी भाषेंत मी, ती कथा निरूपण करणार आहे) त्या मराठी भाषेच्या सौंदर्यामुळे त्यांत प्रतिपादिलेला शांतरस, शृंगाररसाला देखील फिका पाडील, तेव्हा माझ्या ओव्या साहित्यालाहि अलंकाराप्रमाणे सुशोभित करतील. ॥ ४२ ॥ गीता ग्रंथाच्या मूळच्या संस्कृत भाषेवर माझी केलेली मराठी भाषेंतील टीका नीट पडताळून पाहतां, मी काढलेला अभिप्राय योग्य आहे असे मान्य झाल्यास, मूळ कोणते हें निवडतां येणार नाही. ॥ ४३ ॥ ज्याप्रमाणे अत्यंत सुंदर शरीरावर घातलेल्या अलंकाराला तें शरीरच लेणें होतें म्हणजे शोभा आणते, मग कोणी कोणाला शोभा आणली हें सांगतां येत नाही. ॥ ४४ ॥ त्याप्रमाणे मूळ गीताग्रंथाची संस्कृत भाषा व माझ्या टीकेची मराठी भाषा ह्या दोन्ही एका भावार्थरूप पालखींत बसून कशा चातुर्याने शोभतात, हे लक्ष देऊन ऐका. ॥ ४५ ॥

**गूढार्थदीपिका—एका भावार्थाच्या सुखासनी—**भगवंताच्या संस्कृत भाषेंतून व माझ्या मराठी भाषेतून सहजरीत्या निघणारा यथार्थ अभिप्राय एकच आहे असा अर्थ.

**शोभती आयणी**—भगवंताच्या संस्कृत भाषेच्या ठिकाणीं भगवंताचा यथार्थ अभिप्राय व्यक्त करण्याचे जसे चातुर्य आहे, तसेच माझ्या मराठी भाषेच्या ठिकाणींहि तोच अभिप्राय व्यक्त करण्याचे चातुर्य आहे.

आर्षग्रंथांतील संस्कृतभाषेने जशी ज्ञानभक्तीची प्राप्ति होते, तशीच प्राप्ति संताच्या मराठी भाषेतील ग्रंथांतून होते. भाषेमुळे ब्रह्मबोधांत फरक पडत नाही असा भाव.

संस्कृत वाणी देवें केली। तरी प्राकृत काय चोरापासोनि जाली। असोतु या अभिमानभुली। वृथा बोली काय काज. ॥ १२८ ॥ आतां संस्कृता किंवा प्राकृता। भाषा जाली जे हरिकथा। ते पावनचि तत्वतां। सत्य सर्वथा मानली. ॥ १२९ ॥ (ए. भा. अ. १) असे नाथहि म्हणतात.

**उदयलिया भावा रूप। करितां रसवृत्तीचें लागे वडप। चातुर्य म्हणे पडप। जोडलें आम्हां॥ ४६ ॥**
**तैसें देशियेचें लावण्य। हिरोनि रसां अणिलें तारुण्य। मग रचिलें अगण्य। गीतातत्त्व॥ ४७ ॥**

**अर्थ**—चित्तांत स्फुरलेल्या भावार्थाचें स्पष्टीकरण करतांना किंवा तो व्यक्त करतांना, त्याला रसभरित भाषेचा पाऊस लागेल व त्यामुळे आजच्या जगांत या अशा भाषेने आम्हांला प्रतिष्ठा प्राप्त झाली असे चातुर्य म्हणेल. ॥ ४६ ॥ तसे मराठी भाषेचे सर्व सौंदर्य एकत्र करून रसाला तारुण्य आणले व मग त्या योगाने अमर्याद अशा गीतातत्वाची मराठी भाषेत रचना केली. ॥ ४७ ॥

**गूढार्थदीपिका—उदयलिया भावा**—कोणत्याहि ग्रंथकर्त्याचा, त्याच्या अमुकग्रंथातील अभिप्राय किंवा विषय काय आहे, हे कोण बरोबर सांगूं शकतो किंवा त्या ग्रंथावर ज्या पुष्कळांनी टीका केल्या असतील त्यापैकीं मूळ ग्रंथकाराचा अभिप्राय तंतोतंत कोणी जाणला, या प्रश्नाचा विचार केल्यास असे नि:संशय म्हणतां येते की, ज्या टीकाकाराचा ग्रंथकर्त्याशीं अत्यंत स्नेहसंबंध असेल त्यालाच ग्रंथकर्त्याच्या मनांतील खरा अभिप्राय कळणें शक्य आहे. कारण त्याला ग्रंथकर्त्याच्या मतांची विशेष जाणीव असते.

पण जेथे टीकाकार व ग्रंथकार यांचे अत्यंत सख्य नाही तेथे टीकाकार, आपल्या बुद्धीच्या अनुमानाने ग्रंथकर्त्याचा अभिप्राय ठरवित असल्यामुळे, तो बरोबरच राहील असा निश्चय करतां येत नाही. म्हणून अद्वैत संप्रदायांत जीव, परमेश्वराशीं ज्ञान व भक्ति या दोन्ही मार्गाने अत्यंत समरस ऐक्य पावत असल्यामुळे-म्हणजे परमेश्वराच्या सगुण निर्गुण दोन्ही रूपाशीं जीवाचे ऐक्य होत असल्यामुळे-ज्ञानींभक्तासच भगवंताचें खरें हृद्गत कळणें शक्य असते असे म्हणतां येते "यस्य देवे पराभक्तिर्यथा देवे तथा गुरौ। तस्यैते कथिता ह्यर्थाः प्रकाशन्ते महात्मनः ॥"

सगुण भगवान व श्रीगुरु यांचे ठिकाणी नि:सीम प्रेमरूप पराभक्ति करणाऱ्यांनाच भगवंताच्या वचनांचा खरा अर्थ समजूं शकतो, असे प्रत्यक्ष श्वेताश्वतर श्रुतीनेच म्हटले आहे.

**जो चराचरपरमगुरु। चतुरचित्तचमत्कारु। तो ऐका यादवेश्वरु। बोलता जाहला॥ ४८॥**

**अर्थ**—जो चराचर ब्रह्मांडाचा आद्य गुरु, थोर जाणत्याच्याहि चित्ताला आश्चर्यचकित करून सोडणारा, असा तो यादवांचा राजा भगवान श्रीकृष्ण पुढे बोलूं लागला. ॥ ४८ ॥

**गूढार्थदीपिका—चराचरपरमगुरु**—ज्या वेदांतील ज्ञानाने पुरुष, ज्ञानी होतो, तो वेद भगवन्निर्मित असल्यामुळे, परमात्मा सर्वांचा आद्य गुरु ठरतो.

**चतुरचित्तचमत्कारु**—भगवंताची लीला अगम्य असल्यामुळे थोर महात्म्यांच्या चित्तालाहि ती आश्चर्यचकित करणारी आहे.

**यादवेश्वरु**—तोच परमात्मा आपल्या सर्वज्ञत्वादि सर्वशक्तिसह यादव कुलांत उत्पन्न झाला असे ''यादवेश्वरु'' या शब्दाने सुचविलें आहे.

**ज्ञानदेव निवृत्तीचा म्हणे। ऐसें बोलिलें श्रीहरी तेणें। अर्जुना आघवियाचि मातु अंत:करणें। धडौता आहासि॥ ४९॥**

**अर्थ**—श्रीनिवृत्तिनाथांचे ज्ञानदेव म्हणतात, त्या श्रीकृष्णाने अर्जुनाला म्हटलें, की अर्जुना! सर्वच गोष्टी ऐकतांना तूं अंत:करणाने योग्य असतोस म्हणजे एकाग्र चित्ताने ऐकतोस. ॥ ४९ ॥

**गूढार्थदीपिका—आघवियाची मातू अंत:करणें। धडौता आहासी**—वक्त्याच्या तोंडून जें जें निघेल तें तें ऐकावेसेच वाटतें, हेंच श्रोत्याचें प्रेमाने श्रवण करण्याचें लक्षण आहे.

*श्रीभगवानुवाच*

**भूय एव महाबाहो शृणु मे परमं वच:। यत्तेऽहं प्रीयमाणाय वक्ष्यामि हितकाम्यया॥ १॥**

**अर्थ**—भगवान् म्हणतात, हे आजानुबाहो अर्जुना! अत्यंत श्रेष्ठ म्हणजे परब्रह्मवस्तूचें यथार्थ ज्ञान करून देणारे माझें भापण पुन: ऐक. माझें भाषण प्रिय वाटणाऱ्या तुला, तुझ्या हिताच्या इच्छेनेच मी सांगत आहे. ॥ १ ॥

**आम्हीं मागील जें निरूपण केलें। तें तुझें अवधानचि पाहिलें। तंव टांचें नव्हे भलें। पुरतें आहे॥ ५०॥**

**अर्थ**—अर्जुना! मी मागें जें निरूपण केलें, तें तुझें चित्त एकाग्र आहे किंवा नाही हें पाहण्याकरितांच होतें, पण तें अर्धवट नसून पूर्ण एकाग्र होतें, हें कळून आले. ॥ ५० ॥

**गूढार्थदीपिका—अवधानचि पाहिले**—ब्रह्मज्ञानाची गोडी असली, तरच ऐंकलेलें ब्रह्मनिरूपण चित्तांत ठसतें व चित्त ब्रह्मस्वरूपाचे ठिकाणी स्थिर होतें, नाहीतर त्याचा कांही उपयोग होत नाही.

''मननावांचूनि श्रवण करी। जैसिया पालथी घागरी। पर्जन्यांत ठेबिलिया जन्मवरी। अंतरीं बिंदु न सांठवे'' (हरिविजय अ. २५) असे श्रीधरांनी हरिविजयांत म्हटलें आहे; म्हणून शिष्याच्या चित्ताची परीक्षा करूनच सद्‌गुरु शिष्याला श्रवण करवित असतात.

पिता जसा कष्टाने व प्रेमाने जमविलेले व रक्षण केलेलें धन उधळ्या मुलाचे स्वाधीन करुं इच्छित नाही त्याप्रमाणेच कष्टाने व प्रेमाने प्राप्त केलेली व अत्यंत जपून ठेवलेली ब्रह्मस्थिति सद्‌गुरुही अनवधानाने श्रवण करणाऱ्या शिष्याच्या हातीं देत नसतात.

**घटीं थोडेसे उदक घालिजे। तेणें न गळे तरी वरिता भरिजे। तैसा परिसौनि पाहिलासि तंव परिसविजे। ऐसेंचि होतसे॥ ५१॥**

**अवचितयावरी सर्वस्व सांडिजे। मग चोख तरी तोचि भांडारी कीजे। तैसा किरीटी तूं आतां माझें। निजधाम कीं॥ ५२॥**

**अर्थ**—घागरींत थोडेसें पाणी भरावें व तेवढें पाणी तसेंच राहिले, गळलें नाही, तर ती आणखी भरावी, त्याप्रमाणे मी थोडें निरूपण करून, तुला श्रवण करवून पाहिलें, तेव्हा आणखी श्रवण करवावें असेच दिसून आलें. ॥ ५१ ॥ एखादे वेळीं येणाऱ्या माणसावर प्रथम घरांतील सर्व सोपवून पहावें व त्याची सचोटी दिसून आली, तर मग त्यास खजिनदार करावें, त्याप्रमाणे, अर्जुना! माझें अखंड राहण्याचें ठिकाण जें परब्रह्म तें तूं झाला आहेस. ॥ ५२ ॥

**गूढार्थदीपिका—निजधाम**—एकाग्र चित्तवृत्तिलाच सूक्ष्मबुद्धिवृत्ति किंवा अग्रबुद्धि म्हणतात. सूक्ष्म अशा या अग्रबुद्धिवृत्तिनेच ब्रह्म जाणलें जातें किंवा जीव ब्रह्मस्वरूप होतो, म्हणूनच अत्यंत एकाग्र चित्ताने श्रवण करणाऱ्या अर्जुनाला, भगवंताने ''तू'' ''निजधाम'' म्हणजे ब्रह्मस्वरूप झालास असें म्हटलें आहे.

**ऐसें अर्जुना येउतें सर्वेश्वरें। पाहोनि बोलिलें अत्यादरें। गिरी देखोनि सुभरे। मेघु जैसा॥ ५३॥**
**तैसा कृपाळुवांचा रावो। म्हणे आइकें गा महाबाहो। सांगितलाचि अभिप्रावो। सांगेन पुढती॥ ५४॥**
**पैं प्रतिवर्षी क्षेत्र पेरिजे। पिकाची जंव जंव वाढी देखिजे। यालागीं नुबगिजे। वाहो करितां॥ ५५॥**
**पुढतपुढती पुटें देतां। जोडे वानियेची अधिकता। म्हणोनि सोनें पांडुसुता। शोधूंचि आवडे॥ ५६॥**
**तैसें येथ पार्था। तुज आभार नाहीं सर्वथा। आम्ही आपुलियाचि स्वार्था। बोलो पुढती॥ ५७॥**

**अर्थ**—अर्जुनाला अत्यंत एकाग्रतेने ऐकताना पाहून, सर्व देवांचा देव भगवान श्रीकृष्ण, वर सांगितल्याप्रमाणे अत्यंत आदराने बोलले आणि ज्याप्रमाणे पर्वताला पाहून पाण्याने भरलेले मेघ पर्वतावर वळून येतात, त्याप्रमाणे कृपाळूंचा राजा भगवान श्रीकृष्ण म्हणतो, ''महाबाहो अर्जुना! सांगितलेला भावार्थच पुढें पुनः सांगणार आहे. ऐक''॥ ५३-५४॥ कारण दरवर्षी शेत पेरावें व जसजशी पिकांची वाढी होत असलेली पाहावी तसतशी त्या शेताची मशागत करण्याचा त्रास मानूं नये.॥ ५५॥ वारंवार पुटें दिलीं असतां सोन्याचा कस वाढतो, म्हणून वारंवार सोनें शोधावेसेंच वाटते.॥ ५६॥ त्याचप्रमाणे अर्जुना! तुला वारंवार सांगण्यांत तुझ्यावर उपकार करतो असे नसून, मी आपल्याच स्वार्थाकरितां पुनः बोलत आहे.॥ ५७॥

**गूढार्थदीपिका—आम्ही आपुलियाचि स्वार्था। बोलों पुढती**—शिष्य कृतार्थ झाला असतां, श्रीगुरुनाही सात्विक असा निष्काम आनंद प्राप्त होतो, हें मागें आठव्या अध्यायांत (ओवी ५५ गू. दी.) सांगितलेच आहे त्याचाच माऊलींनी ''आम्ही आपुलियाची स्वार्था। बोलों पुढती'' या चरणाने उल्लेख केला आहे. परमप्रेमरूप परब्रह्माची चर्चा परमप्रेमांत निमग्न करणारीच होते.

**जैसें बाळका लेवविजे लेणें। तें शृंगारातें काइ जाणे। परि ते सुखाचे सोहळे भोगणें। माउलियें दिठी॥ ५८॥**
**तैसें तुझें हित आघवें। जंव जंव कां तुज फावें। तंव तंव आमुचें सुख दुणावें। ऐसें असे॥ ५९॥**
**आतां अर्जुना हे विकडी। मज उघड तुझी आवडी। म्हणोनि तृप्तीची सवडी। बोलतां न पडे॥ ६०॥**

**अर्थ**—ज्याप्रमाणे आई आपल्या बाळाच्या आंगावर अलंकार घालते, पण त्या अलंकार घालण्याचा जो आनंद, तो बालक काय जाणत असतो? पण ते सुखाचे सोहळे, आईच आपल्या दृष्टीने भोगत असते.॥ ५८॥ त्याप्रमाणे अर्जुना! आमचें निरूपण ऐकून ब्रह्मबोध ठसल्यामुळे जसें जसें तुला आत्मसुख प्राप्त होईल, तसें तसें आमचेंहि सुख दुप्पट वाढत जातें.॥ ५९॥ आतां अर्जुना! हें अलंकारिक भाषण असो. मला तुझें अत्यंत प्रेम असल्यामुळेच तुझ्याशीं बोलत असतांना तृप्तीचा अवसर लाभत नाही.॥ ६०॥

**गूढार्थदीपिका—म्हणोनि तृप्तीची सवडी। बोलतां न पडे**—ज्याप्रमाणे सेवलेलेच विषय वारंवार सेवन करण्यांत विषयाच्या ठिकाणीं असेलेलें आपलें परमप्रेम व्यक्त होतें, त्याचप्रमाणे परमप्रेमरूप आत्म्याचे निरूपण करण्यांत तृप्ति न वाटणें, हेंच आत्म्याच्या परमप्रेमाचें निदर्शक असतें. तृप्ति वाटणे हें परमप्रेमाचें चिन्ह नव्हें, हें मागें नवव्या अध्यायांत सांगितलेंच आहे (ओ. २ गू. दी.)

**आम्हां येतुलियाचि कारणें। तेंचि तें तुजशीं बोलणें। परि असो हें अंतःकरणें। अवधान देईं॥ ६१॥**

**अर्थ**—या कारणामुळेच (आत्म्याच्या परमप्रेमामुळेच) मी तेंच तें (आत्मस्वरूपाविषयीचें) तुला सांगणार आहे. बरें हें असो. आतां मनापासून माझ्या बोलण्याकडे लक्ष दे.॥ ६१॥

**गूढार्थदीपिका—तेंचि तें तुजशीं बोलणें**—परब्रह्माचें परमप्रेम असल्यामुळें वारंवार परब्रह्माविषयीं बोलावेसें वाटतें व तुझेंहि परम प्रेम असल्यामुळे वारंवार तुझ्याशींच बोलावेसे वाटतें.

**तरी ऐकें ऐकें गा सुवर्म। वाक्य माझें परम। जें अक्षरें लेऊनि परब्रह्म। तुज खेवासि आलें॥ ६२॥**

**अर्थ**—तरी हे अर्जुना! माझें हें अत्यंत मार्मिक व श्रेष्ठ वचन ऐक. हें माझें वाक्य म्हणजे साक्षात् शुद्ध परब्रह्मच अक्षरांचा आंगरखा घालून तुला आलिंगन देत आहे. असें समज. ॥ ६२ ॥

**न मे विदुः सुरगणाः प्रभवं न महर्षयः। अहमादिर्हि देवानां महर्षीणां च सर्वशः॥ २॥**

**अर्थ**—मी आपल्या अचिन्त्य शक्तिसामर्थ्याने कसा नामरूपासह व्यक्त होतो, हें देवादिक किंवा महर्षि देखील जाणूं शकत नाहीत; कारण सर्व देवांचे व महर्षींचें उत्पत्तिकारण मीच आहे. ॥ २ ॥

**अवतरणिका—अध्यायारंभीं अवतरणिकेंत सांगितल्याप्रमाणे श्रीकृष्णस्वरूप हे कार्यब्रह्म आहे—पूर्णब्रह्म नाही—असे जे अर्जुनाला वाटत होतें त्याचाच या पुढील ओवींत भगवंतांनी उल्लेख करून आपलें स्वरूप कारणब्रह्मच आहे हे सांगण्यास सुरुवात केली आहे.**

**तरी किरीटी तूं मातें। नेणसी ना निरुतें। तरि तो गा जो मी एथें। तें विश्वचि हें॥ ६३॥**

**अर्थ**—तर अर्जुना! तूं मला खरोखर जाणत नाहीस ना! तर जो मी तुझ्यासमोर येथे आहे, तोच मी हें विश्वरूप झालों आहे. ॥ ६३ ॥

**गूढार्थदीपिका—तरि तो गा जो मी**—वरील श्लोकांतील ''अहं'' म्हणजे ''मी'' हा शब्द भगवंतांनी आपल्या सगुण स्वरूपाला धरूनच योजिला आहे व श्रीज्ञानेश्वर माऊलींनी 'मी' या शब्दाचा तसाच अनुवाद केला आहे. भगवान म्हणतात ''अर्जुना! जो मी तुझ्यासमोर मर्यादित, सगुण, साकार श्रीकृष्ण स्वरूपाने आहे, तोच 'मी' विश्वरूपाने आहे.''

भगवंताच्या या म्हणण्याचे स्पष्टीकरण असें आहे—

विषयकोटींत न येणाऱ्या म्हणजे ज्ञेय न होणाऱ्या पदार्थावर, दुसऱ्या पदार्थाचा कधीं भ्रम होत नाही. परब्रह्मस्वरूप अविषय कोटींतील आहे. किंवा कळण्याजोगें नाही असे वेदान्तांत म्हटलें असलें, तरी ''दृश्यते त्वग्रया बुद्ध्या'' ''न तावदयमेकान्तेनाविषयः। अस्मत्प्रत्ययविषयत्वात्, अपरोक्षत्वाच्च'' ब्रह्माचा साक्षात्कार होतो व ते 'मी' या वृत्तीचा विषय होतें म्हणून सदासर्वदा तें अविषयकोटींतच असतें असें नाही, असें आचार्यांनी ब्रह्मसूत्रावरील भाष्याच्या प्रारभीं म्हटलें आहे.

अर्थात् परब्रह्म विषयकोटींत असतें म्हणूनच त्याच्यावर जगद्रूप भ्रम झाला आहे.

परब्रह्मावर झालेला हा विश्वरूपभ्रम कसा होतो हें आतां आपण पाहूं—

विश्व म्हणजे नामरूपाचा भास होय. हा नामरूपाचा भास माया उपाधीने किंवा अज्ञानउपाधीने होतो असे वेदान्तशास्त्र म्हणतें. पण याचा अर्थ, माया नामरूपाने परिणाम पावली असा अर्थ करावयाचा किंवा परब्रह्मच नामरूपाने स्फुरलें आहे व जीवाला त्या परब्रह्माचें यथार्थ ज्ञान नसल्यामुळे नामरूपाने नटलेल्या परब्रह्मालाच तो भ्रमाने परब्रह्माहून निराळी अशी जगद्वस्तु मानतो, असा अर्थ करावयाचा हा येथे प्रश्न उत्पन्न होतो.

मायाच नामरूपाने परिणाम पावली असा अर्थ घेतल्यास, माया एक वस्तु आहे असे मानावें लागतें. पण परब्रह्म अद्वैत स्वरूप आहे. त्याच्यावांचून दुसरी खरी वस्तु नाही व खोटीहि वस्तु नाही असा वेदान्तसिद्धान्त आहे व आचार्यांनीहि ''न वास्तवः कश्चिदुपाधिरेषः'' (वि. चू.)॥ २४५॥ जीवाची माया उपाधि वास्तविक नाही असें म्हटलें आहे. म्हणजे उपाधि ही जीवाने कल्पिलेलीच आहे असा त्याचा अर्थ होतो. वेदान्तांत मायाउपाधीला अनिर्वचनीय जें म्हटलें आहे, त्याचा अर्थहि श्रीमाऊलींनी ''अविद्या येणें नावें। मी विद्यामानचि नव्हे। हें अविद्याचि स्वभावें। सांगतसें॥ ३८॥ आणि इये अनिर्वाच्यपण। तें दुजेहि देवांगण। आपुला अभावो आपण। साधितसे''॥ ३९॥ (अमृ. प्र. ६) अज्ञानउपाधि खरी नसून केवळ काल्पनिक आहे असेच या ओव्यांतून सांगितलें आहे.

अर्थात् मायोपाधि किंवा अज्ञानउपाधि खरोखर अस्तित्वांत नसल्यामुळे, ती नामरूपाने परिणाम पावतें हें म्हणणें विसंगत आहे. ''केउते मेलिया माया। होऊं पाहिजे'' (अमृ. प्र. ८) म्हणून नामरूपाने स्फुरण पावलेल्या परब्रह्मालाच, अज्ञानी जीव विश्व किंवा जगत् ही संज्ञा देतो असेच म्हणावे लागतें व असाच वेदान्ताचा सिद्धांत आहे. परब्रह्मच,

नामरूपाने स्फुरण पावतें, असे न जाणणारा अज्ञानी जीव, त्या परब्रह्माच्या नामरूपात्मक आविष्काराला परब्रह्माहून पृथक् मानून, जगत् हें नांव देत असला तरी परमात्मा, मीच नामरूपाने नटलों आहों, हें पूर्णपणें जाणत असतो व हें त्याचें ज्ञान तो कधी विसरत नाही. आणि भक्तांचें प्रेम वाढविण्याकरितां आणि दुष्टांचा नाश करून सज्जनांचे पालन करण्याकरितां परमात्माच मर्यादित असे सगुण साकार श्रीकृष्णस्वरूप घेऊन अवतीर्ण होत असतो; म्हणून पाण्याहून उठणारी लहरी पाण्याचेच रूपांतर असून, पाण्यावरच स्फुरत असल्यामुळे, जसा पाण्याचा व तिचा संबंध सुटत नाही, तसा नित्य, शुद्ध, मुक्त, सर्वज्ञ, सर्वशक्तिमान्, ज्ञानसंपन्न, अस्फुट व पूर्ण असा परमात्मा आपल्यावरच अवताररूपाने स्फुरत असल्यामुळे, रामकृष्णादि अवतारहि पूर्णब्रह्म परमात्मस्वरूप म्हणजे सृष्टि उत्पत्तिस्थितिलय करणारे कारण-ब्रह्मच असतात. हाच सिद्धान्त "मी येथे। ते विश्वचि हे" या चरणांनी माऊलींनी सांगितला आहे.

**एथ वेद मुके जाहाले। मन पवन पांगुळले। रातीविण मावळले। रविशशी॥ ६४॥**
**अगा उदरींचा गर्भु जैसा। न देखे आंपुलिया मायेची वयसा। मी आघवेयां देवां तैसा। नेणवे काही॥ ६५॥**
**आणि जळचरां उदधींचें मान। मशकां नोलांडवेंचि गगन। तैसे महर्षींचें ज्ञान। न देखेचि माते॥ ६६॥**
**मी कवण पां कां केतुला। कवणाचा कैं जाहला। या निरुती करितां बोला। कल्पेले॥ ६७॥**
**कां महर्षी आणि या देवां। येरां भूतजातां सर्वां। मी आदि म्हणोनि पांडवा। अवघड जाणतां॥ ६८॥**
**उतरलें उदक पर्वत वळघे। कां वाढते झाड मुळीं लागे। तरी मियां जालेनि जगें। जाणिजे मातें॥ ६९॥**
**कां गाभेवने वटु गिंवसवे। जरी तरंगीं सागरु सांठवे। कां परमाणूमाजीं सामावे। भूगोलु हा॥ ७०॥**
**तरि मियां जालिया जीवां। महर्षी अथवा देवां। मातें जाणावया होआवा। अवकाशु गा॥ ७१॥**

**अर्थ**—मी आपल्या अचिंत्यशक्तीने नामरूपात्मक कसा होतो किंवा प्रगट होतो याचा वेदालाहि पत्ता लागला नाही; म्हणून त्यांनी त्याविषयीं मौन घेतलें (म्हणजे तेथे शब्दप्रवृत्तीहि नाहीं असा अर्थ). तेथे मन, प्राण यांचींहि वाटचाल कुंठित झाली (म्हणजे मनाचे संकल्प किंवा प्राणाची क्रिया यांचाहि तेथें मागमूस नाही). रात्र नसतांना देखील सूर्यचंद्र यांचा प्रकाश अस्ताला गेला (म्हणजे ज्ञानप्रकाश येवढा प्रचंड आहे की, त्यांत सूर्यचंद्राचेहि प्रकाश लोपून जातात)॥ ६४॥ बा अर्जुना! ज्याप्रमाणे गर्भातील जीव, आपल्या आईचें वय जाणूं शकत नाही, त्याप्रमाणे कोणीहि देव मला जाणू शकत नाही.॥ ६५॥ आणि समुद्रांतील प्राण्यांना समुद्राचा विस्तार कळत नाही किंवा मशकाला आकाश ओलांडून जाणें शक्य नाही, त्याप्रमाणेच महर्षींचें ज्ञान देखील या माझ्या शक्तिस्वरूपाचा ठाव घेऊं शकत नाही.॥ ६६॥ मी कोण आहे, केवढा आहे, कोणाचा आहे, केव्हा झालों इत्यादि गोष्टींचा सत्य विचार करतां करतां कितीतरी कल्प लोटले.॥ ६७॥ अर्जुना! महर्षि असोत किंवा देव-असोत, त्याचप्रमाणे सर्व भूतप्राणि असोत, या सर्वांचे कारण मीच असल्यामुळे किंवा या सर्वांची उत्पत्ति माझ्यापासून असल्यामुळे, त्यांना आपल्या बुद्धीने मला जाणणें दुरापास्त आहे.॥ ६८॥ पर्वतावरून खालीं उतरत पायथ्याशीं येणारे पाणी जर पुन: पर्वतावर चढेल, वर वाढत जात असलेलें झाड जर मुळाकडे वाढत जाईल, तरच माझ्यापासून उत्पन्न झालेल्या जगाला मला जाणतां येणें शक्य आहे.॥ ६९॥ किंवा वटबीजाला अंकुर फुटल्यावर जर त्यांत संपूर्ण वटवृक्ष दृष्टीस पडेल, समुद्राच्या एका तरंगांत जर संपूर्ण समुद्र सांठविला जाईल किंवा एका परमाणुमध्ये ही संपूर्ण भूमि जर सांठविली जाईल.॥ ७०॥ तरच माझ्यापासून झालेले महर्षि, देव, इत्यादि जीवांना मला जाणण्याला जागा राहील.॥ ७१॥

**गूढार्थदीपिका**—भगवंताच्या व्यापक स्वरूपाप्रमाणेच त्याचें एकदेशीय सगुण साकार स्वरूपहि कसें पूर्णब्रह्म असते हे जीवाला अनाकलनीय आहे.

वास्तविक जीव पूर्ण ब्रह्मस्वरूप आहे; पण त्याने आपल्या ठिकाणीं अपूर्णतेची कल्पना करून घेतली असल्यामुळे ती अपूर्णतेचीं कल्पना जोपर्यंत आहे तो पर्यंत तो जसा, आपलें मूळचें पूर्ण ब्रह्मस्वरूप जाणूं शकत नाही, तसेच परमेश्वराच्यां एकदेशीय सगुण साकार स्वरूपाचें पूर्ण ब्रह्मत्वहि त्याला आकलन होऊं शकत नाही, असा या सर्व ओव्यांतील भाव आहे.

**यो मामजमनादिं च वेत्ति लोकमहेश्वरम्। असम्मूढः स मर्त्येषु सर्वपापैः प्रमुच्यते॥ ३॥**

**अर्थ**—मी जन्मरहित आहे आणि अनादि असून सर्व ब्रह्मांडाचा शास्ता महेश्वर आहे, असे जो मला ओळखतो, तो सर्व मनुष्यांमध्ये ज्ञानी होय व तो सर्व पापांपासून मुक्त होतो. ॥ ३ ॥

**ऐसाही जरी विपायें। सांडुनि पुढील पाये। सर्वेंद्रियांसि होये। पाठिमोरा जो॥ ७२॥**
**प्रवर्तलाही वेगीं बहुडे। देह सांडूनि मागलीकडे। महाभूतांचिया चढे। माथयावरी॥ ७३॥**
**तैसा राहोनि ठायठिके। स्वप्रकाशें चोखें। अजत्व माझें देखे। आपुलिया डोळां॥ ७४॥**

**अर्थ**—असे जरी आहे तरी कदाचित् बाह्य विषयांकडील धांव निःशेष सोडून देऊन जो इंद्रियांच्या प्रवृत्तीला पाठमोरा होतो. ॥ ७२ ॥ इंद्रियांबरोबर विषयांकडे प्रवृत्त झाला तरी एकदम जो मागें फिरतो व देहावरील अहंता सोडून जो मन अंतर्मुख करता करतां महाभूतांच्या माथ्यावर किंवा डोक्यावर चढतो—म्हणजे ज्या आत्मस्वरूपापासून भूतांची उत्पत्ति भासली त्या कारणरूप आत्मस्वरूपाचे ठिकाणी जो जातो. ॥ ७३ ॥ महाभूतांच्या पलीकडे असणारें जें माझें स्वयंप्रकाशित स्वरूप, त्या ठिकाणी स्थिर राहून आपल्या स्वयंप्रकाशरूपाने तो आपल्या डोळ्याने माझें अजत्व पाहतो. ॥ ७४ ॥

**गूढार्थदीपिका—अजत्व माझें देखे। आपुलिये डोळा॥** भगवंताचें सगुणस्वरूप कसें पूर्णब्रह्म आहे हें समजण्याकरितां त्याचें निर्गुणस्वरूप जाणणें अवश्य आहे. ज्याप्रमाणे सोनें कळून आल्यानंतर त्याचे दागिनेहि निखालस सोनें आहे असा निश्चय होतो, त्याप्रमाणे ज्याला निर्गुणस्वरूपाचा अनुभव आला तोच भगवंताचे सगुणस्वरूपहि कसें निरुपाधिक व शुद्ध आहे हें जाणतो.

''परमेश्वराचे अनंत गुण। मनुष्यें काय सांगावी खूण। परंतु अध्यात्मग्रंथ श्रवण। होतां उमजे।'' (दास. द. १८ स. ४) नाथहि म्हणतात ''ब्रह्म इंद्रियां गोचर नसे। गुण गेलिया डोळां दिसे। हे अनुभवियासीचि भासे। बोलावें ऐसें तें नव्हें''॥ १५१॥ (ए. भा. अ. ९) जोपर्यंत पुरुष मायेच्या गुणाने बांधला असतो, तोपर्यंत त्याला सर्वच नामरूपात्मक सगुण गुणात्मक दिसतें व आत्मानुभवाने जेव्हा गुणांचें व मायेचें अस्तित्वच शिल्लक राहत नाही. तेव्हा मग तें सगुणही निरुपाधिक होतें व पूर्णब्रह्मरूपाने डोळ्याला अनुभवितां येते. तसेंच तें अजहि आहे हें कळून येतें.

**मी आदीसि परु। सकळलोकमहेश्वरु। ऐसिया मातें जो नरु। यापरी जाणे॥ ७५॥**

**अर्थ**—मी आदिसी पर म्हणजे मी उत्पत्तिरहित आहे, म्हणून मी सर्व ब्रह्मांडाचा नियंता आहे. असा मी आहे असे जो मनुष्य मला जाणतो. ॥ ७५ ॥

**गूढार्थदीपिका—आदिसी पर**—वर सांगितल्याप्रमाणे भगवंताचे सगुणस्वरूपहि उत्पन्न होत नाही, अजच आहे हेंच ''आदिसी पर'' या चरणांत माऊलींनी स्पष्ट सांगितलें आहे.

**सकळलोकमहेश्वरु**—या एकदेशीय सगुणस्वरूपाने देखील भगवान श्रीकृष्ण सर्व ब्रह्मांडाचा नियंता आहे हे 'सकळलोकमहेश्वरु' या पदाने दाखविलें आहे. याप्रमाणे या दोन्ही चरणांनी भगवान श्रीकृष्ण 'कारणब्रह्म' आहे हें सुचविलें आहे.

**तो पाषाणांमाजि परिसु। रसांमाजीं सिद्धरसु। तैसा मनुष्याकृति अंशु। तो माझाचि जाण॥ ७६॥**

**अर्थ**—जसा पाषाणांत परिस श्रेष्ठ आहे किंवा सर्व रसांत सिद्धरस म्हणजे अमृत श्रेष्ठ आहे, त्याप्रमाणे तो सर्व मनुष्यांत माझा अंश होय, हें जाण॥ ७६ ॥

**गूढार्थदीपिका—तो पाषाणामाजि परिसु**—माऊलींनी या चरणांत भगवान श्रीकृष्ण पूर्णब्रह्म आहे असे न जाणणाऱ्यांना पाषाणाची उपमा देऊन जाणणाऱ्यांना परिसाची उपमा दिली आहे.

**तो चालतें ज्ञानाचें बिंब। तयाचे अवयव ते सुखाचें कोंभ। येर माणुसपण ते भांब। लौकिक भागु॥ ७७॥**

**अर्थ**—असा मनुष्य, अर्जुना! ज्ञानाचें चालतें बोलतें बिंब होय, त्याचे जे अवयव दिसतात ते ब्रह्मसुखाला निघालेले कोंभ होत असें समज, बाकी वर वर जो मनुष्यपणाचा भाग दिसतो तो केवळ अज्ञानभ्रमाने दिसतो. ॥ ७७ ॥

**गूढार्थदीपिका—चालतें ज्ञानाचें बिंब**—ज्याप्रमाणे निराकार प्रकाशाचे सूर्यबिंब हें अभिन्न असें साकार स्वरूप आहे, त्याप्रमाणेंच सगुण साकार श्रीकृष्ण स्वरूप व त्याला पूर्णब्रह्मत्वाने ओळखणारे ज्ञानी भक्त हीं दोन्हीं निराकार चित्स्वरूपाची अभिन्न अशीं सगुण साकार स्वरूपें आहेत.

**तयाचे अवयव ते सुखाचे कोंभ**—त्यांचे करचरणादि अवयवासह शरीर हें देखील सच्चिदानंदस्वरूपच असते, ''सदेह सच्चिदानंद कां नोहावे ते'' असे माउलींनी पुढे १८ व्या अध्यायांत म्हटलेंहि आहे.

**येरमाणुसपणते भांब। लौकिक भाग**—लौकिक-म्हणजे अज्ञानी लोकांना दिसणारा-जो त्यांचे ठिकाणी माणुसपणाचा भाग दिसतो, तो त्यांच्या (अज्ञानी लोकांच्या) अज्ञानभ्रांतिमुळे होय.

**अगा अवचिता कापुरा-। माजीं सांपडला हिरा। वरि पडिलिया नीरा। न निगे केवीं॥ ७८॥**
**तैसा मनुष्यलोकाआंतु। तो जरी जाहाला प्राकृतु। तऱ्ही प्रकृतिदोषाची मातु। नेणेचि कीं॥ ७९॥**

**अर्थ**—बा अर्जुना! कापुरामध्ये अकस्मात् हिरा मिसळला, तरी त्यावर पाणी पडलें असतां त्या पाण्याने जसा त्याचा हिरेपणा जात नाही. ॥ ७८ ॥ त्याप्रमाणे माझ्या स्वरूपाला जाणणारा पुरुष, जरी या मनुष्यलोकांत सामान्य प्राकृतिक माणसासारखा दिसत असला, तरी त्याच्या ठिकाणी प्रकृतिरूप दोषांचा स्पर्शहि नसतो. ॥ ७९ ॥

**गूढार्थदीपिका—तरी प्रकृतिदोषाची मातु। नेणेचि की**—''अध्यस्तस्य कुतः सत्त्व असत्यस्य कुतो जनिः'' (वि. चू. २६२) परब्रह्मावांचून माया व मायाकार्य किंवा अविद्या व अविद्येचें कार्य हे सर्व जीवाने भ्रांतीने कल्पिले असल्यामुळें त्यांचें अस्तित्वच नाही असे ज्ञानाने कळून येते; म्हणून ज्ञानानंतर त्यांचा संबंधच राहणें शक्य नाही.

**तो आपभयेंचि सांडिजे पापीं। जैसा जळत चंदनु सर्पी। तैसा मातें जाणे तो संकल्पीं। वर्जूनि घापे॥ ८०॥**
**तेंचि आमुतें कैसें जाणिजे। ऐसें कल्पी जरी चित्त तुझें। तरी मी ऐसा हे माझे। भाव ऐकें॥ ८१॥**

**अर्थ**—भीतीनें आपण होऊनच पापें त्यांच्यापाशीं येत नाहीत. ज्याप्रमाणे सर्प जळत असलेल्या चंदनाच्या झाडाला सोडून देतात त्याप्रमणे माझ्या श्रीकृष्णस्वरूपाचें पूर्णब्रह्मत्व जो जाणतो त्याचा सर्व संकल्प संबंध सोडतात. ॥ ८० ॥ तेच माझे जगात व्यापून असणे कसें जाणावे असे जर तुझ्या चित्तांत वाटत असेल, तर जगांत मी असा आहे व हे माझे विकार आहेत, ते सांगतों ऐक. ॥ ८१ ॥

**गूढार्थदीपिका**—ज्याप्रमाणे कारणच कार्यरूपाने प्रगट होतें. त्याप्रमाणे मीच सर्व कार्यरूप ब्रह्मांडाचें कारण असल्यामुळे, ब्रह्मांडांतील निरनिराळ्या कार्यरूप पदार्थाच्या रूपाने मीच असतो असे येथे भगवान सांगत आहेत.

**जे वेगळालिया भूतीं। सारिखे होऊनि प्रकृती। विखुरले आहेति त्रिजगतीं। आघवियें॥ ८२॥**

**अर्थ**—हे विकार, निरनिराळ्या प्राण्यांमध्ये, त्यांच्या प्रकृतीसारखे होऊन संपूर्ण ब्रह्मांडांत पसरलेले आहेत. ॥ ८२ ॥

**गूढार्थदीपिका**—दोरीच सर्पस्वरूप भासत असते किंवा मातीचा कुंभ केला असतां मातीच त्या स्वरूपाची भासूं लागते, त्याप्रमाणे नामरूपाने नटलेल्या परब्रह्माचे ठिकाणी प्रत्येक नामरूपागणिक भिन्न वस्तूची कल्पना झाल्यामुळें, परब्रह्मच, निरनिराळ्या त्या त्या वस्तूच्या रूपाने भासूं लागतें.

**बुद्धिर्ज्ञानमसम्मोहः क्षमा सत्यं दमः शमः। सुखं दुःखं भवोऽभावो भयं चाभयमेव च॥ ४॥**
**अहिंसा समता तुष्टिस्तपो दानं यशोऽयशः। भवन्ति भावा भूतानां मत्त एव पृथग्विधाः॥ ५॥**

**अर्थ**—बुद्धि, ज्ञान, असंमोह, क्षमा, सत्य, दम, शम, सुख, दुःख, भव, अभाव, भय, अभय, अहिंसा, समता, संतोष तप, दान, यश, अपयश हे सर्व निरनिराळे भाव (विकार किंवा कार्यरूप पदार्थ) सर्व भूतांचे ठिकाणीं असून ते सर्व माझ्यापासून प्रगट झाले आहेत. ॥ ४-५ ॥

**ते प्रथम जाण बुद्धि। मग ज्ञान जें निरवधि। असंमोहन सहन सिद्धी। क्षमा सत्य॥ ८३॥**

**अर्थ**—प्रथम भाव बुद्धि होय, हें लक्षांत ठेव. त्यानंतर जें अमर्याद ज्ञान हा दुसरा भाव होय. मोह नसणें, सर्व सहन करणें, क्षमा म्हणजे कोणी अपकार केल्यास त्याला प्रत्यपकार न करण्याची बुद्धि, सत्य म्हणजे जसें ऐकिलें किंवा पाहिले असेल तसेंच सांगणें. ॥ ८३ ॥

**गूढार्थदीपिका—तेथ प्रथम जाण बुद्धि**—बुद्धि हें तत्व मूळांत शुद्धसत्वात्मक असून अज्ञानामुळे तें त्रिगुणात्मक झालें आहे. तसेंच ज्ञान हें मूळांत अमर्याद ब्रह्मस्वरूप असून अज्ञानामुळे तें सावधि व त्रिगुणात्मक झालें आहे.

अज्ञान नाहीसे होऊन ती बुद्धि आपल्या मूळ शुद्धसात्विक स्वरूपाला प्राप्त झाली म्हणजे तिच्यांत निरवधि ज्ञान प्रगट होतें व असंमोह, क्षमा, सत्य, शम, दम, इत्यादि सात्विक भाव आपोआप व्यक्त होतात.

**मग शम दम दोन्ही। सुखदु:ख वर्तत जनीं। अर्जुना भावाभाव मानीं। भावाचिमाजीं॥ ८४॥**

**अर्थ**—दम म्हणजे-इंद्रियनिग्रह किंवा इंद्रियांचे शास्त्रानुसार नियमन, शम म्हणजे—मनोनिग्रह किंवा मनांतील विषयवासना क्षीण होणें हे दोन भाव, सुख म्हणजे मनाच्या अनुकूल असणें दु:ख म्हणजे मनाच्या विरूद्ध असणें हे जे जगांत दिसून येते, त्याचप्रमाणे भावाभाव म्हणजे असणें व नसणें, हे दोन्ही भाव, भावामध्ये किंवा भावरूपच आहेत असें समज. ॥ ८४ ॥

**गूढार्थदीपिका—भावाभाव मानी भावाचिमाजी—"घटस्येतरेतराभावो घटादन्यो दृष्ट:..........तथैव भावात्मकताऽभावानाम्"** (९ बृ. १-२-१ शं. भा.) ज्याप्रमाणे घटाचा अन्योन्याभाव पटरूप असा भावरूप असतो, त्याप्रमाणेच सर्व अभावरूपच असतात असें आचार्यांनी बृहदारण्य भाष्यांत म्हटलें आहे. पुन: भावरूप पदार्थ असला तरच त्याचे प्रकार असूं शकतात. जो भावरूप पदार्थ नाही त्याचे प्रकार राहूं शकत नाहीत. प्रागभाव, प्रध्वंसाभाव, अन्योन्याभाव, अत्यंताभाव सामायिकाभाव असे अभावाचे प्रकार सांगितले आहेत; म्हणून अभावरूपच आहे.

तसेंच प्रमाणाने जें जें कळतें तें तें भावरूपच असते. भावरूप पदार्थ जाणण्याकरितांच प्रमाणाची आवश्यकता आहे. वेदान्तशास्त्राने एक अनुपलब्धि प्रमाण मानिलें असून, त्या प्रमाणाने अभाव जाणला जातो असे वेदान्तांचें म्हणणें आहे. म्हणून अभावहि भावरूप मानला आहे. तेच माऊलींनी येथे "भावाभाव मानीं। भावाचिमाजी" या चरणांनीं प्रतिपादिलें आहे.

**पैं भय आणि निर्भयता। अहिंसा आणि समता। तुष्टि तप पांडुसुता। ओळख तू॥ ८५॥**
**अगा दान यश अपकीर्ति। हे जे भाव सर्वत्र दिसती। ते मजचि पासूनि होती। भूतांचिया ठायीं॥ ८६ ॥**
**जैसीं भूतें आहाती सिनानीं। तैसेंचि हे वेगळाले मानी। एक उपजती माझ्या ज्ञानीं। एक नेणती मातें॥ ८७॥**

**अर्थ**—आणखी अर्जुना! भय व निर्भयता, अहिंसा म्हणजे कायावाचा मनाने कोणत्याहि प्राण्याला दु:ख न देता सुखच देण्याची प्रवृत्ति आणि समता म्हणजे सर्व प्राणिमात्रांना एकसारखे पाहणें, तुष्टि म्हणजे संतोष, तपादिक हें माझें रूप आहे असें जाण. ॥ ८५ ॥ बा अर्जुना! दान, यश, अपकीर्ति, हे जे सर्व भाव जगांत दिसून येतात, ते सर्व प्राण्यांच्या ठिकाणीं माझ्यापासूनच प्रगट झाले आहेत. ॥ ८६ ॥ ज्याप्रमाणे निरनिराळे प्राणी आहेत, त्याप्रमाणेच हे निरनिराळे भाव आहेत असें जाण. कांही भाव माझ्या स्वरूपाचें ज्ञान करून देणारे आहेत व कांही माझ्या स्वरूपाच्या ज्ञानाला प्रतिबंध करणारे आहेत. ॥ ८७ ॥

**गूढार्थदीपिका**—ज्याप्रमाणे संपूर्ण विकृतिरहित अशा पारदर्शक कांचेंतून कांचेमागील वस्तु जशी यथार्थ आहे, तशीच दिसून येते. विकृत कांचेंतून ती विपरीत दिसते आणि अपारदर्शक कांचेतून ती मुळींच दिसत नाही; त्याप्रमाणे परब्रह्मावर जीवाने कल्पिलेल्या त्रिगुणात्मक मायेच्या कार्यरूप अंत:करणवृत्ती, शुद्ध सात्विक झाल्यास तो, असंमोह, क्षमा, शम, दम, समता, तुष्टि, तप, दान, इत्यादी सात्विक गुणाने युक्त होउन, त्याला निरवधि ज्ञानरूप अशा परब्रह्माचा साक्षात्कार होतो आणि जर ती अंत:करणवृत्ती रजोगुण, तमोगुण यांच्या उत्कर्षाने युक्त असली, तर

परब्रह्माच्या प्रत्ययाचा लोप होऊन त्याला परब्रह्मच दुःख, भावाभाव, भय, अपकीर्ति इत्यादि विपरीत भावयुक्त जगद्रूपाने भासू लागते.

**अगा प्रकाश आणि कडवसें। हें सूर्याचिस्तव जैसें। प्रकाश उदयीं दिसे। तम अस्तुसीं॥ ८८॥**

**अर्थ**—प्रकाश व आंधार हे दोन्ही सूर्यामुळेंच होत असतात. सूर्योदय झाला असतां प्रकाश होतो व सूर्यास्त झाला की आंधार होतो. ॥ ८८ ॥

**आणि माझें जे जाणणें नेणणें। तें तंव भूतांचिया दैवांचे करणें। म्हणोनि भूतीं भावाचे या होणें। विषम पडे॥ ८९॥**

**अर्थ**—आणि मला जाणणें किंवा न जाणणें हे जीवांच्या पूर्वजन्मांतील पापपुण्यरूप कर्माप्रमाणें होत असते; म्हणून भूतांचे ठिकाणीं माझें हें कार्यरूपभावाने प्रगट होणें विषम म्हणजे माझ्या ज्ञानाला कोठें अनुकूल व कोठें प्रतिकूल असें झालें आहे. ॥ ८९ ॥

**गूढार्थदीपिका**—पापकर्माने देहासक्तिद्वारा अज्ञानच वाढीस लागतें व आत्मज्ञानाला प्रतिबंध होतो. पुण्यकर्माने देहासक्ति कमी होऊन तद्वारा अज्ञानहि क्षीण होते व सत्वगुण वाढून चैतन्यप्रकाशरूप आत्म्यांचें ज्ञान होण्यास मदत होते.

**यापरी माझियां भावीं। हे जीवसृष्टि आहे आघवी। गुंतली असे जाणावी। पांडुकुमरा॥ ९०॥**
**आतां इये जे सृष्टीचे पालक। जयां आधीन वर्तती लोक। ते अकरा भाव आणिक। सांगेन तुज॥ ९१॥**

**अर्थ**—याप्रमाने माझ्यापासून उत्पन्न झालेल्या कार्यरूप भावांचे ठिकाणी सर्व जीव गुंतून पडले आहेत, असें अर्जुना! जाण. ॥ ९० ॥ आतां या सृष्टीने पालक म्हणून परमेश्वराने नेमलेले व ज्यांच्या आज्ञेनुसार सर्व लोक वागतात ते अकरा भाव आणखी तुला सांगतों. ॥ ९१ ॥

**महर्षयः सप्त पूर्वे चत्वारो मनवस्तथा। मद्भावा मानसा जाता येषां लोक इमाः प्रजाः॥ ६॥**

**अर्थ**—माझ्या ठिकाणी ज्यांचें चित्त आहे व मी मनाने उत्पन्न केलें म्हणून माझ्या ईश्वरी सामर्थ्याने जे युक्त आहेत, असे पूर्वी होऊन गेलेले जे आधिकारिक सात महर्षि व चार मनु यांच्यापासून सर्व स्वर्गादि लोक व स्थावर जंगमात्मक प्रजा उत्पन्न झाली. ॥ ६ ॥

**तरी आघवांचि गुणीं वृद्ध। जे महर्षीमाजि प्रबुद्ध। कश्यपादि प्रसिद्ध। सप्तऋषी॥ ९२॥**

**अर्थ**—तरी ज्ञानतपादि सर्व गुणांनी श्रेष्ठ व सर्व महर्षिमध्यें ज्ञाते असे जे कश्यपादि प्रसिद्ध सप्तर्षि आहेत. ॥ ९२ ॥

**गूढार्थदीपिका**—पूर्वी सगुण भगवंताच्या भक्तीने संपन्न असलेले जे जीव, त्यांना भगवान उत्तरसृष्टींतील आधिकारि म्हणून नियुक्त करीत असतो व त्यांचे ठिकाणी आपलें ज्ञानऐश्वर्यादिसामर्थ्य देऊन, त्यांच्याकडून सृष्ट्युत्पत्त्यादि कार्य करवितो. ज्याप्रमाणे राजा, मंत्रि इत्यादि संज्ञा अधिकारपदाच्या असतात, त्याप्रमाणे कश्यपादि व मन्वादि संज्ञा देखील भगवंताच्या सृष्टींतील निरनिराळ्या अधिकारपदाच्या आहेत. आपल्या पुण्यकर्माने त्या पदावर येणाऱ्या व्यक्तींना शास्त्रांतून आधिकारिक ही संज्ञा दिली आहे, हें मागें सांगितलेच आहे.

**आणिकही सांगिजतील। जे कां चौदा आंतुल मुद्दल। स्वायंभू मुख्य वडील। चारी मनु॥ ९३॥**
**ऐसे हे अकरा। माझां मनीं जाहाले धनुर्धरा। सृष्टीचिया व्यापारा-। लागोनियां॥ ९४॥**
**जैं लोकांची व्यवस्था न पडे। जैं या त्रिभुवनाचें कांहीं न मांडे। तैं महाभूतांचें दळवाडें। अचुंबित असे॥ ९५॥**
**तैंचि जे जाहाले। मग इहीं लोक केले। तेथ अध्यक्ष रचूनि ठेविले। इहीं जन॥ ९६॥**
**म्हणोनि अकरा हे राजा। मग येर जग यांचिया प्रजा। ऐसा विश्व विस्तारु हा माझा। ऐसेंचि जाण॥ ९७॥**
**पाहें पां आरंभीं बीज एकलें। मग तेचि विरूढलिया बूड जाहालें। बुडीं कोंभ निघालें। खांदियांचे॥ ९८॥**
**खांदियांपासूनि अनेका। फुटलिया नाना शाखा। शाखांस्तव देखा। पल्लव पानें॥ ९९॥**

**पल्लवीं फूल फळ। एवं वृक्षत्व जाहालें सकळ। तें निर्धारितां केवळ। बीजचि आघवे॥ १००॥**
**तैसें मी एकचि पहिलें। मग मी तेंचि मनातें व्यालें। तेथ सप्तऋषी जाहाले। आणि चारी मनु॥ १०१॥**
**इहीं लोकपाळ केले। लोकपाळीं विविध लोक स्त्रजिले। लोकांपासूनि निपजलें। प्रजाजात॥ १०२॥**
**ऐसेनि हें विश्व येथें। मीचि विस्तारिलोंसे निरुतें। परी भावाचेनि हातें। मानें जया॥ १०३॥**

**अर्थ**—आणखी सांगतों ऐक. मूळांत असलेल्या चौदा मनूमध्ये पहिले स्वायंभुव वगैरे जे चार मुख्य मनु आहेत. ॥ ९३ ॥ अर्जुना! असे हे अकराजण पुढील सृष्टीचा उत्पत्त्यादि व्यापार करण्याकरीतां माझ्या मनापासून उत्पन्न झाले. ॥ ९४॥ जेव्हा त्रिभुवनाची मांडणी व लोकांची उत्पत्ति होत नाही आणि पंचभूतांचा समुदाय क्रियारहित असतो. ॥ ९५ ॥ तेव्हा हे अकराजण उत्पन्न झाले व त्यांनी मग हे स्वर्गादि लोक निर्माण केले व तेथे पूर्वपुण्यानुसार अधिकार प्राप्त झालेले अध्यक्ष नेमले व त्यांनी पुढे प्रजा निर्माण केली. ॥ ९६ ॥ म्हणून ह्या अकराजणांचा समुदाय, राजा असून बाकींचे जग त्यांची प्रजा होय, याप्रमाणे हा संपूर्ण विश्वाचा विस्तार माझाच आहे, असें समज. ॥ ९७ ॥ हें पहा, अर्जुना! पहिलें एक बीजच असतें, मग तेंच वाढलें की बूड होतें, पुढे त्या बुडाला फांद्याचे कोंभ निघतात. ॥ ९८ ॥ त्या फांद्यापासून अनेक शाखा फुटतात व त्या शाखांना कोंवळीं करडीं पानें येतात. ॥ ९९ ॥ पाना नंतर फुलें, फळें येतात. याप्रमाणे संपूर्ण झाडाचा विस्तार होतो. या सर्वांचा विचार केला असतां, ते सर्व एक बीजच होय. ॥ १०० ॥ याप्रमाणे या सृष्टीच्या पूर्वी मीच एक असतो. मग त्या माझ्यापासून मनाची उत्पत्ति होते व त्या मनापासून सप्तर्षि व चार मनु उत्पन्न होतात. ॥ १०१ ॥ मग ते लोकपाळांना उत्पन्न करतात लोकपाळ तेथील जनांना उत्पन्न करतात. अशा प्रकारें लोकांपासून अनेक प्रकारची प्रजा निर्माण होते. ॥ १०२ ॥ याप्रमाणे येथें हें जग म्हणजे मीच खरोखर विस्तारलों आहे, पण हें, माझ्या वचनावर दृढ विश्वास असल्यामुळे ज्याला पटेल, त्यालाच कळेल. ॥ १०३ ॥

**गूढार्थदीपिका—मीचि विस्तारलोंसे निरुते**—परब्रह्म सच्चिदानंद स्वरूप आहे असे शास्त्रांत सांगितलें आहे आणि जगत्, जड विनाशी भासतें. पण सच्चिदानंद परब्रह्मापासून जड, विनाशी सृष्टि उत्पन्न झाली असें जें शास्त्रांतून सांगितलें आहे, तें खरोखर, तशीच जड, विनाशी सृष्टि उत्पन्न झाली असे सांगण्याकरितां नसून परब्रह्मापासून झालेली सृष्टि परब्रह्मस्वरूपच आहे, ती जड विनाशी नाही, हें सिद्ध करण्याकरितांच सांगितलें आहे. याचें आम्ही मागें सातव्या अध्यायांत निरूपण केलेंच आहे आणि हेंच येथे माऊलींनी ''मीचि विस्तारलोंसे निरुते'' या चरणाने सांगितले आहे.

**भावाचेनि हातें माने जया**—परब्रह्माच्या सच्चिदानंदलक्षणाहून भिन्न अशा जड, विनाशी लक्षणाने भासणारें जगत् जोपर्यंत सत्य आहे, असें वाटतें, तोपर्यंत सच्चिदानंद परब्रह्मच जगद्रूपाने नटलें आहे, म्हणून जगत्हि सच्चिदानंदस्वरूप आहे, जड विनाशी नाही, असा अनुभव येऊं शकत नाही; तसा अनुभव येण्यापूर्वी, परमात्मा किंवा सद्गुरु जे सांगतील त्यावर दृढ विश्वासच ठेवला पाहिजे, असा भाव.

**एतां विभूतिं योगं च मम यो वेत्ति तत्त्वतः। सोऽविकम्पेन योगेन युज्यते नात्र संशयः॥ ७॥**

**अर्थ**—हा माझा जगरूपाने विस्तार व जगद्रूपाशीं ऐक्य जो कोणी यथार्थ दृष्टीने जाणतो, तो माझ्याशीं अचल असें ऐक्य पावतो, यांत संशय नाही. ॥ ७ ॥

**यालागीं सुभद्रापती। हे भाव इया माझिया विभूती। आणि यांचिया व्याप्तीं। व्यापिलें विश्व॥ १०४॥**
**म्हणोनि गा यापरी। ब्रह्मादिपिपीलिकावरी। मीवांचूनि दुसरी। गोठी नाहीं॥ १०५॥**
**ऐसें जाणे जो साचें। तया चेइरें जाहालें ज्ञानाचें। म्हणोनि उत्तमाधम भेदाचें। दुःस्वप्न न देखे॥ १०६॥**

**अर्थ**—म्हणून सुभद्रापते अर्जुना! हे सर्व अस्तित्वांत आलेले कार्यपदार्थ माझ्या विभूतिं आहेत व यांच्या योगानेच सर्व जग व्यापिलें आहे. ॥ १०४॥ म्हणून, बा अर्जुना! याप्रमाणे ब्रह्मदेवापासून मुंगीपर्यंत माझ्यावांचून दुसऱ्या वस्तूची गोष्ट देखील नाही. ॥ १०५॥ जड-विनाशीभाव जाऊन ज्याला सर्व सच्चिदानंदस्वरूप दिसतें त्याला

शुद्ध ब्रह्मज्ञान झालें असे समज; म्हणून तो उत्तम, मध्यम, कनिष्ठ या भावांचें स्वप्न पाहत नाही. ॥ १०६ ॥

**गूढार्थदीपिका**—अस्फुट परब्रह्माचे ठिकाणी द्वैताचा प्रत्यय जीवकल्पित आहे, म्हणूनच तो, परब्रह्माच्या यथार्थ ज्ञानाने समूळ नाहीसा होतो.

**मी माझिया विभूती। विभूतीं अधिष्ठिलिया व्यक्ती। हें आघवें योगप्रतीती। एकचि मानी॥ १०७॥**

**म्हणोनि निःशंकें येणें महायोगें। मज मीनला मनाचेनि आंगें। एथ संशय करणें न लगे। तो त्रिशुद्धी जाहला॥ १०८ ॥**

**कां जे ऐसें किरीटी। मातें भजे जो अभेदा दिठी। तयाचिये भजनाचिये नाटीं। सूती मज॥ १०९॥**

**अर्थ**—मी, माझ्या विभूती व त्या विभूतीला अधिष्ठानभूत व्यक्ति ह्या सर्वांचे माझ्याशीं ऐक्य आहे, या अनुभवाने तो सर्व मद्रूपच मानतो. ॥ १०७ ॥ म्हणून (ज्याने भिन्न वस्तुत्वाची शंका निःशेष नाहीशी होते) अशा या अद्वैतदृष्टिरूप श्रेष्ठ योगाने जो माझ्याशीं मनाने ऐक्य पावला तो मद्रूप होतो, हे मी त्रिवार प्रतिज्ञा करून सांगतों. येथें संशय घेण्याचें कारणच नाही. ॥ १०८ ॥ कारण अर्जुना! जो अभेददृष्टीने माझें याप्रमाणे भजन करतो, त्या त्याच्या भजनाचे व्यवहारात एक मलाच घेतलेंले असतें. ॥ १०९ ॥

**गूढार्थदीपिका**—ज्ञानाने भगवंताशीं ऐक्य झाल्यावरहि जी भगवंताची भक्ति केली जाते, त्यांत भक्त आपली यत्किंचित् निराळी स्थिति न वागवितां, भगवानच आपलें स्वाभाविक प्रेम करण्याकरितां भक्त व भगवान या रूपाने नटला आहे, असे पूर्णपणें जाणत असतो, असा अर्थ.

**म्हणऊनि अभेदें जो भक्तियोगु। तेथ शंका नाहीं नये खंगु। करितां ठेला तरी चांगु। तें सांगितलें षष्ठीं॥ ११० ॥**

**अर्थ**—म्हणून अभेदाने होणारा जो भक्तियोग, त्यांत पूर्णब्रह्मस्थिति प्राप्त होईल किंवा नाही, ही शंका घेण्याचें कारणच राहत नाही व तो खंडितहि होत नाही आणि खंड पडला तरी तें कल्याणाचें असतें; कारण तो (भक्तियोग) भगवंताच्या कृपेने पुनः सुरू होतो, हें सहाव्या अध्यायांत सांगितलेंच आहे. ॥ ११० ॥

**गूढार्थदीपिका**—भक्ति करीत असतांना भगवान व भक्त, असा भेद पाहणाऱ्याला दिसत असला, तरी भक्ताला भेदाची जाणीव होत नाही किंबहुना जितका जितका भक्तीचा व्यवहार होतो, तितका तितका भेदाचा भास नाहीसा होऊन, अभेदच दृढ होतो, हेच माऊलींनी "भेद तंव तंव दूण। अभेदासी" या ओवीने अमृतानुभवांत प्रतिपादिलें आहे.

**तोचि अभेदु कैसा। हें जाणावया मानसा। साद जाली तरी परियेसा। बोलिजेल॥१११॥**

**अर्थ**—ज्या अभेदाने भक्ति केली जाते म्हणून मी सांगितले, तो अभेद कसा आहे हे जाणावें असा जर तुझ्या मनांत ध्वनि उमटला असेल, तर सांगतों, ऐक. ॥ १११ ॥

**अहं सर्वस्य प्रभवो मत्तः सर्वं प्रवर्तते। इति मत्वा भजन्ते मां बुधा भावसमन्विताः॥ ८॥**

**अर्थ**—मी सर्व जगाचें कारण असून माझ्यापासूनच सर्व म्हणजे जगताची स्थिति, नाश, कर्म, त्याचें फळ, भोग इत्यादि, यांची प्रवृत्ति होते, असे जाणून ज्ञानीपुरुष अत्यंत श्रद्धेने माझें भजन करतात. ॥ ८ ॥

**तरी मीचि एक सर्वा। या जगा जन्म पांडवा। आणि मजचिपासूनि आघवा। निर्वाहो यांचा॥ ११२॥**

**अर्थ**—तरी या सर्व जगाला अर्जुना! मीच एक जन्म देणारा आहे आणि या सर्व जगाची स्थितिहि मजपासूनच होते. ॥ ११२ ॥

**गूढार्थदीपिका**—"ज्यापासून सर्व जगताची स्थिति, उत्पत्ति, लय होतात, तो मायानियंता, सर्वज्ञ, सर्वशक्तिमान् परमात्मा मीच आहे" असे सांगून भगवंताचे सगुण स्वरूप पूर्णब्रह्माहून यत्किंचित्हि न्यून नाही व तें पूर्णब्रह्म किंवा कारणब्रह्मच आहे असे भगवंतांनी वरील श्लोकांत व माऊलींनी या ओवींतून स्पष्ट सांगितलें आहे.

"**जगद्व्यापारवर्जं प्रकरणादसंनिहितत्वाच्च**" (ब्र. सू. ४-४-१७)

या सूत्रांत परमेश्वराशीं मनाने ऐक्य पावून मुक्त झालेल्या ज्ञानी पुरुषांना जगताची उत्पत्ति, स्थिति लयादि व्यापार करण्याचे ऐश्वर्य प्राप्त होत नाही, तें ऐश्वर्य, एका पूर्ण परब्रह्माचे ठिकाणीच असते, असा वेदान्तसिद्धान्त, भगवान

व्यासांनी मांडला आहे आणि या ठिकाणी भगवान श्रीकृष्णाने माझ्यापासूनच जगताचे उत्पत्तिस्थितिलय होतात असे सांगितलें असल्यामुळे, भगवान म्हणजे मुक्त जीव नव्हे, पूर्ण परमात्माच होय हें उघड होतें.

चवथ्या अध्यायांतील पांचव्या श्लोकावर टीका करतांना श्रीमच्छंकाराचार्यांनीहि अवतारांचे ठिकाणी परमेश्वराचे अमर्यादसर्वज्ञता अमर्यादशक्तिमत्ता इत्यादि गुण नाहीसे होतात—म्हणजे अवतार हे आपल्या परमेश्वरापासून च्युत होतात—असे समजणाऱ्यांची 'मूर्ख' म्हणून निंदा करून, अवतार हे पूर्णब्रह्मच असतात, हें स्पष्ट केलें आहे.

**कल्लोळमाळा अनेगा। जन्म जळींचि पैं गा। आणि तयां जळचि आश्रयो तरंगा। जीवनही जळ॥ १३॥**
**ऐसें आघवांचि ठायीं। तयां जळचि जेविं पाहीं। तैसा मीवांचूनि नाहीं। विश्वीं इये॥ १४॥**

**अर्थ**—लाटांच्या माळा म्हणजे लाटांपाठीं लाटा, अशा अनेक लाटा उठल्या असल्या, तरी त्या सर्वांचा जन्म एका पाण्यापासूनच होतो. तें पाणीच त्यांना आधार असते व त्यांतहि केवळ पाणीच असतें.॥ ११३॥ ज्याप्रमाणे त्या लाटांच्या सर्व ठिकाणी एक पाणीच असतें, दुसरें कांहीच नसतें, त्याप्रमाणे या जगामध्ये माझ्यावांचून दुसरें लवमात्र कांही नाही. संपूर्ण मीच आहे.॥ ११४॥

**गूढार्थदीपिका**—या जगांत वस्तुरूपाने व नामरूपाने जेंवढें कांही आहेसें वाटतें तें संपूर्ण, एका सच्चिदानंद परमेश्वरावाचून दुसरे यत्किंचित्हि नाही; म्हणून खरोखर पाहतां मूळांत विश्व पूर्ण सच्चिदानंदस्वरूपच आहे, हेंच माऊलींनी या दोन ओव्यांतून दाखविलें आहे.

**ऐसिया व्यापका मातें। मानूनि जे भजती भल्तेथें। परि साचोकारें उदितें। प्रेमभावें॥ १५॥**
**देश काळ वर्तमान। आघवें मजसीं करूनि अभिन्न। जैसा वायु होऊनि गगन। गगनींचि विचरे॥ १६॥**
**ऐसेनि जे निजज्ञानीं। खेळत सुखें त्रिभुवनीं। जगद्रूपा मनीं। सांठऊनि मातें॥ १७॥**

**अर्थ**—एकदेशीय सगुण साकार स्वरूपाने मी दिसत असलों तरी आतां सांगितल्याप्रमाणे मीच व्यापकहि आहे असें जाणून जे प्रगट झालेल्या निष्कपट प्रेमाने माझें कोठेहि भजन करतात.॥ ११५॥ ज्याप्रमाणे वायु आकाशाशीं एकरूप होऊन आकाशांतच संचार करतो, त्याप्रमाणे देश, काळ व वर्तमान (घडणाऱ्या गोष्टी) हे सर्व माझ्याशीं अभिन्न करून म्हणजे भगवत्स्वरूपच आहेत असे समजून.॥ ११६॥ याप्रमाणे आत्मस्वरूपालाहि जाणून व जगद्रूप असा जो मी. त्या मला अंत:करणांत सांठवून जे आनंदाने त्रिभुवनांत भक्तिप्रेमलीला करतात.॥ ११७॥

**गूढार्थदीपिका—ऐसेनि जे निजज्ञानी**—व्यापक परमात्मा माझा आत्माच होय असे आत्मैक्यज्ञान ज्यांना झालें ते निजज्ञानी होत. असे व्यापकज्ञान ज्यांना झालें आहे असे ज्ञानी देखील ज्ञानानंतर सगुण भगवंताची भक्ति करूं शकतात, हें माऊलींनी ''ऐसेनि जें निजज्ञानी'' या चरणाने दाखविलें आहे.

**जें जें भेटे भूत। तें तें मानिजे भगवंत। हा भक्तियोगु निश्चित। जाण माझा॥ १८॥**

**अर्थ**—जो जो प्राणि समोर येईल तो तो प्राणि साक्षात् भगवंत आहे, असें मानणें हाच, अर्जुना! माझा भक्तियोग होय असे निश्चित् जाण.॥ ११८॥

**गूढार्थदीपिका**—आत्मज्ञानानंतर होणाऱ्या भक्तीचें स्वरूप येथें वर्णन केलें आहे.

भक्ति ही पूर्ण प्रेमरूप असून, त्या पूर्ण प्रेमरूप भक्तीच्या प्राप्तिकरितांच भक्ति केली जाते; म्हणून तीहि पूर्ण अशा भगवंताचीच होऊं शकते, अपूर्ण जीवाची होऊं शकत नाही, असा ब्रह्मसूत्र प्रथमाध्याय द्वितीय पदांतील 'सर्वत्र प्रसिद्ध्यधिकरणम्' यांत सिद्धान्त केला आहे.

भेटेल त्या प्राण्याला भगवंत मानणें म्हणजे ज्या नित्य, शुद्ध, बुद्ध, मुक्त, सर्वज्ञ, सर्वशक्तिमत्वादि गुणांनी भगवान अखंड युक्त असतो, तसाच तोहि त्या संपूर्ण गुणांनी पूर्णपणे अखंड युक्त आहे असें मानणें होय.

असे न मानतां कोणत्याहि गुणाच्या दृष्टीने त्याला अपूर्ण मानून, त्याची सेवा केल्यास ती सेवा भगवद्भक्ति होत नाही, ती दया होते व त्याने दयेचें फळ मिळते, भक्तीचें फळ मिळत नाही.

**मच्चित्ता मद्गतप्राणा बोधयन्तः परस्परम्। कथयन्तश्च मां नित्यं तुष्यन्ति च रमन्ति च॥ ९॥**

**अर्थ**—एक माझेच ठिकाणी चित्त व प्राण ठेवून परस्पर माझा बोध करून देण्यांत व माझे गुण वर्णन करण्यांतच जे सदा संतोष मानतात व रममाण होतात. ॥ ९ ॥

**चित्तें मीचि जाहाले। मियेंचि प्राणें धालें। जीवों मरों विसरले। बोधाचिया भुली॥ ११९॥**

**अर्थ**—जे चित्ताने मद्रूप झालें, जे मलाच आपला प्राण समजून तृप्त असतात, जे माझें सगुणस्वरूपहि पूर्ण ब्रह्म आहे या ज्ञानांत तल्लीन राहत असल्यामुळे जन्ममरणांचाहि त्यांना विसर पडतो. ॥ ११९ ॥

**गूढार्थदीपिका—चित्तें मीचि जाहालें**—''ज्याचें जया ध्यान। तेचि होय त्याचे मन'' (तु. गा. ३७२१) या तुकाराम महाराजांच्या वचनाप्रमाणे ''चित्तें मीचि'' म्हणजे भक्ताच्या अंत:करणांत एक सगुण भगवंताचेंच ध्यान असतें दुसरे कशाचेंहि नसतें.

''**मियेंचि प्राणे धालें**'' म्हणजे मनुष्य जसा प्राणाने जगतो तसा भक्त केवळ भगवंतामुळेच जगतो.

''**जीवों मरों विसरलें**'' या चरणाने भक्तांना देहासह जन्ममरणाचा विसर पडतो असे सांगितलें आहे.

''**बोधाचिया भूली**'' म्हणजे भगवंताचें सगुणस्वरूपहि पूर्ण ब्रह्मस्वरूप आहे या ज्ञानांत निमग्न झाल्यामुळे.

निर्गुणस्वरूप नित्यसाक्षी असल्यामुळे, चित्ताने आकलन करण्याजोगे नाही, तेथे प्रेम करतां येत नाही व त्या ज्ञानाने देहादिकांचा विसरहि पडत नाही. म्हणून येथील ''बोध'' या शब्दाचा, ''सगुणस्वरूपाच्या पूर्णब्रह्मत्वाचा बोध'' असा अर्थ केला पाहिजे, ''निर्गुणस्वरूपाचा बोध'' असा अर्थ करतां येत नाही.

**मग तया बोधाचेनि माजें। नाचती संवादसुखाचीं भोजें। आतां एकमेकां घेपे दीजे। बोधचि वरी॥ १२०॥**

**अर्थ**—मग माझ्या स्वरूपाच्या ज्ञानाने उन्मत्त होऊन संवादाने उत्पन्न होणाऱ्या सुखाच्या मूर्ती होऊन नाचतात आणि परस्पर एकमेकांस माझ्या स्वरूपाचाच बोध घेतात व देतात. ॥ १२० ॥

**गूढार्थदीपिका—तया बोधाचेनि माजें**—मत्तपणा म्हणजे न जिंकला जाणारा परमात्मा जिंकला गेला असे वाटणें किंवा परमात्मा अधीन झाला असे वाटण्यांत निमग्न होणे.

केवळ निर्गुणज्ञान्यांना जाणीवेचा अहंकार उत्पन्न न होऊं देतां, केवळ ज्ञानस्थितींत मत्त राहतां येत नाही व निर्गुण प्राप्तीने मत्त झाल्यास अहंकार वाढून निर्गुणप्रत्ययाचा लोप होतो.

आवडता अलंकार सोन्याचा आहे असे कळून आल्याने, जसें त्यावरील प्रेम वाढतें, त्याप्रमाणे परमेश्वराचें आवडलेलें सगुणस्वरूप पूर्ण ब्रह्म आहे हें कळून आल्याने, भक्ताचें प्रेम वाढून, तो त्या प्रेमाने वेडा होतो—म्हणजे त्याला त्यापुढे परमेश्वराचे निर्गुणस्वरूपहि गोड लागत नाही.

भगवान नारदांनीहि ''यज्ज्ञात्वा मत्तो भवति स्तब्धो भवति'' असे भक्तिसूत्रांत भक्ताचें वर्णन केलें आहे.

**नाचती संवादसुखाची भोजें**—ज्ञानीभक्त, सगुणभगवंताच्या निरुपाधिक पूर्ण ब्रह्मत्वाची व त्यांच्या प्रेमाची अखंड चर्चा करीत असल्यामुळें त्यांच्या पूर्वदेहाची पांचभौतिकता नाहीशी होऊन, ते ब्रह्मसुखाच्या मूर्ति बनतात व भगवत्प्रेमाने नाचूं लागतात.

**एवंव्रतः स्वप्रियनामकीर्त्या जातानुरागो द्रुतचित्तउच्चैः। हसत्यथो रोदिति रौति गायत्युन्मादवन्नृत्यति लोकबाह्यः॥**

(भाग. स्कं. ११-२-४०)

असें व्रत धारण करून भक्त आपल्या प्रिय भगवंताच्या नामसंकीर्तनाने उत्पन्न झालेल्या प्रेमाने आर्द्रचित्त होऊन प्रेमवश असा मोठ्याने हसतो, रडतो, आक्रोश करू लागतो व गायन करूं लागतो.

**जो मोलें मदिरा खाये। तो मदिरानंदे नाचे गाये। जेणे ब्रह्मानंदु सेविलाहे। तो केविं राहे आवरला॥**

(ए. भा. अ. २-५७७)

असे भागवतांत व त्यावरील टीकेंत श्रीएकनाथ महाराजहि म्हणतात.

**एकमेकां घेपे दीजे। बोधचि वरी**—असे झाले असतां त्या भगवत्प्रेमाने ते एकमेकांना सगुण स्वरूपाचा बोधच घेतात व देतात.

**जैसीं जवळिकेंचीं सरोवरें। उचंबळलिया कालवती परस्परें। मग तरंगासि धवळारें। तरंगचि होती॥ १२१॥**
**तैसी येरयेरांचिये मिळणी। पडत आनंदकल्लोळांची वेणी। तेथ बोध बोधाचीं लेणीं। बोधेंचि मिरवी॥ १२२॥**

**अर्थ**—ज्याप्रमाणे अत्यंत जवळ असलेल्या दोन सरोवरांतील पाणी उचंबळून आलें असतां दोन्ही सरोवरें परस्परांत मिसळतात व तरंगच तरंगाची घरें होतात.॥ १२१॥ त्याप्रमाणे ज्ञानीभक्त, परस्परांना भेटले असतां ब्रह्मानंदाचे कल्लोळ उठून त्यांची वेणीच गुंतली जाते आणि तेथे बोधबोधांचे अलंकार बोधांनीच घातले जातात.॥ १२२॥

**गूढार्थदीपिका—तैसी येरयेरांचियें मिळणीं। पडत आनंदकल्लोळांची वेणी**—'बोध' म्हणजे ज्ञान व 'आनंद' म्हणजे सुख. हे दोन्ही ब्रह्माचेच धर्म असून ते परस्परांना सोडून नसतात, असे जरी वेदान्तांत सांगितलें आहे, तरीपण जीवाच्या वृत्तिउपाधीने ते अंशरूपाने परस्परांपासून भिन्न इव झाल्यामुळे, ज्ञानांशाच्या अनुभवाबरोबर आनंदाचा अनुभव येतोच असे नाही, असे विद्यारण्यांनी पंचदशीच्या आत्मानंदनामक बाराव्या प्रकरणांत ७३-७४ श्लोकांनी सांगितले आहे. आणि योगानंदरूप अकराव्या प्रकरणांतील ९८ श्लोकामध्ये ज्ञानाहंकार संपूर्ण विसरल्याशिवाय आनंद प्रगट होत नाही, असे सांगून, आत्मानंदरूप बाराव्या प्रकरणांत जशी जशी प्रेमाची वृद्धि होते, तशी तशी आनंदाची व सुखाची वृद्धि होते असे ७२ व्या श्लोकाने सांगितलें आहे.

या सर्वांचा विचार केला असतां, ज्ञानस्थितींत जी ऐक्याची जाणीव राहत असते तिच्यामुळे केवळ निर्गुणज्ञान्यांना मुख्य ब्रह्मानंद नसतो, ब्रह्मानंदाचा वासनानंद असतो, असे विद्यारण्यस्वामींनी पंचदशीच्या योगानंद प्रकरणांतील ९६-९७ श्लोकांनी सांगितलें आहे, पण निर्गुणस्वरूपाचे ज्ञानांत निपुण असून सगुण भगवंताचें प्रेम असलेल्या भक्तांचा काल, सदा भगवंताच्या स्वरूपचर्चेत व गुणकीर्तनांतच जात असल्यांमुळे, त्यांना जाणीवाहंकार स्फुरतच नाही, म्हणून ते अखंड ब्रह्मानंदांत निमग्न असतात.

**बोधबोधांची लेणीं। बोधेचि मिरवी**—अशा भक्ताचे ठिकाणी ब्रह्मबोध नसतो असे नाही, पण तो असतो तरी ज्ञान्याप्रमाणे ते बोधाहंकार वागवित नसून, बोधच बोधाला वागवितो म्हणजे ज्ञान्याचे ठिकाणीं बोध, जाणीवेच्या अहंकारासहित असतो व भक्तांचे ठिकाणी बोध, जाणिवेरहित चिन्मात्र असतो असा अर्थ.

**जैसें सूर्यें सूर्यातें वोवाळिलें। कीं चंद्रें चंद्रम्या क्षेम दिधलें। नातरी सरिसेनि पाडें मीनले। दोनी ओघ॥ १२३॥**
**तैसें प्रयाग होत सामरस्याचें। वरी वोसाण तरत सात्त्विकाचें। ते संवादचतुष्पथींचे। गणेश जाहालें॥ १२४॥**

**अर्थ**—ज्याप्रमाणे एका सूर्याने दुसऱ्या सूर्याला ओवाळावें किंवा एका चंद्राने दुसऱ्या चंद्राला आलिंगन द्यावे अथवा दोन ओघ सारखे एकमेकांत मिसळावे.॥ १२३॥ त्याप्रमाणे दोन भक्तांच्यां प्रेमसंवादांत दोन प्रेमळ भक्तांचे प्रेम व परमेश्वररूप भगवान या तिघांच्या प्रेमाचा संगम होऊन ते एक समरस प्रेमाचे प्रयाग झाले व त्या प्रेमाच्या संगमावर अष्टसात्विकभावरूपी जाणीवेचा केरकचरा वर तरंगत राहून, भक्त त्या संवादरूपी चव्हाट्यावर गणेश होऊन राहतात.॥ १२४॥

**गूढार्थदीपिका—संवादचतुष्पथींचे। गणेश जाहाले**-संवाद म्हणजे निरनिराळ्या शास्त्रांतील परस्पर विरोधी सिद्धान्ताची एकवाक्यतारूप चर्चा.

चतुष्पथ म्हणजे परस्पर विरोधी दिशेकडून आलेले चार रस्ते जेथे एकत्र मिळतात तें स्थान.

गणेश म्हणजे शब्दाचा जो विवक्षित अर्थ तो जाणणारी व त्याच अर्थाचा दुसऱ्याच्या बुद्धींत प्रकाश करणारी देवता.

निरनिराळ्या शास्त्रांतील, वर वर पाहतां विरोधी दिसणाऱ्या सिद्धान्तांची एकवाक्यता माझ्या स्वरूपाच्या ठिकाणी आहे असे जाणून व तेथे स्थिर राहून म्हणजे पूर्ण अद्वैतरूप होऊन, ज्ञानीभक्त चर्चा करीत असतात व तेच दुसऱ्यालाहि तशीच एकवाक्यता करणारी बुद्धि देऊं शकतात; म्हणून त्यांना "संवाद चतुष्पथींचे गणेश" म्हटलें आहे.

**यस्य देवे पराभक्तिर्यथा देवे तथा गुरौ। तस्यैते कथिता ह्यर्थाः प्रकाशन्ते महात्मनः॥** (श्वे. उ. ६-२३)

ज्यांची भगवंताचे ठिकाणी किंवा श्रीगुरुचे ठिकाणी परम प्रेमरूप भक्ति आहे, अशा ज्ञानीभक्तालाच शास्त्रांत सांगितलेल्या शब्दांचे अर्थ समजतात असे श्वेताश्वतरश्रुतींत सांगितले आहे.

**तेव्हां तया महासुखाचेनि भरें। धांवोनि देहाचिये गावांबाहेरें। मिया धाले तेणें उद्‌गारें। लागती गाजों॥ १२५ ॥**

**अर्थ**—तेव्हा त्या भगवत्प्रेमाच्या अत्यंत सुखामुळे ते देहगांवाच्या बाहेर धांवतात आणि माझ्या प्रेमाने आकंठ तृप्त होऊन तृप्तीमुळे येणाऱ्या ढेंकराने गाजूं लागतात.॥ १२५॥

**गूढार्थदीपिका—तेव्हा तया महासुखाचेनि भरें। धांवोनि देहाचियें गांवाबाहेरें**—या चरणांनी भगवद्भक्तांना देहाचें भान, भगवंताच्या परम प्रेमामुळे राहत नाही, हें सुचविलें आहे.

**मियां धाले तेणें उद्गारें। लागती गाजों**—''धालेपणाचे ढेकर। जेविं देती जेवणार। तेविं आनंदाचे उद्गार। अनिर्वाच्य वदवी''॥ ६२॥ (शुकाष्टक)

भोजन करून तृप्त झालेला पुरुष जसे तृप्तीचे ढेंकर देतो, त्याप्रमाणे भगवंताच्या परमप्रेमाने ते परमसुखरूप झाले, हे व्यक्त करणारे अखंड भगवन्नामस्मरणरूप व अखंड गुणवर्णनरूप भक्तिमार्गाचे ढेंकर, ते देत असतात.

**पैं गुरुशिष्यांचिया एकांती। जे अक्षरा एकाचि वदंती। ते मेघाचियापरी त्रिजगतीं। गर्जती सैंघ॥ १२६॥**

**अर्थ**—तसेच गुरूशिष्याच्या एकान्तात, ज्या एका अविनाशी वस्तुविषयींच्या रहस्याची चर्चा होते, ती चर्चा ते भक्त मेघगर्जनेप्रमाणे त्रैलोक्यांत गर्जून सांगतात.॥ १२६॥

**गूढार्थदीपिका**—परब्रह्मस्वरूपाची विशेष चर्चा गुरूंनी शिष्याशीं एकान्तांत करावी, लोकान्तात करूं नये, असा निर्बंध आहे असे बृहदारण्यकोपनिषदांत (३-२-१३) व त्यावरील आचार्यभाष्यांत सांगितलें आहे.

**जैसी कमळकळिका जालेपणें। हृदयींचिया मकरंदातें राखों नेणे। दे राया रंका पारणें। आमोदाचें॥ १२७॥**

**तैसेंचि मातें विश्वीं कथित। कथितेनि तोषें कथूं विसरत। मग तया विसरामाजीं विरत। आंगें जीवें॥ १२८॥**

**अर्थ**—ज्याप्रमाणे कमळाची कळी उमलून विकसित झाली असतां, आपल्या ठिकाणचा सुवास ती गुप्त ठेऊं शकत नाही आणि राजापासून रंकापर्यंत ती आपल्या सुवासाचें भोजन घालते.॥ १२७॥ त्याप्रमाणेच ते ज्ञानीभक्त, सर्व विश्वांत मोकळ्या मनाने, माझ्या गुणादि वर्णनाचे द्वारा, माझ्या सगुण स्वरूपाचे जगांत निरूपण करतात. निरूपण करतां करतां प्रेम दाटून येऊन, ते निरूपण करणेंहि विसरतात व त्यांत जीवभाव व शरीरभावहि विसरतात.॥ १२८॥

**गूढार्थदीपिका—मातें विश्वीं कथित**—भगवंताच्या सगुणस्वरूपांत निर्गुण स्वरूपच सांठविलेंले असतें; म्हणून प्रेमळ ज्ञानीभक्त सगुणभगवंताच्या लीलांचे व स्वरूपाचेंच कथन करीत असतात.

**कथितेनि तोषें कथूं विसरत**—भक्तांना भगवंताच्या गुणकथनाचे इतकें प्रेम असतें, की, ती गुणकथा वर्णन करण्याचा प्रसंग आला असतां, त्यांना परमानंद होतो व गुणकथा वर्णन करतां करतां त्यांची नि:शब्द स्थिति होते.

**मग तया विसरामाजी विरत। आंगें जीवें**—त्याप्रमाणे त्यांना देहभाव व जीवभाव यांचा विसर पडतो म्हणजे त्यांना सगुणस्वरूपाचे ठिकाणीं प्रेमसमाधि लागते—असा अर्थ.

**ब्रह्मानंद हा जाणीवरहित आहे**—म्हणजे ब्रह्मानंद असतो तेव्हा जाणीव स्फुरत नाही किंवा जाणीव स्फुरत नाही तेव्हाच ब्रह्मानंद असतो—हे मागें बृहदारण्यक श्रुतीच्या आधारें सांगितलेंच आहे.

**ऐसें प्रेमाचेनि बहुवसपणें। नाहीं राती दिवो जाणणें। केलें माझें सुख अव्यंगवाणें। आपणपेयां जिहीं॥ १२९॥**

**अर्थ**—अशा नि:सीम प्रेमामुळे त्यांना रात्र व दिवस यांचाहि विसर पडतो व असे ते आपणच आपले ठिकाणी संपूर्ण सुखरूप होऊन राहतात.॥ १२९॥

**गूढार्थदीपिका**—आपणच आपलें ठिकाणी सुखस्वरूप राहणें हीच प्रेमसमाधि होय. मागें पांचव्या अध्यायांतहि माऊलींनी ''तैसें सुखची उरे स्वरूपें। सुरतीं तिये'' या चरणाने सांगितलें आहे.

**तेषां सततयुक्तानां भजतां प्रीतिपूर्वकम्। ददामि बुद्धियोगं तं येन मामुपयान्ति ते॥ १०॥**

**अर्थ**—परम प्रेमाने माझें भजन करीत, माझाशीं अखंड ऐक्य पावलेल्यांना, ते मला अखंड प्राप्त झालेले

राहतील असा बुद्धियोग मी त्यांना देतो—म्हणजे त्यांच्या स्थिर झालेल्या बुद्धीचें मी संरक्षण करतो—आपल्यापासून त्यांची बुद्धि ढळूं देत नाही. ॥ १० ॥

**तयां मग जें आम्हीं कांहीं। द्यावें अर्जुना पाहीं। ते ठायींचीच तिहीं। घेतली सेल॥ १३०॥**

**अर्थ**—मग जी कांही स्थिति, अर्जुना! आम्ही त्यांना प्राप्त करून द्यायची, ती मुळांत असलेली नि:सीम स्थिति त्यांनीच प्राप्त करून घेतली असते, पहा. ॥ १३० ॥

**कां जे ते जिया वाटा। निगाले गा सुभटा। ते सोय पाहोनि अव्हांटा। स्वर्गापवर्ग॥ १३१॥**

**अर्थ**—कारण थोर योद्धया अर्जुना! ते ज्या मार्गाने जायला निघाले, त्या मार्गाची सुखरूपता पाहिली असतां स्वर्ग व मोक्ष ह्या आडवाटा ठरतात. ॥ १३१ ॥

**गूढार्थदीपिका**—सगुण भगवंताच्या परम प्रेमाने प्राप्त होणाऱ्या जाणीवरहित परमानंदरूपमोक्षांच्या दृष्टीने, ब्रह्मैक्यजाणीवरूप मोक्षाला येथे आडमार्ग म्हटलें आहे, त्यावरून जाणीवेमुळे अत्यंत समरस असें ब्रह्मैक्य होत नाही. हेंच माउलींनी सुचविलें आहे.

**म्हणोनि तिहीं जें प्रेम धरिलें। तेंचि आमुचें देणें उपाइलें। परि आम्हीं देयावें हेंहि केलें। तिहींचि म्हणियें॥ १३२॥**

**अर्थ**—म्हणून भक्तांनी जें प्रेम धरलें, तें आमचें देणें होय असें प्रसिद्ध झालें, पण प्रेम आम्ही द्यायचें असतें, हेहि त्यांनीच रूढ केलें, असें म्हणावे लागतें. ॥ १३२ ॥

**गूढार्थदीपिका**—भक्तांचे ठिकाणीं भगवंताविषयीं जें प्रेम असते, ते मी दिले नाही, भक्तानेच माझ्या ठिकाणीं तसें प्रेम धरलें आहे, असे भगवंताला निरहंकारतेमुळे वाटतें आणि भक्तहि तसेच, मी भगवंतावर प्रेम करतो असा त्याचे ठिकाणी लेशमात्र अहंकार उत्पन्न न होतां भगवंतांनी प्रेम द्यावे, अशी भगवंतापाशीं अखंड याचना करीत असतो. माझें हातीं आहे करावें चिंतन। तुम्ही कृपादान प्रेम द्यावें'' (तु. गा. ८२७)

वास्तविक भगवच्चिंतनाचा प्रयत्न भगवत्प्रेमामुळेच होणें शक्य आहे, पण तुकाराम महाराजांना प्रेमामुळे त्याची जाणीव न होतां ते प्रेमाची याचना करीत आहेत.

भगवच्चिंतन करणें, माझें ठिकाणीं प्रेम नाही असे समजणें व त्या प्रेमाकरितां तळमळणें व भगवंतापाशीं प्रेमाची याचना करणें हे एका प्रेमाचेच प्रकार आहेत आणि या प्रकारांनीच भक्तांचें प्रेम व्यक्त होत असतें किंवा असा हा भक्ताने भगवंताविषयीं धरलेल्या प्रेमाचा प्रकार असतो.

**आतां यावरी येतुलें घडे। जें तेंचि सुख आगळें वाढे। आणि काळाची दिठी न पडे। हें आम्हां करणें॥ १३३॥**

**अर्थ**—आतां यानंतर एवढे व्हावें की, त्यांचे माझे ठिकाणी असलेलें प्रेम नि:सीम वाढेल आणि कालांतरानेहि तें प्रेम क्षीण होणार नाही, इतकेच आम्हांला करायचे असते. ॥ १३३ ॥

**गूढार्थदीपिका**—प्रेमळ भक्त भगवंताचें जे निष्काम प्रेम करतो, ते प्रेमाचें ऋण समजून, त्यांतून उत्तीर्ण होण्याकरितां, संपूर्ण जीव-प्राण्यांचा अधिष्ठानभूत असलेला सर्वसमर्थ परमात्मा, भक्ताच्या ठिकाणी प्रेमाच्या जाणीवेचा किंवा मी प्रेम करतों असा प्रेमाला क्षीण करणारा किंवा नाहीसा करणारा अहंकार उत्पन्न न होऊं देतां, आपल्या भक्ताचें प्रेम वाढवितो.

**लळेयाचिया बाळका किरीटी। गवसणी करूनि स्नेहाचिया दिठी। जैसी खेळतां पाठोपाठीं। माउली धांवे॥ १३४॥**
**तें जो जो खेळ दावी। तो तो पुढें सोनयाचा करूनि ठेवी। तैसी उपास्तीची पदवी। पोषित मी जायें॥ १३५॥**
**जिये पदवीचेनि पोषकें। ते मातें पावती यथासुखें। हे पाळती मज विशेखें। आवडे करूं॥ १३६॥**

**अर्थ**—अर्जुना! अत्यंत लाडक्या मुलाला, आई आपल्या प्रेमळ दृष्टीची खोळ करून, मूल खेळत असतां जशी ती त्याच्या पाठीमागें धांवत असते. ॥ १३४ ॥ व तें लाडकें मूल जो जो खेळ बोटाने दाखवून मागेल, तो तो खेळ ती तान्हुल्याच्या स्वाधीन, ज्या प्रमाणे, करते, त्याप्रमाणे मीहि आपल्या भक्ताच्या भक्तिप्रेमाच्या नि:सीम भूमिकेचें संरक्षण करीत असतो. ॥ १३५ ॥ ज्या प्रेमस्थितीचें पोषण केलें असतां ते मला सुखाने प्राप्त होतील, अशा रीतीने तिचें पालन-पोषण करणें, हेंच मला विशेषत: आवडतें. ॥ १३६ ॥

**गूढार्थदीपिका—मातें पावती यथासुखें**—परमेश्वर जसा सदेह असीम ब्रह्मसुखाची मूर्ति आहे, तसेच भक्तहि सदेह असीम सुखाची मूर्ति होऊन राहतात.

**पैं गा भक्तांसि माझें कोड। मज तयाचे अनन्यगतीची चाड। कां जें प्रेमळांचें सांकड। आमुचिया घरीं॥ १३७॥**

**अर्थ**—असो पण बा अर्जुना! भक्ताला माझे अत्यंत प्रेम असतें व मलाहि त्याच्या अनन्यतेची गोडी असते. कारण आमच्या घरीं—म्हणजे माझ्या सगुण स्वरूपाचे ठिकाणी नि:सींम प्रेम करणाऱ्या प्रेमळ भक्ताचाच दुष्काळ आहे. ॥ १३७ ॥

**गूढार्थदीपिका—प्रेमळाचें सांकड। आमुचिया घरीं**—माझें सगुणस्वरूपहि पूर्ण ब्रह्म आहे. म्हणून माझ्या सगुण स्वरूपाच्या प्रेमभक्तीने सर्वच साधते, हें जाणून, केवळ माझ्या सगुण स्वरूपाचें प्रेम करणारे प्रेमळ भक्त दुर्मिळ असतात, असा अर्थ.

**पाहें पां स्वर्ग मोक्ष उपायिले। दोन्ही मार्ग तयांचिये वाहणी केले। आम्ही आंगही शेषा वेंचिलें। लक्ष्मीयेसी॥ १३८ ॥**

**अर्थ**—हे पहा अर्जुना! स्वर्ग व मोक्ष हे दोन मार्ग मी प्रगट केलें असून, ते दोन्ही मार्ग त्यांच्या—म्हणजे माझी सकाम व निष्काम उपासना करणाऱ्यांच्या—आचरणांच्या प्रवाहांत ठेविले. आणखी लक्ष्मीसह त्यांच्या कामना पूर्ण करण्याकरितां शरीरहि झिजविलें. ॥ १३८ ॥

**गूढार्थदीपिका—पाहें पां स्वर्ग मोक्ष उपायिले। दोन्ही मार्ग तयांचिये वाहणी केले**—कर्ममिश्र व शुद्धप्रेमरूप अशी दोन प्रकारची भक्ति आहे. कर्ममिश्रभक्तीला गौणभक्ति म्हणतात ती गौणभक्ति सकाम व निष्काम अशी दोन प्रकारची आहे. सकाम गौणभक्तीने स्वर्ग मिळतो व निष्काम गौणभक्तीने ज्ञानजन्य मोक्ष मिळतो, असा अर्थ.

**आम्हीं आंगही शेषा वेंचिलें। लक्ष्मियेसि**—सकाम सगुणभक्ताचे सर्व मनोरथ भगवान लक्ष्मीसह जातीने स्वत: पूर्ण करतो.

**परि आपणपेंवीण जें एक। तें तैसेंचि सुख साजुक। सप्रेमळांलागीं देख। ठेविलें जतन॥ १३९ ॥**

**अर्थ**—पण मीपणाचे जाणीवेवांचून असणारे व न विटणारें असें जें केवळ प्रेमसुख आहे, तें तसेच आपल्या प्रेमळ भक्ताला देण्याकरितां जपून ठेविलेंले असतें. ॥ १३९ ॥

**गूढार्थदीपिका**—प्रेमळ भक्त अखंड अविनाशी, सच्चिदानंदी अशा सगुण स्वरूपाशीं ऐक्य पावून राहतात असा भाव.

**हा ठायवरी किरीटी। आम्ही प्रेमळु घेवों आपणयासाठीं। या बोलीं बोलिजत गोष्टी। तैसिया नव्हती गा॥ १४० ॥**

**अर्थ**—अर्जुना! आम्ही आपल्या प्रेमळ भक्तावर आपल्यासाठीच इतकें प्रेम करतो, पण ह्या, शब्दाने सांगण्यासारख्या गोष्टी नव्हेत. ॥ १४० ॥

**गूढार्थदीपिका—आम्ही प्रेमळ घेवों। आपणयासाठीं**—ज्या प्रमाणे वाऱ्याने पाण्यावर लाट उठली असतां, ती दुसऱ्या लाटेला उत्पन्न करते, त्याप्रमाणे अविद्याउपाधिमुळे जीवाचे ठिकाणी ''देहोऽहं'' इत्यादि विपरीतवृत्तीचें जे स्फुरण आहे, त्याच्या अपेक्षेने परमेश्वराचे ठिकाणी ''अहं ब्रह्मास्मि'' इत्यादि विद्यावृत्तीचें स्फुरण होतें, त्यामुळें त्याची जाणीव झाल्यास अखंड ब्रह्मानंदाला खंड पडण्याचा संभव असतो, पण भक्ताचे अंत:करणांत भगवंताविषयीं जे नि:सीम प्रेम असतें, त्याच्या अपेक्षेने भगवंताच्या अंत:करणातहि आपल्या भक्ताचें नि:सीम प्रेम स्फुरतें व त्यामुळेच भगवंताला ''अहं ब्रह्मास्मि'' वृत्तीची जाणीव उत्पन्न होत नाही व त्याचा ब्रह्मानंद खंडित होत नाही. हेच माऊलींनी ''आपणयासाठी'' या पदाने सुचविलें आहे.

**तेषामेवानुकम्पार्थमहमज्ञानजं तम:। नाशयाम्यात्मभावस्थो ज्ञानदीपेन भास्वता॥ ११ ॥**

**अर्थ**—सर्वस्वीं माझ्या ठिकाणी अनन्य झालेल्या भक्तांवर कृपा करण्याकरितां, त्यांच्या अंत:करणांत राहूनच, त्यांचा अविवेकरूपी अंध:कार, मी आपल्या प्रकाशमान ज्ञानदीपाने नाहीसा करतों. ॥ ११ ॥

**म्हणोनि मज आत्मयाचा भावो। जिहीं जियावया केला ठावो। एक मीवांचूनि वावो। येर मानिलें जिहीं॥ १४१ ॥**

**तयां तत्त्वज्ञां चोखटां। दिवी पोतासाची सुभटा। मग मीचि होऊनि दिवटा। पुढां पुढां चाले॥ १४२॥**

**अर्थ**—(अर्जुना!) मज सगुणस्वरूप झालेल्या आत्माचें प्रेम, हेच ज्यांनी आपल्या जिवंत राहण्याचें ठिकाण केलें आणि माझ्यावांचून जेवढे कांही आहे असें वाटतें, तें सर्व खोटें मानलें.॥ १४१॥ हे उत्तम योद्ध्या अर्जुना! या त्याच्या यथार्थ-विवेक-ज्ञानरूप कापराच्या अल्पज्योतीचा, मग मीच मोठा टेंभा होऊन पुढें पुढें चालतो.॥ १४२॥

**गूढार्थदीपिका**—श्री माऊलींनी या ओवींतून निर्गुण साक्षात्कार व सगुण साक्षात्कार यांत काय फरक आहे हे दाखविलें आहे.

**दिवी पोतासाची**—आत्मानात्मरूप व्यतिरेकज्ञानाने जो अहं ब्रह्मास्मि म्हणून निर्गुण स्वरूपाचा आत्मसाक्षात्कार होतो, तो, कापराच्या अल्पजोतिप्रमाणे अल्पप्रकाश देणारा आहे—म्हणजे सर्वत्र एक अद्वितीय सच्चिदानंद परब्रह्मच भरले असतांना, भगवान व नामरूपात्मक जगत् अशा दोन सत्य वस्तु आहेत असा जो भेद, अज्ञानाने मानला जात असतो, तो तो आत्मज्ञानाने नाहीसा झाला, तरी आत्मरूपाने मी, सत्य असून व नामारूपात्मक जगत् मिथ्या आहे, असा अविद्यालेशरूप सत्यमिथ्यात्वाचा भेद, ज्ञान्याचे ठिकाणी उरत असतो. ''सर्वं खल्विदं ब्रह्म'' या श्रुतींत सांगितल्याप्रमाणे एका पूर्ण अद्वैत सच्चिदानंदाचाच बोध राहत नाही, म्हणून व्यक्तिरेकाने होणाऱ्या ''अहं ब्रह्मास्मि'' अज्ञानाला ''पोतासाची दिवी'' असे माऊलींनी म्हटलें आहे.

**मीचि होऊनि दिवटा**—पुढे, व्यतिरेक ज्ञानानंतर उरलेला अविद्यालेशरूप सत्यमिथ्यात्वाचा भेद नाहीसा होऊन ''खल्विदं ब्रह्म'' या श्रुतींत सांगितल्याप्रमाणे नामरूपासह एक अद्वैत पूर्ण सच्चिदानंद परब्रह्मच आहे, असा व्यापक अनुभव, रामकृष्णादि सगुण साकार स्वरूपाच्या प्रेमभक्तीनेच येतो, हेंच माऊलींनी ''मीचि होऊनि दिवटा। पुढां पुढां चालें'' या चरणाने सांगितलें आहे.

**अज्ञानाचिये राती-। माजी तमाची मिळणी दाटती। ते नाशूनि घालीं परौती। करीं नित्योदयो॥ १४३॥**

**अर्थ**—आत्मविस्मृतिरूप अज्ञानाचे रात्रीमध्ये नानाप्रकारच्या अज्ञानरूप अंध:काराच्या मिळणीची दाटी होत असते; ती नि:शेष नाहीशी करून, मी भक्ताचे ठिकाणी नित्य अशा ज्ञानरूप प्रकाशाचा उदय करून देतों.॥ १४३॥

**गूढार्थदीपिका**—सगुणाच्या भक्तिवांचून केवळ शमदमादि साधनसंपत्तीच्या साह्याने आत्मज्ञान होणे अत्यंत कठीण आहे; हें मागें सांगितलेंच आहे व तें झालें तरी नुसते शाब्दिक किंवा आनुमानिकच राहते. पण भक्तीच्या साह्याने झालेलें ज्ञान मात्र सूर्याप्रमाणे अपरोक्ष व अखंड प्रकाशरूप असतें, श्री नाथांनीहि ''शब्दज्ञानाची व्युत्पत्ति। दाटुगी होय लौकिकस्थिति। माया निवर्तक ज्ञानप्राप्ति। न करतां हरिभक्ति कदा नुपजे॥ ३१०॥ (ए. भा. अ. २)'' ''ज्ञान साधावयां लागीं जाण। कष्टावे न लगे गा आपण। सप्रेम करितां माझे भजन। दवडितां ज्ञान। घर रिघे''॥ १३६॥ (ए. भा. अ. २०) ''ऐसें श्रेष्ठ जें ब्रह्मज्ञान। तें भक्तीचें पोषण जाण। न करितां भगवद्भजन। ब्रह्मज्ञान कदा नुपजे॥ ४६७॥ (ए. भा. अ. २)'' या ओव्यांतून हाच भाव प्रगट केला आहे.

*अर्जुन उवाच*

**परं ब्रह्म परं धाम पवित्रं परमं भवान्। पुरुषं शाश्वतं दिव्यमादिदेवमजं विभुम्॥ १२॥**

**अर्थ**—अर्जुन म्हणतो, भगवंता! तूंच परब्रह्म आहेस, तूंच परमधाम म्हणजे शेवटीं प्राप्त होणारी गति आहेस. अत्यंत पवित्र तूंच आहेस. शाश्वत, दिव्य, आदिदेव, जन्मरहित व व्यापक असा पुरुष तो तूंच आहेस.॥ १२॥

**ऐसें प्रेमळाचेनि प्रियोत्तमें। बोलिलें जेथ पुरुषोत्तमें। तेथ अर्जुन मनोधर्मे। निवालों म्हणतसे॥ १४४॥**
**हां हो जी अवधारा। भला केरु फेडिला संसारा। जाहलों जननीजठरजोहरा-। वेगळा प्रभू॥ १४५॥**

**अर्थ**—याप्रमाणे सर्व प्रेमळ भक्तांचा प्रियतम जो परमात्मा श्रीकृष्ण, त्याने अर्जुनाला असे म्हटलें असतां अर्जुन म्हणतो, देवा! माझें मन अत्यंत समाधान पावलें आहे.॥ १४४॥ अहो जी भगवंता! ऐका. माझ्या अंत:करणांत जो संसाररूपी केरकचरा सांचला होता, तो तुम्ही झाडून नाहीसा केला, म्हणून आज मी आईच्या जठररूपी लाक्षागृहांतून मुक्त झालों म्हणजे जन्ममरणापासून मुक्त झालो.॥ १४५॥

**गूढार्थदीपिका—भला केरू फेडिला संसारा**—जड विनाशीं पांचभौतिक अशी एक संसार वस्तु आहे ही विपरीत समजूत नाहीशी केली.

**जी जन्मलेपण आपुलें। हें आजि मियां डोळां देखिलें। जीवित हाता चढलें। आवडेतैसें॥ १४६॥**

**अर्थ**—हे श्रीकृष्ण प्रभो! आज मी आपल्या डोळ्यांनी आपला जन्म पाहिला आणि वाटेल तसें आयुष्य माझ्या हातीं आलें—म्हणजे मी जन्ममरणरहित अविनाशीस्वरूप झालों. ॥ १४६ ॥

**गूढार्थदीपिका—जन्मलेपण आपुलें। हें आजि मियां डोळां देखिलें**—मी अविनाशी सच्चिदानंदस्वरूप आहे हे विसरल्यामुळे अज्ञानाने जन्माचा अनुभव घेत होतो—किंवा माझा पांचभौतिक देह नाहीसा होऊन, आज मी सच्चिदानंदरूप देहाने जन्मास आलो असे पाहिलें.

**जीवित हाता चढलें**—माझ्या देहाला जन्ममरण राहिले नाही असा अर्थ.

**आजि आयुष्या उजवण जाहली। माझिया दैवा दशा उदयली। जे वाक्यकृपा लाधली। दैविकेनि मुखें॥ १४७॥**

**अर्थ**—देवाच्या मुखाने माझ्यावर बोधामृतरूपी वचनाची कृपा झाली; म्हणून तें वचन ऐकून आज माझ्या आयुष्याची सफलता झाली व माझ्या दैवाच्या भाग्यदशेस प्रारंभ झाला. ॥ १४७ ॥

**आतां येणें वचनतेजाकारें। फिटलें आंतील बाहेरील आंधारें। म्हणोनि देखतसें साचोकारें। स्वरूप तुझें॥ १४८॥**

**अर्थ**—आतां तुझ्या या वचनाच्या अर्थरूप ज्ञानप्रकाशाने आंतील व बाहेरील अज्ञान-अंध:कार नाहीसा झाला, म्हणून आतां तुझें खरें स्वरूप मी पाहात आहे. ॥ १४८ ॥

**गूढार्थदीपिका—फिटलें आंतील बाहेरील आंधारें**—भगवंताच्या वाक्याने अर्जुनाचे अंत:करणांतील ''मी ब्रह्म नाही'' व ''मला ब्रह्म दिसत नाही'' असा दोन्ही प्रकारचा हृदयांतील आवरणात्मक अज्ञानांध:कार व ''मी देह आहे'' व ''नामरूपात्मक जगत् आहे'' हा बाहेरील आवरणासह असणारा विक्षेप अंध:कार नाहीसा झाला.

**म्हणोनि देखतसें साचोकारें। स्वरूप तुझें** ''पुरुष एवेदं विश्वम्'' (मुं. २-१-१०) या श्रुतींत व त्यावरील भाष्यांत ''न विश्वं नाम पुरुषादन्यत्किंचिदस्ति'' या भाष्यपंक्तींत संपूर्ण नामरूपात्मक सर्व विश्वच खरोखर ब्रह्मस्वरूप आहे असे जेथे म्हटलें आहे, तेथे भगवंताचा सगुणविग्रह पूर्ण ब्रह्मस्वरूप नाही असे कोणत्या ज्ञान्याला म्हणतां येईल?

नामरूपें सोडून ''विश्व'' हा शब्द लागू होत नसल्यामुळे येथें ''विश्व'' या शब्दाने ''नामरूपें'' हाच अर्थ घेतला पाहिजे म्हणजे नामरूपासहित पूर्णब्रह्म आहे असाच श्रुति व त्यावरील आचार्यांच्या भाष्याचा अर्थ आहे.

**तरी होसी गा तूं परब्रह्म। जें या महाभूतां विसंवतें धाम। पवित्र तूं परम। जगन्नाथा॥ १४९॥**

**तूं परम दैवत तिहीं देवां। तूं पुरुष जी पंचविसावा। दिव्य तूं प्रकृतीभावा-। पैलीकडील॥ १५०॥**

**अर्थ**—ज्या ठिकाणीं संपूर्ण महाभूतें विश्राम पावतात तें परब्रह्म तूंच आहेस. हे जगन्नाथा! तूं अत्यंत पवित्र आहेस. ॥ १४९ ॥ ब्रह्मा, विष्णु, महेश्वर या तिन्ही देवांचे श्रेष्ठ दैवत तूंच आहेस. सांख्यांचा पंचविसावा असंग पुरुष तूंच आहेस आणि प्रकृतीच्या पलीकडे जी दिव्य तेजोमय वस्तु सांगितली आहे, तीहि तूच आहेस. ॥ १५० ॥

**गूढार्थदीपिका—तूं परम दैवत तिहीं देवा**—ब्रह्मा, विष्णु, महेश्वर हे कार्यब्रह्म असून भगवान श्रीकृष्ण कारणब्रह्म म्हणजे पूर्णब्रह्म आहे असे या चरणांत दाखविलें आहे.

**तूं पुरुष जी पंचविसावा। दिव्य तूं प्रकृतीभावा-पैलीकडील**—आणि सांख्यशास्त्रांच्या मते प्रकृतिसह चोविस तत्वांच्या पलिकडे असणारा जो पंचविसावा निर्गुण पुरुष तो भगवान श्रीकृष्ण आहे, असे सांगून भगवान श्रीकृष्णाच्या सगुण स्वरूपाचें व पंचविसाव्या निर्गुण स्वरूपाचें ऐक्य दाखविलें आहे. तसेच भगवंताचें सगुणस्वरूप कारणब्रह्म कां समजावें याचे ''प्रकृति-पैलीकडील'' म्हणून कारणहि दिलें आहे.

**अनादिसिद्ध तूं स्वामी। जो नाकळिजसी जन्मधर्मीं। तो तूं हें आम्हीं। जाणितलें आतां॥ १५१॥**

**अर्थ**—प्रभो श्रीकृष्णा! तू अनादि व स्वत:सिद्ध ब्रह्मांडाचा स्वामी आहेस. तूं जन्मादिधर्मांत सांपडत नाहीस-म्हणजे तुला जन्मादिक नाहीत असा तूं आहेस, हें आज मी आतां जाणलें. ॥ १५१ ॥

**गूढार्थदीपिका—हे अनादिसिद्ध तूं स्वामी। जो नाकळिजसी जन्मधर्मी**—परमेश्वराचे रामकृष्णादि अवतार विग्रही अनादिसिद्धच असतात. त्यांना जन्म-मरण नाही असे महावराह पुराणांत ''सर्व नित्या: शाश्वताश्च देहास्तस्य परात्मन:'' या श्लोकांत सांगितले आहे. भगवान रामकृष्णादिकांचा जन्म झाला, असा अज्ञानी लोकांना, त्यांच्या अज्ञानामुळे भ्रम होतो. वास्तविक अज्ञानी लोकांप्रमाणे परमेश्वराचा जन्म होत नाही हे मागें चवथ्या अध्यायांतील ६ व्या श्लोकावर आचार्यांच्या भाष्याधारें आम्ही स्पष्ट केलेंच आहे.

**तूं या कालयंत्रासि सूत्री। तूं जीवकळेची अधिष्ठात्री। तूं ब्रह्मकटाहधात्री। हें कळलें फुडें॥ १५२॥**

**अर्थ**—तूं कालरूपी यंत्राचा सूत्रधार आहेस. तूं या जीवरूपी चैतन्यांशाला अधिष्ठान आहेस. तूंच या सर्व ब्रह्मांडाला धारण करणारा आहेस हें मला स्पष्ट कळून आलें. ॥ १५२ ॥

**गूढार्थदीपिका**—पुन: या ओवींतहि ''तूं कालयंत्रासि सूत्री'' ''जीवकळेची अधिष्ठात्री'' ''ब्रह्मकटाहधात्री'' या विशेषणांनी माऊलींनी भगवंताच्या श्रीकृष्णस्वरूपाचें कारणब्रह्मत्वच प्रतिपादिले आहे.

**हें कळतें फुडें**—उपासना कारणब्रह्माचीच होते. उपास्य कार्यब्रह्म—म्हणजे मर्यादित सामर्थ्यानी युक्त-आहे असे त्याचें ज्ञान असल्यास, त्या ठिकाणीं कारणब्रह्माची भावना म्हणजे तें कारणब्रह्मच आहे, अशी भावना करून उपासना करावी लागते. असे ''ब्रह्मदृष्टिरुत्कर्षात्'' (ब्र. सू. ४-१-५) या सूत्रांत सांगितले आहे. आणि ही कार्यब्रह्माची उपासना होते हे कशावरून समजायचे हेहि तेथेच स्पष्ट केलें आहे.

**उपास्य कारणब्रह्म असल्यास**—म्हणजे अनुभवजन्य ज्ञानाने तें अगाध सामर्थ्यादि गुणांनी युक्त पूर्णब्रह्म आहे. असे कळून आल्यास-तेथे 'ब्रह्मभावना' करावी लागत नाही आणि ती करायला सांगितलीहि नाही. येथे भगवंताचे श्रीकृष्णस्वरूप पूर्णब्रह्म आहे असा स्वत:चा अनुभव अर्जुन सांगत आहे हें ''कळलें फुडें'' या पदावरून स्पष्ट होतें. म्हणून अर्जुनाने श्रीकृष्णस्वरूपाचे ठिकाणीं ब्रह्मभावना करून हे श्रीकृष्णस्वरूपांचे वर्णन केलें आहे, असे म्हणतां येत नाही.

**आहुस्त्वामृषय: सर्वे देवर्षिर्नारदस्तथा । असितो देवलो व्यास: स्वयं चैव ब्रवीषि मे॥ १३ ॥**

**अर्थ**—देवा! सर्व ऋषी, देवर्षि नारद, त्याचप्रमाणे असित देवल, व्यास हे सर्व तुझ्याविषयीं असेच सांगत असत आणि प्रत्यक्ष तूंहि आपल्याविषयीं असेच मला सांगत असतोस. ॥ १३ ॥

**पैं आणिकही एके परी। इयेचि प्रतीतीची येतसे थोरी। जे मागें ऐसेंचि ऋषीश्वरी। सांगीतलें तूंतें॥ १५३॥**
**परि तया सांगितलियाचें साचपण। हें आतां माझे देखतसे अंत:करण। जे कृपा केली आपण। म्हणोनि देवा॥ १५४॥**
**येऱ्हवीं नारदु अखंड जवळां ये। तोही ऐसीचि वचनें गाये। परि अर्थ न बुजोनि ठाये। गीत सुखचि ऐकों॥ १५५॥**
**हां गा आंधळेयांच्या गांवीं। आपणपें प्रगटले रवीं। तरि तिहीं वोतपलीचि घ्यावी। वांचूनि प्रकाशु कैंचा॥ १५६॥**
**परि देवर्षिही अध्यात्म गातां। आहाच रागांगेंसी जे मधुरता। तेचि फावे येर चित्ता। नलगेचि कांहीं॥ १५७॥**
**पैं असिता देवलाचेनहि मुखें। मी एवंविधा तूंतें आइकें। परि तैं बुद्धी विषयविखें। घारिली होती॥ १५८॥**
**विषयविषाचा पडिपाडू। गोड परमार्थु लागे कडू। कडू विषय तो गोडू। जीवासी जाहला॥ १५९॥**

**अर्थ**—तुझ्या वाक्याने जो अनुभव आला त्याची आणखीहि एका दृष्टीने थोरवी माझ्या अनुभवास आली कारण मागें मोठमोठ्या ऋषींनी असेच तुझ्याविषयीं सांगितलें होतें. ॥ १५३ ॥ पण त्या सांगितलेल्याची सत्यता, आज माझ्या अंत:करणाला पटली; याचें कारण, देवा! आपण माझ्यावर कृपा केली हें होय. ॥ १५४ ॥ नाहीं तरी नारदमुनि नेहमी आमचेकडे येत असत. तेहि अशारीतीने तुझे वर्णन करीत असत; पण त्यावेळीं त्यांच्या वचनांचा अर्थ न समजतां तुझ्या गायनाचें सुखच आम्हांला प्राप्त होत असे. ॥ १५५ ॥ अहो जी भगवंता! आंधळ्यांच्या गावांत जर सूर्य आपण होऊन प्रकाशित झाला तर त्या आंधळ्यांना सूर्याची कोंवळी ऊनच घेतां येईल. त्याशिवाय प्रकाश मिळणें कसें शक्य

आहे ?॥ १५६॥ त्याप्रमाणेच देवर्षि नारदमुनि देखील तुझ्या अध्यात्मस्वरूपाचेंच वर्णन करीत असत; पण त्या वर्णनाला रागरागिणीमुळे जी वरवर गोडी येत होती, तिचाच आमच्या चित्ताला लाभ होत होता, दुसरा कोणताहि लाभ होत नव्हता. ॥ १५७॥ तसेंच असित, देवल, या ऋषीच्या मुखाने असेच तुझें वर्णन आम्ही ऐकत असूं; पण त्यावेळीं आमचें अंत:करण विषयरूपी विषानें व्यापिलें होतें. ॥ १५८॥ विषयरूपी विषाचा एवढा प्रताप आहे की जीवाला, परमार्थ गोड असून कडू वाटतो व विषय कडू असूनहि गोड वाटतात. ॥ १५९॥

**गूढार्थदीपिका**—जोपर्यंत विषयसुखाचें प्रेम असतें, तोपर्यंत ब्रह्मबोधाकडे जीवाची प्रवृत्तिच होत नाही, असा अर्थ.

**आणि हें आणिकांचें काय सांगावें। राउळा आपणचि येऊनि व्यासदेवें। तुझें स्वरूप आघवें। सर्वदा सांगिजे॥ १६०॥**

**परि तो अंधारीं चिंतामणि देखिला। जेवीं नव्हे या बुद्धी उपेक्षिला। पाठीं दिनोदयीं वोळखिला। होय म्हणोनि॥ १६१॥**

**तैसीं व्यासादिकांची बोलणीं। तिया मजपाशीं चिद्रत्नांचिया खाणी। परि उपेक्षिल्या जात होतिया तरणी। तुजवीण कृष्णा॥ १६२॥**

**अर्थ**—भगवंता! दुसऱ्याचें कशाला सांगूं! पुष्कळदां स्वत: भगवान व्यासांनी आमच्या राजवाड्यांत येऊन तुझ्या स्वरूपाचें सदा संपूर्ण वर्णन करीत असावें. ॥ १६०॥ पण ज्याप्रमाणे आंधारांत चिंतामणि पडला असतां तो चिंतामणि नव्हे या बुद्धीने उपेक्षा होते. नंतर उजाडल्यावर, तो चिंतामणिच होय असा ओळखला जातो. ॥ १६१॥ त्याप्रमाणे व्यासादिकाचीं बोलणीं म्हणजे मला प्राप्त झालेल्या चैतन्यरूपी रत्नांच्या खाणीच होत्या; पण हे श्रीकृष्णा! तुझ्या सूर्यप्रकाशाच्या अभावीं त्यांची उपेक्षाच होत होती. ॥ १६२॥

**सर्वमेतदृतं मन्ये यन्मां वदसि केशव । न हि ते भगवन्व्यक्तिं विदुर्देवा न दानवा:॥ १४॥**

**अर्थ**—हे भगवंता! केशवा! तू जें मला सांगतोस तें सर्व खरें आहे. तुझ्या या व्यक्त सगुण श्रीकृष्णस्वरूपाचा महिमा, देव, दानव यापैकीं कोणीहि जाणूं शकत नाहीत. ॥ १४॥

**ते आतां वाक्यसूर्यकर तुझे फांकले। आणि ऋषींनी मार्ग होते जे कथिले। तयां आघवयांचेंचि फिटलें। अनोळखपण॥ १६३॥**

**• जी ज्ञानाचें बीज तयांचे बोल। माझिये हृदयभूमिके पडिले सखोल। वरि इये कृपेची जाहाली वोल। म्हणोनि संवादफळेंसी उठलें॥ १६४॥**

**अर्थ**—तेंच आतां तुझें वाक्यरूपी सूर्यकिरण माझ्या अंत:करणांत फांकल्यामुळे पूर्वी ऋषींनी जे मार्ग सांगून ठेविले आहेत त्या सर्वांची आज ओळख पटली—म्हणजे त्यांनी जे तुझ्या स्वरूपाचें पूर्ण ब्रह्मत्वाने वर्णन केलें होतें, तें सर्व यथार्थ होतें, याचा आज मला अनुभव आला. ॥ १६३॥ देवा! त्या ऋषीचें बोलणें हें आत्मज्ञानाचे बीज होय. तें माझ्या हृदयरूपी भूमींत खोल पडलें व त्यावर तुझ्या कृपेचा ओलावा मिळाल्यामुळे तें बीज अंकुरित होऊन, तें सर्व संवादरूपी यथार्थबोधाने फलद्रूप झालें. ॥ १६४॥

**गूढार्थदीपिका**—परमेश्वर कृपेने व श्रीगुरुच्या मुखाने जोपर्यंत अद्वैत आत्मस्वरूपाचें यथार्थ ज्ञान होत नाही, तोपर्यंतच निरनिराळीं शास्त्रें करणाऱ्या ऋषींच्या वचनांत विरोध दिसून पडतो. अद्वैत आत्मस्वरूपाचें ज्ञान झाल्यावर आत्म्याचे ठिकाणीं सर्व विरोधी वाक्यांची साक्षात् किंवा परंपरेने एकवाक्यता आहे असे कळून येतें, असा भाव.

"**सर्वेषां च प्रस्थानकर्तृणा मनीनां विवर्तवादपर्यवसानेनाद्वितीये परमेश्वरे एव वेदान्तप्रतिपाद्ये तात्पर्यम्। न हि ते मुनयो भ्रान्ता: सर्वज्ञात्वात्तेषाम्**" सर्व दर्शनकार भगवत्कृपेने सर्वज्ञ होते, भ्रांत नव्हते. म्हणून त्यांनी रचलेल्या दर्शनांचे साक्षात् किंवा परंपरेने एका भगवंताचे ठिकाणीच पर्यवसान आहे, असेच मधुसुदन सरस्वतीनींहि महिम्नस्तोत्रावरील आपल्या टीकेंत म्हटलें आहे. विद्यारण्य स्वामींनीहि हाच भाव आपल्या सूतसंहितेवरील टीकेंतून व्यक्त केला आहे.

**अहो नारदादिकां संतां। त्यांचिया उक्तिरूप सरिता। मी महोदधी जाहालों अनंता। संवादसुखाचा॥ १६५॥**

**प्रभु आघवेनि येणें जन्में। जियें पुण्यें केलीं मियां उत्तमें। तयांची न ठकतीचि अंगीं कामें। सद्‌गुरू तुवां॥ १६६॥**

**अर्थ**—देवा! नारदादि संतांच्या वचनरूप नद्यांना मी एकवाक्यतारूप संवादसुखाचा समुद्र झालों. ॥ १६५॥ देवा! या आणि मागील सर्व जन्मांत जेवढे कांही निष्काम पुण्य केले असेल त्यांचें, सद्‌गुरुप्राप्ति हें जें फळ, तें कधीं होत नाही असे नाही. म्हणूनच तूं मला सद्‌गुरु प्राप्त झालास. ॥ १६६॥

**गूढार्थदीपिका**—अनेक जन्मांतील निष्काम पुण्यकर्माचरण हें सद्‌गुरुच्या प्राप्तीचें साधन असतें, असा भाव.

**एऱ्हवीं वडिलवडिलंचेनि मुखें। मी सदा तूंतें कानीं आइकें। परि कृपा न किजेचि तुवां एकें। तंव नेणवेचि कांहीं॥ १६७॥**
**म्हणोनि भाग्य जैं सानुकूळ। जालिया केले उद्यम सदा सफळ। तैसें श्रुताधीत सकळ। गुरुकृपा साच॥ १६८॥**

**अर्थ**—वस्तुत: वाडवडिलांच्या मुखाने मी तुझ्या स्वरूपाचा महिमा सदा कानाने ऐकत होतो, पण जोपर्यंत तुझी कृपा झाली नव्हती, तोपर्यंत मला तुझा महिमा कळूं शकला नाही. ॥ १६७ ॥ म्हणून ज्याप्रमाणे आपलें दैव जेव्हा अनुकूल होतें तेव्हा केलेले सर्व प्रयत्न सफळ होंतात, त्याप्रमाणे श्रीगुरुकृपेनेच संपूर्ण श्रवण व पठण केलेल्या वचनांचा यथार्थ बोध होतो. ॥ १६८ ॥

**गूढार्थदीपिका—तैसें श्रुताधीत सकळ। गुरुकृपा साच**—नित्यज्ञानसंपन्न अशा परमेश्वरापासून जसे मंत्रब्राह्मणात्मक वेद निर्माण झाले, तसेच आत्मबोधाने परिपूर्ण असलेल्या आधिकारिक ऋषींच्या द्वारा भगवंतांनीच वेदोपजीवी इतर इतिहासपुराणादि ग्रंथ निर्माण केंले असल्यामुळे तेहि ईश्वरप्रणीतच ठरतात. म्हणूनच सर्व वेदादीशास्त्रांची एकवाक्यता आहे असें मानिलें पाहिजे आणि समन्वयाने व एकवाक्यतेने जो बोध होतो तोच परमेश्वराला संमत असलेला यथार्थ बोध असूं शकतो.

हा यथार्थ बोध, ज्ञानभक्तीने संपन्न असलेले श्रीगुरु आपल्या शिष्यांना शास्त्रवचनांचा समन्वय व एकवाक्यता करूनच नेहमी करून देत असतात. त्यांच्या उपदेशावांचून शास्त्रांचा समन्वय आपल्या बुद्धीने कळूं शकत नाही. हेंच माऊलींनी ''तैसे श्रुताधीत सकळ। गुरुकृपा साच'' या वचनाने सांगितलें आहे.

**जी बनकरू झाडें सिंपी जीवें साटीं। पाडूनि जन्में काढी आटी। परि फळेंसी तैंचि भेटी। जैं वसंतु पावे॥ १६९॥**
**अहो विषमा जैं वोहट पडे। तैं मधूर तें मधुर आवडें। पैं रसायनें तैं गोडें। जैं आरोग्य देहीं॥ १७०॥**

**अर्थ**—देवा! माळ्याने आपल्या जीवाच्या मोबदल्याने-म्हणजे झाडाचे जगणे तेंच आपलें जगणे असे समजून-झाडांना पाणी घातलें आणि जन्मापाठीं जन्म घेऊन असेच कष्ट केलें, तरीपण एवढ्या कष्टानेहि झाडांना फळें येतातच असे नाही; तें वसंतऋतूच्या स्वाधीन आहे. ॥ १६९ ॥ त्याचप्रमाणे देवा! त्रिदोषाची विषमता कमी झाली असतां, मधुररस मधुर लागतो; आणि देहाचे ठिकाणीं आरोग्य असलें तरच रसायन परिणामकारक होतें. ॥ १७० ॥

(टीप-औषध हें रोगनिवृत्तिकर असतें व तें रोग्याला दिलें जातें. रसायन हें जरानिवारक व आयुष्यवर्धक असतें व तें निरोगी मनुष्याला दिलें जातें, असे वैद्यशास्त्राचें मत आहे.)

**कां इंद्रियें वाचा प्राण। यां जालियांचें तैंचि सार्थकपण। जैं चैतन्य येऊनि आपण। संचरे माजीं॥ १७१॥**
**तैसें शब्दजात आलोडिलें। अथवा योगादिक जैं अभ्यासिलें। तें तैंचि म्हणों ये आपुलें। जैं सानुकूल श्रीगुरु॥ १७२॥**
**ऐसिये जालिये प्रतीतीचेनि माजें। अर्जुन निश्चयाची नाचतुसे भोजें। तेवींचि म्हणे देवा तुझें। वाक्य मज मानलें॥ १७३॥**
**तरि साचचि हे कैवल्यपती। मज त्रिशुद्धी आली प्रतीती। जे तूं देवदानवांचिये मती-। जोगा नव्हसी॥ १७४॥**
**तुझें वाक्य व्यक्ती न येतां देवा। आपुलिया जाणे जाणिवा। तैंसा कहींचि नाहीं हें मद्भावा। भरंवसेनि आलें॥ १७५॥**

**अर्थ**—चैतन्य शरीरांत प्रवेश करीते तेव्हाच इंद्रियें, वाणी, प्राण याचें असण्याचें सार्थक होतें. ॥१७१॥ त्याप्रमाणे मनुष्य जेवढें कांही शास्त्रावलोकन करतो किंवा योगादिक मार्गाचा अभ्यास करतो, तेवढे सर्व श्रीगुरुची कृपा झाली तरच खरोखर आपल्या स्वाधीन होते. ॥ १७२ ॥ (श्रीगुरुकृपेनेच शब्द यथार्थ समजूं शकतात) या आलेल्या अनुभवाने अर्जुन मत्त होऊन, दृढ निश्चयाची मूर्ति होऊन, नाचूं लागला व तसेंच, 'देवा! तुझें म्हणणें मला पटले' असें म्हणू लागला. ॥ १७३ ॥ हे कैवल्याचे स्वामी भगवंता! तरी तूं खरोखरच देवदानवांच्या बुद्धीस आकलन होण्यासारखा नाहीस, हें त्रिवार सत्य आहे, असा मला अनुभव आला. ॥ १७४ ॥ तुझ्या कृपेने जोपर्यंत तुझ्या वचनाचा यथार्थ व स्पष्ट बोध होत नाही, तोपर्यंत आपल्या बुद्धीनेच जाणण्याचा एखाद्याने कितीहि प्रयत्न केला, तरी त्याला त्यांचा यथार्थ बोध कधीहि होणें शक्य नाही, हे मला निश्चित कळून आलें. ॥ १७५ ॥

**स्वयमेवात्मनात्मानं वेत्थ त्वं पुरुषोत्तम। भूतभावन भूतेश देवदेव जगत्पते॥ १५॥**

**अर्थ**—हे पुरुषोत्तमा! हे जगत्कर्त्या! हे जगन्नियंत्या! हे देवाधिदेवा! हे जगत्पते! तूंच एक स्वतःला जाणूं शकतोस. ॥ १५ ॥

**एथ आपुलें वाडपण जैसें। आपणचि जाणिजे आकाशें। कां मी येतुली घनवट ऐसें। पृथ्वीचि जाणे॥ १७६ ॥**
**तैसा आपुलिये सर्वशक्ती। तुज तूंचि जाणसी लक्ष्मीपती। येर वेदादिक मती। मिरवती वायां॥ १७७॥**
**हां गा मनातें मागां सांडावें। पवनातें वावीं मवावें। आदिशून्य उतरोनि जावें। केउतें बाहीं॥ १७८॥**
**तैसें हें तुझें जाणणें आहे। म्हणोनि कोणाही ठाकतें नोहे। आतां तुझें ज्ञान होये। तुजचिजोगें॥ १७९॥**

**अर्थ**—ज्याप्रमाणे आकाश आपला अफाट विस्तार आपणच जाणूं शकतें किंवा मी इतकी घन आहे असा आपला घनवटपणा पृथ्वीच जाणूं शकते. ॥ १७६ ॥ त्याप्रमाणे भगवंता! आपल्या सर्व शक्तिसामर्थ्याला तूंच एक जाणूं शकतोस, बाकी तेथे वेदादिक शास्त्रें तुला जाणण्याचा अभिमान व्यर्थच वागवितात. ॥ १७७॥ बा अर्जुना! मनाला मागें कसें टाकतां येईल? वाऱ्याला हाताने कसें मोजतां येईल? बाहुच्या बळावर सृष्टिपूर्वीची शून्यस्थिति कशी तरून जातां येईल?॥ १७८ ॥ त्याप्रमाणे तुझ्या स्वरूपाला जाणणें अशक्य आहे; म्हणूनच कोणालाहि तुझें स्वरूप कळत नाही. तुझ्या स्वरूपाचें ज्ञान तुलाच होण्याजोगें आहे. ॥ १७९ ॥

**गूढार्थदीपिका**—निर्गुणाचें ज्ञान एकदाचें कसें तरी होऊं शकतें, पण सगुणाचें ज्ञान होणें दुरापास्त आहे. याचें थोडक्यांत विवरण मागे नवव्या अध्यायांतील ३७१ ओवीवरील गूढार्थदीपिकेंत आम्ही केलें आहे. पण निर्गुणस्वरूपापेक्षा सगुणस्वरूप कनिष्ठ आहे, असे मानणाऱ्यांच्या मताचें परिवर्तन व्हावें, म्हणून येथे त्याचा पुनः विशेष विचार करावासा वाटतो.

"**तथापि भूमन् महिमागुणस्य ते विबोद्धुमर्हत्यमलान्तरात्मभिः। अविक्रियात्स्वानुभवादरूपतो ह्यनन्यबोध्यात्मतया न चान्यथा॥**" (भाग. स्कं. १०-१४-६) हे भगवंता! तुझ्या निर्गुणस्वरूपाचा महिमा, निर्मळ अंतःकरणाच्या योग्यांनाच जाणतां येतो; कारण तें स्वरूप निर्विकार, स्वानुभवरूप व रूपातीत असल्यामुळे आपल्या स्वप्रकाशरूप आत्मस्वरूपाने समजण्यासारखें आहे. दुसऱ्या कोणत्याहि मार्गाने त्याचें ज्ञान होत नाही. या श्लोकावरील टीकेंत श्रीधरस्वामी म्हणतात—

"**इदानीं यद्यप्युभयोरविशेषेण दुर्ज्ञेयत्वमुक्तं तथापि गुणातीतस्य ज्ञानं कथंचिद्भवेन्नतु सगुणस्य तव अचिन्त्यानन्तगुणत्वादिति**"-तुझ्या सगुण निर्गुण या दोन्ही स्वरूपाचें ज्ञान होणें दुस्तर असलें, तरी गुणातीत अशा निर्गुणाचें ज्ञान एकदाचें होऊं शकतें; पण अचिन्त्य, अनंत, अपार, गुण असलेल्या तुझ्या सगुण स्वरूपाचें पूर्ण ज्ञान होणें शक्य नाही.

निर्गुणस्वरूपाचें तरी एकदाचें ज्ञान होणें कसें शक्य आहे, हें सांगतांना स्वामी म्हणतात, "स्वानुभवादात्माकारान्तःकरणसाक्षात्कारात्"-म्हणजे विशेषरहित असा जो आत्मा, तदाकार झालेल्या अंतः-करणाचा साक्षात्कार हेंच निर्गुणाचें ज्ञान होय.

"**नन्वंतःकरणमपि सविकारमेव विषयी करोतीति कथमात्माकारता तस्येत्यत आह-अविक्रियादिति। विक्रिया विशेषाकारस्तद्रहितात्। विशेषपरित्याग एवात्माकारतेत्यर्थः**" अंतःकरणाला कार्यरूप विशेष पदार्थाचेंच ज्ञान होत असतें, तेव्हां ते निर्गुण आत्माकार कसें होऊं शकतें, अशी कोणी शंका करतील. त्याला स्वामींनी उत्तर दिलें आहे की, अंतःकरणांतील नामरूपात्मक विशेषभाव नाहीसे झाले की अंतःकरण आत्माकार होतें; म्हणून अंतःकरणांतील सर्व नामरूपात्मक विशेषभाव नाहीसे करून, निर्गुणस्वरूपाचा साक्षात्कार करून घेणें, एकदाचें शक्य आहे; पण अचिन्त्य, अनंत, अपारगुणसागर अशा सगुण परमेश्वराच्या स्वरूपाचें ज्ञान करून घेणें जीवाला कधीहि शक्य होत नाही.

येथें भगवद्भक्त श्रीधराचार्यांच्या या मताप्रमाणेच माऊलींनी आपलें मत प्रदर्शित केलें आहे व असेंच सर्व संतांचें मत असून "अनंताचे गुण अनंत अपार। न कळेचि पार श्रुति शास्त्रा॥ तो हा महाराज विटेवरी उभा। लावण्याचा गाभा शोभतसे" असे श्रीएकनाथ महाराजांनीहि म्हटलें आहे.

**जी आपणपयातें तूंचि जाणसी। आणिकांतें सांगावयाही समर्थ होसी। तरि आतां एक वेळ घाम पुसीं। आर्तीचिये निडळींचा॥ १८०॥**

**अर्थ**—देवा! तूच आपल्याला जाणू शकतोस व दुसऱ्यालाहि आपल्या स्वरूपाचें ज्ञान करून देण्यास तूच समर्थ आहेस. तर देवा! एक वेळ, आतां, माझ्या इच्छेच्या कपाळावरील घाम पुसून टाक-म्हणजे माझी इच्छा पूर्ण कर. ॥ १८० ॥

**गूढार्थदीपिका—आपणयातें तूंचि जाणसी। आणीकांतें सांगावयाही समर्थ होसी**—सगुण परमात्मा अनंत गुणसागर कसा आहे, तो अवतार कसा घेतो व त्याचा अवतारहि अनादिसिद्ध कसा राहूं शकतो, इत्यादि त्याची लीला जीवाला सर्वस्वीं अगम्य व अतर्क्य आहे असें मागील ओवींत सांगून, या ओवींत माऊली म्हणतात, परमेश्वरवचनानेच परमेश्वराच्या सगुण स्वरूपाचें ज्ञान होऊं शकतें, जीवाला तें स्वत:च्या बुद्धीने होऊं शकत नाही.

**हें आइकिलें कीं भूतभावना। भव गजपंचानना। सकळदेवदेवतार्चना। जगन्नायका॥१८१॥**
**जरी थोरी तुझी पाहत आहों। तरी पासीं उभे ठाकावयाही योग्य नोहों। या शोच्यता जरी विनवूं बिहों। तरी आन उपायो नाहीं॥ १८२॥**
**भरले सरिता समुद्र चहूंकडे। परि तें बापियासि कोरडें। कां जैं मेघौनि थेंबुटा पडे। तैं पाणि कीं तया॥१८३॥**
**तैसें श्रीगुरु सर्वत्र आथी। परि कृष्णा आम्हां तूंचि गती। हें असो मजप्रती। विभूती सांगें॥१८४॥**

**अर्थ**—हे प्राणिमात्राला उत्पन्न करणाऱ्या! हे संसाररूपी हत्तींचा नाश करणाऱ्या! हे सकळ देवांना पूज्य असणाऱ्या! हे जगताचे स्वामी असणाऱ्या! माझें हें बोलणें ऐकलेंस काय?॥ १८१ ॥ अनुभविलेल्या तुझ्या थोरवीकडे लक्ष दिले असतां, तुझ्यापाशीं उभे राहण्यापुरती देखील आमची योग्यता नाही. या अपात्रतेचे वाईट वाटून जरीं तुम्हाला विनंति करायला भ्यालों तरीपण त्यावांचून दुसरा उपायहि नाही. ॥ १८२ ॥ चहूंकडे समुद्र, नद्या, इत्यादि जलाशय जरी भरले, तरी त्या बापड्या चातकाच्या दृष्टीने मात्र ते सर्व कोरडेच होत; कारण जेव्हा मेघांतून पाण्याचा थेंब पडतो, तेव्हाच तो तें पाणी पीत असतो. ॥ १८३ ॥ त्या प्रमाणे उपदेश करणारे श्रीगुरु सर्वत्र असले तरी श्रीकृष्णा! आम्हाला मात्र शरण जाऊन विचारण्याला तूंच एक गति आहेस. हे असो. मला आतां आपल्या विभूति सांग. ॥ १८४ ॥

**गूढार्थदीपिका—तैसें श्रीगुरु सर्वत्र आथी। परि कृष्णा आम्हां तूंचि गती**—ज्ञानी भक्तच 'श्रीगुरु' या संज्ञेस पात्र असतात. असें ज्ञानीभक्त श्रीगुरुरूपाने सर्वत्र असलें, तरी श्रीगुरुरूपाने ज्या ज्ञानीभक्ताचा शिष्याशीं संबंध झाला असेल तोच त्याचा सर्वस्वीं शरण जाण्याला योग्य श्रीगुरु असतो व त्यांच्यापासूनच शिष्यांनी आपल्या सर्व शंका निरसन करून घेऊन परोक्ष ज्ञान व अपरोक्ष ज्ञान प्राप्त करून घ्यावें.

**वक्तुमर्हस्यशेषेण दिव्या ह्यात्मविभूतयः। याभिर्विभूतिभिर्लोकानिमांस्त्वं व्याप्य तिष्ठसि॥ १६॥**
**कथं विद्यामहं योगिंस्त्वां सदा परिचिन्तयन्। केषु केषु च भावेषु चिन्त्योऽसि भगवन्मया॥ १७॥**

**अर्थ**—भगवंता! ज्या विभूतींच्या द्वारा या त्रैलोक्याला तूं व्यापून आहेस त्या संपूर्ण आपल्या दिव्य विभूती मला सांग. ॥ १६ ॥ हे योगेश्वरा! तुझें अखंड चिंतन करण्याकरितां मी तुला कोठें कोठें जाणावें व कोणकोणत्या पदार्थाचे ठिकाणी माझ्याकडून तूं चिंतिला जाण्याजोगा आहेस?॥ १७॥

**जी तुझिया विभूती आघविया। परि व्यापिती या शक्ति दिव्या जिया। तिया आपुलिया दावाविया। आपण मज॥ १८५॥**
**जिहीं विभूतीं ययां समस्तां। लोकांतें व्यापूनि आहासी अनंता। तिया प्रधाना नामांकिता। प्रगटा करीं॥ १८६॥**
**जी कैसें मियां तूंतें जाणावें। काय जाणोनि सदा चिंतावें। जरी तूंचि म्हणों आघवें। तरि चिंतनचि न घडे॥ १८७॥**

**अर्थ**—देवा! दिव्यशक्तीने व्यापून असलेल्या ज्या तुझ्या संपूर्ण विभूती आहेत, त्या आपल्या आपण मला दाखवाव्यात. ॥ १८५ ॥ ज्या विभूतींनी या सर्व त्रैलोक्याला तूं व्यापून आहेस, त्यापैकीं मुख्य व नामांकित अशा ज्या असतील, त्या आपण मला सांगा. ॥ १८६ ॥ देवा! मी तुला कशा रीतीने जाणूं शकेन? काय जाणून सर्वदा तुझें चिंतन करतां येईल. हे सांग. सर्व तूंच आहेस असे समजलें तर चिंतनच होऊं शकत नाही. ॥ १८७ ॥

**विस्तरेणात्मनो योगं विभूतिं च जनार्दन। भूयः कथय तृप्तिर्हि शृण्वतो नास्ति मेऽमृतम्॥ १८॥**

**अर्थ**—हे जनार्दना! आपले योगसामर्थ्य म्हणजे बहुरूप होण्याचे सामर्थ्य व विभूति यांचे विस्ताराने वर्णन करून पुनः सांगा, तुमच्या वचनामृताचे कितीहि श्रवण केले तरी माझी तृप्ति होत नाही. ॥ १८ ॥

**म्हणोनि मागां भाव जैसें। आपुले सांगितले तुवां उद्देशें। आतां विस्तारोनि तैसें। एक वेळ बोलें॥ १८८ ॥**

**जया जया भावाचिया ठायीं। तूते चिंतितां मज सायास नाहीं। तो विवळ करूनि देईं। योग आपुला॥ १८९ ॥**

**अर्थ**—म्हणून मागे जसे आपण संक्षेपाने आपले भाव सांगितले, तसेच आतां विस्ताराने एक वेळ पुन: सांगा. ॥ १८८ ॥ ज्या ज्या भावाचे ठिकाणी तुझे चिंतन करणे मला सोपे जाईल, तो तो आपला योग मला स्पष्ट करून सांगा. ॥ १८९ ॥

**गूढार्थदीपिका—योग आपुला**—योग म्हणजे ऐक्य हे मागे सांगितलेंच आहे. नामरूपांचे परमेश्वराशीं जे ऐक्य आहे किंवा परमेश्वरच नामरूपाने जो प्रगट झाला आहे, तें ऐक्यच येथे ''योग'' या शब्दाने सूचित केले आहे.

**आणि पुसलिया जिया विभूती। त्याही बोलाविया भूतपती। एथ म्हणसी जरी पुढतीं। काय सांगों॥ १९० ॥**

**अर्थ**—आणि देवा! आपल्या ज्या प्रधान विभूति सांगा म्हणून, मी प्रार्थना केली, त्याहि मला सांगा. येथें कदाचित् असे म्हणाल की पुनः पुनः काय सांगायचे आहे!॥ १९० ॥

**गूढार्थदीपिका—विभूति**-भगवान ज्या अगाधसामर्थ्यादि ऐश्वर्याने मूळचाच युक्त असल्यामुळें सर्वश्रेष्ठ होतो; तें त्याचें सर्वश्रेष्ठत्व जीववर्गांतील एखाद्या जीवव्यक्तीच्या ठिकाणीं अंशाने प्रगट झालें असतां, ती व्यक्ति त्या वर्गांत श्रेष्ठ समजली जाते व तिलाच विभूति म्हणतात. सारांश विभूती ही अपूर्ण असा जीव असतो व अवतार हा पूर्णब्रह्म असतो असा या दोहोंत फरक आहे.

जीव मूळांत खरोखर पूर्णब्रह्म असतांना, अज्ञानामुळें आपल्याला अपूर्ण मानतो व त्याला सर्वत्र अपूर्णताच दिसते. आणि जगांत परमेश्वरच जगद्रूपाने प्रगट झाला असला, तरी त्याचा जीवाला अनुभव येत नाही. तो अनुभव विभूतीच्या द्वारा थोडातरी त्याला येऊं शकेल, या भावनेने, अज्ञानी लोकांची भूमिका घेऊन अर्जुनाने भगवंताला, आपल्या विभूती सांगण्याविषयीं प्रार्थना केली.

**तरी हा भाव मना। झणें जाय हो जनार्दना। पैं प्राकृताही अमृतपाना। ना न म्हणवे जी॥ १९१ ॥**

**जें काळकूटाचें सहोदर। जें मृत्युभेणें प्याले अमर। तरि दिहाचे पुरंदर। चौदा जाती॥ १९२ ॥**

**ऐसा कवण एक क्षीराब्धीचा रस। जया वायांचि अमृतपणाचा आभासु। तयाचाही मिठांशु। जे पुरे म्हणों नेदी॥ १९३ ॥**

**तया पाबळेयाही येतुलेवरी। गोडियेची आथि थोरी। मग हें तंव अवधारीं। परमामृत सांचें॥ १९४ ॥**

**जें मंदराचळु न ढाळितां। क्षीरसागरु न डहुळितां। अनादि स्वभावता। आइतें आहे॥ १९५ ॥**

**जें द्रव ना नव्हे बद्ध। जेथ नेणिजती रस गंध। जें भलतयांही सिद्ध। आठवलेंचि फावे॥ १९६ ॥**

**जयाची गोठीचि ऐकतखेंवो। आघवा संसारु होय वावो। बळिया नित्यता लागे येवों। आपणपेयां॥ १९७ ॥**

**जन्ममृत्यूची भाख। हारपोनि जाय निःशेख। आंत बाहेरी महासुख। वाढोंचि लागे॥ १९८ ॥**

**मग दैवगत्या जरी सेविजे। तरि तें आपणचि होऊनि ठाकिजे। तें तुज देतां चित्त माझें। पुरे म्हणों न शके॥ १९९ ॥**

**अर्थ**—देवा जनार्दना! अशी तुझ्या मनांत कदाचित् कल्पना येईल, पण प्रकृतिजन्यहि अमृत प्यायला मिळालें असतां जसें कोणाच्याने नको म्हणवत नाही. ॥ १९१ ॥ जें अमृत, काळकूटाचा भाऊ होय, मृत्यु येऊं नये म्हणून तें इंद्रादी प्यालें, तरी ब्रह्मदेवाचे एक दिवसांत चौदा इंद्र होतात. ॥ १९२ ॥ असा कोणी एक क्षीरसमुद्रांतून निघालेला जो रस, त्याचे ठिकाणी व्यर्थच अमरपणाचा भास आहे; पण त्याचीहि गोडी, 'पुरे' असे म्हणूं देत नाही. ॥ १९३ ॥ अशा त्या क्षुद्र पदार्थाच्या गोडीची एवढी थोरवी आहे. मग पहा, हें तर खरोखर परमामृतच आहे. ॥ १९४ ॥ या परमामृताकरितां मंदराचलाला फिरवावें लागलें नाही, क्षीरसमुद्राला डहुळावें लागलें नाही, हें अनादि, स्वाभाविक व सिद्ध आहे. ॥ १९५ ॥ जें पातळ नाही, घट्ट नाही, ज्याचे ठिकाणीं रसगंधादि गुणहि नाहीत व जें स्मरण झाल्याबरोबर आपल्या ठिकाणीं मूळचेच आहे असा कोणलाहि अनुभव येतो. ॥ १९६ ॥ या परमामृताचे नुसतें वर्णन

ऐकतांच सर्व संसार खोटा ठरतो व आपला विनाशीपणा जाऊन, बळेंच आपल्याठिकाणी नित्यता धर्म येतो. ॥ १९७ ॥ जन्ममरणाची भाषा नि:शेष नाहीशी होते व आंतबाहेर परमसुख वाढूं लागतें. ॥ १९८ ॥ सुदैवाने या परमामृताचें सेवन झालें असतां, तें आपणच होऊन राहतें, असें हें परमामृत तूं मला पाजीत असतांना माझें चित्त पुरें म्हणूं शकत नाही. ॥ १९९ ॥

**तंव तुझें नामचि आम्हां आवडे। वरि भेटी होय आणि जवळिक जोडे। पाठीं गोठी सांगसी सुरवाडें। आनंदाचेनि॥ २०० ॥**

**अर्थ**—भगवंता! तुझें नांवच तर आम्हाला अत्यंत प्रिय वाटतें. त्यांतहि पुन: तुझें दर्शन होऊन नित्य सान्निध्य आहे. त्यांत पुन: प्रेमाने गोड गोड गोष्टी सांगतोस. ॥ २०० ॥

**गूढार्थदीपिका**—भक्ताला, भगवंताच्या सगुण स्वरूपाचें व त्याच्या गुणाचें कसें अनुपम व अवीट प्रेम असतें याचें अर्जुनाने, अनुभवाने वर्णन केलें आहे. भगवंताचे स्वरूप पाहतां पाहतां व गुण ऐकतां ऐकतां भक्ताच्या मनाची कधी तृप्तिच होत नाही. "गोपीनां परमानंद आसीद् गोविंददर्शने। क्षणं युगशतमिव यासां येन विनाभवत्॥" (भाग. स्कं, १० अ. १९ श्लो. १६) प्रेमसंपन्न गोपींना नुसत्या भगवंताच्या दर्शनाने देखील परमानंद किंवा ब्रह्मानंद होत होता व त्या देहभान विसरत होत्या. परमात्मा क्षणभर जर त्यांना दिसला नाही तर तो क्षणाचा काळ, त्यांना शेकडों युगासारखा जावा, इतके त्यांना श्रीकृष्णाच्या विरहाचें दु:ख होत होतें.

**आतां हें सुख कायिसयासारिखें। कांहीं निर्वचेना मज परितोखें। तरि येतुलें जाणें जें येणें मुखें। पुनरुक्तीही हो॥ २०१ ॥**

**हां गा सूर्य काय शिळा। अग्नि म्हणों येत आहे वोंवळा। कां नित्य वाहातया गंगाजळा। पारसेपण असे॥ २०२ ॥**

**तुवां स्वमुखें जें बोलिलें। हें आम्हीं नादासि रूप देखिलें। आजि चंदनतरूचीं फुलें। तुरंबीत आहों मां॥ २०३ ॥**

**तया पार्थाचिया बोला। सर्वांगें श्रीकृष्ण डोलला। म्हणे भक्तिज्ञानासि जाहला। आगरु हा॥ २०४॥**

**ऐसा पतिकराचिया तोषाआंतु। प्रेमाचा वेग उचंबळतु। तो सायासें सांवरूनि अनंतु। काय बोले॥ २०५॥**

**अर्थ**—आतां हें होणारें सुख कशासारखें आहे, हें मला झालेल्या आनंदामुळे शब्दाने कांही सांगतां येत नाही. पण एवढें मात्र मला सांगतां येतें की तुमच्या मुखाने तेंच तें सांगितलें गेलें, तरी तें गोडच लागतें. ॥ २०१ ॥ भगवंता! सूर्य शिळा होतो काय? अग्नीला ओवळा म्हणता येते काय? नित्य वाहणाऱ्या गंगाजळाला पारोसेपण असतें काय?॥ २०२ ॥ तुम्ही जें स्वमुखाने सांगितलें, तें ऐकून आम्ही मूर्तिमंत नादब्रह्मच पाहिला किंवा आज सुवासिक अशा चंदनाच्या झाडाच्या फुलांचा सुवास घेत आहों असें वाटलें. ॥ २०३ ॥ असें अर्जुनाचें बोलणें ऐकून श्रीकृष्ण सर्वांगाने डोलूं लागले व खरोखर, अर्जुन हा भक्तिज्ञानाचें कोठार झाला, असें मनांत म्हणाले. ॥ २०४ ॥ याप्रमाणे अर्जुनाच्या ठिकाणीं भक्तिज्ञानाचा आविष्कार पाहून, भगवंताला झालेल्या संतोषाने, भगवंताच्या अंत:करणांत प्रेम उचंबळू लागलें. पण मोठ्या प्रयत्नाने तो प्रेमाचा वेग आवरून देव पुढें बोलू लागलें. ॥ २०५ ॥

*श्रीभगवानुवाच*

**हन्त ते कथयिष्यामि दिव्या ह्यात्मविभूतय:। प्राधान्यत: कुरुश्रेष्ठ नास्त्यन्तो विस्तरस्य मे॥ १९॥**

**अर्थ**—भगवान म्हणतात, हे कुरुकुलांत श्रेष्ठ असणाऱ्या अर्जुना! माझ्या विस्ताराला मर्यादा नसल्यामुळे मी आतां तुला, माझ्या दिव्य अशा मुख्य विभूति सांगतों. ॥ १९ ॥

**मी पितामहाचा पिता। हें आठवितांही नाठवे चित्ता। कीं म्हणतसे बा पांडुसुता। भलें केलें॥ २०६ ॥**

**अर्थ**—(अर्जुनाचें प्रेमांत भगवान इतके मग्न होते की) मी ब्रह्मदेवाचाहि पिता आहे याची आठवण करतांही भगवंताला आठवण होऊं शकत नव्हती; म्हणून भगवंतांनी अर्जुनाला, "बापा अर्जुना!" बरें केलेंस असें म्हटलें. ॥ २०६ ॥

**गूढार्थदीपिका**—जीवाला अज्ञान असल्यामुळे कशाचीहि विस्मृति होते आणि भगवंताला कधीच अज्ञान नसल्यामुळे व तो सर्वज्ञ असल्यामुळे त्याला विस्मृति कधीच नसते. पण अर्जुनावरील प्रेमामुळे त्याला (भगवंताला) विसर पडला व अर्जुनाला "बापा अर्जुना" असें म्हटलें. आपला विसर पडणें हा प्रेमाचा स्वभावच आहे.

**अर्जुनातें बा म्हणे एथ कांहीं। आम्हां विस्मो करावया कारण नाहीं। अंगें तो लेंकरूं काई। नव्हेचि नंदाचें॥ २०७॥**

**अर्थ**—येथें भगवंतांनी अर्जुनाला "बापा अर्जुना" म्हटलें याचें आपणाला आश्चर्य वाटण्याचें कारण नाही. भगवान स्वत: नंदाचें लेंकरूं झालें नाही काय?॥ २०७॥

**गूढार्थदीपिका**—लौकिकांतहि बाप, प्रेमाने मुलाला बाबा म्हणतांना दिसतो, हें एक प्रेमाचें लक्षण आहे. त्याच लक्षणाने अर्जुनावरील भगवंताच्या प्रेमाचा माऊलींनी उल्लेख केला आहे. भगवान पितामहाचा पिता खरा, पण आपल्या भक्ताचें प्रेम वाढविण्याकरितां आपल्या भक्ताशीं बालभावानेहि क्रीडा करतो.

**परि प्रस्तुत ऐसें असो। हें करवी आवडीचा अतिसो। मग म्हणे आइकें सांगतसों। धनुर्धरा॥ २०८॥**
**तरि तुवां पुसलिया विभूती। तयांचें अपारपण सुभद्रापती। ज्या माझियाचि परी माझिये मती। आकळती ना॥ २०९॥**

**अर्थ**—पण सध्यां हे बाजूला ठेवू. मनांत असलेलें अतिशय प्रेमच असा प्रकार करवित असतें. मग भगवान म्हणतात, धनुर्धरा! सांगतों ते ऐक.॥ २०८॥ तू माझ्या विभूति विचारल्यास, पण अर्जुना! त्यांना मर्यादाच नाही. कारण मलाच माझ्या विभूतींची संख्या करवत नाही.॥ २०९॥

**गूढार्थदीपिका**—ज्याप्रमाणे दोरीवर भासणारा सर्प, दोरी जितकी लांब असते तितकाच तो लांब भासतो, त्याप्रमाणे परमात्मा अमर्याद आहे, म्हणून त्याच्याशीं ऐक्य राहून जेवढें कांही भासतें तें सर्व अमर्यादच असतें, हा नियम आहे.

**अंगीचिया रोमा किती। जयाचिया तयासि न गणवती। तैसिया माझिया विभूति। असंख्य मज॥ २१०॥**
**एऱ्हवीं तरी मी कैसा केवढा। म्हणोनि आपणपयाही नव्हेचि फुडा। यालागीं प्रधाना जिया रूढा। तिया विभूती आइकें॥ २११॥**
**जिया जाणितलियासाठीं। आघविया जाणितलिया होती किरीटी। जैसें बीज आलिया मुठीं। तरूचि आला होय॥ २१२॥**
**कां उद्यान हातां चढिन्नले। तरी आपैसीं सांपडलीं फळें फुलें। तेवीं देखिलिया जिया देखवलें। विश्व सकळ॥ २१३॥**
**एऱ्हवीं साचचि गा धनुर्धरा। नाहीं शेवटु माझिया विस्तारा। पैं गगना ऐसिया अपारा। मजमाजीं लपणें॥ २१४॥**

**अर्थ**—आंगावर रोम कितीं आहेत, हें ज्याचे त्याला जसें मोजून सांगतां येत नाही, त्याप्रमाणे माझ्या विभूती मलाच मोजतां येण्याजोग्या नाहीत.॥ २१०॥ एरवीं मी कसा व केवढा आहे, हें मलाच स्पष्ट कळत नाही, म्हणून मुख्य मुख्य विभूती ज्या प्रसिद्ध आहेत त्या सांगतों, ऐक.॥ २११॥ ज्याप्रमाणे बीज हातीं आलें असतां वृक्षच हातात आल्यासारखा होतो, त्याप्रमााणे ज्या माझ्या मुख्य मुख्य विभूती जाणल्या असतां, संपूर्ण विभूती जाणल्या जातील.॥ २१२॥ किंवा बगीचा हातांत आला असतां, त्यांतील फुलें, फळेंहि अनायासें हातांत येतात, त्याप्रमाण ज्या विभूती समजल्याबरोबर सर्व विश्वच विभूतीमय दिसू लागेल.॥ २१३॥ वस्तुत: धनुर्धरा! माझ्या विस्ताराला खरोखर अंत नाही, कारण ज्याला आपण अमर्याद म्हणतो असें आकाशहि माझ्या ठिकाणींच असतें.॥ २१४॥

**अहमात्मा गुडाकेश सर्वभूताशयस्थित:। अहमादिश्च मध्यं च भूतानामन्त एव च॥ २०॥**

**अर्थ**—हे निद्रा जिंकणाऱ्या अर्जुना! मीच सर्वांचा आत्मा असून, सर्व भूतांच्या हृदयांत आहें, म्हणून सर्व भूतांचा आदि, मध्य व अंत मीच आहे.॥ २०॥

**आइकें कुटिलालकमस्तका। धनुर्वेदत्र्यंबका। मी आत्मा असें एकैका। भूतमात्राचां ठायीं॥ २१५॥**
**आंतुलीकडे मीचि यांचे अंत:करणीं। भूतांबाहेरी माझीचि गंवसणी। आदि मी निर्वाणीं। मध्यही मीचि॥ २१६॥**

**अर्थ**—काळें कुरळें केस मस्तकावर धारण करणाऱ्या, धनुर्विद्येत दुसरा शंकर असलेल्या अशा अर्जुना! ऐक, मी प्रत्येक भूताचे ठिकाणी आत्मरूपाने आहे.॥ २१५॥ या भूतांच्या आंत अंत:करणांत-मीच असून, बाहेरून सर्व भूतांना माझीच खोळ घातलेली आहे व भूतांच्या आदी, अंतीं व मध्येहि मीच आहे.॥ २१६॥

**गूढार्थदीपिका**—भूतांच्या आंत, बाहेर मीच आहे असें म्हणून भगवंतांनी आपल्या अद्वैतस्वरूपाचे ठिकाणी, त्याच्याहून भूतांचें किंवा नामरूपांचें भिन्न अस्तित्व मानण्यास जागा नाही, हेंच दाखविले आहे.

**जैसें मेघां या तळी वरी। एक आकाशचि आंत बाहेरी। आणि आकाशींचि जाले अवधारीं। असणेंही आकाशीं॥ २१७॥**
**पाठीं लया जे वेळीं जाती। ते वेळीं आकाशचि होऊनि ठाती। तेविं आदि स्थिती अंतगती। भूतांसि मी॥ २१८॥**

**अर्थ**—ज्याप्रमाणे मेघाला खाली-वर, आंत-बाहेर एक आकाशच असतें. आकाशांतच मेघ उत्पन्न होतात व आकाशांतच राहतात.॥ २१७॥ शेवटीं जेव्हा ते नाहीसे होतात, तेव्हा आकाशरूपच होऊन जातात, त्याप्रमाणे सर्व भूतांचे उत्पत्ति, स्थिति, लय मीच आहे.॥ २१८॥

**गूढार्थदीपिका**—नामरूपात्मक जगांत केवळ भगवंताचेंच एकवस्तुत्व आहे, असें दाखविण्याकरितां, येथे जे दृष्टान्त दिले आहेत, त्यांत मेघ व आकाश अशा भिन्न पदार्थांचा उल्लेख केला असला, तरी परमात्मा अद्वैतस्वरूप असल्यामुळे त्याचे ठिकाणी तो व जग अशा दोन भिन्न पदार्थांचें अस्तित्व मानतां येत नाही.

भगवंताच्या अद्वैताचा बोध होईल, असा जगांत दृष्टान्तच सांपडूं शकत नाही; म्हणून जीवाला भगवंताच्या अद्वैतसत्तेचा बोध करून देण्याकरितां द्वैतांतीलच दृष्टान्त जरी दिले गेले असले, तरी भाषेंतील द्वैताकडे लक्ष न देतां अर्थांतील अद्वैत घेतलें पाहिजे.

**ऐसें बहुवस आणि व्यापकपण। माझें विभूतियोगें जाण। तरी जीवचि करूनि श्रवण। आइकोनि आइक॥ २१९॥**

**अर्थ**—असे माझें नानाविध व व्यापक होणें हें माझ्या विभूति व योगामुळे होत असतें असें समज. तर आतां आपल्या जीवाचे व श्रवणेंद्रियाचे ऐक्य करून श्रवणेंद्रियांच्या द्वारा ऐक-म्हणजे अत्यंत एकाग्रचित्ताने ऐक.॥ २१९॥

**गूढार्थदीपिका—ऐसें बहुवस आणि व्यापकपण। माझें विभूतियोगें जाण**—विभूतीमुळे-म्हणजे विभूति नाना असल्यामुळे-माझे नानात्व असून, योगाने-म्हणजे संपूर्ण नानारूपाशीं माझें ऐक्यच असल्यामुळें माझें व्यापकत्वहि आहे.

**याहीवरी त्या विभूती। सांगणें ठेलें सुभद्रापती। सांगेन म्हणितले तुजप्रीती। त्या प्रधाना आइकें॥ २२०॥**

**अर्थ**—मी सर्वत्र नामरूपांत व्यापून असल्यामुळें, विभूति सांगणें खरोखर संपलें; पण अर्जुना! तुला विभूति सांगतों असें म्हटलें, म्हणून माझ्या मुख्य मुख्य विभूति ऐक.॥ २२०॥

**आदित्यानामहं विष्णुर्ज्योतिषां रविरंशुमान्। मरीचिर्मरुतामस्मि नक्षत्राणामहं शशी॥ २१॥**
**वेदानां सामवेदोऽस्मि देवानामस्मि वासवः। इन्द्रियाणां मनश्चास्मि भूतानामस्मि चेतना॥ २२॥**
**रुद्राणां शंकरश्चास्मि वित्तेशो यक्षरक्षसाम्। वसूनां पावकश्चास्मि मेरुः शिखरिणामहम्॥ २३॥**

**अर्थ**—आदित्यांत मी विष्णु असून प्रकाशवंतांत मी किरणवान् सूर्य आहे. मरुद्गणांत मी मरीचि असून, नक्षत्रामध्ये मी चंद्र आहे.॥ २१॥ वेदांमध्ये मी सामवेद असून देवांमध्ये मी इंद्र आहे. इंद्रियामध्ये मी मन असून प्राण्यांमध्ये मी चैतन्य आहे.॥ २२॥ रुद्रांमध्ये मी शंकर आहे, यक्षराक्षसांमध्ये मी कुबेर आहे. वसुमध्ये अग्नी मी आहे आणि उंच शिखर असणाऱ्यांमध्ये मी मेरु आहे.॥ २३॥

**हें बोलोनि तो कृपावंतु। म्हणें विष्णु मी आदित्यांआंतु। रवी मी रश्मिवंतु। सुप्रभांमाजी॥ २२१॥**
**मरुद्गणांचां वर्गीं। मरीचि म्हणे मी शार्ङ्गी। चंद्र मी गगनरंगीं। तारांमाजीं॥ २२२॥**
**वेदांआंतु सामवेदु। तो मी म्हणे गोविंदु। देवांमाजी मरुद्बंधु। महेंद्र तो मी॥ २२३॥**
**इंद्रियांआंतु अकरावें। मन तें मी हें जाणावें। भूतांमाजीं स्वभावें। चेतना ते मी॥ २२४॥**
**अशेषांही रुद्रांमाझारीं। शंकर जो मदनारी। तो मी येथ न धरीं। भ्रांति कांहीं॥ २२५॥**
**यक्षरक्षोगणांआंतु। शंभूचा सखा जो धनवंतु। तो कुबेरु मी हें अनंतु। म्हणता जाहला॥ २२६॥**
**मग आठांही वसूंमाझारी। पावकु तो मी अवधारीं। शिखराथिलियां सर्वोपरी। मेरु तो मी॥ २२७॥**

**अर्थ**—असें म्हणून तो कृपाळु भगवान म्हणाला, आदित्यांत मी विष्णु आहे. चांगल्या प्रकाशवान् पदार्थामध्ये किरणयुक्त असणारा सूर्य मी आहे.॥ २२१॥ मरुद्गणांच्या समुदायात, भगवान म्हणाले, मी मरीचि आहे. आकाशमंडळांतील नक्षत्रांमध्ये चंद्र मी आहे.॥ २२२॥ भगवान म्हणतात, वेदांत सामवेद तो मी आहे. देवांमध्ये

मरुतांचा भाऊ जो इंद्र तो मी आहे. ॥ २२३ ॥ इंद्रियांमध्ये अकरावें जें मन, तें मी आहे असें जाण. भूतमात्रांमध्ये सर्वांच्या ठिकाणी स्वाभाविक असणारें चैतन्य, तें मी आहे. ॥ २२४ ॥ सर्व रुद्रांमध्ये मदनाचा नाश करणारा जो शंकर तो मी आहे, याविषयीं शंका घेऊं नकोस. ॥ २२५ ॥ यक्षराक्षस यांच्या समुदायांत शंकराचा मित्र जो धनसंपन्न कुबेर, तो माझी विभूति होय, असें अनंत म्हणाला. ॥ २२६ ॥ मग अष्टवसूंमध्ये जो अग्नि, तो मी आहे, हें जाण आणि उंच शिखर असलेल्या पर्वतांत मेरु मी आहे. ॥ २२७ ॥

**पुरोधसां च मुख्यं मां विद्धि पार्थ बृहस्पतिम्। सेनानीनामहं स्कन्दः सरसामस्मि सागरः ॥ २४ ॥**
**महर्षीणां भृगुरहं गिरामस्म्येकमक्षरम्। यज्ञानां जपयज्ञोऽस्मि स्थावराणां हिमालयः ॥ २५ ॥**

**अर्थ**—अर्जुना! पुरोहितांमध्ये मुख्य जो बृहस्पति, तो मी आहे, असें जाण, सेनापतींमध्ये कार्तिकेय स्वामी माझें स्वरूप होय. सर्व जलाशयांमध्ये सागर हा मी आहे. ॥ २४ ॥ महर्षींमध्ये भृगु हें माझें स्वरूप असून, वाणीने उच्चारिल्या जाणाऱ्या शब्दांमध्यें एकाक्षर जो प्रणव, तो माझें स्वरूप होय. यज्ञांमध्ये जपयज्ञ हा मी आहे. स्थावर पदार्थांमध्ये हिमालय हें माझें स्वरूप होय. ॥ २५ ॥

**जो स्वर्गसिंहासना सावावो। सर्वज्ञते आदीचा ठावो। तो पुरोहितांमाजीं रावो। बृहस्पती मी॥ २२८ ॥**

**अर्थ**—स्वर्गाच्या सिंहासनाला सहायभूत, सर्वज्ञतादि गुणांचें राहतें घर व पुरोहितांचा राजा असा जो बृहस्पति तो मी आहे. ॥ २२८ ॥

**गूढार्थदीपिका**—स्वर्गाच्या सिंहासनाला म्हणजे इंद्रपदाला दैत्यांकडून भय उत्पन्न झालें असतां बृहस्पतीच्या सल्ल्यानुसार त्याचें संरक्षण केलें जातें, म्हणून बृहस्पतीला "स्वर्गसिंहासना सावावो" हें विशेषण दिलें आहे.

**त्रिभुवनींचिया सेनापतीं-। आंत स्कंदु तो मी महामती। जो हरवीर्यें अग्निसंगती। कृत्तिकाआंतु जाहला॥ २२९ ॥**
**सकळिकां सरोवरांसीं। माजि समुद्र तो मी जळराशी। महर्षीआंतु तपोराशी। भृगु तो मी॥ २३० ॥**
**अशेषांही वाचा-। माजीं नटनाच सत्याचा। तें अक्षर एक मी वैकुंठींचा। वेल्हाळु म्हणे॥ २३१ ॥**
**समस्तांही यज्ञांच्यापैकीं। जपयज्ञु तो मी ये लोकीं। जो कर्मत्यागें प्रणवादिकीं। निपजविजे॥ २३२ ॥**

**अर्थ**—हे महामति अर्जुना! त्रैलोक्यांतील सेनापतिमध्ये श्रेष्ठ, शंकराच्या वीर्यापासून, अग्नीच्या संगतीने, कृत्तिकेच्या पोटीं जन्मलेला, जो कार्तिकस्वामी, तो माझें स्वरूप होय. ॥ २२९ ॥ समस्त सरोवरांमध्ये अगाध जळराशी जो समुद्र तो मी आहे व महर्षींमध्ये तपोराशी जो भृगुऋषि तो मी आहे. ॥ २३० ॥ वाणीने उच्चारिले जाणाऱ्या संपूर्ण शब्दांमध्ये अविनाशीपणाचें नृत्य करणारे जें ॐकाररूपी एक अक्षर तें मी होय, असे वैकुंठांत विलास करणारा भगवान श्रीकृष्ण म्हणतो. ॥ २३१ ॥ जो जपयज्ञ, यज्ञादि कर्म न करतां ॐकारादिकांच्या योगाने प्रगट केला जातो, तो या लोकांतील संपूर्ण यज्ञापैकीं मी आहे. ॥ २३२ ॥

**गूढार्थदीपिका**—"प्रणवादिकीं" या शब्दाने त्यांत भगवन्नामस्मरणाचा अंतर्भाव केला आहे.

**नामजपयज्ञु तो परम। बाधूं न शके स्नानादि कर्म। नामें पावन धर्माधर्म। नाम परब्रह्म वेदार्थी॥ २३३ ॥**

**अर्थ**—नामजपयज्ञ हा सर्व यज्ञांत श्रेष्ठ आहे. त्याला स्नानादि कर्मांचें बंधन नाही. उलट त्या नामजपयज्ञानेच धर्माधर्म देखील पावन व पूर्ण होतात; कारण नाम हें परब्रह्म आहे असाच वेदार्थ आहे. ॥ २३३ ॥

**गूढार्थदीपिका—नामें पावन धर्माधर्म**—भगवन्नामानें धर्म पदरीं पडतो व अधर्मादि दोष नाहीसे होतात.

**नाम परब्रह्म वेदार्थी**—"**वाचारंभणं विकारो नामधेयं मृत्तिकेत्येव सत्यम्**" (छां. उ. ६-१-४) या छांदोग्योपनिषदांतील श्रुतीचा "सर्वच नामरूपादि सदात्मनैव सत्यं विकारजातम्" सद्ब्रह्मावर व्यक्त होणारी नामरूपें सद्ब्रह्मरूपच आहेत असा आचार्यांनी भावार्थ व्यक्त केला आहे.

या श्रुतिवचनाच्या आधारें माऊलींनीहि "नाम परब्रह्म वेदार्थी" असे म्हटलें आहे.

अज्ञानाने नामरूपांचे परब्रह्माहून निराळे मानलेलें वस्तुत्व व अस्तित्व, आत्मज्ञानाने नाहीसे झाल्यावर जर तीं नामरूपें सद्ब्रह्माशीं ऐक्य पावतात, म्हणजे सद्ब्रह्माची होतात, म्हणून सद्ब्रह्मरूप होतात, तर पूर्णब्रह्मरूप सगुण

राम-कृष्णाच्या ठिकाणी ऐक्याने असलेलीं त्यांचीं नामें पूर्णब्रह्मस्वरूपच असतात यांत संशय नाही. "भगवन्नामानि तु अखंडशब्दब्रह्मरूपाणि" (उज्वलनीलमणी श्लो. १८). भगवंताचीं नांवें अखंडब्रह्मरूपच आहेत असे उज्वलनीलमणी या ग्रंथावरील आनंदचंद्रिका या टीकेंत विश्वनाथ चक्रवर्तीहि म्हणतात.

**स्थावरां गिरीं आंतु। पुण्यपुंज जो हिमवंतु। तो मी म्हणे कांतु। लक्ष्मीयेचा॥ २३४॥**

**अर्थ**—स्थावर जे पर्वतादिक पदार्थ त्यांत पुण्याची राशी जो हिमालय तो मी आहे असें लक्ष्मीचा पति भगवान श्रीकृष्ण म्हणाले.॥ २३४॥

**अश्वत्थः सर्ववृक्षाणां देवर्षीणां च नारदः। गन्धर्वाणां चित्ररथः सिद्धानां कपिलो मुनिः॥ २६॥**
**उच्चैःश्रवसमश्वानां विद्धि माममृतोद्भवम्। ऐरावतं गजेन्द्राणां नराणां च नराधिपम्॥ २७॥**
**आयुधानामहं वज्रं धेनूनामस्मि कामधुक्। प्रजनश्चास्मि कन्दर्पः सर्पाणामस्मि वासुकिः॥ २८॥**
**अनन्तश्चास्मि नागानां वरुणो यादसामहम्। पितृणामर्यमा चास्मि यमः संयमतामहम्॥ २९॥**

**अर्थ**—सर्व वृक्षांमध्ये अश्वत्थवृक्ष मी आहे. देवर्षिमध्ये नारद मी आहे. गंधर्वामध्ये चित्ररथ गंधर्व मी आहे. सिद्धांमध्ये कपिल महामुनि मी आहे॥ २६॥ सर्व घोड्यांमध्ये व सर्व गजांमध्ये अमृताकरितां मंथन केलेल्या क्षीरसमुद्रांतून उत्पन्न झालेला उच्चैःश्रवा घोडा व ऐरावत गज मी आहे. मनुष्यांमध्ये राजा माझी विभूति आहे.॥ २७॥ आयुधांमध्ये वज्र मी आहे, गाईमध्ये कामधेनु मी आहे. संतति उत्पन्न करणाऱ्यांमध्ये मदन मी आहे. सर्पांमध्ये वासुकि मी आहे.॥ २८॥ नागांमध्ये अनंत मी आहे. जळांत राहणाऱ्यांमध्ये वरुण मी आहे. पितृगणांमध्ये अर्यमा माझी विभूति आहे आणि शासन करणाऱ्यांमध्ये यम मी आहे.॥ २९॥

**कल्पद्रुम हन पारिजातु। गुणें चंदनुही वाड विख्यातु। तरि ययां वृक्षजातांआंतु। अश्वत्थु तो मी॥ २३५॥**
**देवऋषी आंतु पांडवा। नारदु तो मी जाणावा। चित्ररथु मी गंधर्वां। सकळिकांमाजीं॥ २३६॥**
**ययां अशेषांही सिद्धां-। माजीं कपिलाचार्यु मी प्रबुद्धा। तुरंगजातां प्रसिद्धां-। आंत उच्चैःश्रवा मी॥ २३७॥**
**राजभूषण गजांआंतु। अर्जुना मी गा ऐरावतु। पयोराशी सुरमथितु। अमृतांशु तो मी॥ २३८॥**
**ययां नरांमाजीं राजा। तो विभूतिविशेष माझा। जयातें सकळ लोक प्रजा। होऊनि सेविती॥ २३९॥**
**पैं आघवेयां हातियेरां-। आंत वज्र तें मी धनुर्धरा। जें शतमखोत्तीर्णकरा। आरूढोनि असे॥ २४०॥**
**धेनूंमध्यें कामधेनु। ते मी म्हणे विष्वक्सेनु। जन्मवितयाआंत मदनु। तो मी जाणें॥ २४१॥**
**सर्पकुळाआंत अधिष्ठाता। वासुकी गा मी कुंतीसुता। नागांमाजी समस्तां। अनंतु तो मी॥ २४२॥**

**अर्थ**—गुणाने, कल्पवृक्ष, पारिजात, चंदन हे वृक्ष श्रेष्ठ म्हणून प्रसिद्ध आहेत; तरीपण या सर्व वृक्षामध्ये अश्वत्थवृक्ष मी आहे.॥ २३५॥ अर्जुना! देवर्षीमध्ये नारदऋषि मी आहे असे जाण. सर्व गंधर्वामध्ये चित्ररथ गंधर्व हा मी होय.॥ २३६॥ या सर्व सिद्धांमध्ये, सूज्ञ अर्जुना! कपिलाचार्य मी होय. अमृतासाठी देवांनी केलेल्या क्षीरसागराच्या मंथनांतून निघालेले उच्चैःश्रवा व ऐरावत अनुक्रमें हे दोन, अश्वांच्या प्रसिद्ध असलेल्या जातिमध्ये व राज्यभूषण जे गज त्यामध्ये, माझ्या विभूति आहेत.॥ २३७-२३८॥ ज्याची सर्व लोक प्रजाजन होऊन सेवा करतात तो राजा, सर्व मनुष्यांमध्ये माझी विभूति होय.॥ २३९॥ संपूर्ण हत्यारांमध्ये जे शंभर यज्ञ करणाऱ्या इंद्राच्या हातांत असतें तें वज्र मी आहे.॥ २४०॥ गायींमध्ये कामधेनु ती मी होय, असें भगवान म्हणतात. जन्म देणाऱ्यांमध्ये मदन हा माझें स्वरूप होय असें जाण.॥ २४१॥ अर्जुना! संपूर्ण सर्पकुळांमध्ये त्या कुळाचा अधिपति जो वासुकि तो मी आहे व सर्व नागांमध्ये अनंत मी आहे.॥ २४२॥

**गूढार्थदीपिका**—विषारी ते सर्प व निर्विष ते नाग अशा भेदाला धरून सर्प व नाग असे दोन प्रकार सांगितले आहेत.

**अगा यादसांआंतु। जो पश्चिमप्रमदेचा कांतु। तो वरुण मी हें अनंतु। सांगत असे॥ २४३॥**
**आणि पितृगणां समस्तां-। माजीं अर्यमा जो पितृदेवता। तो मी हें तत्त्वतां। बोलत आहें॥ २४४॥**

**जगाचीं शुभाशुभें लिहिती। प्राणियांचिया मानसाचा झाडा घेती। मग केलियानुरूप होती। भोगनियम जे॥ २४५॥**
**तयां नियमितयां माजी यमु। जो कर्मसाक्षी धर्मु। तो मी म्हणे आत्मारामु। रमापती॥ २४६॥**

**अर्थ**—अर्जुना! जलांत राहणाऱ्या प्राण्यांमध्ये पश्चिमदिशारूपी स्त्रियेचा पति जो वरुण तो मी आहे असे श्रीकृष्ण सांगूं लागले.॥ २४३॥ सर्व पितरांच्या समुदायांत अर्यमा नावांची पितृदेवता मी आहे, हें मी खरें सांगतों.॥ २४४॥ सर्व प्राण्यांची पापपुण्यें लिहून ठेऊन व त्यांच्या मनांतील सर्व जाणून, त्याप्रमाणे प्राण्यांना नियमित जे सुखदु:खांचे भोग देतात.॥ २४५॥ असे भोगांचें नियमन करणाऱ्यामध्ये, कर्माचा साक्षी जो यमधर्मराज तो मी आहे, असें रमेचा पति आत्माराम भगवान श्रीकृष्ण म्हणाले.॥ २४६॥

**प्रह्लादश्चास्मि दैत्यानां कालः कलयतामहम्। मृगाणां च मृगेन्द्रोऽहं वैनतेयश्च पक्षिणाम्॥ ३०॥**
**पवनः पवतामस्मि रामः शस्त्रभृतामहम्। झषाणां मकरश्चास्मि स्रोतसामस्मि जाह्नवी॥ ३१॥**

**अर्थ**—दैत्यांमध्ये प्रह्लाद हा मी आहे. गणना करणाऱ्यांमध्ये काल माझें स्वरूप आहे. श्वापदांमध्ये सिंह मी आहे व पक्ष्यांमध्ये गरुड मी आहे.॥ ३०॥ वाहणाऱ्यांमध्ये वायु मी आहे. शस्त्र धरणाऱ्यांमध्ये राम मी आहे, जलांत राहणाऱ्या पुच्छवान प्राण्यांमध्ये मगर मी आहे व संपूर्ण नद्यांमध्ये जान्हवी मी आहे.॥ ३१॥

**अगा दैत्यांचियां कुळीं। प्रल्हादु तो मी न्याहाळीं। म्हणोनि दैत्यभावादिमेळीं। लिंपेचिना॥ २४७॥**
**पैं कळितयांमाजीं महाकाळु। तो मी म्हणे गोपाळु। श्वापदांआंतु शार्दुळु। तो मी जाण॥ २४८॥**
**पक्षिजातीमाझारीं। गरुड तो मी अवधारीं। यालागीं जो पाठीवरी। वाहों शके मातें॥ २४९॥**
**पृथ्वीचिया पैसारा-।माजीं घडी न लगतां धनुर्धरा।एकेंचि उड्डाणें सातांहि सागरां।प्रदक्षिणा करी जो॥ २५०॥**
**तयां वहिलियां गतिमंतां-। आंत पवनु तो मी पांडुसुता। शस्त्रधरां समस्तां-। माजीं श्रीराम तो मी॥ २५१॥**

**अर्थ**—अर्जुना! दैत्यांच्या कुळांमध्ये प्रह्लाद मी आहे, पहा. म्हणूनच त्याच्या ठिकाणीं दैत्यांच्या स्वभावाचा स्पर्श नव्हता.॥ २४७॥ श्रीकृष्ण म्हणतात, अर्जुना! गणना करणाऱ्यांमध्ये महाकाळ मी आहे आणि वन्यपशूमध्ये सिंह मी आहे असें जाण.॥ २४८॥ सर्व पक्षिजातीमध्ये गरुड मी आहे हें जाण, म्हणूनच तो मला पाठीवर वाहूं शकतो.॥ २४९॥ एका उड्डाणासरसे साताहि सागराला प्रदक्षिणा होईल अशा वेगाने वाहणारे जेवढे या संपूर्ण पृथ्वींवर पदार्थ आहेत, त्यांत वायु तो मी आहे आणि शस्त्र धारण करणाऱ्यांमध्ये प्रभू रामचंद्र मी आहे.॥ २५०-२५१॥

**जेणें सांकडलिया धर्माचेन कैवारें। आपणपयां धनुष्य करूनि दुसरें। विजयलक्ष्मीये एक मोहरें। केलें त्रेतीं॥ २५२॥**

**अर्थ**—ज्यांनी संकटांत पडलेल्या धर्माचा कैवार घेऊन व आपल्याच आपल्याहून निराळे असें धनुष्य करून घेऊन त्रेतायुगामध्यें एका विजयरूपी लक्ष्मीला आपल्याच समोर केले—म्हणजे संकटांत सांपडलेल्या धर्माला एकसारखा विजयच मिळवून दिला असा अर्थ.॥ २५२॥

**गूढार्थदीपिका—आपणपयां धनुष्य करूनि दुसरें**—मायामोहित जीवाचा देह जडविनाशी असतो; म्हणून त्या देहधारी जीवाने धारण केलेली आयुधेंहि जडविनाशी असतात. पण पूर्णब्रह्म अशा रामचंद्रादि अवतारांचे देह पूर्णब्रह्मच असल्यामुळे आणि पूर्णब्रह्माच्या ज्ञानाने, माया ही वस्तुच नाही असा त्यांना अनुभव येत असल्यामुळे, त्याच्या ठिकाणीं असणारीं आयुधें जडविनाशी राहूं शकत नाहीत. तीं चेतनच असतात.

"कैकय्यां भरतो जज्ञे पांचजन्यांशसंभवः" "सुदर्शनांशाच्छत्रुघ्नः" (पद्मपुराण उत्तरखंड अ. २६) भरत हा भगवान विष्णूच्या हातांत असलेल्या पांचजन्याचा अंश असून शत्रुघ्न हा सुदर्शनाचा अंश होय, असें पद्मपुराणांत सांगितलें आहे. वाल्मिकी रामायण बालकांड अध्याय १५ श्लोक २१ यांतील "कृत्वात्मानं चतुर्विधम्" या पदावर टीका करतांना टीकाकार म्हणतात "अत्रात्मानमित्युक्त्या शंखचक्रानन्तानामपि भगवद्रूपता सूचिता" भगवंतानी आपल्यालाच चार प्रकारचे करून घेतले असें जें म्हटले आहे त्यांत भगवान विष्णुच्या देहाच्या ठिकाणीं असलेली शंखचक्रादि आयुधें सच्चिदानंद भगवद्रूपच होतीं, असें सुचविले आहे.

**पाठीं उभें ठाकूनि सुवेळीं। प्रतापलंकेश्वराचीं सिसाळीं। गगनीं उदो म्हणतया हस्तबळी। दिधलीं भूतां॥ २५३॥**

**जेणें देवांचा मानु गिंवसिला। धर्मासि जीर्णोद्धारु केला। सूर्यवंशीं उदेला। सूर्य जो कां॥ २५४॥**
**तो हतियेरुपरजितयांआंतु। रामचंद्र मी जानकीकांतु। मकर मी पुच्छवंतु। जळचरांमाजीं॥ २५५॥**
**पैं समस्तांही वोघां-। मध्यें जे भगीरथें आणितां गंगा। जन्हूनें गिळिली मग जंघा। फाडूनि दिधली॥ २५६॥**
**ते त्रिभुवनैकसरिता। जान्हवी मी पंडुसुता। जळप्रवाहां समस्तां-। माझारीं जाणें॥ २५७॥**
**ऐसेनि वेगळालां सृष्टीपैकीं। विभूती नाम सुतां एकेकीं। सगळेन जन्मसहस्रें अवलोकीं। अर्ध्या नव्हती॥ २५८॥**

**अर्थ**—नंतर सुवेल पर्वतावर उभे राहून, मूर्तिमंत प्रताप असा जो लंकेचा राजा रावण, त्याचीं मस्तकें. आकाशात उदोउदो करणारीं भूतपिशाच्चें, यांच्या हातांत त्यांना बळी म्हणून ज्याने अर्पण केलीं. ॥ २५३ ॥ ज्याने देवाचा मान पुनः त्यांना प्राप्त करून दिला व धर्माचा जीर्णोद्धार केला, जो सूर्यवंशामध्ये मूर्तिमंत उगवलेला सूर्यच होय. ॥ २५४ ॥ हत्यार धारण करणाऱ्यांमध्ये तो सीतापति रामचंद्र, मी आहे. जलामध्ये राहणाऱ्या पुच्छवंत प्राण्यामध्ये मगर मी आहे. ॥ २५५ ॥ आणखी संपूर्ण प्रवाहांमध्ये जी गंगा, भगीरथ राजा पृथ्वीतलावर आणीत असतां, जन्हुराजाने गिळली व मग आपली मांडीं फाडून परत सोडली. ॥ २५६ ॥ अशी त्रिभुवनांत एकच वाहणारी, अर्जुना! जान्हवी नदी, ती सर्व जलप्रवाहांमध्ये माझें रूप होय असें जाण. ॥ २५७ ॥ याप्रमाणे निरनिराळ्या भूतसृष्टीमधील एका एका विभूतीचें नांव सांगतांना हजारों जन्म खर्ची घातले, तरी अर्ध्या देखील विभूति सांगणें होणार नाही, पहा! ॥ २५८ ॥

**सर्गाणामादिरन्तश्च मध्यं चैवाहमर्जुन। अध्यात्मविद्या विद्यानां वादः प्रवदतामहम्॥ ३२॥**
**अक्षराणामकारोऽस्मि द्वन्द्वः सामासिकस्य च। अहमेवाक्षयः कालो धाताहं विश्वतोमुखः॥ ३३॥**

**अर्थ**—या सर्व कार्यसृष्टीचा आदि, मध्य व अंत, अर्जुना! मीच आहे. विद्यांमध्ये अध्यात्मविद्या मी आहे. बोलणाऱ्यांच्या बोलण्यांत वाद मी आहे. ॥ ३२ ॥ अक्षरांमध्ये अकार मी आहे. सर्व समासांमध्यें द्वंद्वसमास मी आहे. सर्वांचा ग्रास करणारा असा जो अक्षय काल तो मीच असून, सर्व प्राण्यांच्या कर्मांचें फळ देणारा व सर्वत्र मुखें असणारा मीच आहे. ॥ ३३ ॥

**जैसीं अवघींचि नक्षत्रें वेंचावीं। ऐसी चाड उपजेल जैं जीवीं। तैं गगनाची बांधावी। लोथ जेवीं॥ २५९॥**
**कां पृथ्वीये परमाणूंचा उगाणा घ्यावा। तरि भूगोलुचि काखे सुवावा। तैसा विस्तरु माझा पहावा। तरि जाणावें मातें॥ २६०॥**
**जैसें शाखांसी फूलफळ। एकिहेळां वेटाळूं म्हणिजे सकळ। तरि उपडूनियां मूळ। जेवीं हातीं घेपे॥ २६१॥**
**तेवीं माझे विभूतिविशेष। जरी जाणों पाहिजेती अशेष। तरी स्वरूप एक निर्दोष। जाणिजे माझें॥ २६२॥**
**येऱ्हवीं वेगळालिया विभूती। कायिएक परिससी किती। म्हणोनि एकीहेळां महामती। सर्व मी जाण॥ २६३॥**
**मी आघवियेचि सृष्टी। आदिमध्यांतीं किरीटी। ओतप्रोत पटीं। तंतु जेवीं॥ २६४॥**
**ऐसिया व्यापका मातें जैं जाणावें। तैं विभूतिभेदें काय करावें। परि हे तुझी योग्यता नव्हे। म्हणोनि असो॥ २६५॥**

**अर्थ**—सर्व नक्षत्रें वेंचून घ्यावीं अशी जर आपल्याला मनांत इच्छा झाली तर, ज्याप्रमाणे आकाशाची मोट बांधली पाहिजे. ॥ २५९ ॥ किंवा पृथ्वीच्या संपूर्ण परमाणूंचा झाडा घ्यावा अशी इच्छा झाल्यास, ज्याप्रमाणे संबंध भू गोलच खाकेंत उचलून घेतला पाहिजे, त्याप्रमाणे माझा संपूर्ण विस्तार पाहावयाचा असल्यास मलाच जाणलें पाहिजे. ॥ २६० ॥ ज्याप्रमाणे वृक्षाचीं संपूर्ण फुलें, फळें फांद्यासह एकदम घ्यावीं असें म्हटल्यास झाडाचें मूळच उपटून हातीं घ्यावें लागतें. ॥ २६१ ॥ त्याप्रमाणे संपूर्ण माझे विभूतिविशेष जाणूं म्हटल्यास, माझें एक शुद्ध स्वरूपच जाणलें पाहिजे. ॥ २६२ ॥ नाही तर वेगळ्या एक एक विभूति, अर्जुना! तूं काय व किती ऐकशील? म्हणून बुद्धिमंता! मीच सर्व आहे हें एकदा जाणून घे. ॥ २६३ ॥ ज्याप्रमाणें वस्त्राचे आदी, मध्य व अंती एक सूतच ओतप्रोत भरलेले असतें, त्याप्रमाणे या संपूर्ण सृष्टीचे आदी, मध्य व अंती एक मीच संपूर्ण भरून आहे. ॥ २६४ ॥ अशा सर्वव्यापक मला जर जाणलें, तर या भिन्न-भिन्न विभूति जाणण्याचा काय उपयोग आहे? पण असें मला व्यापक स्वरूपाने जाणण्याला तुझी योग्यता नाही; म्हणून तें सांगून उपयोग नाहीं. ॥ २६५ ॥

**गूढार्थदीपिका**—संपूर्ण सृष्टींत एक भगवंतच भरलेला आहे किंवा परमेश्वराचे व नानारूपाचें अत्यंत ऐक्य

असून परमेश्वरच नामरूपाने नटला आहे. असें जाणणें, याला योग म्हणतात, हें मागें सांगितलेंच आहे. ज्ञानी पुरुषालाच या योगाचा अनुभव येतो. विभूति ह्या अज्ञान्याकरिता असतात असें जें आम्ही मागें म्हटलें आहे तें माऊलीच्या या ओवीच्या वचनाच्या आधारेच म्हटलें आहे.

**कां जे तुवां पुसलिया विभूती। म्हणोनि तिया आईक सुभद्रापती। तरी विद्यांमाजीं प्रस्तुती। अध्यात्मविद्या ते मी॥ २६६ ॥**
**अगा बोल्तयांचिया ठायीं। वादु तो मी पाहीं। जो सकलशास्त्रसंमतें कहीं। सरेचिना॥ २६७॥**
**जो निर्वचूं जातां वाढे। आइकतयां उत्प्रेक्षा सळु चढे। जयावरी बोल्तयांचीं गोडें। बोलणीं होती॥ २६८॥**
**ऐसा प्रतिपादनामाजी वादु। तो मी म्हणे गोविंदु। अक्षरांआंतु विशदु। अकारु तो मी॥ २६९॥**

**अर्थ**—हे अर्जुना! त्वां मला माझ्या विभूती सांग असें म्हटलें, म्हणून त्याच ऐक. सर्व विद्येमध्ये अध्यात्मविद्या मी आहे. ॥ २६६ ॥ अर्जुना! बोलणाऱ्यांच्या ठिकाणी सर्व शास्त्रांचे आधारें होणारा व कधी न संपणारा जो वाद तो मी आहे. ॥ २६७ ॥ जो प्रतिपादन करूं जातां वाढतो, ऐकणाऱ्यांच्या मनांत कोट्या करण्याच्या उर्मी उठतात आणि ज्यांत बोलणांऱ्यांचीं गोड बोलणीं होतात. ॥ २६८ ॥ असा जो वाद, तो सर्व प्रकारच्या प्रतिपादनामध्ये मी आहे असे भगवान म्हणतात. अक्षरांमध्ये स्पष्ट जो 'अ' कार तो माझें स्वरूप होय. ॥ २६९ ॥

**गूढार्थदीपिका—प्रतिपादनामाजी वाद**—बोलण्याचे जल्प, वितंड, वाद असे तीन प्रकार आहेत. वादाचें बोलणें निराग्रही बुद्धीने व शास्त्राचा प्रमाण मानून गोड भाषेंत होत असतें, म्हणून त्या वादाला भगवंतांनी आपली विभूति म्हटलें आहे.

**पैं गा समासांमाझारीं। द्वन्द्व तो मी अवधारीं। मशकाल्रगोनि ब्रह्मावेरीं। ग्रासिता तो मी॥ २७०॥**
**मेरुमंदरादिकीं सर्वीं। सहित पृथ्वीतें विरवी। जो एकार्णवातेंही जिरवीं। जेथिंचा तेथें॥ २७१॥**
**जो प्रळयतेजा देत मिठी। सगळिया पवनातें गिळी किरीटी। आकाश जयाचिया पोटीं। सामावलें॥ २७२॥**
**ऐसा अपार जो काळु। तो मी लक्ष्मीलीळु। मग पुढती सृष्टीचा मेळु। सृजिता तो मी॥ २७३॥**

**अर्थ**—आणि सर्व समासांमध्ये द्वंद्वसमास मी आहे असें जाण. मशकापासून ब्रह्मदेवापर्यंत सर्वांना ग्रासणारा (अक्षय जो काळ) तो मी आहे. ॥ २७० ॥ सातहि समुद्राचा एक समुद्र करून मेरुमंदार इत्यादि सर्व पर्वतासहित संपूर्ण पृथ्वीला त्या झालेल्या समुद्रांत नाहीसे करतो व त्या एकरूप झालेल्या समुद्रालाहि (प्रलय तेजाने) जेथल्या तेथे शोषून टाकतो. ॥ २७१ ॥ पुढें जो प्रलयकालच्या तेजालाहि मिठी मारून सर्व वायूलाहि जो गिळतो आणि शेवटीं आकाशहि ज्याच्या पोटांत, अर्जुना! सामाविलें जातें. ॥ २७२ ॥ असा अमर्याद जो काळ, तो मी होय, असें लक्ष्मीशीं कीडा करणारा श्रीकृष्ण म्हणूं लागला. मग पुनः सृष्टीचा समुदाय उत्पन्न करणारा तोहि मीच आहे. ॥ २७३ ॥

**गूढार्थदीपिका—सृष्टीचा मेळ। सृजिता तो मी**—कार्य उत्पन्न करणाऱ्याला निमित्तकारण म्हणतात. भगवानच सृष्टिकार्याचें निमित्तकारण आहे असा अर्थ.

**मृत्युः सर्वहरश्चाहमुद्भवश्च भविष्यताम्। किर्तिः श्रीर्वाक् च नारीणां स्मृतिर्मेधा धृतिः क्षमा॥ ३४॥**
**बृहत्साम तथा साम्नां गायत्री छन्दसामहम्। मासानां मार्गशीर्षोऽहमृतूनां कुसुमाकरः॥ ३५॥**

**अर्थ**—सर्व नाहीसे करणारा मृत्यु मीच आहे. उत्पन्न होणाऱ्या वस्तूंना उत्पन्न करणारा मीच आहे. स्त्रियांमध्ये कीर्ति, श्री, वाणी, स्मृति, मेधा, धृति, क्षमा ह्या माझ्या विभूति आहेत. ॥ ३४ ॥ सामामध्ये बृहत्साम हे माझे स्वरूप होय. छंदांमध्ये गायत्री छंद, महिन्यांत मार्गशीर्ष व ऋतूंमध्ये वसंत ऋतु मी आहे. ॥ ३५ ॥

**सृजिलिया भूतांते मीचि धरीं। सकळां जीवनही मीचि अवधारीं। शेखीं सर्वांतें या संहारीं। तेव्हा मृत्युही मीचि॥ २७४॥**

**अर्थ**—उत्पन्न झालेल्या भूतसृष्टीला मीच धारण करतो. सर्व सृष्टीला मीच जीवन आहे—म्हणजे माझ्यामुळें त्यांचें पोषण होते व वृद्धि होते-शेवटीं सर्वांचा संहार मीच करतों, म्हणून मृत्युहि मीच आहे. ॥ २७४ ॥

**गूढार्थदीपिका**—कोणतेहि कार्य आपल्या उपादान कारणाचें ठिकाणींच उत्पन्न होतें, तेथेंच त्याची स्थिति असते व शेवटीं तेथेच त्याचा लय होतो; म्हणून सर्व सृष्टीचें भगवानच उपादानकारण आहे असा या ओवीचा अर्थ आहे.

**आतां स्त्रीगणांचां पैंकीं। माझिया विभूती सात आणिकी। तिया ऐक कवतिकीं। सांगिजतील॥ २७५॥**
**तरी नित्य नवी जे कीर्ति। अर्जुना ते माझी मूर्ती। आणि औदार्येसीं जे संपत्ती। तेही मीचि जाणें॥ २७६॥**

**अर्थ**—आतां स्त्रीजातीपैकीं माझ्या आणखी सात विभूति आहेत. त्याहि कौतुकाने सांगतो, ऐक. ॥ २७५ ॥ तरी नित्य नवी जी कीर्ति आहे ती, अर्जुना! माझी विभूति होय आणि औदार्यासह जी संपत्ति तीहि माझी विभूति होय, असें जाण. ॥ २७६ ॥

**गूढार्थदीपिका—नित्य नवी जे कीर्ती। अर्जुना ते माझी मूर्ती**—लोकांत निष्कलंक कीर्ति होऊन पुन: नव्या नव्या कीर्तीची त्यात भर पडत जाणें याला नित्य नवी कीर्ति म्हणतात. हें सात्विक सदाचरणाचें फळ असल्यामुळे अशा कीर्तीला भगवंतांनी आपली विभूति म्हटलें आहे.

**औदार्येसीं जे संपत्ती**—राजस पुण्यकर्मानें जी संपत्ति प्राप्त होते, तींत औदार्य नसतें. ती कृपणादि दुर्गुणासह असते आणि तिचा विनियोग सकामतेने केला जातो, सात्विक पुण्याने जी संपत्ति प्राप्त होते. ती औदार्यासहित असते-म्हणजे निष्काम चित्ताने सात्विक कर्मांतच उदारपणें तिचा विनियोग केला जातो-म्हणून ही संपत्ति माझें स्वरूप होय असें भगवान म्हणतात.

**आणि ते गा मी वाचा। जे सुखासनीं न्यायाचां। आरूढोनि विवेकाचां। मार्गी चाले॥ २७७॥**
**देखिलेनि पदार्थें। जे आठवूनि दे मातें। ते स्मृतिही पै एथें। त्रिशुद्धी मी॥ २७८॥**
**पैं स्वहिता अनुयायिनी। मेधा ते गा मी इये जनीं। धृती मी त्रिभुवनीं। क्षमा ते मी॥ २७९॥**
**एवं नारींमाझारीं। या सातही शक्ति मीचि अवधारी। ऐसें संसारगजकेसरी। म्हणता जाहला॥ २८०॥**
**वेदराशीचिया सामा-। आंत बृहत्साम जें प्रियोत्तमा। तें मी म्हणे रमा-। प्राणेश्वरु॥ २८१॥**

**अर्थ**—आणि जी वाणी न्यायाला व विवेकाला धरून असते ती माझी विभूति होय. ॥ २७७ ॥ पदार्थ पाहिल्याबरोबर माझी आठवण करून देणारी स्तुति, माझी विभूति होय हें त्रिवार सत्य जाण. ॥ २७८ ॥ आपल्या आत्महिताचा घात न करणारी धारणाशक्ति, ही माझी विभूति होय आणि आत्मप्राप्तिकरितां शमदमादिसाधनांचें दु:ख, ज्या धैर्याने सहन केलें जातें, ते धैर्य व कोणी अपकार केला असतां, उलट त्याच्यावर अपकार करण्याची वृत्ति न उठणें, ही जी क्षमा, ती माझी विभूति होय. ॥ २७९ ॥ याप्रमाणे स्त्री जातिपैकीं या सात शक्ति माझ्या विभूति आहेत, हें जाण, असें संसारहत्तीचा नाश करणारा सिंह, भगवान श्रीकृष्ण म्हणते झाले. ॥ २८० ॥ हे प्रियतम अर्जुना! संपूर्ण वेदराशींत श्रेष्ठ असलेल्या सामवेदांत, बृहत्साम हें माझें स्वरूप आहे, असे रमेचे प्राणेश्वर भगवान श्रीकृष्ण म्हणतात. ॥ २८१ ॥

**गूढार्थदीपिका**—"वेदानां सामवेदोऽस्मि" सर्व वेदांत सामवेद माझी विभूति आहे, असे मागें भगवंतांनी सांगितले. येथे पुन: त्या सामवेदांतील "त्वामिद्धि हवामहे" या ऋचाने जें इंद्राचें परमेश्वरस्वरूपाने विशेष गायन केलें आहे व ज्याला बृहत्साम म्हणतात, त्या स्तोत्राला भगवंतांनी आपली विभूति म्हटलें आहे. येथे सर्व वेदांत आपल्या वैदिक भगवत्स्तुत्यात्मक सामवेदभागाला भगवंतांनी स्वविभूतित्व सांगून, सर्व कर्मरूपधर्मापेक्षा आपल्या स्तवनरूप धर्माचें श्रेष्ठत्व दाखविलें आहे.

भारतातील विष्णुसहस्रनामाचे प्रारंभी धर्मराजाने भीष्माला "को धर्म: सर्वधर्माणां भवत: परमो मत:" आपल्या मतें सर्व धर्मांत कोणता धर्म श्रेष्ठ आहे, असा प्रश्न केला असतां, भीष्माने" "यद्भक्त्या पुंडरीकाक्षं स्तवैरर्चयेन्नर: सदा" भक्तिभावाने भगवंताची स्तुति करणें हाच सर्व धर्मांत श्रेष्ठ धर्म आहे, असे उत्तर दिलें आहे.

**गायत्रीछंद जें म्हणिजे। तें सकळां छंदांमाजि माझें। स्वरूप हें जाणिजे। निभ्रांत तुवां॥ २८२॥**
**मासांआंत मार्गशीरु। तो मी म्हणे शार्ङ्गधरु। ऋतूंमाजीं कुसुमाकरु। वसंतु तो मी॥ २८३॥**

**अर्थ**—ज्याला गायत्री छंद म्हणतात, तें सर्व छंदामध्ये माझें स्वरूप आहे, हें नि:संशय जाण. ॥ २८२ ॥ मासांमध्ये मार्गशीर्षमास मी आहे व ऋतूंमध्ये वसंतऋतु मी आहे, असें श्रीकृष्ण म्हणाले. ॥ २८३ ॥

**द्यूतं छलयतामस्मि तेजस्तेजस्विनामहम्। जयोऽस्मि व्यवसायोऽस्मि सत्त्वं सत्त्ववतामहम्॥ ३६॥**
**वृष्णीनां वासुदेवोऽस्मि पाण्डवानां धनञ्जयः। मुनीनामप्यहं व्यासः कवीनामुशना कविः॥ ३७॥**

**अर्थ**—छळणाऱ्यांमध्ये द्यूत ही माझी विभूति आहे. तेजस्वी पदार्थांमध्ये तेज माझी विभूति आहे. जय मिळविणाऱ्यांमध्ये जय ही माझी विभूति होय. उद्यमामध्ये न्यायाने केलेला उद्यम मी आहे. सत्व ज्यांच्यात आहे अशा सात्विकांमध्ये सत्व मी आहे. ॥ ३६ ॥ यादवकुळांत वासुदेव मी आहे, पांडवांत अर्जुन मी आहे. मुनीमध्यें व्यास मी आहे व कवीमध्ये शुक्राचार्य मी आहे. ॥ ३७ ॥

**छळितयां विंदाणा-। माजीं जूं तें मी विचक्षणा। म्हणोनि चोहटां चोरी परी कवणा। निवारूं न ये॥ २८४॥**
**अगा अशेषांही तेजसां-। आंत तेज तें मी भरंवसा। विजयो मी कार्योद्देशां। सकळांमाजीं॥ २८५॥**
**जेणें चोखाळत दिसे न्याय। तो व्यवसायांत व्यवसाय। माझेंचि स्वरूप हें राय। सुरांचा म्हणे॥ २८६॥**
**सत्त्वाथिलियांआंतु। सत्त्व मी म्हणे अनंतु। यादवांमाजीं श्रीमंतु। तोचि तो मी॥ २८७॥**
**जो देवकी वसुदेवास्तव जाहला। कुमारीसाठीं गोकुळीं गेला। तो मी प्राणासकट पियाला। पूतनेतें॥ २८८॥**
**नुघडतां बाळपणाची फुली। जेणें मिया अदानवी सृष्टि केली। करीं गिरि धरूनि उमाणिली। महेंद्रमहिमा॥ २८९॥**
**कालिंदीचें हृदयशल्य फेडिलें। जेणें मियां जळत गोकुळ राखिलें। वासरुवांसाठीं लाविलें। विरंचीस पिसें॥ २९०॥**
**प्रथमदशेचिये पहांटे-। माजि कंसा ऐशीं अचाटें। महाधेंडीं अवचटें। लीळाचि नासिलीं॥ २९१॥**
**हें काय कितीएक सांगावें। तुवांही देखिलें ऐकिलें असे आघवें। तरि यादवांमाजीं जाणावें। हेंचि स्वरूप माझें॥ २९२॥**

**अर्थ**—हे सूज्ञ अर्जुना! छळणाऱ्या प्रकारांत जुगार हें माझें स्वरूप होय. म्हणून द्यूत, उघड चव्हाट्यावर चोरी करणेंच होय; पण कोणाला त्यापासून परावृत्त करूं नये. ॥ २८४ ॥ अर्जुना! संपूर्ण तेजस्वी पदार्थांत तेज माझें स्वरूप होय, हें निश्चयाने जाण. कार्य करण्याचे जे विजयाचे उद्देश असतात, त्या सर्वांमध्ये जय माझी विभूति होय. ॥ २८५ ॥ सर्व उद्योगांमध्ये ज्या उद्योगांत न्याय स्पष्ट दिसतो तें माझे स्वरूप होय; असे देवाधिदेव श्रीकृष्ण म्हणतात. ॥ २८६ ॥ सात्विकांमध्ये राहणारें सत्व मी आहे. यादवांमध्ये जो श्रीमंत तोच मी आहे असे श्रीकृष्ण म्हणतात. ॥ २८७ ॥ जो देवकीवसुदेवाच्या तपामुळे प्रगट झाला, जो गोपकुमारीकरितां गोकुळांत गेला व ज्याने प्राणासकट पूतनेचें प्राशन केलें तोच मी होय. ॥ २८८ ॥ बाळपणाची अवस्था संपण्यापूर्वी दैत्यरहित पृथ्वी केली आणि हातावर पर्वत धरून इंद्राचा पराक्रम अजमाविला. ॥ २८९ ॥ यमुनेच्या हृदयांतील दुःख नाहिसे केलें, गोकुळ जळण्याची भीति प्राप्त झाली असतां, तेवढा अग्नी पिवून गोकुळाचें रक्षण केलें. वांसरें चोरून नेणाऱ्या ब्रह्मदेवास वेड लाविलें. ॥ २९० ॥ कुमारदशेंतच कंसासारख्या अचाट पराक्रमी वीरांचा सहज लीलेनें नाश केला. ॥ २९१ ॥ अर्जुना! हें किती वर्णन करायचें? तूं देखील हे सर्व पाहिलें व ऐकिलें आहेस, तर यादवांमध्ये हेंच माझें स्वरूप होय. ॥ २९२ ॥

**गूढार्थदीपिका—यादवामाजि जाणावें। हेंचि स्वरूप माझें**—निरनिराळ्या जीववर्गांत, त्या वर्गांतील श्रेष्ठ जीवांना, भगवंतांनी आपली श्रेष्ठ विभूति म्हटलें आहे, हें आम्हीं मागे सांगितले आहे; पण भगवान श्रीकृष्ण व भगवान रामचंद्र पूर्णब्रह्म ईश्वर असूनहि त्यांचें जें विभूतित्व सांगितलें आहे त्याचे कारण, ते जीव होते असें नसून वृष्णिकुलामध्ये व रघुकुलामध्ये त्यांच्याशिवाय दुसरा कोणी श्रेष्ठ नव्हता, म्हणून सांगितलें आहे.

**आणि सोमवंशीं तुम्हां पांडवां-। माजीं अर्जुन तो मी जाणावा। म्हणोनि एकमेकांचिया प्रेमभावा। विघडु न पडे॥ २९३॥**
**संन्यासी तुवां होऊनि जनीं। चोरूनि नेली माझी भगिनी। तऱ्ही विकल्पु नुपजे मनीं। मी तूं दोन्ही स्वरूप एक॥ २९४॥**
**मुनीआंत व्यासदेवो। तो मी म्हणे यादवरावो। कवीश्वरांमाजीं धैर्या ठावो। उशनाचार्य मी॥ २९५॥**

**अर्थ**—आणि चंद्रवंशांत उत्पन्न झालेल्या तुम्हां पांडवांमध्ये अर्जुन मी आहे, म्हणूनच आपल्या परस्परांच्या प्रेमांत कशानेहि बिघाड होत नाही. ॥ २९३ ॥ लोकांत बाह्यतः संन्यासी होऊन तूं माझी बहीण चोरून नेलीस; पण मी व तूं एक स्वरूप असल्यामुळे माझ्या मनांत कांही विकल्प उठला नाही. ॥ २९४ ॥ सर्व मुनीमध्ये व्यासदेव तो

मी आहे आणि कवीश्वरामध्ये, सर्व धैर्याचें वसतें ठिकाण जो शुक्राचार्य तो मी आहे, असे यादवश्रेष्ठ भगवान श्रीकृष्ण म्हणतात. ॥ २९५ ॥

**दण्डो दमयतामस्मि नीतिरस्मि जिगीषताम्। मौनं चैवास्मि गुह्यानां ज्ञानं ज्ञानवतामहम्॥ ३८॥**
**यच्चापि सर्वभूतानां बीजं तदहमर्जुन। न तदस्ति विना यत्स्यान्मया भूतं चराचरम्॥ ३९॥**
**नान्तोऽस्ति मम दिव्यानां विभूतीनां परन्तप। एष तूद्देशतः प्रोक्तो विभूतेर्विस्तरो मया॥ ४०॥**

**अर्थ**—निग्रह करणाऱ्यांमध्ये दंड मी आहे. जिंकू इच्छिणाऱ्यामध्ये नीति मी आहे. गुप्त ठेवणाऱ्यामध्ये मौन मी आहे. ज्ञानवानांमध्ये ज्ञान मी आहे. ॥ ३८ ॥ अर्जुना! सर्व भूतांचें जें कांहीं बीज किंवा उत्पत्तिकारण असेल तें मी आहे, कारण जें जें चराचरभूत आहे तें तें माझ्यावांचून नाही. ॥ ३९ ॥ शत्रूला ताप देणाऱ्या अर्जुना! माझ्या दिव्य विभूतींना अंतच नाही. मी माझ्या विभूतीचा हा विस्तार, विचारलास तेवढ्या पुरता संक्षेपाने सांगितला. ॥ ४० ॥

**अगा दमितयांमाझारीं। अनिवार दंडु तो मी अवधारीं। जो मुंगियेलागोनि ब्रह्यावेरीं। नियमित पावे॥ २९६॥**
**पैं सारासार निर्धारितयां। धर्मज्ञानाचा पक्षु धरितयां। सकळशास्त्रांमाजीं ययां। नीतिशास्त्र तें मी॥ २९७॥**

**अर्थ**—निग्रह करणाऱ्यांमध्ये, अर्जुना! मुंगीपासून तर ब्रह्मदेवापर्यंत त्यांच्या कर्मानुसार कधी न चुकतां अवश्य दंड जो मिळतो, तो मी आहे. ॥ २९६ ॥ सर्व शास्त्रांमध्ये सार काय, असार काय, यांचा निर्णय करणारे व धर्मज्ञान यांचा पक्ष धरणारें जें नीतिशास्त्र तें मी आहे. ॥ २९७ ॥

**गूढार्थदीपिका—नीतिशास्त्र तें मी**—धर्म, ज्ञान व सारासार विचार याला धरून आर्षनीतिशास्त्र निर्माण झालें आहे, ह्याचा विचार अ. ४ ओ. ५३ वरील गूढार्थदीपिकेंत केला आहे.

**आघवियाचि गूढां-। माजीं मौन तें मी सुहाडा। म्हणोनि न बोलतयां पुढां। स्त्रष्टाही नेण होय॥ २९८॥**
**अगा ज्ञानियांचां ठायीं। ज्ञान तें मी पाहीं। आतां असो हें ययां कांहीं। पार न देखों॥ २९९॥**

**अर्थ**—संपूर्ण गुप्त ठेवणाऱ्यामध्ये, सख्या अर्जुना! मौन तें मी आहे. म्हणूनच बोलणाऱ्यांच्या मनांतील, सृष्टि उत्पन्न करणारा ब्रह्मदेवहि जाणूं शकत नाही. ॥ २९८ ॥ अगा अर्जुना! ज्ञानियांचे ठिकाणी जें ज्ञान असतें, तें, मी आहे. आतां पुरें. या माझ्या विभूतींना मर्यादाच नाही. ॥ २९९ ॥

**गूढार्थदीपिका—ज्ञानियांचियाठायीं। ज्ञान तें मी पाही**—ज्ञान हें एकच असलें तरीं अंतःकरणवृत्तीमुळे तें वृत्तिसहित व वृत्तिरहित असे दोन प्रकारचें होतें.

विभूति ही विशेषगुणाला धरून असते हें वर सांगितलेंच आहे. ज्या ज्ञानांत मला कळलें किंवा मला जाणीव झाली असा हा विशेष स्फुरत नाही, त्या ज्ञानाला वृत्तिरहितज्ञान किंवा चिन्मात्र ज्ञान म्हणतात आणि ज्या ज्ञानांत हा विशेष स्फुरतो त्या ज्ञानाला वृत्तिरूप ज्ञान म्हणतात.

चिन्मात्रज्ञान पूर्ण ब्रह्मस्वरूप असून; ज्ञानी अज्ञानी या सर्व प्राणिमात्रांचे ठिकाणीं ते मूळचेंच असून, त्या ज्ञानाने आपल्याला कोणी ज्ञानवान् समजत नाही; पण मला कळले मी जाणलें असे ज्या वृत्तिरूपज्ञानांत स्फुरतें, त्या ज्ञानाने मनुष्य मी ज्ञानवान् झालों असें समजतो.

म्हणून येथील 'ज्ञान' या शब्दाचा, वृत्तिरूपज्ञान किंवा मला कळलें अशा जाणिवेने युक्त असलेलें ज्ञान, असा अर्थ आहे.

**पैं पर्जन्याचिया धारां। वरी लेख करवेल धनुर्धरा। कां पृथ्वीचिया तृणांकुरां। होईल ठी॥ ३००॥**
**पैं महोदधिचिया तरंगां। व्यवस्था धरूं नये जेवीं गा। तेविं माझिया विशेषलिंगां। नाहीं मिती॥ ३०१॥**
**ऐशियाही सातपांच प्रधाना। विभूती सांगितलिया तुज अर्जुना। तो हा उद्देशु जो गा मना। आहाच गमला॥ ३०२॥**
**येरां विभूतिविस्तारांसि कांहीं। एथ सर्वथा लेख नाहीं। म्हणोनि परिससी तूं काई। आम्ही सांगों किती॥ ३०३॥**
**ययालागीं एकीहेळां तुज। दाऊं आतां वर्म निज। तरी सर्वभूतांकुरें बीज। विरूढत असे तें मी॥ ३०४॥**
**म्हणोनि सानें थोर न म्हणावें। उंच नीच भाव सांडावे। एक मीचि ऐसें मानावें। वस्तुजातातें॥ ३०५॥**

**तरी यावरी साधारण। आईक पां आणिकही खूण। तरि अर्जुना तें तूं जाण। विभूति माझी॥ ३०६॥**

**अर्थ**—अर्जुना! एकदां पावसाच्या धारा मोजतां येतील किंवा पृथ्वीवरील गवताच्या संपूर्ण अंकुराचे ठिकाणीं देखील मर्यादेची दृष्टि होऊं शकेल. ॥ ३०० ॥ परंतु महासमुद्राचे तरंगांची गणती ज्याप्रमाणे करतां येत नाही, त्याप्रमाणे माझ्या विशेषरूपचिन्ह असलेल्या विभूतींची संख्याच करतां यावयाची नाही. ॥ ३०१ ॥ अशांतहि मुख्य मुख्य सातवर पांच म्हणजे पंच्याहत्तरं विभूति, अर्जुना! तुला सांगितल्या, तो हा विचारण्यापुरता जो मी थोडा विभूतिविस्तार केला, तो मनाला वरवर झाला असेंच वाटतें. ॥ ३०२ ॥ बाकींच्या विभूतिविस्ताराची मर्यादा किंवा संख्याच करवत नाही; म्हणून तूं ऐकणार किती व आम्ही सांगणार तरी कोठवर?॥ ३०३ ॥ म्हणून एकदांचें तुला आपल्या विभूतीचें वर्म सांगून ठेवतों की जें बीज सर्व भूतरूप अंकुरानें उगवत असतें ते मी आहे—म्हणजे मीच सर्व सृष्टिरूप झालों आहे. ॥ ३०४ ॥ म्हणून येथें लहानथोर, उंच-नीच असा भेदभाव करूं नये. संपूर्ण एक परमेश्वरच सर्व स्वरूपाने नटला आहे असें मानावें. ॥ ३०५ ॥ तर यावरहि मी विभूति ओळखण्याची आणखीहि साधारण खूण सांगतों, त्यावरून अर्जुना! माझी विभूति जाणून घेत जा. ॥ ३०६ ॥

**यद्यद्विभूतिमत्सत्त्वं श्रीमदूर्जितमेव वा । तत्तदेवाऽवगच्छ त्वं मम तेजोंऽशसम्भवम्॥ ४१॥**

**अर्थ**—या जगात जी जी वस्तु माझ्या विशेषगुणांनी विशिष्ट व संपत्तींनी युक्त असेल ती ती वस्तु, माझ्या ईश्वरी तेजाचाच अंश आहे असे समज. ॥ ४१ ॥

**जेथ जेथ संपत्ति आणि दया। दोन्ही वसती आलिया ठाया। ते ते जाण धनंजया। विभूति माझी॥ ३०७॥**

**अर्थ**—संपत्ति व दया ह्या दोन्ही ज्या वस्तुचे ठिकाणीं एकत्र वसत असतील, ते ते अर्जुना! माझे अंश होत असे जाण. ॥ ३०७ ॥

**अथवा बहुनैतेन किं ज्ञातेन तवार्जुन। विष्टभ्याहमिदं कृत्स्नमेकांशेन स्थितो जगत्॥ ४२॥**

***ॐतत्सदिति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे विभूतियोगो नाम दशमोऽध्याय: ॥ १० ॥***

**अर्थ**—किंवा नाना प्रकारच्या विभूतिद्वारा, अर्जुना मला जाणण्यांत तुला कांही लाभ होणार नाही, हे संपूर्ण जगत् एका अंशाने व्यापून मी स्थित आहे—म्हणजे हे संपूर्ण जगत् माझ्या एका अंशावर भासतें असा अर्थ. ॥ ४२ ॥

**अथवा एकलें एक बिंब गगनीं। तरि प्रभा फांके त्रिभुवनीं। तेवीं एकाकियाचि सकळ जनीं। आज्ञा पाळिजे॥ ३०८॥**

**अर्थ**—अथवा ज्याप्रमाणे आकाशांत एकच सूर्यबिंब असतें आणि किरणाच्या द्वारें त्याचा प्रकाश त्रिभुवनांत पसरतो, त्याप्रमाणे सर्वत्र मी परिपूर्ण रूपानेच असल्यामुळे संपूर्ण जगांत विभूतीच्या द्वारे देखील माझीच आज्ञा पाळली जाते. ॥ ३०८ ॥

**तयांतें एकलें झणीं म्हण। ते निर्धन या भाषा नेण। काय कामधेनुसवें सर्व साहान। चालत असे॥ ३०९॥**
**तियेतें जें जेधवां जो मागे। तें ते एकसरेंचि प्रसवों लागे। तेवीं विश्वविभव तया अंगें। होऊनि असती॥ ३१०॥**
**तयातें वोळखावया हेचि संज्ञा। जे जगें नमस्कारिजे आज्ञा। ऐसें आथि ते जाण प्राज्ञा। अवतार माझे॥ ३११॥**

**अर्थ**—म्हणून त्यांना एकलें—म्हणजे मर्यादित ऐश्वर्याने युक्त-असे कदाचित् म्हणशील (पण असें त्यांना म्हणूं नकोस) त्यांना दरिद्री हे शब्द लावूं नकोस. कामधेनुबरोबर सर्व सामग्री चालत असते काय?॥ ३०९ ॥ त्या कामधेनूला जो जेव्हा जे कांहीं मागतो तेव्हा ती सर्व एकदम आपल्यापासून प्रगट करते, त्याप्रमाणे तेहि स्वत:अंगाने, विश्वच ज्यांचें ऐश्वर्य आहे, असे भगवत्स्वरूपच असतात. ॥ ३१० ॥ त्यांना ओळखण्याची ही एक खूण आहे की सर्व जीव त्यांची आज्ञा शिरसा मान्य करतात. बुद्धिमान् अर्जुना! हे असे जे असतील ते माझें अवतार होत हें जाण. ॥ ३११ ॥

**गूढार्थदीपिका**—अपूर्णता हा जीवपणा आहे आणि विभूतींचे ठिकाणी भगवंताच्या अपरिमित ऐश्वर्याचा एक अंश असतो, म्हणूनच विभूति हे जीव असतात. हें मागें सांगितलेंच आहे.

पण वास्तविक पाहतां भगवंताचें सच्चिदानंदस्वरूप नित्य पूर्ण असतें—म्हणजे नामरूपात्मक दशेंतहि तें कधी अपूर्ण होत नाही. (बृ. उ. अ. ५ भाष्यारंभ) आणि "न कचिदवयवैः स्फुटति" (मा. का. ३-२) तें नित्य अस्फुट राहतें. म्हणजे कधीं अंशभूत होत नाही, असे आचार्यांनी म्हटलें असून "हे सरले अद्वैता अस्फुटामाजि" (अ. प्र. ९-६) भगवंताची अद्वैतस्थिति अस्फुट आहे, असे श्रीमाऊलींनीहि अमृतानुभवांत म्हटलें असल्यामुळें, त्या भगवंताचे ज्ञानवैराग्यादि षड्गुणैश्वर्यहि नित्य, अपरिमित असते. म्हणून सर्व नाम-रूपात्मक सृष्टीच्या आंत-बाहेर व्यापून असलेला परमात्मा, सर्वत्रच पूर्ण सच्चिदानंदस्वरूप व पूर्ण ऐश्वर्यसंपन्नच असतो, हें सिद्ध आहे.

पूर्ण ब्रह्मस्वरूप व पूर्ण ऐश्वर्यसंपन्न अशा नामरूपात्मक विग्रहालाच अवतार ही संज्ञा असल्यामुळें, खरोखर प्रत्येक नामरूपात्मक विग्रह परमेश्वराचा अवतारच होय असें म्हणावें लागतें.

या सिद्धान्ताला धरून माऊलींनी, माझ्या ठिकाणीं अपूर्णतारूप विभूतीचे अनुसंधान न करतां, पूर्ण अशा अवताराचेच अनुसंधान करावें असे या ओव्यांतून म्हटलें आहे.

**आतां सामान्य विशेष। हें जाणणें एथ महादोष। कां जे मीचि एक अशेष। विश्व आहे म्हणोनि॥ ३१२॥**

**अर्थ**—आणि मीच एक सर्व जगद्रूप झालों असून, मी सर्वत्र सारखा असल्यामुळें, सामान्य-विशेष पाहणें हा मोठा दोष आहे.॥ ३१२॥

**गूढार्थदीपिका**—सामान्य म्हणजे साधारण किंवा कनिष्ठ, विशेष म्हणजे अधिक किंवा श्रेष्ठ परब्रह्म अस्फुट, अद्वैत, अविकारी व पूर्ण असून तें नामरूपात्मक किंवा जगद्रूप झालें तरी जसेच्या तसेच अस्फुट, अद्वितीय, अविकारी व पूर्णच राहतें; म्हणून त्याचे ठिकाणी कोणत्याहि प्रकारचा भेद किंवा कमी-अधिकपणा मानतां येत नाही. तो अविचारामुळेच मानला जातो असा भाव. माऊलींनी चांगदेव पासष्टींत "सोनें सोनेपणा उणें। न येतांचि झालें लेणें। तेविं न वेंचता जग होणें। अंगे जया"॥ ४॥ या ओवीने हाच सिद्धान्त मांडला असून, "विशेषाकारतो भेदं वदन्ति भुवि केचन। ते महामोहसर्पेण दंष्टा एव न संशयः" (य. वै. खं. अ. १९) या श्लोकाने सूतसंहितेंतहि असेच सांगितलें आहे.

**तरी आतां साधारण आणि चांगु। ऐसा कैंसेनि पां कल्पावा विभागु। वायां आपुलियेचि मती वंगु। भेदाचा लावावा॥ ३१३॥**
**एऱ्हवीं तरी तूप कासया घुसळावें। अमृत कां रांधूनि अर्धे करावें। हा गां वायूसि काय डावें उजवें। अंग आहे॥ ३१४॥**
**पैं सूर्यबिंबासि पोट पाठीं। पाहातां नासेल आपुली दिठी। तेवीं माझां स्वरूपीं गोठीं। सामान्यविशेषाची नाहीं॥ ३१५॥**
**आणि सिनाना इहीं विभूती। मज अपारातें मविसील किती। म्हणोनि किंबहुना सुभद्रापती। असो हें जाणणें॥ ३१६॥**
**आतां पैं माझेनि एकें अंशें। हें जग व्यापिलें असे। यालागीं भेदु सांडूनि सरिसें। साम्यें भज॥ ३१७॥**
**ऐसें विबुधवनवसंतें। तेणें विरक्तांचेनि एकांते। बोलिलें जेथ श्रीमंतें। श्रीकृष्णदेवें॥ ३१८॥**
**तेथ अर्जुन म्हणे स्वामी। येतुलें हें राभस्य बोलिलेती तुम्हीं। जे भेदु एक आणि आम्हीं। सांडावा कीं॥ ३१९॥**
**हां हो सूर्य म्हणे काय जगातें। अंधारें दवडा कां परौतें। केवीं धसाळ म्हणों देवा तूंते। तरी अधिक हा बोलु॥ ३२०॥**
**तुझें नावंचि एक कोण्ही वेळें। जयांचिये मुखासि कां काना मिळे। तयांचिया हृदयातें सांडूनि पळे। भेदु जी साच॥ ३२१॥**

**अर्थ**—म्हणून निर्विशेष आत्मस्वरूपाचे ठिकाणीं साधारण व चांगला असा विभाग कां कल्पावा व व्यर्थच आपल्या बुद्धीला भेदाचा डाग कां लावावा?॥ ३१३॥ नाही तरी तूप व्यर्थच कशाला घुसळायचे, अमृताला शिजवून व्यर्थच कां अर्धे करावें? अर्जुना! वायुला डावें उजवें अंग आहे काय?॥ ३१४॥ तसेंच सूर्यबिंबाचे ठिकाणी पोट पाठ पहायला गेलों तर आपली दृष्टि नष्ट होईल, त्याप्रमाणें माझ्या स्वरूपाचे ठिकाणीं सामान्य-विशेष अशा भागाची मुळी गोष्टच नाही.॥ ३१५॥ या निरनिराळ्या विभूतींच्या द्वारें माझ्या अपार स्वरूपाची काय मोजणी होणार आहे?

म्हणून, सुभद्रापति अर्जुना! हें विभूतीचें जाणणें पुरें ॥ ३१६ ॥ आतां माझ्या एका अंशाने हें जग व्यापिलें आहे, म्हणून भेद सोडून व एक समदृष्टि ठेवूनच माझें भजन कर (सर्वत्र एक पूर्ण सच्चिदानंद परब्रह्मच पाहा, असा अर्थ.) ॥ ३१७ ॥ याप्रमाणें ज्ञानरूपी वनाला वसंताप्रमाणे प्रसन्न करणारा, विरक्त पुरुषाचा जो एकान्त म्हणजे विरक्त पुरुष सर्व संग परित्याग करून ज्या एकाचाच आश्रय करतात, असे षड्गुणैश्वर्यसंपन्न भगवान श्रीकृष्ण याप्रमाणें बोललें. ॥ ३१८ ॥ तेव्हा अर्जुन म्हणतो, प्रभो! एक भेद आहे असे पाहणारे जे आम्ही त्यांनीं तो भेद टाकावा असे जें तुम्हीं म्हटलें तें थोडें विचार न करतां बोलले असें वाटतें. ॥ ३१९ ॥ का हो देवा! (जेथे सूर्य उगवल्याबरोबर आंधार आपोआप नाहिसा होतो तेथे) आतां आंधार दूर करा असे सूर्य लोकांना म्हणतो काय? त्याप्रमाणे भेद टाकून दे, असे सांगणाऱ्या तुम्हांला, देवा! अविचारी म्हणावें, तर तें अमर्यादेचें बोलणें होतें. ॥ ३२० ॥ एक तुझें नामच जर एखादे वेळीं ज्याच्या मुखांत आलें किंवा कानांत पडलें, तर त्याच्या हृदयांतून खरोखर भेद निघून जातो. ॥३२१ ॥

**गूढार्थदीपिका**—"एक तत्त्व नाम दृढ धरी मना" "एक नाम हरि द्वैतनाम दुरी। अद्वैत कुसरी विरळा जाणे" इत्यादि हरिपाठांतील अभंगांत श्री ज्ञानेश्वर माऊलींनी भगवंताचें रूप जसें अद्वैतस्वरूप आहे, तसेंच भगवंताचें नामहि अद्वैतरूप आहे, पण नामाचें अद्वैतत्व जाणणारा विरळा असतो, असें प्रतिपादिलें आहे. भगवद्ध्यानाने जसा अनुभव येतो, तसा भगवन्नामस्मरणानेहि अद्वैत अनुभव येतो, असा त्याचा अर्थ आहे. भगवन्नामस्मरणाने अद्वैताचा अनुभव येण्याकरितां तें "वाचेसी सद्गद् जपे आधीं" सद्गद अंत:करणाने केलें पाहिजे असे माऊलीचें म्हणणें आहे.

येथेहि ज्या नामस्मरणाने व श्रवणाने हृदयांतील भेद नाहिसा होतो असे म्हटलें आहे, तें सद्गद अंत:करणाने होणाऱ्या किंवा ऐकले जाणाऱ्या नामस्मरणाविषयींच म्हटलें आहे असें समजावें.

**तो तूं परब्रह्मचि असकें। मज दैवें दिधलासि हस्तोदकें। तरी आतां भेदु कायसा कें। देखावा कवणें॥ ३२२॥**
**जी चंद्रबिंबाचां गाभारां। रिगालियावरीही उबारा। परि राणेपणें शार्ङ्गधरा। बोला हें तुम्ही॥ ३२३॥**
**तेथ सावियाचि परितोषोनि देवें। अर्जुनातें आलिंगिलें जीवें। मग म्हणे तुवां न कोपावें। आमुचिया बोला॥ ३२४॥**
**आम्हीं तुज भेदाचिया वाहाणीं। सांगीतलीं जे विभूतींची कहाणी। ते अभेदें काय अंत:करणीं। मानिलीं कीं न मने॥ ३२५॥**
**हेंचि पाहावयालागीं। नावेक बोलिलों बाहेरिसवडिया भंगीं। तंव विभूती तुज चांगी। आलिया बोधा॥ ३२६॥**
**येथ अर्जुन म्हणे देवें। हें आपुलें आपण जाणावें। परि देखतसे विश्व आघवें। तुवां भरलें॥ ३२७॥**
**पैं राया तो पांडुसुतु। ऐसिये प्रतीतीसि जाहला वरितु। या संजयाचिया बोला निवांतु। धृतराष्ट्र राहे॥ ३२८॥**
**कीं संजयो दुखवलेनि अंत:करणें। म्हणतसे नवल नव्हे दैव दवडणें। हा जीवें धडसा आहे मी म्हणें। तंव आंतुही आंधळा॥ ३२९॥**
**परि असो हें तो अर्जुनु। स्वहिताचा वाढवितसे मानु। कीं याहीवरी तया आनु। थिंवसा उपनला॥ ३३०॥**
**म्हणे हेचि हृदयाआंतुली प्रतीती। बाहेरी अवतरो कां डोळ्यांप्रती। इये आर्तीचांया पाउलीं मती। उठती जाहली॥ ३३१॥**
**मियां इहींच दोहीं डोळां। झोंबावें विश्वरुपा सकळा। एवढी हांव तो दैवाआगळा। म्हणऊनि करी॥ ३३२॥**
**आजि तो कल्पतरूची शाखा। म्हणोनि वांझोळें न लगती देखा। जें जें येईल तयाचिया मुखा। तें तें साच करीतसे येरु॥ ३३३॥**
**जो प्रल्हादाचिया बोला। विषाहीसकट आपणचि जाहला। तो सद्गुरु असे जोडला। किरीटीसीं॥ ३३४॥**
**म्हणोनि विश्वरूप पुसावयालागीं। पार्थ रिगता होईल कवणें भंगीं। तें सांगेन पुढिलिये प्रसंगीं। ज्ञानदेव म्हणे निवृत्तीचा॥ ३३५॥**

**इति श्रीज्ञानदेवविरचितायां भावार्थदीपिकायां दशमोऽध्याय: ॥ १० ॥**

**अर्थ**—पूर्णब्रह्मच असलेला तो तूं, माझ्या सुदैवाने, माझ्या हातावर पाणी सोडून दान दिल्या गेला-म्हणजे माझ्या सुदैवाने सर्वस्वीं तूं माझ्या स्वाधीन झाला आहेस तेव्हा आतां कशाचा, कोठे व कोणी भेद

पाहावा ? ॥ ३२२ ॥ देवा! चंद्रबिंबाच्या गाभाऱ्यामध्ये—म्हणजे मध्यभागीं शिरल्यानंतरहि उकडूं लागेल काय? पण देवा! स्वामीपणाचे नात्याने हे तुम्ही बोलत आहां. ॥ ३२३ ॥ अर्जुनाचें भाषण ऐकून भगवंताला खरोखर आनंद झाला व त्यांनी अर्जुनाला प्रेमाने आलिंगन दिलें. नंतर भगवान म्हणतात, अर्जुना! माझ्या बोलण्याचा राग मानूं नकोस. ॥ ३२४ ॥ आम्ही भेदाला धरूनच तुला जो विभूतीचा विस्तार सांगितला, तो अभेदपूर्वक तुझ्या अंत:करणांत ठसला की नाही. ॥ ३२५ ॥ हें पाहण्याकरितांच असे मी थोडेसें बाह्यात्कारी बोललों; पण तुला विभूतीचा बोध उत्तम प्रकारें झाला आहे हें समजून आलें. ॥ ३२६ ॥ तें ऐकून अर्जुन म्हणतो, देवा! हें आपलें आपण जाणां; पण सर्व जगांत तूच एक व्यापून भरला आहेस, असे मात्र मी पाहत आहे. ॥ ३२७ ॥ संजय म्हणतो, राजा धृतराष्ट्रा! तो पांडुसुत अर्जुन असा अभेद किंवा अद्वैताचा अनुभव घेऊं लागला; परंतु संजयाचें भाषण ऐकून धृतराष्ट्र स्तब्धच राहिला. ॥ ३२८ ॥ हें पाहून, संजयाला धृतराष्ट्राविषयीं थोडे दु:ख झालें व तो म्हणूं लागला की भगवंताच्या मुखाने असा अद्वैतज्ञानाचा उपदेश ऐकण्याचें सद्भाग्य प्राप्त होऊनहि, हा त्या भाग्याला दूर लोटतो हें आश्चर्य नव्हे काय? हा धृतराष्ट्र वरून आंधळा आहे; पण अंत:करणांतून आंधळा नसेल असें मला वाटत होतें, परंतु तो आंतहि आंधळाच आहे-म्हणजे त्याच्या अंत:करणांत ज्ञानसूर्याचीं किरणें शिरत नाहीत असे मला आतां वाटू लागले. ॥ ३२९ ॥ पण असो. याचें आपल्याला काय करायचें आहे. अर्जुन मात्र आपलें वाढतें आत्मकल्याण करून घेण्याची इच्छा करूं लागला; कारण यानंतरहि त्याच्या अंत:करणांत दुसऱ्या गोष्टीविषयीं भरंवसा वाटू लागला. ॥ ३३० ॥ संजय म्हणतो हा हृदयांतील अनुभव बाहेर डोळ्याला प्रत्यक्ष दिसावा अशा इच्छेच्या पावलाने त्याची बुद्धि उसळू लागली. ॥ ३३१ ॥ अर्जुन हा थोर भाग्यवान होता, म्हणूनच याच दोन्ही डोळ्यांनी भगवंताच्या विश्वरूपाला मिठी मारावी अशी थोर हांव करीत होता. ॥ ३३२ ॥ प्रस्तुत अर्जुन कल्पतरुची फांदी होता, म्हणूनच तिला वांझ फूल लागत नव्हतें. जी जी इच्छा त्याने बोलून दाखवावी ती ती भगवान पूर्ण करीत असे. ॥ ३३३ ॥ जो प्रल्हादाच्या शब्दासाठी विषहि आपण झाला, तो श्रीकृष्ण भगवान, अर्जुनाला गुरुरूपाने प्राप्त झाला होता. ॥ ३३४ ॥ म्हणून अर्जुन आतां विश्वरूपाच्या दर्शनाकरितां कोणत्या रीतीने प्रश्न करील हें श्रीनिवृत्तिनाथांचे श्रीज्ञानेश्वर महाराज म्हणतात, पुढील अध्यायांत सांगणार आहे. ॥ ३३५ ॥

***श्रीसद्गुरुकृपेने श्रीज्ञानेश्वरीच्या दहाव्या अध्यायाचा मराठी अनुवाद गूढार्थदीपिकेसह समाप्त झाला तो सद्गुरुचरणीं समर्पण असो.***



## समारोप

मागील नवव्या अध्यायांतील शेवटील श्लोकांत भगवंतांनी अर्जुनाला सांगितलें की, अर्जुना! माझेंच ध्यान कर, माझेंच प्रेमाने भजन कर, माझ्या संकल्पाने कर्म करून विषयांचा संकल्प नि:शेष नाहीसा कर व सर्वत्र मद्रूप पाहून नमस्कार कर म्हणजे मला तूं नि:संशय प्राप्त होशील. असें हें भगवंतांनी संपूर्ण भगवद्भक्तीचेंच वर्णन केलें. हें ऐकून स्वरूपाने व ऐश्वर्यादि गुणाने अमर्याद असलेल्या परमेश्वराला, सर्व दृष्टीने अपूर्ण असलेल्या या जगांत कसें ओळखतां येईल अशी शंका येऊन अर्जुनाने भगवंताला प्रार्थना केली की, भगवंता! मला आपलें विभूतित्व किंवा श्रेष्ठत्व कोठे कोठे आहे, ते सांगा.

भगवान म्हणतात, अर्जुना! ज्याप्रमाणे पाण्यावर उठलेल्या तरंगाच्या आंत-बाहेर पाणीच असतें, त्याप्रमाणे या संपूर्ण जगाचें आदिकारण मीच असल्यामुळे संपूर्ण जगांत व्यापून असलेला मी, पुन: जगांतच सगुण साकार व्यक्तरूपाने कसा प्रगट होतो हे, देव किंवा महर्षि यापैकीं कोणालाहि कळूं शकत नाही, मी जगांत सगुण साकारस्वरूपाने प्रगट झालों, तरी मी अनादि, जन्मरहित व सर्व ब्रह्मांडाचा स्वामी राहतो; हें जो जाणतो तो सर्व कर्मापासून मुक्त होतो.

बुद्धि, ज्ञान, क्षमा, सत्य इत्यादि सूक्ष्मभाव व महर्षि इत्यादि स्थूलभाव माझ्यापासूनच झाले आहेत; म्हणून या सर्व माझ्या विभूतिच आहेत, हें जो जाणतो तो माझ्याशीं निश्चळ ऐक्य पावतो; म्हणूनच हें ज्ञान संपादन करून सर्व ज्ञाते पुरुष माझ्या एकाचेंच प्रेमाने भजन करतात. चित्तांत माझें अखंड ध्यान ठेऊन जे माझें भजन करण्याकरितांच प्राण धारण करतात, त्यांना माझ्या ऐक्यज्ञानामुळे आपल्या जन्ममरणाचीहि कल्पना येत नाही. अशा रीतीने प्रेमाने भजन करीत माझ्याशीं अखंड एकरूप झालेल्या भक्तांच्या ऐक्यस्थितीचें मी संरक्षण करतो—म्हणजे माझ्यापासून त्यांचें चित्त ढळूं देत नाही.

त्यावर अर्जुन म्हणतो, देवा! आतां आपण जसें सांगितलें तसेंच व्यासादि महर्षि नेहमीं घरीं येऊन सांगत असत, पण माझ्यावर कृपा करून स्वत: तुम्ही सांगेतोपर्यंत त्याचा बोध माझे अंत:करणांत ठसत नसे. आज मात्र आपल्या कृपेने तुझ्या स्वरूपाविषयीं पूर्ण बोध अंत:करणांत ठसला गेला.

आतां या सृष्टींत जेथे तुमच्या श्रेष्ठत्वाचें किंवा विभूतीचें दर्शन घडेल अशा कोणकोणत्या विभूति आहेत त्या मला सांगा. ही प्रार्थना ऐकून अर्जुन हा निर्गुण ज्ञानाने व सगुणाच्या प्रेमाने संपन्न झाला असे वाटून, भगवंताला अत्यंत आनंद झाला. पुढे भगवंतांनी त्याला आपल्या मुख्य मुख्य पंच्याहत्तर विभूति सांगितल्या.

विभूति सांगितल्यानंतर, भगवान म्हणतात, अर्जुना! मी निर्गुणस्वरूपाने तसाच सगुणस्वरूपानेहि पूर्ण अद्वैत स्वरूप असल्यामुळे, विषमभावरहित असा सदासर्वदा निर्विशेष स्वरूप आहे; म्हणून जगांतहि मला पाहतांना चांगला, वाईट, अपूर्ण असा कांही एक भेद ठेवूं नकोस. मी सर्वत्र परिपूर्ण आहे, हीच एक दृष्टि ठेव.

**॥ श्रीमद्सद्गुरु श्रीज्ञानेश्वर महाराजार्पणमस्तु ॥**

